

उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

स्थापना २६ जुलै १९९१

'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,
बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७.
दूरध्वनी क्रमांक : २४२१ ००४७



॥ श्रीराम ॥

सप्रेम नमस्कार

श्री समर्थ रामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्वज्ञानापासून प्रेरित होऊन 'ओंकार ट्रस्ट' या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा या शुभदिनी - दिनांक २६ जुलै १९९१ रोजी करण्यात आली. (रजि. क्र. इ. १५०५, दि. १०-१०-१९९१)

देणगीदारांना ८० ग अन्वये प्राप्तीकरांत सूट मिळते.

आमच्या न्यासाच्या उद्दिष्टाप्रमाणे - सामाजिक बांधिलकीस्तव विविध उपक्रम ''विनामूल्य'' राबविले जातात, त्यापैकी महत्वाचे काही उपक्रम पुढील प्रमाणे -

१) गुजरवाडी - निंबाळकरवाडी (कात्रजपासून पुढे ५ कि.मी. अंतरावर ग्रामीण भागात) येथे न्यासातर्फे मुले-मुलींसाठी संस्कार वर्ग घेण्यात येतो.

२) मांगडेवाडी ( कात्रजपासून सुमारे ३ कि.मी.) येथे जिल्हा परिषद शाळेतील मुला-मुलींसाठी संस्कार वर्ग आयोजित केला जातो.

३) कर्वे स्त्री शिक्षण संस्था येथील इयत्ता आठवीतील निवासी मुलींसाठी (सुमारे १८० मुली) संस्कार वर्ग घेतला जातो.

४) डॉ. पारस शहा यांचे नेतृत्वाखाली आतापर्यंत निरनिराळ्या वर्षी आठ नेत्र चिकित्सा शिबिरे गरीब व गरजू व्यक्तींसाठी घेण्यात येवून गरजूंना औषधे व चष्मे मोफत देण्यात आली.

५) तसेच न्यासाने कॅन्सर चिकित्सा शिबीर - मांगडेवाडी येथे, मधुमेह चिकित्सा शिबीर - बिबवेवाडी पुणे येथे व सर्वसाधारण रोगनिदान शिबीर - गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे आयोजित केली आहेत.

६) उत्कृष्ट सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तिला अथवा संस्थेला ''वसुंधरा कृतज्ञता'' (न्यासाच्या संस्थापिकेच्या नावाने) पुरस्कार गेली १२ वर्षे देण्यात येत आहे. या पुरस्काराचे स्वरुप मानपत्र, स्मृतिचिन्ह व रोख रक्कम रु.५०००/- असे आहे. पुरस्कार देण्यात आलेल्या व्यक्ति-संस्था - १) डॉ. स्वर्णलता भिशीकर-सोलापूर २) प्रा. डॉ. अशोक कामत-पुणे ३) समर्थ भक्त सुनीलजी चिंचोलकर-पुणे ४) द्वा. वा. केळकर - पुणे ५) डॉ. सुनीलकुमार लवटे - कोल्हापूर ६) सौ. सिंधूताई सपकाळ - ता. पुरंधर (जि. पुणे) ७) डॉ. पारस शहा - पुणे ८) श्री. श्रीकांत मुंदडा - पुणे ९) श्री. गिरीष यशवंत प्रभुणे - चिंचवड १०) मानव्य संस्था - (संस्थापिका - कै. विजयाताई लवाटे) पुणे ११) डॉ. राजा व सौ. रेणूताई दांडेकर - ता. दापोली (जि. रत्नागिरी) १२) आपल घर (संस्थापक - श्री. विजयजी व सौ. साधनाताई फळणिकर)

७) न्यासाने मराठी व इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प श्री. नानासाहेब लाभे, नागपूर यांचे मार्गदर्शनाखाली ६ वर्षांच्या कालावधीत सुमारे ३५ शाळांमधून

घेतला व त्याचा फायदा सुमारे १०,००० पेक्षा जास्त विद्यार्थ्यांना झाला.

८) न्यास वेळोवेळी आध्यात्म, संतविचार इ. करिता थोरामोठ्यांची प्रवचने / व्याख्याने आयोजित करते. समर्थ भक्त श्री. सुनीलजी चिंचोलकर यांची श्री. एकनाथ महाराज यांचे चिरंजीव काव्य या विषयावर ३ प्रवचने आयोजित करण्यात आली होती.

तसेच यावर्षी ''यांनी घडविला महाराष्ट्र'' या विषयांवर अधिकारी व्यक्तिंची व्याख्याने आयोजित केली होती.

क्रांतीकारक – श्री. निनाद बेडेकर

समाजसुधारक – डॉ. सदानंद मोरे

संतांचे कार्य – डॉ. यशवंत पाठक

याशिवाय डॉ. यशवंत पाठक, प्रमुख – ज्ञानदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ, पुणे यांनी १) येणे वाग्यज्ञे तोषावे – श्री ज्ञानेश्वर महाराज २) एका जनार्दनी शरण – श्री एकनाथ महाराज ३) उत्कट भव्य तेचि घ्यावे – श्री समर्थ रामदास स्वामी या विषयांवर ३ दिवसांची प्रवचन माला गुंफली.

९) न्यास दरवर्षी खालील शिष्यवृत्या – पारितोषिके देत आहे –

१) हुशार व गरीब विद्यार्थीनीला उच्च शिक्षणासाठी रु. ५०००/– ची शिष्यवृत्ती कै. नलिनी विष्णू जोगळेकर यांचे नावाने, त्यांचे बंधु श्री. गजानन विष्णू जोगळेकर यांनी दिलेल्या देणगीतून देण्यांत येते.

२) श्रीमती मृणालिनी अशोक जोगळेकर यांनी त्यांचे पती कै. श्री. अशोक विष्णू जोगळेकर यांचे स्मरणार्थ दिलेल्या देणगीतून गुजरवाडी – निंबाळकरवाडी येथील एक विद्यार्थी व एक विद्यार्थीनीस प्रत्येकी रु. ७००/– ची शिष्यवृत्ती देण्यांत येते.

३) श्री. विष्णू काशिनाथ आठल्ये यांनी दिलेल्या देणगीतून शालांत परिक्षा, पुणे विभागांत संस्कृत व मराठी विषयांत प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांना कै. श्री. काशिनाथ लक्ष्मण आठल्ये व कै. सौ. विजया काशिनाथ आठल्ये या नावाने पारितोषिके देण्यांत येतात.

१०) ओंकार न्यास गेली १० वर्षे गरीब मुले–मुली दत्तक घेत असून त्यांचा पालन–पोषण, शिक्षण इ. खर्च करत आहे. त्यांचे निवासासाठी गुजरवाडी – निंबाळकरवाडी येथे रु. ६,००,०००/– खर्च करून १६०० चौरस फूट इमारत बांधकाम केले आहे. सध्या ६ मुले–मुली दत्तक घेतली आहेत. त्यांच्या व वाडीतील मुलांच्या विकासासाठी खालील कार्यक्रम राबविले जातात.

दररोज २ तास इंग्रजी व हिंदीचा वर्ग घेतला जातो व त्यालाही मुलांची उपस्थिती चांगली असते आणि त्यांना त्याचा छान उपयोग होत आहे.

संस्कार वर्गात नेहमीच्या उपक्रमाशिवाय गीतापाठ चालू केला आहे. गीता शिकविण्यास कसबा पेठ, पुणे येथून श्री. किशोर वैद्य सर विना मानधन नियमीत येतात. त्यांनी स्वत: मुलांसाठी पुस्तके, सीडी इ. सर्व साहित्य आणले आहे. त्यांच्या सुलभ रीतीने शिकविण्याच्या पद्धतीमुळे मुलांना सुद्धा गीतापाठाची गोडी लागली आहे.

याशिवाय विश्वस्त श्रीमती मालती निमोणकर यांनी यावर्षी नवीन उपक्रम चालू केला आहे. वाडीतील इयत्ता १०वी मध्ये असणाऱ्या काही मुलींना घरी अडचणी असतात, अभ्यासाचे वातावरण नसते, मार्गदर्शन करणारे कोणी नसते. श्रीमती निमोणकर अशा मुलींना न्यासाच्या वाडीतील जागेत अभ्यासाला बोलावून त्यांचेकडून योग्य रीतीने अभ्यास करून घेतात, त्यांच्या अडचणी समजावून घेऊन त्यांना आर्थिक व मानसिक आधार देतात. खरेतर मुलींना मनापासून शिकायचे असते परंतु घरातील वातावरण, अडचणी इ. मुळे त्या नापास होतात व नंतर शिक्षण बंद होते ह्यावर मात करण्याच्या दृष्टीने श्रीमती निमोणकर हा प्रयत्न करत आहेत.

१२) ओंकार न्यास दरवर्षी कल्याणी विशेषांक वेगवेगळ्या संतांवर प्रकाशित करत असते. आतापावेतो न्यासाने एकूण १७ अंक प्रकाशित केले आहेत. त्यातील काही संतांची नांवे अशी – श्री ज्ञानेश्वर महाराज, श्री गुरुदेव रानडे, श्री टेंबे स्वामी, श्री स्वरुपानंद, पावस, श्री स्वामी चिन्मयानंद, श्री गोंदवलेकर महाराज, श्री समर्थ रामदास स्वामी इ. यापैकी कल्याणींच्या २००० साली प्रकाशित झालेल्या स्वामी श्री स्वरुपानंद विशेषांकास मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट आध्यात्मिक अंक म्हणून पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार मिळाला आहे.

न्यासाने प्रकाशित केलेल्या सर्व कल्याणी विशेषांकास साधक / वाचक यांचेकडून फारच उत्तम प्रतिसाद मिळाला आहे. मागील कल्याणी विशेषांक एप्रिल २००८ मध्ये समर्थ रामदास स्वामी यांचेवर श्री. चंद्रशेखर महाराज आठवले (पंढरपूर) यांचे शुभहस्ते प्रकाशित करण्यांत आला असून पुढील कल्याणी विशेषांक आद्य श्री शंकराचार्य यांचेवर एप्रिल २००९ मध्ये प्रकाशित करण्यात येत आहे. तसेच समाजासाठी अतुलनीय कार्य केल्याबद्दल वसुंधरा पुरस्कार देण्यांत येणार आहे.

सुसंस्कृत समाज बनण्यासाठी बालांचे मन सुसंस्कृत होणे आवश्यक आहे. ट्रस्टच्या या कार्यात समाजातील विविध स्तरांतून सक्रिय पाठिंबा व सहभाग मिळत आहे.

आपण आमच्या कार्यास

१) देणगी रुपाने २) वस्तु रुपाने

३) न्यासात कार्यरुपाने भाग घेऊन

मदत करु शकता.



उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)
'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १, बिबवेवाडी,
पुणे ४११ ०३७.
टेलिफोन क्रमांक : ४२१००४७
मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये
नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक -
ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१
कलम ८०ग खाली आयकर सवलत क्रमांक :
पी एन् टी/ ८० जी / ०२० / ९९ - २००० दि. ६-४-९९
कालावधी १-४-१९९९ ते ३१-३-२००२




❖ **मुखपृष्ठ संकल्पना** ❖
श्री. अभय पुरंदरे

❖ **अक्षरजुळणी** ❖
प्रतिमा ऑफसेट, पुणे ४.

❖ **छपाई** ❖
प्रतिमा ऑफसेट, पुणे ४. फोन : ५४६०२१६

❖ **प्रोसेसिंग** ❖
**पिक्सेल ग्राफिक्स प्रा. लिमिटेड,** शनिवार पेठ, पुणे,
यांच्या सौजन्याने.





ओंकार ट्रस्ट २००२ चा
**"श्रीगुलाबराव महाराज"** विशेषांक, संपादक सौ. रजनी गोपाळ काळे, ट्रस्टी यांनी प्रतिमा ऑफसेट, पुणे ४. येथे छापून, श्री. भालचंद्र वा. सातवळेकर, ट्रस्टी, यांनी 'विसावा' अनिकेत सोसायटी क्र. १, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७ येथे प्रकाशित केला.


टीप : (१) सदरचा विशेषांक **फक्त खाजगी वितरणासाठी** असून तो विनामूल्य आहे.

(२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखनाशी संपादक सहमत असतीलच असे नाही.

# ओंकार ट्रस्टची वाटचाल

श्रीसमर्थरामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्त्वज्ञानापासून प्रेरित होऊन **'ओंकार ट्रस्ट'** या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा दि. २८.७.१९९१ रोजी करण्यात आली. संस्था सार्वजनिक न्यास म्हणून नोंदविण्यात आली आहे.

**संस्थेचे मुख्य उद्देश :** १) संस्कार वर्ग व बालवाचनालय, २) दवाखाना व प्रसुतिगृह, ३) ध्यानधारणा व ४) अध्यात्मिक जनजागरण.

गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे १ एकर जागा घेतली असून त्या ठिकाणी ऑपरेशन थिएटरसह ६ खाटांचे **'राधाबाई हर्डिकर प्रसूतिगृह'** या नावाने कार्यरत आहे. दररोज दवाखानापण चालू आहे. या ग्रामीण भागात मुळीच वैद्यकीय सेवा उपलब्ध नाही.

**डॉ. पारस शहा** यांचे नेतृत्वाखाली ७ **नेत्र चिकित्सा शिबीरे** घेतली असून ८ वे चिकित्सा शिबिर वाघापूर येथे घेण्यात आले. मुख्यतः नाना महाराज तराणेकर त्रिपदी परिवार व वेलफेअर मेडिकल फाऊंडेशन यांच्या सहकार्याने १५५ जणांना मोफत चष्मे व औषधे देण्यात आली. दिनदयाळ हॉस्पिटल मार्फत एक **चिकित्सा शिबीर** घेण्यात आले.

सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तीला / संस्थेला १९९७ पासून दरवर्षी **'वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार'** देण्यात येतो. मराठी-इंग्रजी शुद्धाक्षर सुधार प्रकल्प गेले ५ वर्षे श्री. नानासाहेब लभे यांचे मार्गदर्शनाखाली ३५ शाळांतून राबविण्यात आला. कल्याणीच्या श्रीगुरुदेव रानडे विशेषांकाचे प्रकाशन व सामाजिक कार्य करणारे कोल्हापुरचे श्री. सुनीलकुमार लवटे यांना २००१ चा 'वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार' प्रदान. सुप्रसिद्ध पत्रकार व लेखक श्री. विजय कुवळेकर यांचे शुभहस्ते देण्यात आला.

गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे ७ दिवसांचे संस्कार शिबिर घेण्यात आले. १८ मुला-मुलींनी भाग घेतला. रामकृष्ण मठ पुणे येथील संस्कार शिबीरात क्राफ्टचे प्रकार ट्रस्टतर्फे शिकविण्यात आले. मांगडेवाडी, गुजरवाडी, निंबाळकरवाडी येथे चित्रकला स्पर्धा घेण्यात आल्या. कर्वे स्त्रीशिक्षण संस्था येथे चित्रकला, निबंध व पाठांतर स्पर्धा आयोजित केल्या होत्या. श्री. मोरेश्वर जोशी यांची ३ कीर्तने ३ ठिकाणी व १ प्रवचन आयोजित केले होते.

स.भ. श्री. सुनीलजी चिंचोलकर यांची ५ दिवस रामायणावर प्रवचने झाली. कर्वे स्त्रीशिक्षण संस्थेत पण प्रवचन झाले. श्री. ज्ञानेश पुरंदरे यांनी कर्वे स्त्रीशिक्षण संस्था व फडगेट पोलीस स्टाफ क्वार्टर्स येथे क्रांतिकारकांवर भाषणे दिली.

सुखसागर सांस्कृतिक संघ, बिबवेवाडी यांनी आयोजित केलेल्या १५-२० वयोगटातील ३ दिवसांच्या मुला-मुलींच्या शिबीरात ट्रस्टतर्फे भाग घेण्यात आला.

कल्याणीच्या २००० साली प्रकाशित झालेल्या स्वामी स्वरूपानंद विशेषांकाला मुंबई मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट अध्यात्मिक अंक म्हणून पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार मिळाला.

ट्रस्टने २००० साली नवरात्रीच्या प्रथम दिवशी २ अनाथ मुले व १ मुलगी दत्तक घेतली असून त्यांच्याबरोबर २ महिला गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे रहात आहेत. त्यांच्या रहाण्यासाठी १६०० स्वे. फुटांचे बांधकाम रु. ६/- लाख खर्च करून गुजरवाडी येथे सुरू केले आहे. चार महिन्यांत इमारत पूर्ण केली जाणार आहे.

इंजिनिअरींग, मेडिकल किंवा आर्किटेक्टला प्रवेश घेणाऱ्या **विद्यार्थीनीस कै. नलिनी विष्णू जोगळेकर या नावाची रु. १०००/- ची शिष्यवृत्ती** गेली २ वर्षे देण्यात येत आहे.

देणगीदार, जाहिरातदार, लेखक, संस्थेचे हितचिंतक यांचा मेळावा गुजरवाडी-निंबाळकरवाछी येथे संपन्न झाला.

संस्थेच्या उद्दीष्ट पूर्तीसाठी तनमनधनाची आवश्यकता आहे. त्यासाठी समाजातील अनेक सहृदय दानशूर व्यक्ती निश्चितच पुढे येतील असा दुर्दम्य आत्मविश्वास ट्रस्टला आहे.

D. B. THENGADI
B.A.L.L.B., Ex. M.P. (RS)

Founder :
Bharatiya Mazdoor Sangh
Bharatiya Kisan Sangh

Resi. : 129 SOUTH AVENUE,
NEW DELHI-110011
PH. : 3011286

Offi. : RAMNARESH BHAVAN,
TILAK GALI, PAHAR GANJ,
NEW DELHI - 1100055 (INDIA)
PH. : 523644

# 卐 हार्दिक शुभेच्छा... 卐

प्रातःस्मरणीय सद्‌गुरु मधुराद्वैताचार्य श्री गुलाबराव महाराज हे विसाव्या शतकातील सत्पुरुष ! त्यांचा भारतीय समाज, पाश्चात्य विज्ञान, तत्त्वज्ञान आणि नीति याचा विशेष अभ्यास होता. सर्व विषयांत समन्वयाची विचारधारा असल्याने त्यांना 'समन्वय महर्षि' म्हणत असत. भक्तीलाही अद्वैताची जोड दिली असल्याने मधुरा भक्तीला निर्झर जणू आजही वाङ्मयाद्वारे वाहात आहे.

पुण्यातील ओंकार ट्रस्ट व त्याचे विश्वस्त या वर्षीचा 'कल्याणी' अंक पू. गुलाबराव महाराज यांचे विषयी प्रसिद्ध करीत आहेत. म्हणजेच जनसामान्यांपर्यंत कल्याणाचा मार्ग सुकर करीत आहेत. माझ्या सर्वांना हार्दिक शुभेच्छा !

डी. बी. ठेंगडी
दत्तो- ठेंगडी

॥ श्रीराम ॥





**श्रीबाबाजी महाराज पंडित**

# संपादकीय

भारताचा सांस्कृतिक इतिहास गौरवशाली आहे. हा गौरव मुख्यत्वे करून या भूमीतील संतांच्या शिकवणीतून प्राप्त झाला आहे. अनेक आघात सोसूनसुद्धा अजून आपली संस्कृती तग धरून आहे आणि त्याचा विस्तारपण होत आहे. ही संत कृपाच होय. धर्माला ग्लानी आली असता आणि दुष्टांचा सुकाळ झाला असता धर्म रक्षणासाठी व दुष्टांचे निर्दालनासाठी भगवान 'विष्णू' ज्याप्रमाणे नवा जन्म घेतात त्याप्रमाणेच भारतीय संस्कृतीला परकीयांचे तडाखे बसू लागले की संस्कृती रक्षणासाठी आपल्या भूमीमध्ये संतांचे अवतार झालेले आहेत असे आपल्या निदर्शनास येते. म्हणूनच भारतामध्ये संत हे भगवान स्वरूप मानले आहेत.

माधान या गावी अमरावती जिल्ह्यामध्ये जन्म घेतलेले श्रीगुलाबराव महाराज हे याच संत परंपरेतील सत्पुरुष होत. १८८१ ते १९१५ हा त्यांचा कालखंड. त्यांच्या या काळामध्ये युरोपियन विचारांचा पगडा भारतीयांच्या वरती इतका जबरदस्त होता की त्यातून ते बाहेर पडू शकत नव्हते. किंबहुना त्यामध्ये ते जास्तच गुरफटत चालले होते. अशा अंधकारमय परिस्थितीमधे भौतिक जग बघू न शकणाऱ्या अंध महाराजांनी प्रज्ञाचक्षूंनी अनेक सांस्कृतिक विषयांचा परामर्ष घेतला. संस्कृती उज्वल करणाऱ्या मूलभूत विचारांना योग्य दिशा दिली. नवव्या महिन्यात अंधत्व आलेल्या महाराजांचे हे कार्य पाहिले की आपली प्रज्ञा थक्क होऊन तोंडात बोट घालायला लावते. अवघ्या ३४ वर्षाच्या आयुष्यात संस्कृत, मराठी, हिन्दी व व्रज भाषेमधे १३० पेक्षा जास्त ग्रंथांची रचना त्यांनी केली आहे. त्यांच्या साहित्यात संगीत, व्याकरण, आयुर्वेद, काव्य, गायन, मानसशास्त्र, मानसायुर्वेद, कौटुंबिक समस्या, शैक्षणिक समस्या प्रेमभाव इत्यादी अनेक विविध विषयांचा मौलीक पद्धतीने परामर्ष घेऊन वैदिक संस्कृतीच कशी सर्वश्रेष्ठ आहे आणि सर्व धर्म व सर्व संस्कृतींचा मूलभूत पायापण या संस्कृतीमधेच सामावलेला आहे हे सत्य जगापुढे त्यांनी साधार मांडले आहे.

महाराजांचे उत्तराधिकारी व श्रीमहाराजांच्या वाङ्मयीन मूर्तीचे शिल्पकार श्रीबाबाजी महाराज पंडित यांनी १९०५ मधे घरदार, शिक्षण सोडून गुरुसेवेस आरंभ केला. त्यांनी महाराजांची अगदी निरपेक्ष सेवा केली त्यांचे ते निर्व्याज्य व उत्कट प्रेम पाहून महाराजांनी उद्‌गार काढले 'मी पंडिताला वश झालो आहे.' गुरुभक्तीने ओथंबलेल्या अंतःर्मनाला आणखी काय हवे असते? शेवटच्या वेळी महाराजांनी आपण होऊन आशिर्वाद दिला, 'अरे पंडित मी आजवर तुला काही दिले नाही. माझे ग्रंथ वाच तुला समजतील.' या अमोघ शब्दांनी या हृदयीचे त्या हृदयी सामावले. पंडितांचे सारे जीवनच उजळून गेले. त्या सोज्वळ प्रकाशात महाराजांच्या ग्रंथांची सर्व हस्तलिखिते सूक्ती रत्नावलीच्या यष्टीरूपाने प्रकाशित झाली आणि पंडितांच्या अखंड परीश्रमाने महाराजांची वाङ्मयीन मूर्ती साकारली.

'कल्याणी' विशेष अंकाच्या रूपाने गुंफलेल्या गुलाब पुष्पांच्या हारामधील हे ११ वे साहित्य पुष्प श्रीगुलाबराव महाराजांच्या चरणी विनम्र भावाने समर्पित करताना न्यासाला अतिशय आनंद होत आहे. अंकाच्या या निमित्ताने ज्ञानोत्तर भक्तीचा प्रसार करणाऱ्या या महान पुण्य पुरुषाचे जवळून दर्शन घडले हे आमचे परम भाग्य असे आम्ही समजतो. आज ज्ञानेश्वर महाराजांचा फेटा घातलेला जो प्रचलित फोटो आहे त्याचे चित्र श्रीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे चित्रकाराने श्री. धामापूरकर यांचे घरी अकोला येथे काढलेले आहे. श्रीमहाराजांनी सुरू केलेल्या कात्यायनी व्रतास २००२ ते २००३ या वर्षामध्ये शंभर वर्षे पूर्ण होत आहेत.

श्रीगुलाबराव महाराजांवर नुकतीच आळंदी येथे वेबसाईट सुरू करण्यात आली असून त्याचा पत्ता 'Website http//www gulabrao maharaj.org.' असा आहे.

प्रज्ञाचक्षू, मधुराद्वैताचार्य, समन्वय महर्षी श्रीज्ञानेश्वर मधुराद्वैत संप्रदायाचे जनक असणारे व स्वतःला ज्ञानेश्वर कन्या व श्रीकृष्ण पत्नी म्हणवून घेणाऱ्या श्रीगुलाबराव महाराजांना नतमस्तक होऊन हे साहित्य पुष्प अर्पण !

विचारवंत लेखक हे आमच्या अंकाच्या यशाचे मुख्य मानकरी आहेत त्यांचे बहुमोल लिखाण ते आम्हाला देतात त्यामुळेच सर्वांना आवडणारा हा अंक आम्ही काढू शकतो याची आम्हाला पूर्ण जाणीव आहे. मानधन न घेता लेख देणाऱ्या या सर्व लेखकांचे आम्ही शतशः ऋणी आहोत. त्यांचे ऋण आम्ही फेडू शकणार नाही तरी औपचारिक शिष्टाचार म्हणून आम्ही त्यांचे आभार मानीत आहोत.

त्याचप्रमाणे अंक काढण्यासाठी आर्थिक सहाय्य करणाऱ्या जाहीरातदारांचे पण आम्ही ऋणी आहोत. लेखक, जाहिरातदार तसेच अंक काढणेसाठी हस्ते-परहस्ते मदत करणाऱ्या सर्व हितचिंतकांचे पुनःश्च आभार मानल्याशिवाय रहावत नाही.

वाचकांचा प्रतिसाद व हितचिंतकांच्या सदिच्छा या बळावर ओंकार न्यासाची वाटचाल प्रगतीपथाच्या दिशेने चालू आहे.

जय जय रघुवीर समर्थ

**— सौ. रजनी काळे**



श्रीगुलाबराव महाराजांच्या नित्यपुजेतील श्री माऊलींच्या पादुका



श्रीगुलाबराव महाराजांचा कात्यायनी व्रताच्या वेळेच्या पूजेचा फोटो

# ज्ञानेशकन्याबाराष्टी

"या आर्यावर्तांभीतरी । असंख्य साधु साक्षात्कारी । होवोनि गेले आजवरी । ऐसा इतिहास सांगतसे ॥१॥ व्यास नारद जैमिनी । प्राणवाह याज्ञवल्क्य मुनि । जे विविध ज्ञानाचे वासरमणी । शब्दसृष्टीचे ईश्वर ॥२॥ शब्दसृष्टी जयांची । ओळख करवी ईश्वराची । ज्या वाचेनें जीवाची । उपाधि जाऊनि शिव होई ॥३॥ ज्यांनीं नानाग्रंथ निर्मिले । पुढिल्या पिढीस शाहाणे केले । आपल्या कृतीने जाहले । इहपरलोकी आजरामर ॥४॥

या महात्म्यानंतर । ईश्वराकडोनि साचार । कित्येक महात्मे भूमीवर । आले सद्धधर्माच्या संरक्षणा ॥५॥ श्रीमत् शंकराचार्य जगद्गुरु । जे पदनताचे कल्पतरु । अध्यात्मविद्येचे सागरु । वादाटवीचे पंचानन ॥६॥ या थोर दिव्य पुरुषांनी । महत्कार्य केले जनी । ज्यांचे पाश्चिमात्यांनीही । कौतुक केले विबुध हो ॥७॥ मध्यंतरी या देशाला । सहज पडता काळ आला । अभक्तीचा जोर झाला । दैन्य आले सर्वत्र ॥८॥ दुष्ट चढले वैभवासी । मान न मिळे सन्नीतीसी । सद्धर्माच्या टवाळीशी । चार्वाक करूं लागले ॥९॥ त्याचें करावया निर्मूलन । नाथपंथीं साधुजन । होते झाले अवतीर्ण । त्या समयीं या देशीं ॥१०॥ ते गोरख मच्छिंद्र जालंदर । गहिनीनाथादि थोर थोर । यांही केला जीर्णोद्धार । त्या अध्यात्मविद्येचा ॥११॥

या अध्यात्म ज्ञानाचा ठेवा । निवृत्तीस लाधला बरवा । त्यांनींच तो ज्ञानदेवा । कथन केला साकल्यें ॥१२॥ श्रीविष्णु अवतार ज्ञानेश्वर । ज्ञानांबरींचा दिनकर । संतमालेचा कोहिनूर । गोदातटीं जन्म ज्याचा ॥१३॥ हा मराठी भाषेचा । शंकराचार्य होय साचा । छात्र निवृत्तिनाथाचा । विठ्ठलाचा कठमणी ॥१४॥ यांनीं रचिली ज्ञानेश्वरी । जी सुबोध टीका गीतेवरी । या ग्रंथांची अजुनी सरी । न ये विबुध हो, कोणातें ॥१५॥ पासष्टी अनुभावमृत । हे आणखी दोन ग्रंथ । करिते झाले ज्ञाननाथ । अज्ञान जनाचें निवटावया ॥१६॥ या तिन्ही ग्रंथांची थोरी । महाराष्ट्र भाषेभीतरीं । अनुपम आहे खरी । हे राजराजेश्वर ग्रंथांचे ॥१७॥

जनार्दन एकनाथ मुक्तेश्वरा । नामा तुका श्रीधर । समर्थ सजनगडावर । ऐशीं संतरत्नें बहु झालीं ॥१८॥ अलीकडेही याचपरी । साधु जन्मले साक्षात्कारी । वऱ्हाड प्रांतामाझारी । गुलाबराव नाम जयांचे ॥१९॥ पूर्वी पुराण ग्रंथांचे । वक्ते जेवी "सूत" साचे । तैसे आधुनिक कालाचे । "सूत" हेचि निःसंशय ॥२०॥ अंध दोन्ही डोळ्यांनी । परी होते पूर्ण ज्ञानी । कोणत्याही विषयालागुनी । जाणत होते पूर्णपणे ॥२१॥ कोणताही ग्रंथ ठेवा । त्यांच्यापुढें नेवोनि बरवा । तो न पाहातां करावा । अनुवाद त्यांनी तयाचा ॥२२॥ ग्रंथाचें अवघें हृद्गत । सांगावें श्रोतियांप्रत । जणूं ते साक्षात् "सूत" । ज्ञानेशकन्यारूपें अवतरले ॥२३॥ त्यांना संबोधाया कारणे "सूत" । अवघें शास्त्र तयां मुखोद्गत । कोणी विचारल्या त्यांप्रत । ऐशा रीती सांगत होते ॥२४॥ हा श्लोक अमक्या पुराणीं । अमक्यां पानांत अमक्या ठिकाणीं । ही परीक्षा चिकित्सकांनीं । घेतली त्यांची कितीकदां ॥२५॥ पाश्चिमात्त्य शास्त्रेंही । गुलाबराया अवगत पाहीं । असुक एक येत नाहीं । हें म्हणाया सोय नसे ॥२६॥ या आधुनिक "सूत" ज्ञानाचा । लाभ व्हावा अवघ्यां साचा । म्हणोनी ग्रंथप्रकाशनाचा । शिष्यांहीं आरंभिला प्रयत्न ॥२७॥ हें बहु उचित झालें । साधन साधका हातीं आलें । महाराष्ट्रवाङ्मया भूषविलें । भर या घालोनि ग्रंथांची ॥२८॥

श्रीगुलाबरायांचे ज्ञान । होतें स्वानुभवाचें पूर्ण । कां कीं ज्ञानेश्वरांचें पुण्यस्मरण । नित्य होतें हृदयीं ॥२९॥ ज्ञानेश ज्ञानाचा सागर । त्याशीं समरस झाल्यावर । मग कोठूनि उरणार । अज्ञानाशी छटा तेथें ॥३०॥ नंदनवनींचा पारिजात । आणिला श्रीकृष्णें मथुरेंत । जालें तसेंच तंतोतंत । या ग्रंथाचे प्रकाशनें ॥३१॥ हा नूतन वाङ्मयठेवा । साधकें आदरें वाचावा । आणि मननें अनुभवावा । रस तेथिंचा हे विनति ॥३२॥

या वाङ्मयापरी । स्वानुभवी वाङ्मय भूमीवरी । अलीकडील काळाभीतरी । निर्माण झालें विबुध हो ॥३३॥ अध्यात्मावरी ग्रंथ । लिहितील शब्दपंडित । परि स्वानुभवी जे कां संत । त्यांची कृति निराळी ॥३४॥ नुसत्या शब्दज्ञानें भला । कोणी पंडित संत झाला । प्राधान्य शब्द छळाला । पंडितग्रंथीं विशेष ॥३५॥ अध्यात्मविद्येमाझारी । शब्द हा सालपटापरी । रसमाधुर्य त्या भीतरीं । कोठूनि येऊं शकेल ॥३६॥ सालपटें फळाचें ज्ञान होतें । परी अंतरींच्या रसातें । टरफल केव्हांही न दाखवितें । हें ध्यानीं असें द्या ॥३७॥ स्वानुभवी संतांची । योग्यता रस दावण्याची । सत्य आहे जगीं साची । तें न कार्य पंडितांचें ॥३८॥ ऐसे गुलाबराय संत । झाले विसाव्या शतकांत । म्हणोनी त्यांच्या ग्रंथाप्रत । अभ्यासाया विनवितों ॥३९॥ संत होवोनि संतासी ॥ ओळखावें अहर्निशी । वरवरल्या सोंगासी । भुलून कोणी जाऊं नये ॥४०॥ संत असती वैराग्यभरित । संत असती विवेकी सत्य । पोकळ डामडौलाप्रत । जागा न मिळे त्यांपाशीं ॥४१॥ मन निष्पाप झाल्याविना । संतत्व आंगी येईना । संतत्वावांचुनी होईना ॥ साक्षात्कार केव्हांही ॥४२॥ शब्दपंडित भाषाज्ञानी । महत्त्व साक्षात्कारालागुनि । न देती किंचित जनीं । आपुलें स्तोम माजवावया ॥४३॥ निजस्तुतीची मोठी हौस । वाटते शब्दपंडितास । ह्या गोष्टीचा वाटे त्रास । स्वानुभवी संताकारणें ॥४४॥ नखरा करिती वारयोषिता । साध्या राहाती पतिव्रता । तोचि न्याय तत्वता । येथें लागू पडतसे ॥४५॥ वाङ्मय संतनिर्मित । ज्ञानांबरींचा सूर्य सत्य । पंडिताचे कृतीप्रत । दिवटी समजणें विबुधहो ॥४६॥ गजपति काळाकुळीत । तैसाच रेडा असे सत्य । परी फरक दोघांत । आहे जमीन अस्मानाचा ॥४७॥ पंडिताच्या कृतींनी । शब्दज्ञान होईल झणीं । परी स्वानुभवालागोनी । उरताचि तेथें उरेल ॥४८॥ म्हणून संतनिर्मित जे जे ग्रंथ । तेचि अभ्यासावे सतत । उगीच शब्दजाळांत । साधकानें पडूं नये ॥४९॥ शब्दज्ञानें वाढेल महती । परी अनुभव नये कल्पांती । बहुरूपी जेवी आणिती । सोंगें रायाची जनांत ॥५०॥ श्रीगुलाबराय वर्तनांत । दांभिक नव्हते किंचित । स्वानुभवी ज्ञानाचा मूर्तिमंत । पुतळाच हे होते कीं ॥५१॥ भांडण शैववैष्णवांचे । व्यवहारीं ये प्रत्यया साचे । परी श्रीगुलाबरायाचें । प्रेम दोहीं ठायीं सारिखेंचि ॥५२॥ नित्य पार्थिवाचें पूजन । तैसेंचि श्रीविष्णूचें आराधन । करीत होते प्रेमें पूर्ण । भेदभावा जागा नसे ॥५३॥ ज्ञान ज्ञानेश्वरांपरी । जागृत होतें अंतरीं । ईश भरला जगदंतरीं । हाचि सिद्धांत तयांचा ॥५४॥ श्रीतुकारामासमान । भक्ति होती परिपूर्ण । मनीची राष्ट्रकल्याणेच्छा जाण । आठवण देई समर्थांचि ॥५५॥ ऐसा ज्ञानभक्तिवैराग्याचा समन्वय त्यांचे ठायीं साचा । म्हणोनि त्यांच्या ग्रंथाचा । आस्वाद घ्या विबुध हो ॥५६॥ त्याचें काव्यभांडार । स्वानुभवी सागराकार । त्यांचा कोठुनिया यावा पार । मज अज्ञाकारणें ॥५७॥ परी त्यांच्या शिष्यांनीं । महाप्रयासें करूनी । ग्रंथ सूत्रांत गोवूनि । हार बनविले नानाविध ॥५८॥ त्या मालेचा आस्वाद घ्यावा । ग्रंथ अवश्य संग्रहीं ठेवावा । आणि नित्यनेमें वाचीत जावा । अभ्युदयाकारणेंही ॥५९॥ ही दासगणूची विज्ञप्ति । आहे अवघ्यां भाविकांप्रती । हें वाङ्मय नोहे, सरस्वती । वर द्याया आली तुम्हां ॥६०॥ तिचा घ्यावा आशीर्वाद । चित्त ठेवावें अभेद । तरीच तुम्हा ब्रह्मानंद । येईल कीं भोगितां ॥६१॥ असो, श्रीगुलाबराया चरणांसी । नमन माझें आदरेंशीं । तेवी त्यांच्या वाङ्मयासी । प्रणिपात माझे शतशः ॥६२॥"

(भुवैकुंठ-पंढरी, का. शुं. ११/१८५७)

ह.भ.प. दासगणू महाराज



# गुलाब सौरभ

वेदांचे वैभव जगा दाखविण्यासाठी ।
माधुर्य-भक्तिचे गीत घेऊनी ओठी ॥१॥

ज्ञानेश्वर-कन्या भूमिवरी अवतरली ।
विश्वात समन्वय-पहाट आता फुटली ॥२॥

कुणब्याघरी घेऊनि जन्म जगद्गुरु आला ।
या बालांधाचा प्रकाश जगती भरला ॥३॥

खेडीत सहजचि अनोळखी शास्त्रांची ।
होतसे अंध हा काठी विज्ञ-जनांची ॥४॥

पावोनि जयाला धर्मा भरते आले ।
योगाचे दुर्गम दालन भक्ता खुलले ॥५॥

हा धर्म-समन्वय-कर्ता विरळा संत ।
तत्त्वज्ञ थोर हा असीम प्रज्ञावंत ॥६॥

हा योगिशिरोमणि ज्ञान जयाला स्फुरते ।
ही आंधळी गौळण कृष्णासाठी झुरते ॥७॥

हा गुलाब-सौरभ सर्वदूर पसरेल ।
भक्तिची लता नभि जाऊनिया बहरेल ॥८॥

हे अक्षर वाङ्मय जगेल जिंकुनि काळा ।
होईल जगद्गुरु ज्ञानेशांची बाळा ॥९॥

जगि भाग्यवान जे भजले या श्रीचरणां ।
ज्ञानेश्वर त्यांवरि अपार करतिल करुणा ॥१०॥

**आचार्य किशोर व्यास, पुणे.**









## ऋणनिर्देश

*देऊळकर या जाहिरातीचे काय झाले?*

*'अहो काका, जरा थांबा मी सांगतो तुम्हाला सगळं.' अशी संवाद फेक आता परत ऐकायला मिळणार नाही आणि त्या आवाजाची नक्कल पण घरात केली जाणार नाही. कारण श्री. देऊळकर यांना दि. ८ जानेवारी २००२ ला अचानक देवाज्ञा झाली. शेवटच्या क्षणापर्यंत हिंडणारा-फिरणारा माणूस एकदम काळाच्या आड नाहीसा झाला. विश्वास बसत नाही. पण सत्य स्विकारावेच लागते.*

*समाजामध्ये अशा बऱ्याच व्यक्ती असतात, की ज्या सर्वज्ञात नसतात. पण त्या आपले कार्य सेवाभाव वृत्तीने निस्वार्थ बुद्धिने करत असतात. त्यामुळे सहवासात आलेल्या मंडळींच्यामधे प्रिय होतात. श्री. देऊळकर हे यापैकीच एक होते. 'ओंकार ट्रस्टशी' त्यांचा ट्रस्टच्या स्थापनेपासूनच अतिशय जवळचा संबंध होता. ट्रस्टच्या वतीने कोणताही कार्यक्रम असो देऊळकर आले नाहीत, असे कधी झालेच नाही. ट्रस्टमार्फत दर वर्षी काढल्या जाणाऱ्या 'कल्याणी' विशेषअंकाचे काम सुरू झाले म्हणजे तर बघायलाच नको. कारण अंकाचे व्यवस्थापकीय सहकार्य हे त्यांचेच असे. प्रपंचामध्ये पैशाची कमतरता असतानासुद्धा कोणत्याही मानधनाची अपेक्षा न ठेवता स्वतःची पदरमोड करून पेट्रोलसाठी पैसे खर्च करून कोथरूडहून बिबवेवाडीपर्यंत दिवसातून दोन दोन वेळा खेपा घालणारे देऊळकर आठवले की डोळ्यांत पाणी आल्याशिवाय रहात नाही. अशा व्यक्तीच्या निधनाने आम्हा सर्व विश्वस्तांचे व ट्रस्टचे भरून न येणारे नुकसान झाले आहे. दैवगतीपुढे कोणाचे चालत नाही हेच खरे.*

*त्यांच्या आठवणी काढत या वर्षीच्या श्रीगुलाबराव महाराज विशेष अंकाचे काम आम्ही चालू ठेवले आहे, तीच त्यांना खरी श्रद्धांजली आहे.*

*'अनंत सर्व्हीसेस'चा **शाम** शेवटी अनंत सर्व्हीस देत देतच अनंतात विलीन झाला.*

# मधुराद्वैताचार्य श्रीगुलाबराव महाराज

श्रीज्ञानेश्वर महाराजांनी स्वतः ''श्री ज्ञानेश्वर माऊली'' हा नाममंत्र श्रीगुलाबराव महाराजांना दिला.




नामजपयंत्र

संकल्पना, निर्मिती व हस्ताक्षर : श्री. वसंत गोडबोले

# श्रीगुलाबराव महाराज व मधुराद्वैतदर्शन

ले. श्री. बाबाजीमहाराज पंडित

*श्रीबाबाजी महाराज यांचे पूर्वज झांशीच्या राज्यात सुप्रसिद्ध सरदार होते. श्रीबाबाजीमहाराज (नारायण) यांचा जन्म चंद्रपूर येथे शके १८०७ मकर संक्रांतीच्या महापर्व काळी झाला. स्वतः गरीबीत शिक्षण घेऊन इ.स. १९०३ मध्ये ते मॅट्रिक उत्तीर्ण झाले. असहाय स्थितीमुळे त्यांना दोन वर्षातच कॉलेज शिक्षण सोडून सरकारी नोकरी करावी लागली. सद्‌गुरु श्रीगुलाबरावमहाराज यांचे दर्शन त्यांना नागपूर मुक्कामी विद्यार्थीदशेत इ.स. १९०५ साली झाले. तेव्हापासून त्यांचे चित्त तिकडे आकर्षिले गेले. इ.स. १९०८ साली सर्व संसारपाश तोडून ते श्रीगुरुचरणाजवळ सतत राहू लागले.*

***सच्चित्‌सुखविहारायविमलज्ञानमूर्तये ।***
***श्रीपांडुरंगनाथाय सिद्धप्रज्ञाय ते नमः ॥***

## अल्प परिचय : श्रीज्ञानेश्वर महाराजांचा साक्षात्कार.

वऱ्हाडातील उमरावती जिल्ह्यात माधान नावाचे गावी पाटलाचे कुळात श्रीगुलाबराय महाराजांचा जन्म शके १८०३ आषाढ महिन्यात झाला. पांडुरंगनाथ हे त्यांचे नाथसंप्रदायातील नांव. श्रीमहाराजांची आई थोर पतिव्रता व वडील थोर शिवभक्त होते. ते अत्यल्प वयातच-म्हणजे सुमारे नऊ महिन्यांचे असतानाच त्यांचे दोन्ही डोळे आंधळे झाले. लहानपणाचे श्रीमहाराजांचे खेळणे तंतोतंत श्रीकृष्णासारखे असे. लहानपणांत त्यांच्या ठिकाणी दांडगी स्मरणशक्ति व मेधाशक्ति व थोर प्रज्ञाशक्ति प्रगट झाली. बालपणी त्यांचे वागणे फार खेळकर व स्वच्छंदी असे. रात्रभर समाधी लावून बसलेले पुष्कळ जुन्या लोकांनी त्यांना पाहिले. 'वैद्यराज आम्ही निर्गुणपुरीचे, औषध घ्याना कोणी' हे गाणे ते लहानपणी म्हणत असत. शिक्षणाचा गंधही नसताना ते काव्य करीत. पाठांतरही बरेच होते. आमच्या पाश्चात्य विद्याभूषितांना चमत्काराचे वावडे असले तरी हजारो लोकांच्या अनुभवास आलेले त्यांचे अलौकिक सामर्थ्य पाहून ते आश्चर्यचकीत होत.

स्वतः श्रीज्ञानेश्वर महाराजांनी महाराजांना स्वनामाचा उपदेश केला असे त्यांनी --

***'आपला अनुभव असतां प्रत्यक्ष । इतरांची कायसा साक्ष ।***
***मज आडवे मांडिये घेऊनी । कृपाकटाक्षें निहाळिले ॥२८॥***
***दिधला मंत्र चतुराक्षरी । आपुली प्रतिज्ञा केली पुरी ।'***

(संप्रदाय सुरतरु, अध्याय ४ था, ओवी २८-२९)

आपल्या 'संप्रदाय सुरतरु' त सांगून ठेवले आहे.

पुढे आपले गाव सोडून ते निरनिराळ्या ठिकाणी हिंडून लोकांना उपदेश करू लागले व आपल्या मताला पुष्टी देण्याकरिता पूर्वाचार्यांच्या ग्रंथातून त्यांची प्रमाणार्थ वचने घेण्यासाठी ग्रंथ वाचून घेणे सुरू झाले. वाचणाऱ्या मंडळीलाही वाचलेल्या ग्रंथातील न उलगडणारा अर्थ त्यांनीच समजून द्यावा. येथून पुढे ग्रंथलेखन सुरू झाले. प्रथमपासून शेवटपर्यंतचे एकूण एक त्यांचे लिखाण लिहिले गेले असते तर, गद्य सोडून आज जवळ जवळ सव्वा लाख पद्य लिखाण झाले असते ! काही मंडळी मग त्यांच्या जवळ राहू लागली. तोंडओळखीचे पुष्कळ लोक होते पण फार थोड्यांना त्यांनी अनुयायी म्हटले. कारण शिष्यशाखा वाढविण्याकडे त्यांचा ओढा नव्हता. अशा सुप्रसिद्ध महात्म्यांनी मधुराद्वैताचे उद्‌घाटन केले. आपल्या ध्येयानुसार त्यांनी स्त्री-वेशाची काही चिन्हे धारण केली होती.

## संप्रदायाची स्थापना

भारतातील वेदाला प्रमाण मानून निघालेले सर्व संप्रदाय भगवंतापासून प्रगट झाले आहेत. त्यांचे आचार्य हे त्या संप्रदायाचे केवळ पुनरुज्जीवन करणारे आहेत. त्याचप्रमाणे मधुराद्वैतसंप्रदाय देखील भगवान आदिनाथ शंकरापासून प्रगट झालेला आहे व श्रीज्ञानेश्वरादि संतांनी आपल्या वाङ्मयातून त्या भक्तिसंप्रदायातील भक्तिप्रेमाचे उद्‌गार काढलेले आहेत. सूत्ररूपाने या भक्तिमार्गाची चिकित्साही त्यांच्या ग्रंथातून आली असून स्वतः सर्व संतांनी भक्तिमार्गाच्या आचरणाने व उपदेशाने त्याचा पुरस्कारही केला. पण भक्तिशास्त्राचे सविस्तर उपपादन कोणी केले नाही. संतांचे सूत्रप्राय उपपादनावर श्रीमहाराजांनी भक्तिशास्त्राच्या उपपादनाची श्रुति, युक्ति इत्यादी प्रमाणांच्या साहाय्याने इमारत उभारली आहे. म्हणून हा संप्रदाय नवीन नाही. उपपादन मात्र नवीन आहे. 'येथ आदिनाथ तें मूळ । आळंदीश्वर तें फळ' असे श्रीमहाराजांनी स्वतः सांगितले असून 'याते नाथसंप्रदाय म्हणती' असे त्यांनीच सांगून ठेविले आहे. म्हणून श्रीमहाराज या संप्रदायाचे उद्‌घाटक आचार्य आहेत. सर्व संप्रदायांच्या आचार्यांचीही हीच गोष्ट आहे.

## मधुराद्वैतदर्शन

भक्ति म्हणजे तुकाराम महाराज म्हणतात,

***'हेचि थोर भक्ति आवडते देवा ।***
***संकल्पावी माया संसाराची ।'***

व्यवहारामध्ये कोणते तरी स्नेहाचे नाते ठेवून आपण प्रेम किंवा माया करीत असतो. स्वामींच्या ठिकाणी नोकर, दासाचे नाते ठेवून प्रेम करतो. मुलगा, बालभाव किंवा लेकुरभाव आपल्या ठिकाणी घेऊन आईबापांचे ठिकाणी मातृपितृ भावाने पूज्यता बाळगून प्रेम करतो. मित्रभावाने मित्र मित्राशी वागतो. आई मुलाचे ठिकाणी प्रेम करते. पत्नी, पतीचे ठिकाणी प्रेम करते. असे पांच प्रकारचे स्नेहसंबंध आहेत. या स्नेहसंबंधाने परमेश्वराचे ठिकाणी प्रेम करणे याला भक्ति म्हणतात. हे स्नेहसंबंध उत्तरोत्तर श्रेष्ठ आहेत; म्हणून त्या उत्तरोत्तर स्नेहसंबंधाने केलेली भक्तीही पूर्व पूर्व भक्तीपेक्षा श्रेष्ठ ठरते. कारण पूर्व पूर्व भक्तीचा उत्तरोत्तर भक्तीमध्ये अंतर्भाव असतो. अर्थातच पत्नीभावाने केलेल्या भक्तीत पूर्वीच्या सर्व प्रेमसंबंधांचा अंतर्भाव असल्यामुळे, ती भक्ति प्रेमाचे परमोच्च शिखर होय व अशा संबंधाने केलेल्या भक्तीलाच मधुर भक्ती म्हणतात. या भक्तीत द्वैत मुळीच राहत नाही. कारण ती ज्ञानानंतरच करता येते व केली जाते.

***'कोणी एक अकृत्रिम । भक्तीचें हें वर्म***
***योगज्ञानादिविश्राम । भूमिका हे ।' (अमृ. ९-५९)***

योगमार्ग व ज्ञानमार्ग यातील सविकल्प स्थिति येथे राहत नाही व प्रेमभक्ति करणाऱ्या भक्ताचे ठिकाणी दुसऱ्याला द्वैताचा भास झाला तरी

***'द्वैतदशेचें आंगण । अद्वैत वोळगे आपण ।***
***भेद तंव तंव दूण । अभेदासी ।' (अमृ. ९-२८)***

प्रेमभक्तीने द्वैत निःशेष नाहीसे होऊन अद्वैत दशा अधिकाधिक अनुभवाला येते. श्रीज्ञानेश्वरमहाराजादी संतांनी या सर्व स्नेहसंबंधाने परमेश्वराला आळविले आहे. सर्व संतांच्या गौळणी वगैरे गाण्यांमध्ये पत्नीभावाने देवाला प्रेम समर्पण केल्याचे दिसून येते. गोपिका या मधुर भावाने प्रेम समर्पण करणाऱ्यांमध्ये गुरुस्थानी आहेत. भगवान शंकर आदिनाथ हे भगवान श्रीकृष्णाच्या रासात गोपिका होऊन राहिले आहेत, असे पुराणात सांगितले आहे. त्यांच्यापासून हा मधुराद्वैत संप्रदाय प्रवृत्त झाला. 'स्वमन्तव्यांशसिद्धान्ततुषार' या ग्रंथात श्री महाराजांनी स्वमुखाने मी गोपी आहे, असे सांगितले असून त्यांच्या ठिकाणी मधुररसमंदाकिनीचा प्रेमप्रवाहच मुख्य होता. म्हणूनच त्यांच्या वाङ्मयातून या प्रेमाची सिद्धि व या प्रेमसंबंधानेच विशेषतः भगवंताला आळविलेले दिसून येते.

## संप्रदायाचे वाङ्मय

उगमापासून निघालेल्या नदीचे प्रवाहपात्र जसे पुढे पुढे वाढत जाते त्याप्रमाणे अल्पवयातच प्रगट झालेली श्रीमहाराजांची काव्यस्फूर्ति अमर्याद वाढू लागली. त्यांच्या काव्यस्फूर्तीचे सर्व लिखाण झाले असते तर सुमारे सव्वा लक्ष ओव्यांचा ग्रंथराज प्रसिद्ध झाला असता. काव्यस्फूर्तीचा वेग इतका असे की, लेखकांना लेखन करणेच कठीण जात असे. सर्व संतांचे ग्रंथ या संप्रदायात मान्य असून मधुराद्वैताचे प्रतिपादन करणारे त्यांचे वाङ्मय पुढीलप्रमाणे आहे. श्रीमहाराजांचे जे ग्रंथ छापून प्रसिद्ध झाले त्या ग्रंथांना 'सूक्तिरत्नावलि' हे नाव दिले असून प्रत्येक भागाला 'यष्टि' हे नाव दिले आहे व प्रत्येक यष्टीमध्ये ज्ञानोत्तर भक्तीचे निरनिराळ्या रीतीने प्रतिपादन आले आहे.

### प्रथमयष्टि मुख्य ग्रंथ

(१) भक्तिपदतीर्थामृत - यात तत्त्वमसि महावाक्याचे भक्ति दृष्टीने विवेचन केले आहे.

(२) निगमांतपथसंदीपक - ज्ञानोत्तर भक्तीचे उपपादन.

(३) निदिध्यासनप्रकाश - यात निदिध्यासाच्या प्रक्रिया आहेत.

### द्वितीययष्टि-पूर्वार्ध

(१) प्रिय पाहुणेर - यात मर्यादा व पुष्टि असे प्रेमाचे दोन भेद करून दोन्ही प्रकारच्या भक्तीची आवश्यकता दाखविली आहे.

### द्वितीययष्टि-उत्तरार्ध

(१) भगवद्भक्तिसौरभ - यात रुक्मिणीने भगवंतास पाठविलेल्या पत्रातील श्लोकावर पतिपत्नीभक्तीला धरून सुंदर विवरण आहे.

(२) प्रीतिनिर्तन - यात लालन, वात्सल्य व पतिपत्नी भक्ति ह्या, पूर्वपूर्व भक्तीपेक्षा कशा वाढत्या प्रेमाने केल्या जातात, हे दाखविले आहे.

### तृतीययष्टि

(१) ही यष्टि म्हणजे श्रीमद्भागवत प्रथमस्कंध या वरील टीका होय.

### चतुर्थयष्टि

(१) यात स्त्रियांची गाणी दिली आहेत.

### पंचमयष्टि

(१) हा ग्रंथ व्याख्यानरूपाने आहे.

### षष्ठयष्टि

(१) स्वमंतव्यांशसिद्धान्ततुषार (हिंदी) - यात श्रीमहाराजांनी आपण कोण व कोणत्या कार्याकरिता आलो हे सांगितले आहे व ज्ञानोत्तरभक्तीचे प्रतिपादन केले आहे.

### सप्तमयष्टि-उपदेशामृत पत्रे

(१) वेळोवेळी आपल्या मंडळीला व बाहेरच्याही मंडळींनी विचारलेल्या शंकांना उत्तरादाखल पत्रे लिहिली त्यांचा संग्रह.

### अष्टमयष्टि

(१) साधुबोध - यात आधुनिक विद्वानांच्या संभाव्य शंकांना उत्तर म्हणून प्रश्नोत्तररूपाने विवेचन आले आहे.

### नवमयष्टि-पूर्वार्ध

(१) अभंगांची गाथा.

### नवमयष्टि-उत्तरार्ध

(१) पदांची गाथा.

### दशमयष्टि

(१) प्रेमनिकुंज - यात ज्ञानोत्तरभक्ति कशी होऊ शकते, तिची आवश्यकता, आक्षेपकांचे खंडण, श्रीकृष्णस्वरूपाचे निरुपाधिकत्व असे भक्तीवर सांग निरूपण आले आहे. हा माधुर्य भक्तिरस प्रधान ग्रंथ आहे.

### एकादशयष्टि

(१) संप्रदायसुरतरु - हा ग्रंथ मुख्यतः भागवत धर्माचा संपूर्ण उहापोह करणारा असून मधुराद्वैत संप्रदायाची यात शिकवण दिली आहे.

### द्वादशयष्टि

(१) यातहि उपदेशामृत पत्रेच दिली आहेत.

### त्रयोदशयष्टि

(१) यात वेदान्तातील पारिभाषिक शब्दांचे अर्थ दिले आहेत व स्वतःचे ग्रंथ कसे लावावे याची दिशा दाखविली आहे.

बाकीच्या चतुर्दशयष्टि, पंचदशयष्टि, षोडशयष्टि यातून श्रीमहाराजांच्या अपूर्ण वाङ्मयाचा संग्रह असून नारदभक्तिसूत्रांवर २५ सूत्रांपर्यंत संस्कृत

भाष्य आले आहे. षोडशयष्टीत त्यांचे संपूर्ण संस्कृत वाङ्मय आले आहे. हे सर्व प्रकरणग्रंथ काही पूर्ण व अपूर्ण आहेत. या संप्रदायात श्री ज्ञानेश्वर महाराजांचे अमृतानुभवादि ग्रंथ वेदरूप व इतर संतांचे वाङ्मय स्मृतिरूप व श्री महाराजांचे वाङ्मय भाष्यरूप समजले जाते.

## संप्रदायाची शिकवण-सामान्य

श्रीमहाराजांनी उदाहरलेल्या संप्रदायाची शिकवण मी त्यांच्याच शब्दात पुढे देतो –

*'येथ आदिनाथ तें मूळ । आळंदीश्वर ते फळ ।*
*किंवा आघवाचि कल्लोळ । मधुररसमंदाकिनीचा ॥८९॥*
*म्हणोनि यातें नाथसंप्रदाय म्हणती ।*
*श्रीकृष्णोपासना वैष्णवपद्धति*
*परी ज्ञानसिद्धांत केवलाद्वैती । निश्चित असे ॥९०॥*
*आळंदी मूळ पीठ देख । प्रतिनिधी ते सेवक ।*
*आणि प्रतिनिधीवर रूपें अनेक । तातविग्रह ॥९१॥*
*उपास्यत्वें पाहतां साची । शाखा वारकरीं संप्रदायाची ।*
*जे फळीं पुष्पीं सुखाची । दुमदुमिली आहे ॥९२॥*
*द्रुम धर्म सनातन । मूळ तंव ते नारायण ।*
*येथ शिव आदि गुरु देव श्रीकृष्ण ।*
*शैववैष्णव मिश्र म्हणोनि संप्रदाय हा ॥९३॥*
*दोहींचा समावेश पुरता । श्रीगुरु आळंदीश्वरांत होता ।*
*वाढता आनंद मंत्र जपतां । चतुराक्षरी वा सप्ताक्षरी ॥९४॥*
*सेवक, शिष्य आणि भक्त । हे त्रिविध जन मानिले येथ ।*
*सेवकाचे प्रकार दोन होत । अप्रविष्ट आणि प्रविष्ट ऐसे ॥९५॥*
*जे पतित वा नीच पूर्ण । बळेंची करिती अधर्माचरण ।*
*तयातें तंत्रें संकोचून । आणावें धन त्याचपासुनी ॥९६॥*
*आतां गृहकार्यासक्त । परी यथाशक्ति प्रतिनिधिवचन मानित ।*
*तो जनसमुदाय समस्त । प्रविष्ट सेवक जाणावा ॥९७॥*
*तयाचे चतुर्थांश धन । सुखें घ्यावें याचना करून ।*
*नाहीं तरी अप्रविष्टपण । देयावें तयातें ॥९८॥*
*साधनचतुष्टयसंपन्न । मुमुक्षु शिष्य म्हणविती पूर्ण ।*
*तिही करावे कार्य तीन । प्रातःकाळी जप योग ध्यान । संप्रदायानुसार ॥९९॥*
*माध्यान्हकालीं ज्ञानचर्चा पूर्ण । अथवा करावे ग्रंथलेखन ।*
*सायंसमयीं हरिकीर्तन । प्रेम करोनी करावे ॥१००॥*
*कीर्तनाचें न घेयावें धन । यति तरी खावें भिक्षा मागोन ।*
*नाहीं तरी थोडीशी निश्चिंती पूर्ण ।*
*मीं केली तेवी करावी ॥१०१॥*
*बहुशा ऐसी समयरीती । अविरोध न येतां संप्रदायाप्रति ।*
*मध्यें संप्रदायकार्य येती । तेही कीजती उल्हासे ॥१०२॥*
*शरीरापुरते स्वकार्य पाही । त्याचा उपदेश न लगे कांहीं ।*
*सेवकापासुनी जे आणिले लवलाहि ।*
*तें धन स्वकार्या लावूं नये ॥१०३॥*
*तया धनेंकरून । नवे करावेत शिव-कृष्णालयें जीर्ण ।*
*पुस्तकालयें बांधोन । करावे पूजन तयाचे ॥१०४॥*

(अध्याय ११ वा. संप्रदाय सुरतरु).

दास्यदीक्षा घेऊन बाह्यपूजा करता करता एकेंद्रियता आली म्हणजे मग संबंधदीक्षा घेऊन प्रेमभक्ति करावी. लालन, वात्सल्य, माधुर्य असे तीन संबंध आहेत. पुरुषांस बहुतेक लालनच हितावह आहे. लालन म्हणजे श्रीगुरुला किंवा देवाला आईबाप समजून प्रेम करणे होय. स्त्रियांना श्रीगुरुचे किंवा देवाचे ठिकाणी वात्सल्य करणे हितावह आहे. वात्सल्य म्हणजे श्रीगुरुला किंवा देवाला आपले लहान मूल समजून प्रेम करणे उत्तम होय. ज्यांना आत्मज्ञान झाले आहे त्यांनी देवाला पति समजून प्रेम करणे उत्तम होय. भक्तीत भगवत्प्रेमामुळे विषयांचा वीट आला असल्यामुळे, या कोणत्याही भक्तीत विषयसुखाचा मुळीच संबंध नसतो व त्यातल्या त्यात दृढज्ञान्याचे ठिकाणी तर तो मुळीच नसतो.

## संप्रदायाची पूजा स्थाने

(१) आळंदी मुख्य (२) वृंदावन (३) मथुरा (४) प्रयाग (५) पंढरी (६) हरिद्वार (७) काशी - वगैरे, द्वादश ज्योतिर्लिंगे इत्यादी संप्रदायाची पूज्यस्थाने आहेत.

## संप्रदायाची व्याप्ति

श्रीमहाराजांच्या हयातीत पुष्कळ लोकांशी त्यांचा परिचय झाला. चर्चा, संवाद वगैरेही पुष्कळ लोकांनी त्यांच्याशी केले. हे सर्व सविस्तरपणे त्यांच्या चरित्रात आले आहे. पण अत्यंत निष्ठावंताखेरीज त्यांची कोणाला सांप्रदायिक किंवा शिष्य करण्याची प्रवृत्ती नसल्यामुळे, त्यांच्या अनुयायांची व्याप्ति फार थोडी आहे. अजूनही तीच शिकवण पाळली जात असल्यामुळे संप्रदायाचा शिष्यपरिवार काही मोठा नाही. तरीपण त्यांच्या ग्रंथाचा अभ्यास करणारे व तद्वारा त्यांच्याबद्दल आदर असलेले लोक पुष्कळ दिसून येतात. श्रीमहाराजांवर अत्यंत निष्ठा असल्यामुळे त्यांचे गुरुत्व ज्यांनी पत्करले असे पुरुष जुने व नवे मिळून शंभराचे आतच आहेत.

## सांप्रदायिक उत्सव

गोकुळ अष्टमी, कात्यायनी व्रतोत्सव, शिवरात्री-उत्सव व रामनवमी इतके उत्सव होतात.

## सध्या चालू असलेले संप्रदाय कार्य

श्री महाराजांनी 'संप्रदाय सुरतरु' ग्रंथात सांगितलेल्या मार्गाने श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या पादुका व श्रीकृष्ण मूर्ति यांची पूजाअर्चा, वेदान्तचर्चा, भजन, श्रीमहाराजांच्या ग्रंथातून प्रतिपादलेल्या तत्त्वांचा प्रवचनाद्वारे पुरस्कार, श्रीमहाराजांचे अप्रकाशित ग्रंथ प्रकाशित करणे, त्यांच्या ग्रंथसंग्रहालयाची व्यवस्था इत्यादी संप्रदायाचे कार्य चालू आहे. इति शम्.

**कै. श्री. बाबाजीमहाराज पंडित**



# जो जनावेगळा असे

सौ. ममता गद्रे

*बी.ए., कीर्तनकार व प्रवचनकार.*

**म**हाराष्ट्रातील आपण भाविक श्रीज्ञानदेवांना माऊलीच समजतो. पण भगवान श्रीकृष्णाप्रति "मी भक्त तूं देव" हाच भाव सामान्य मनात रुजला आहे. लहानपणी श्रीगुलाबराव महाराजांचे चरित्र मी जेव्हा ऐकले तेव्हा स्वतःला ज्ञानेश्वर कन्या व श्रीकृष्णाची पत्नी या नात्याने त्यांचे जीवन कल्पनेत न सामावणारे, त्यांचे वागणे, बोलणे, पोषाख त्यांची दैनंदिन आचरण पद्धती व सर्वसामान्य साधकाला अवघड अशी त्यांनी अंगिकारलेली मधुरा भक्ती व त्याद्वारे भगवदूरूप झालेले त्याचे अतर्क्य जीवन मला नेहमीच आकर्षित करीत गेले.

श्रीज्ञानदेवांचे सद्गुरु निवृत्तिनाथ हे त्यांचे थोरले बंधू म्हणजे घरातलेच होते. ते जसे भिंतीच्या घरातले होते, तसे त्यांच्या अंतरात म्हणजे मनात सतत जवळच होते. जो आपल्या अगदी जवळचा असतो तो आपल्याला कित्येकदा नीट बघताच येत नाही किंवा बघता येतोच असे नाही. जवळचेच कित्येकदा दिसत नाही. डोळा व कानाएवढे अंतर पडले तितके जवळच्याला बघताना होते कारण तो रोजच्या बघण्यात असतो. दिसतो, दिसणे ही वरवरची इंद्रियांकरवी क्रिया झाली पण बघायला अंतरात्म्यातली (आंतली) इंद्रिये जागृत करावी लागतात. श्रद्धेय श्रीगुलाबराव महाराज ओळखायचे ते अभ्यासकृपेपेक्षा गुरुकृपेनेच ओळखणे शक्य आहे. कारण त्यासाठी नुसते भौतिक जग दाखवणारे डोळे उपयोगाचे नाहीत तर आतल्या डोळ्यांना जागे करावे लागते. सकल संतांनी जी अफाट वाङ्मय निर्मिती केली. त्याच्या अभ्यासातून ज्ञान शाखेतील पदव्या मिळतात पण त्यातून विद्वत्तेचा अहंकार तयार होण्याची शक्यताच जास्त. संत वाङ्मय व चरित्राच्या अभ्यासातून ज्ञान मिळते पण अनुभव मिळण्यासाठी गुरुकृपाच हवी. अभ्यासातून मनाचे समाधान होईलच असे नाही गुरूकृपेतून अभ्यासासह मनाचे अखंड समाधान लाभते व हा अनुभव श्रीगुलाबराव महाराजांच्या वचनांवर दृढ विश्वास ठेऊन आचरण करणाऱ्यांना आजही येतो.

श्रीगुलाबराव महाराजांचे कल्पनेत न सामावणारे अलौकिक जीवन म्हणजे जणु गौरीशंकराची उंची गाठणारे चरित्र आहे ही पक्की खूणगांठ मनात ठसते. मनात लगेच हा विचारही चटकन येतो की आपल्याला साधं उभंही राहता येत नाही मग आपण त्यांच्यासारखे होणे शक्य नाही. पण लगेच दुसऱ्या मनाने निर्णय दिला की सन्मार्गाने वागण्याचा प्रयत्नच करता येणार नाही असे नाही. निष्ठेने सातत्याने केलेला प्रयत्न निष्फळ जाणार नाही. या भगवंताच्या वचनावर विश्वास ठेऊन श्रीगुलाबराव महाराजांचे चरित्र आपल्याला आकलन होवो ही त्यांचेच चरणी नम्र प्रार्थना करून आपण त्यांच्या जीवनात प्रवेश करू या.

शके १८०३ (इ.स. १८८१) वृषभनाम संवत्सरात आषाढ शुद्धात मातोश्री अलोकाबाई व पिता श्री. गोंदुजी यांना लोणी टाकळी या खेड्यात एका अलौकीक बालकाचे माता-पिता होण्याचे देवदुर्लभ भाग्य लाभले. विदर्भात अमरावतीच्या उत्तरेला २३ मैलांवर चांदुर बाजार तालुक्यात 'माधान' या खेडेगावात मोहोड कुटुंबात एक सावळ्या वर्णाचे गुटगुटीत बालक सर्वांचे लक्ष वेधून घेऊ लागले. त्याचे नाव 'गुलाब' ठेवले. लहानपणी डोळे आले व नीट औषधोपचार न झाल्याने त्यांना कायमचे अंधत्व प्राप्त झाले. चर्मचक्षु गेले तरी सिद्ध प्रज्ञाचक्षुंनी त्यांनी साऱ्या जगाला चकीत करून सोडावे असे आपले दर्शन घडवले. त्यांच्या अंधत्वामुळे त्यांचे कुठलेही काम अडले नाही. ते परावलंबही झाले नाहीत. लपंडाव वा शिवाशिवीचा खेळ खेळताना डोळस माणसे कुठेतरी पडत वा आदळत पण गुलाबराव महाराज मात्र कुठे अडखळलेले कुणाला दिसले नाहीत.

त्यांच्या पूर्वजांविषयी जी माहिती उपलब्ध आहे, त्यानुसार ते वसिष्ठ गोत्री, सूर्यवंशी राजपूत राणे घराण्यात जन्म झाला तरी परंपरेने संस्कारलोप होता होता कलियुगात त्यांना क्षुद्रत्व आले; पण ब्राह्मण द्वेषाची वृत्ती उत्पन्न करण्याने उच्च वर्णाची प्राप्ती होणार नसून सदाचार तसेच देवद्विजांची भक्ती समाजात वृद्धिंगत केल्यानेच संस्कार लोप झालेले वर्ण पुन्हा शुद्ध होण्याचा संभव आहे, यावर श्रद्धेने विश्वास ठेऊन निर्मत्सर भाव सर्वांच्या मनात ठसवण्याचा त्यांनी आयुष्यभर प्रयत्न केला. उदरनिर्वाहाच्या निमित्ताने पितामह श्री. राणोजीराव राजस्थान, उत्तर प्रदेश, मराठवाडा असे भ्रमंती करीत ते विदर्भात पोचले. माधानच्या शिवलिंगाची नेमाने पूजा, प्रदोष, सोमवार, शिवरात्र ही व्रते व त्यासोबतच एकादशीचे विष्णू व्रतही ते निष्ठेने कडक नियमांसह पाळत. शास्त्रशुद्ध आचरण व उपासनेचे परंपरेने झालेल्या संस्काराची फलप्राप्ती म्हणजे तिरळे कुणबी समाजात मोहोड कुटुंबात श्रीगुलाबराव महाराजांचा जन्म ! ज्ञानदेवांनी १८ व्या वर्षी ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथ लिहिला. रेड्याचमुखी वेद बोलवला; भिंत चालवली हे सारे चमत्कार सामान्य मनाला भुरळ घालतात, आकर्षित करतात; पण चमत्कारासाठी संतांचा जन्म नसतो. भक्ती व प्रेमाच्या जोरावर त्रिगुणात्मक शक्तीवर नियंत्रण ठेवणाऱ्याला असे चमत्कार सहज घडवता येतात, असेच अगणित चमत्कार श्रीगुलाबराव महाराजांच्या चरित्रात बघायला मिळतात. त्यामुळेच महाराजांची वृत्ति, कृति, एवढेच काय भाषासुद्धा आपल्या आकलनात येणे कठीण जाते.

मातोश्री आलोकाबाईंचे निधन झाल्याने छोटा 'गुलाब' आजी जवळ राहू लागला. आजी त्याला लाडाने 'गुल्ल्या' म्हणत असे. आजी आजोबांनी लाड केले तरी मामा-मामींच्या तिरस्काराची झळ त्यांना सोसावी लागली. लहानपणापासून त्यांच्या प्रज्ञाचक्षुत्वाचे अनेक अनुभव लोकांना येऊ लागले. जोडव्यांचा, बांगड्यांचा, पायांचा इ. सर्व आवाजावरून ते व्यक्ती ओळखत असत. कपड्यांची, खाण्या-पिण्याची त्यांना विशेष चिंता नसे. स्वतःच्या

जिभेवरचा काळा डाग दाखवून "ही बघा माझ्या जिभेवर सरस्वती आहे" असे म्हणत. लहानपणापासूनच ते कृष्णभक्तीत रंगलेले होते.

***"त्यजूनि काम आज शाम दृष्टी पाहिला । ज्या स्थळी मी जाई तेथ नित्य राहिला ।"***

ह्या त्यांच्याच काव्यपंक्तितून हे लक्षात येते की सर्वच श्रीकृष्णाच्या सगुण रूपाचा अनुभव घेत होते. परमेश्वराच्या या कृपाप्रसादाने शेकडो सिद्धी बालवयातच त्यांच्या पायी लोटांगण घालत होत्या. सामान्य अंध व्यक्तींप्रमाणे मान-हात हलवण्याचा त्यांना छंद होता. आत्मानंदात रंगून ते तासनूतास दंग राहात.

दहाव्या वर्षी महाराज माधानला आले; पण सापत्न मातेच्या त्रासाला त्यांना सामोरे जावे लागले. आंधळे पोर म्हणून घरात उपेक्षा होऊ लागली व कसेही करून घरातून काढून टाकण्याचा प्रयत्न होऊ लागला. असे असले तरी काका-काकूंनी मात्र त्यांना जिवापाड जपले. काकूंना ते ताई म्हणत. त्यांची सारी काळजी या ताई करीत. पूर्णा नदीच्या काठी प्राचीन सोमतीर्थ, नरसिंह मंदिरात, ब्रह्मदेवाचे मंदिरात कित्येक पहर बालवयात ते रंगून जात. शास्त्रपुराण, कथा, कीर्तने ऐकावी व तत्काळ म्हणूनही दाखवावी असे आपल्या अफाट स्मरणशक्तीचे दर्शन घडवित. कुणी अन्य धर्माची व्यक्ती आली तर सर्वच धर्म समजून घेण्यात त्यांचा सर्वधर्म समभावच दिसे. त्यांचे शाळेत मात्र मन रमले नाही. माधानच्या शाळेतील रामराव बळवंत या सात्विक शिक्षकांकडे मात्र गणित, संस्कृत शिकण्याचा सपाटा लावला. त्यामुळे ग्रंथ वाचण्याची त्यांना आवड निर्माण झाली व गावातील शिक्षित मंडळींकडून पुस्तके हर प्रयत्नाने मिळवून वाचून घेण्याचा उद्योग आयुष्यभर त्यांनी केला. शेकडो पुस्तकांचा संग्रह फार कष्टाने केला व जोपासला. इतकेच नव्हे तर कोणते पुस्तक कुठे ठेवले आहे, कुठल्या पानावर काय मजकुर आहे ते बिनचूक सांगत. माणसाला संस्कारक्षम करण्याचे सामर्थ्य ह्या ग्रंथात आहे, हेच त्यांचा संग्रह सुचवतो.

गणाजी भूयार यांच्या 'पूर्णा' नावाच्या मुलीशी विवाह झाला. कौटुंबिक वातावरणात काहीच बदल न घडल्याने श्रीमहाराज आपणहून घराबाहेर पडले. त्यामुळे त्यांच्या आचरणातून अनेकांना सत्संगाचा लाभ झाला. शिव आणि विष्णु दोन्हींची अभेदभावाने ते पूजा करीत. कोणत्याही धर्माची तत्त्वे वैदिक धर्मापेक्षा श्रेष्ठ नाहीत व इतर धर्मात जी मान्य होण्यासारखी तत्त्वे आहेत ती वैदिक धर्मातील आहेत हे पटवून देण्यासाठी ते आजीवन झटले. आमच्या सनातन वैदिक विचारावर कोणी हल्ला केला तर त्यांचे खंडण ते बिनतोड करीत. त्यांच्या सर्वज्ञतेची ख्याती लोकांपर्यंत पोचल्याने त्यांच्याभोवती भाविक जमू लागले. प्रपंच व परमार्थ दोन्हीत येणाऱ्या अडचणींत श्रीमहाराज प्रत्येकाला आपले वाटत. परमार्थातील साधकांना मंत्रदीक्षा देताना त्यांनी सांगितलेले मुख्य चार नियम हे वारकरी संप्रदायाशी जवळीक दर्शवतात. ते असे –

१) पर स्त्री माते समान मानणे, २) खोटे न बोलणे, ३) परद्रव्य न घेणे, ४) मांस व मद्याचे सेवन वर्ज्य. त्यांच्या पत्नी सौ. मनकर्णिका बाईंनाही घरीच धर्मग्रंथ वाचण्यास शिकवून परमार्थाची दीक्षा दिली. बालपणी महाराजांनी गुरु गोपालदास महाराजांचा अनुग्रह घेतला तरी त्यांचा ओढा ज्ञानेश्वर माऊलीकडे होता. त्यामुळेच

***"माझा सद्गुरु करुणाघन । आळंदीपती कल्याण निधान ।***
***जेणे आपुलिया नामाचा मंत्र देऊन । कृतार्थ केले मजलागी ॥"***

या ओळीतून त्यांना माऊलीने आपल्या अंकावर घेऊन त्यांना मंत्रदीक्षा देऊन कृतार्थ केले. गुरु गोपालदासांच्या अनुमतिनेच दत्त उपासनेकडून ते कृष्णउपासनेत एकरूप झाले. इथून पुढे त्यांचे जीवन तेजाने झळाळले. रामचंद्र बापू पाटील, हरिभाऊ केवले इ. मंडळी साखरेला मुंग्या जशा चिकटून बसतात तशी चिकटू लागली. त्यांच्या सत्संगात भाविक न्हाऊन निघत. संत आनंदाचे स्थळ । संत सुखचि केवळ । नाना संतोषाचे मूळ । ते हे संत ॥ ह्या श्रीसमर्थ उक्तीचा अनुभव जी जी व्यक्ती महाराजांच्या सान्निध्यात आली त्याने घेतली. निरनिराळ्या प्रसंगी महाराज प्रवचन स्वरूपात बोलत. अनेक विषयांचे खंडन-मंडन करीत, निरूपण करीत. हरिभाऊ केवले त्यांची टिपणे आपल्या साक्षेपी प्रयत्नाने लिहून काढीत. महाराजांच्या मुखांतून शब्दांची धबधब्यासारखी ज्ञानधारा कोसळायला लागली की लेखणीबद्ध करणे हे महान अवघड कार्य. त्याचे वर्णन करताना संत वाङ्मयाचे गाढे अभ्यासक ह.भ.प. श्री लक्ष्मणराव रामचंद्र पांगारकर म्हणतात, "ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत इ. मोठमोठ्या ग्रंथाची रचना कशी होत असेल याची मला कल्पना नव्हती पण श्रीगुलाबराव महाराजांच्या सान्निध्यात त्या वाङ्मय निर्मितीचे प्रत्यक्ष दर्शन मला घडले. "मी हळूहळू सांगतो लिहून घ्या." असं म्हणून जे सांगत ते महाराजांचे हळूहळू सांगणे लिहायला तीन-चार जण कमी पडत, यावरून त्यांच्या बोलण्याचा ओघ सतत धारेप्रमाणे मुखातून कसा बाहेर पडत असेल याची कल्पना येऊ शकते.

महाराजांची वाङ्मयनिर्मिती प्रचंड आहे. त्यांच्या ग्रंथाची ओवी संख्या लाखांच्या घरात आहे.

जात्यावरच्या ओवीपासून ज्ञानेश्वरीच्या टीकेपर्यंत त्यांचे सर्व वाङ्मय मनाला थक्क करणारे आहे. सूत्रग्रंथ, आकार ग्रंथ, भाष्यग्रंथ, शास्त्रग्रंथ, योग, सांख्य, छंदसंगीत, आयुर्वेद, प्रकरण ग्रंथ, भक्ती ग्रंथ, गाथा निबंध, संवाद, पत्रे, लोकगीते, स्तोत्रे, चरित्र आख्याने अशा सर्व स्तरांतील स्त्री पुरुषांना शिक्षित-अशिक्षित सर्वांना या वाङ्मयातून मार्गदर्शन लाभते. श्री गुलाबराव महाराजांना दैवीप्रज्ञेची देणगी लाभली होती. ते योगी होते. तत्त्वज्ञही होते पण या सर्वांपेक्षा ते संत होते. त्यामुळेच त्यांच्याकडे जाणाऱ्या कुठल्याही माणसाचा त्यांनी कधी अव्हेर केला नाही. अनेकांना अनेक संकटातून त्यांनी वाचवले. निंदक असो, कुटाळ असो सर्वांवर कृपादृष्टी ठेवली. "साधक भावे नमस्कार घाली । त्याची चिंता साधुस लागली" ह्या उक्तीचा अनुभव अनेक साधकांनी घेतला. 'झाल्या' कुत्र्यालासुद्धा त्यांनी सद्गति दिली. इतकेच काय 'हिरा' नावाच्या वेश्येचाही उद्धार केला.

श्री महाराजांचे कौटुंबिक जीवन म्हणजे शास्त्रशुद्ध आचरणाचा वस्तुपाठच ! शास्त्राज्ञेला सोडून कुठलाच व्यवहार त्यांनी केला नाही. देहशुद्धीचे सर्व नियमही काटेकोरपणे पाळीत. "ठेविले अनंते तैसेचि राहावे । चित्ती असो द्यावे समाधान ।" या तुकोबाच्या उक्तीप्रमाणे ते प्रपंचात राहिले. त्यामुळेच प्रसंग येताच त्यांनी घराचा त्याग केला. शास्त्राज्ञेला अनुसरूनच पत्नीची पुत्रप्राप्तीची इच्छाही त्यांनी पूर्ण केली. पण त्यांच्या मनातील पुत्रमोह दूर करायलाही ते विसरले नाहीत. प्रपंच व परमार्थाची सांगड घालण्याची युक्ती सांगताना महाराज म्हणतात, "अंतरी परामार्थ धरावा । बाहेरी व्यवहार करावा. पण हे करताना "आवडी भगवंत भजावा । हळूहळू मिळवावा विराग ॥ जोवरी विकारी आपुले चित्त ।

तोवरी दुर्जनासी करू नये मात । आपुले निर्विकारी होता चित्त । मग दुष्ट सुधारणार्थ किंचित यत्न कीजे ।।" थोडक्यात "आधी प्रपंच करावा नेटका । मग घ्यावे परमार्थ विवेका ।" हेच श्रीसमर्थांचे सांगणे त्यांनी वेगळ्या शब्दांत सांगितले. आपले अलौकिकत्व झाकून बाहेर व्यवहार चालू असला तरी या ज्ञानेश्वर कन्येचे श्रीकृष्णावरचे प्रेम उत्तरोत्तर वाढतच होते. ते स्वतःला पंचलतिका गोपिका म्हणवून घेत. माऊलीनेच आपल्या या कन्येचा विवाह प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्णाशी करून दिला. श्रीकृष्णाची पत्नी हे पद प्राप्त झाल्याचा अपार आनंद व्यक्त करताना ते म्हणतात, "आज मी भाग्याची झाले । नंदसुता करि देऊनि बापे कन्यादान केले ।। मधुराभक्तिविषयी अनेकांच्या मनात अनेक शंका असतात. ब्रह्मोपासना पुरुषाची पण मधुराभक्ती स्त्रीची असे दुहेरी जीवन श्रीमहाराजांनी पत्करले. कात्यायनी या व्रतात रासक्रीडेत त्यांनी भगवंताच्या अलौकिक लीलेचा अनुभव घेतला.

दास्य, वात्सल्य, सख्य भक्तिप्रमाणे मनाच्या कल्पनेत हा मधुराभक्तीचा प्रकार चटकन बसत नाही. 'यथा व्रज गोपीकानाम्' या नारदभक्ती सूत्राला अनुसरून त्यांनी मधुराभक्ती अंगिकारली. संत मीराबाई, नरसी मेहता या संतांनी अद्वैत भावाने केलेल्या भक्तीचेच पुनरुज्जीवन महाराजांनी केले. गोपींनी केलेली कृष्णभक्तीसुद्धा समजायला अवघडच. अशा गोपींची महाराजांनी फारच सुंदर व्याख्या केली. गोपी-पाद-पियूष लहरी या ग्रंथात ते म्हणतात,

***"गोपी भक्त की भगवंत । हा निर्णय करिता शब्द कुंठित ।***
***अनिर्वाच्य प्रेमा जो यथार्थ । त्याचि मूर्ति गोपिका ।।"***

अत्यंत मर्यादित शब्दांत अमर्याद प्रेमाचे केलेले हे वर्णन भाविक मनाला भुरळ पाडते. प्रेम नये सांगिता दाविता हेच खरे. या भक्तीत अनैतिकता नसून नीतीच भरलेली आहे. कारण हे प्रेम निर्विषय आहे. ह्या मधुराभक्तीकडून जे सुख प्राप्त होते ते ऱ्हास पावत नाही. श्रीकृष्णाच्या प्राप्तीसाठी गोपींनी कात्यायनी व्रत केल्याचा उल्लेख श्रीमद्‌भागवताच्या दशम स्कंधात आहे. मधुराद्वैत संप्रदायाच्या स्थापनेसाठी आळंदीची वारी, कात्यायनी उत्सव, एकादशी, सोमवार, गुरुवार, शिवरात्र, हरिपाठ इ. चा नेम स्वतः आचरणात आणून इतरांना प्रवृत्त केले. प्रत्यक्ष भगवान शंकरांनी देखील स्त्रीवेशात रासक्रीडेचा अनुभव घेण्याची अभिलाषा पूर्ण केली. श्रीगुलाबराव महाराज "मी पंचलतिका नावाची गोपी आहे" असे म्हणत. विवाहोत्तर महिला जशा मंगळागौरी इ. व्रते करतात तशी व्रते ते करीत. स्वतः गोपी असल्याने मंगळसूत्र, वेणी, कुंकु इ. सौभाग्य लेणी धारण करीत. उखाण्यात श्रीकृष्णाचे नाव घेताना ते खरोखरीच लाजत. जे जे कृष्णाला प्रिय ते ते त्यांना आवडे.

मी आरंभीच नमूद केल्याप्रमाणे त्यांचे हे स्त्रीवेशातील वर्णन पतिव्रतेप्रमाणे आचरण लहानपणी जेव्हा मी ऐकले तेव्हा मला ते अनाकलनीय वाटत होते व अशी भक्ती आपल्याला कशी जमणार? असा विचार डोकावून मी चिंतीत होत असे. पुढे अनेक संतांचे ग्रंथ व महाराजांच्याही ग्रंथाचे वाचन घडले, तेव्हा असे लक्षात आले की मधुराद्वैत संप्रदाय स्थापून महाराजांनी मधुराभक्तीचे पुनरुज्जीवन केले तरी सर्वांनीच अशी माधुर्यभावाने भक्ती करावी असा आग्रह त्यांनी कधीच केला नाही. अशी भक्ती करणे हे येरागबाळाचे काम नोहे. भक्तिचा अधिकार वा ब्रह्मनिष्ठता प्राप्त झाल्याशिवाय ही मधुराभक्ती साधणे शक्य नाही, हे त्यांचे स्वतःचेच मत होते. त्यामुळे अनुग्रह दिला की 'मधुराभक्ती' करावी लागते असा गैरसमज माझ्या मनात आला तो दूर झाला. उपासनेच्या आरंभीच ही भक्ती कुणी केलेली नाही. मधुराद्वैत संप्रदाय स्थापण्याचा त्यांचा हेतू हाच की जीवनातील अंतिम ध्येयाचा टप्पा गाठण्यासाठी मार्ग दाखवणे, सनातन वैदिक धर्माचरण करणे हाही उद्देश त्यात होता. शिव आणि विष्णु दोन्हींची उपासना स्वीकारून संप्रदायाने शैव व वैष्णवाचा वाद टाळला आहे. भजनाच्या पंचपदीतही एक भजन विष्णुचे तर एक शिवाचे म्हणावे असा नियम त्यांनी घालून दिला.

श्रीनिवास शास्त्री, श्री. बळवंतराव देशमुख, श्री. विठ्ठलराव केकरे इ. नी अर्थसहाय्य करून श्रीज्ञानेश्वर प्रासादिक मुद्रणालयाची स्थापना करून मधुराद्वैत प्रतिपादक वाङ्मयाची निर्मिती केली. निरनिराळ्या उत्सवातून-प्रवचनांतून समाजाच्या सर्व स्तरांतील माणसे महाराजांभोवती गोळा होत होती. महाराजांच्या कालखंडात पाश्चात्य विचार व थिऑसाफिकल सोसायटीच्या विचारांचा धुडगुस व 'नाना मतांचा गलबला । कोणी पुसेना कोणाला ।' अशा कचाट्यात बरेच शिक्षित लोक सापडले होते. त्यामुळे अशा विचारांच्या गोंधळात सापडलेल्या लोकांच्या डोक्यात शिरलेले चुकीचे विचार महाराज आपल्या वाक्‌चातुर्याने काढून टाकत. वास्तविक स्वतः अंध असूनही सर्व धर्मग्रंथांचे त्यांचे मन थक्क करणारे ज्ञान, खंडन मंडनात बिनतोड युक्तिवाद हा एक फार मोठा चमत्कार प्रत्येकाला जाणवला तरी महाराज मात्र हा ग्रह काढून टाकण्यास जपत. नव्हे यासाठी त्यांचे वागणेही कधी कधी विचित्र असे. लोकेषणेपासून ते कायम दूर राहात. विसाव्या शतकात डार्विन व स्पेन्सर या तत्त्ववेत्त्यांचा प्रभाव जनमानसावर असताना श्री गुलाबराव महाराजांनी तर्कवादाने उत्क्रान्तीवादाचे व अज्ञेयवादाचे इतके बिनतोड खंडन केले की त्याची समीक्षा मुळातून वाचावी अशी आहे. या समीक्षणावर श्रीमंत जठार यांनी जो अभिप्राय दिला त्यावरून त्याचे महत्त्व लक्षात येते. श्रीमंत जठार लिहितात, "तुमचा लेख एकंदर वाचल्यानंतर मौज वाटली. मयुरपक्षांच्या डोळ्यांप्रमाणे डोळे बाळगण्यापेक्षा तुमच्यासारखे प्रज्ञाचक्षूच होणे उत्तम आहे. डार्विन, स्पेन्सर वगैरेंची मते जितकी तुम्ही धुंडाळून चिकित्सा केली तेवढी दुसऱ्याने केली नाही." हे लिखाण केसरीत प्रसिद्ध करण्याची शिफारस केली पण तसे झाले नाही. पाश्चात्य व अवैदिक विचारांच्या खंडनासाठी त्यांनी प्रचंड वाङ्मय निर्माण केले; पण जनसामान्यांपर्यंत त्यांचा व्हावा तेवढा प्रचार-प्रसार झाला नाही, हे खेदाने म्हणावे लागते. त्यांच्या सर्व विचारांचे व एवढ्या प्रचंड खटाटोपाचे सार व त्यांच्या अलौकीक अवतारकार्याचे मर्म पुढील शब्दातून लक्षात येते.

"सर्व परकीय दृष्य अदृष्य शास्त्रांचा विचार करून प्रिय बांधव हो ! आपण जसे लिंग शरीरापर्यंत येऊन पोहोचलो तसे अन्य त्या शास्त्राचे निर्माणकर्ते पोचले नाहीत. म्हणून असाच विचार कितीही चालू ठेवला तरी ह्याच्यापुढे आपल्याला वैदांतिक पद्धतीवाचून जाणे शक्य नाही. म्हणून आर्यांचेच म्हणणे योग्य आहे हे सिद्ध करणे हेच माझे व माझ्या हितचिंतकांचे जीवन कर्तव्य आहे." ह्यातून महाराजांची जीवननिष्ठा दिसून येते.

असंख्य पदांची, स्तोत्रांची, अभंगांची रचना केली. ते स्वतः उत्तम गात असत. श्री. व्यंकटराव देशपांडे यांचेकडून शास्त्रोक्त संगीताचे धडे त्यांनी घेतले. त्यामुळे त्याच्या सर्व अभंगावर तो कुठल्या तालात व रागात

गावा याची माहिती दिलेली आहे. भजनानंदात व रासक्रीडेत ते इतके रंगून जात की जसा बुक्क्याचा दिव्य परिमल परिसरात दरवळत राही व प्रत्यक्ष भगवान गोपाळकृष्ण रासक्रीडेत होते याची साक्ष लोकांना बघायला मिळाली. त्यांनी ''गानसोपान'' हा ग्रंथ लिहून आपल्या विलक्षण प्रतिभेचे दर्शन घडवले. सुविख्यात साहित्यिक श्री. पु. ल. देशपांडे या ग्रंथावर अभिप्राय देताना म्हणतात की या श्रीमहाराजांच्या ग्रंथावर अभिप्राय तर सोडाच पण हा ग्रंथ वाचायला लागणारा अधिकार देखील मला आहे की नाही याचा विचार करायला हवा. प्रतिभा, प्रज्ञा व परिष्करण यांचा लोकविलक्षण संगम झालेले हे व्यक्तिमत्त्व ! या ग्रंथावर अभिप्राय देण्याच्या योग्यतेचा संगीतातला जाणकार विद्वान मला तरी आता कोणी दिसत नाही !

अपार पूर्वपुण्याईने महाराजांनी ज्यांना आपले म्हटले, अनुग्रह देऊन कृतार्थ केले त्यांची सारी जबाबदारी लौकिक व पारलौकिक त्यांनी पत्करली व परमार्थाला अनुकूल असे शिक्षण त्यांनी अनेक लीला मुद्दाम घडवून आणून कृतीतून, उपदेशांतून साधकांना दिले. असे करताना वात्सल्याने या मार्गात रक्षण केले. भक्तांच्या चेहऱ्यावरून कुणाला भूक लागली, कुणाचे पाय दुखले, तर महाराजच त्यांची काळजी घेत. लालन-पालन केलेल्यांना महाराज धर्म, प्रेम, गुरुआज्ञा यांचे शिक्षण देत. ज्याचे फळ ब्रह्मज्ञान होईल व परमेश्वराचे ठिकाणी रति उत्पन्न होईल तो धर्म व यासाठी आपले स्वतंत्र अस्तित्व श्रीगुरुचरणी विलीन करतो ते खरे प्रेम. एका अभंगात या प्रेमाचे सविस्तर वर्णन करीत महाराज सांगतात, ''ज्ञानेराजा सांगे स्वामी सुखासाठी । नित्य व्हावे पोटी कासावीस ।'' भक्तांचे आपल्यावरचे प्रेम बघायला ते कुणाला पंधरा मिनिटांत स्वयंपाक करायला सांगत तर कुणाचे व्यसन घालवत. एकदम असाल तसे प्रवासाला निघा म्हणत यातून वरपांगी ते त्रास देतात असे वाटले तरी लेकराच्या हितासाठी ते होते हे लक्षात येई. केवळ गुरुसेवेने रक्तपितीसारखे रोग दूर केले. ''सर्वस्वी परतंत्रपणे आपण म्हणाल तसे मी वागेन अशी प्रतिज्ञा कोण घ्यायला तयार आहे?' असा प्रश्न विचारून शिष्यांना पेचात टाकले. ''आपली प्रतिज्ञा मला मान्य आहे महाराज ! सर्वस्वी परतंत्रपणे आपण म्हणाल तसेच मी वागेन.'' हे महाराजांना हवे असलेले उत्तर फक्त एकानेच दिले. ते म्हणजे श्री बाबाजी महाराज पंडित. ज्यांच्या गुरुसेवेनी ''मी पंडितला वश झालो आहे'' असे उद्‌गार प्रत्यक्ष श्रीगुलाबराव महाराजांनी काढले. धन्य श्रीगुरु व धन्य ते शिष्य !

महाराज कित्येकदा शिष्याला आपल्या बरोबरीने वागवत व प्रसंगानुसार त्याचे शिक्षण व रक्षणाची सोय करीत. ''सुटावया विषयाचा संग । गुरु अनुराग नित्य व्हावा'' हाच त्यातील हेतु. शिष्यांनी चूक करावी व ११ वेळा शिवापराधक्षमापनं स्तोत्र मात्र प्रायश्चित म्हणून महाराजांनी म्हणावे.

अनेकांच्या शारीरिक व्याधी दूर करणारे, अनेक भवरोग्यांना उपाय सांगणारे श्रीगुलाबराव महाराजांनी १९१४ सालची 'कात्यायनी' साजरी केली. 'आता आपला अवतार संपला. आपण निजधामास परतावे' असे स्वप्न उठून महाराजांनी सांगितले व त्यांना क्षय सुरू झाला. महर्षि अण्णासाहेब पटवर्धन हे पुण्यातील नामांकित वैद्य. त्यांचा उपचार घेण्यासाठी महाराजांना पुण्यात आणले. हेतू हा की तेथून आळंदीही दर्शनास जवळच आहे. जन्माष्टमी उत्सव सर्व शिष्यांनी मोठ्या काळजीच्या वातावरणातच आटोपला. द्वादशीला श्रीमहाराजांनी अंतरंग शिष्य असलेल्या बाबाजी महाराजांना प्रेमाने,''पंडित !'' अशी हांक मारली. ''आतापर्यंत मी तुला काही दिले नाही व शिकवलेही नाही पण आता एकच लक्षात ठेव. माझे ग्रंथ वाच आणि ते तुला समजतील !'' एवढ्या वाक्यांनी ''ये ऱ्हदयीचे ते ऱ्हदयी घातले'' हा अनुभव दिला. 'समर्थे समर्थ करावे' किंवा 'आपणासारिखे करिती तात्काळ । नाही काळवेळ तया लागी ।' असा सद्‌गुरु कृपेचा सकल संतांनी सांगितलेला अनुभव शिष्योत्तम, महाराजांचे उत्तराधिकारी सद्‌गुरु बाबाजी महाराज पंडित यांनी अनुभवला. काहीच क्षणात एक ज्ञानदीप प्रकाशमान करून स्वतःची ज्योत अनंतात विलीन केली. श्रीमहाराजांचे चिरंजीव अनंतरावांनी त्यांचा पवित्र पार्थिव देह अग्निनारायणाच्या स्वाधीन केला. त्यांच्या आज्ञेनुसार प्रयागच्या त्रिवेणीत अस्थि विसर्जित झाल्या.

महाराज, देहाने नसले तरी भक्तांच्या हाकेला 'ओ' देतात हा अनुभव असल्याने संप्रदायांत त्यांची पुण्यतिथी होत नाही हे वैशिष्ट्य ! ''माझी काया आणि वाणी । गेली म्हणाल जरी । परि मी जगाजीवनी । असें निरंतर ।' ही श्रीसमर्थांची उक्तीच गुलाबराव महाराजांच्या बाबतीत अनुभवाला येते.

चर्मचक्षू नसलेल्या पण प्रज्ञाचक्षु असलेले, स्वतःला पंचलतिक गोपी म्हणवून मधुराद्वैत संप्रदायाची स्थापना करणारे, ज्ञानेश्वर कन्या म्हणवणारे, पूर्वजन्मी बेचरानंद महाराज असलेले, नराला नारायण करण्याचे सामर्थ्य असलेले, श्रीमद् आचार्यांचे वादपटुत्व असल्याने डार्विन, स्पेन्सर सारख्या तत्त्ववेत्यांचे त्यांनी केलेले खंडन सर्वज्ञता व सर्वशक्तिमान असे सर्व भगवद् गुणांचा वास असणारे, बद्रीनारायणाच्या संन्निध असलेल्या केशवपुरीचे किंवा व्यासभूमीचे अलौकीक दर्शन घडवणारे असे मधुराद्वैताचार्य सद्. प.पू. गुलाबराव महाराजांनी आश्वासन दिले की,

''आपण जितका मजवर विश्वास ठेवाल, तितक्या या जन्मात व पुढच्या जन्मात आपणास अनंत प्रचिती येतील.''

एकाच व्यक्तिमत्त्वात इतकी वैशिष्ट्ये एकवटलेली अन्य कोणी विभूति माझ्या अल्प मतिप्रमाणे मला आढळत नाही. वेद प्रतिपादित सिद्धान्ताचेच सुलभ रूप असलेल्या भागवत धर्माने जगातील यच्चयावत् धर्मसंप्रदायांचा व भारतीय दर्शनशास्त्रांचा सोपान परंपरेने सुंदर समन्वय कसा करता येतो हे त्यांनी सप्रमाण दाखवून दिले. संत श्री गुलाबराव महाराज हे पुढल्या शतकात जगद्‌गुरुत्वाचा सन्मान पावतील असे प्रतिपादन आधुनिक काळातले भागवताचे श्रेष्ठ भाष्यकार प. पू. आचार्य किशोरजी व्यास यांच्यासारख्यांनी केले आहे. आज प्रसिद्धी माध्यमांतून त्यांच्या उपदेशाचा, वाङ्मयीन कार्याचा प्रसार वाढला आहे यातच त्याचे मर्म आहे.

माझ्यासारख्या अति छोट्या व्यक्तीने या महान चरित्राला शब्दबद्ध करणे केवळ अशक्यच. चरित्राचे वाचन व अभ्यास करून लिहिताना खाऊच्या दुकानात लहान लेकराला हे घेऊ का ते घेऊ, दुकान उचलून नेऊ का, असे होते. अगदी हे चरित्र लिहिताना माझी तीच अवस्था झाली. चमत्कारावर भर न देता जे भावले ते मी शब्दबद्ध केले. माझ्याकडून आपल्या कन्येचे चरित्र लिहून घेणाऱ्या श्री ज्ञानेश्वर माऊलीला, ज्ञानेश्वर कन्येला व भगवंताला अनन्य भावाने वंदन करून लेखणी थांबवते.

**सौ. ममता गद्रे**
अविराम, गोकुळ पेठ, नागपूर ४४००१०

# संत साहित्यातील विभूती - मधुराद्वैताचार्य श्री गुलाबराव महाराज

*बी.एस्सी. (ऑनर्स) प.पू. नाना महाराज तराणेकर अनुग्रहित नागपूरच्या शांती पुरुष व हरिद्वारच्या समन्वय साधना या मासिकातूंन लिखाण.*

## १) पूर्व परंपरा

अमरावतीपासून ४०-४५ कि.मी. अंतरावर एलिचपूर तालुक्यात माधान या खेडेगावी कुणबी लोकांची वस्ती फार. येथेच महाराजांच्या अनेक पिढ्यांचे वास्तव्य होते. महाराजांचे आजोबा राणोजीराव. ते श्री शंकराचे निस्सीम उपासक होते. महाशिवरात्रीच्या नवरात्रात ते फक्त रानशेणीचे भस्म सेवन करून कडक उपासना करीत. ते नेहमी शिवलीलामृत व अन्य धार्मिक ग्रंथ वाचीत. एकदा नवरात्रीचे उपवास चालू होते, तेव्हा श्री शिवशंकरांनी त्यांना स्वप्न दर्शन देऊन असा दिव्य दृष्टांत दिला की, "तुमच्या कुळात एक असामान्य महात्मा जन्माला येणार आहे". या राणोजीच्या चार पुत्रांपैकी तिघा मोठ्या मुलांना अपत्य लाभ झालाच नाही. सर्वात लहान पुत्र गोंदूजी. याचा विवाह लोणी टाकळी येथील पाटीलकन्या आलोकाबाई यांच्याशी झाला होता. याच गोंदूजी-आलोका दांपत्यास लोणी टाकळी येथे आषाढ शुद्ध दशमी, वृषभनाम संवत्सरात, शके १८०३ म्हणजेच २१ जुलै १८८१ रोजी एक तेजस्वी पुत्र झाला. याच पुत्राचे नाव गुलाब ठेवण्यात आले.

बाळ गुलाब सहा महिन्यांचा असताना त्याचे डोळे आले. त्यावर औषधोपचारासाठी झाडपाल्याचे औषध डोळ्यांत घातले होते. त्याचा उपयोग तर झाला नाहीच पण कायमच अंधत्व आले. गुलाबचे चर्मचक्षू नाहीसे झाले तरी त्याचे प्रज्ञाचक्षू फार सामर्थ्यवान असून चर्मचक्षूने जे दिसले असते त्यापेक्षा त्यांच्या प्रज्ञाचक्षूंनी त्यांना विश्वरचना अगदी लीलया दिसू शकत होती. अशी असामान्य दृष्टी घेऊनच त्याने या नश्वर मायेच्या विश्वात जीवन यात्रा सुरू केली.

• अशा जवळ जवळ जन्मांध स्थितीतच ते मोठे होऊ लागले. गावचे पाटील असल्याने त्यांच्या वाड्यातील विहिरीवर पाणी भरण्यास स्त्रीवर्ग येत असे. त्यांच्या पायातील जोडव्यांच्या व हातातील बांगड्यांच्या सुक्ष्मातिसूक्ष्म नाद-फरकाने गुलाब त्यांची नावे सांगत असे. या त्यांच्या प्रज्ञाचक्षूंमुळे भविष्य काळातील घटनाही हा बाळ अचूक सांगत असे. हा बाळ चार वर्षांचा झाला व त्यांच्या मातेचा बाळंतरोगाने मृत्यू झाला म्हणून तो माधानहून आजोळी टाकळीला गेला. तेथे मामा-मामी त्याचा रागराग करीत पण त्याची आजी मात्र प्रेम करीत असे. अशा परस्पर विरोधी वातावरणातही बाळाची अलौकिकता सर्वांना जाणवत असे. म्हणजेच त्याच्या नश्वर चर्मचक्षूंचा अंत व शाश्वत प्रज्ञाचक्षूंचा उदय म्हणजे

*ते पापाचा आवढू कुटे । पुण्याची पहाट फुटे ॥*

## २) अथा तो ज्ञान जिज्ञासा । अथा तो ब्रह्म जिज्ञासा ॥

गुलाब बाळ आजीसमवेत कीर्तन-प्रवचनाला जाऊन त्या विषयांचे सतत मनन व चिंतन करीत असे. धर्मग्रंथ, पुराणे, आरत्या नियमितपणे ऐकत व एकपाठी तल्लख बुद्धीमुळे ते सर्व लगेच पाठ होई. त्याला भजन-पूजनाची फार आवड होती. पुराणे व कुराणही ते वाचवून घेत व त्यातील कलमे लीलया पाठ होत. तसेच बायबल, उपनिषदे, झेंदावस्ता हे ग्रंथ वाचण्यात व समजून घेण्यात त्यांचे मन विलक्षण रमत असे. खाण्या-पिण्याची त्यांना अजिबात आवड नव्हती. शिक्षण लालसेने त्यांचे मन व्याकूळ होई. शक्य असेल त्या मार्गाने तो ग्रंथ वाचून घेई व त्याचे मोबदल्यात धान्य देत असे. पोथ्या-पुराणातील कथा ऐकून हा बाळ रात्री भजनानंतर तासन् तास प्राणायाम करीत असे व समाधी लावून बसत असे.

गावात श्री. रामराव देशपांडे नामक संस्कृत शिक्षक होते. पाढे, तोंडी हिशोब, शब्दरूपावली, धातुरूपावली अशा विविध विषयावरील बाळाची एकाग्रता व एकपाठी वृत्तीचे त्यांना आश्चर्य वाटले. त्यांनी बाळाला उपनिषदे वाचून दाखविताच बाळाने एकाच श्लोकाचे वेगवेगळे अर्थ सांगितले. शेवटी एक दिवस असा उजाडला की देशपांडे गुरुजींनी गुलाब बाळाचेच पाय धरले व त्यांच्याकडूनच गुरुपदेश घेतला. या घटनेनंतर बाळ गुलाबला 'गुलाबराव महाराज' ही संज्ञा अधिकार वाणीने प्राप्त झाली. अशी अद्वितीय घटना कुठेही झाली नसेल.

## ३) विवाह (एक समसमा संयोग)

श्री गुलाबराव महाराजांचा विवाह त्यांचे वयाचे अकराव्या वर्षी श्री. सीतारामजी भुयार यांच्या सात वर्षे वयाच्या कन्येबरोबर फाल्गुन वद्य पंचमी शके १८१४ (म्हणजेच सन १८९६) मध्ये झाला. महाराजांनी सौ. मनकर्णिकाबाईना लिहिणे, वाचणे, स्तोत्र पाठांतराची सोय केली होती. नंतर स्वतः महाराजच त्यांना वेदांग, योगविद्या, व्याकरण शिकवीत व अशा प्रकारे श्री महाराजांचे सहवासात सौ. मनकर्णिका आईचे अध्यात्मिक जीवन समृद्ध होत गेले. श्री महाराजांच्या अति मानुशी दैवी गुणांमुळे जनतेचे लक्ष त्यांचेकडे आकर्षित होवू लागले. सौ. आईपण सर्वांवर मातेच्या प्रेमाची पाखर घालीत. दोघांनाही गोड आवाजाची देणगी लाभल्याने दोघेही श्री ज्ञानेश्वरीचे पारायण करीत व त्याची लज्जत वेगळीच असे – जणु "रत्नम् समागच्छतु कांचनेन" याचा पदोपदी अनुभव येई. अध्यात्माच्या मार्गावर पतीच्या पावलावर पाऊल टाकून त्यांनी स्वतःची प्रगती करून घेतली होती.

श्री महाराजांनी जीवन विषयक कल्पना देण्यासाठी सौ. आईना एक ओविबद्ध पत्र पाठविले होते. त्यातील काही भाग असा होता –

*प्रिये तूं नव्हेस स्त्री वा पुरुष । सच्चिदानंद स्वयम् प्रकाश ।*
*अविद्येने भुलोनि तयास । स्त्री पुरुषत्व तुज वाटे ॥*
*स्त्री पुरुष देहासी नाम । त्याहुनी वेगळा आत्माराम*
*तो नव्हे काम निष्काम । कर्माकर्मा वेगळा जो ॥*
*पती पुत्र गोत्र बंधू । हे अवघेचि स्वार्थ साधू*
*यांचा सोडुनिया संबंधू । चित्ती मुकुंद आठवी ॥*

उत्तरादाखल सौ. आईनी लिहिले की वेदशास्त्राप्रमाणे मी स्त्री वा पुरुष नसेन पण जोपर्यंत स्त्री वा पुरुष मानवी देहात आहे तोपर्यंत गुरुसेवा, पतिसेवा इ. कर्तव्य बुद्धीने करणेच उचित आहे.

## ४) गृहकलह व गृहत्याग

सन १८९७ च्या मार्च महिन्यात महामारीची साथ सुरू झाली. दि. ८ मार्च रोजी महाराजांवर मातृवत् प्रेम करणारी काकू "सारजाताई" स्वर्गवासी झाली व नंतर १२ मार्च रोजी महाराजांचे तीर्थरूप "गोंदूजीबापू" निजधामाला गेले व महाराजांवर प्रेम करणारे छत्र नाहीसे झाले. घरात सावत्र आईचा आणि काकांचा वरचष्मा होता. त्यांच्या वागण्याचा व बोलण्याचा महाराजांना जाच सहन न झाल्याने त्यांनी ४० तोळे सोमल खाऊन टाकला. पण या दिव्यातून श्रीकृष्णानेच त्यांची सुटका केली. याचा मतितार्थ एवढाच की मानव जातीच्या मार्गदर्शनाचे कार्य त्यांचेकडून अद्यापि पूर्ण झाले नसल्याने थोड्याशा शारीरिक व्यथेपेक्षा विपरीत काहीही झाले नाही. उलटपक्षी सुवर्ण ज्या प्रमाणे अग्नीतून बाहेर पडल्यावर अति शुद्ध व चमकदार होते तद्वत महाराजांची प्रतिभा तावून, सुलाखून जास्त प्रखरतेने तळपू लागली.

***म्हणोनि गा भक्ता । नाही एकही चिंता***

महाराजांच्यावर विषप्रयोग करण्यासाठी सावत्र आईची धडपड पाहिल्यावर एक दिवस फक्त आपल्या पुस्तकांची पेटी डोक्यावर घेऊन त्यांनी गृहत्याग केला व ते रामराव मास्तर यांचे घरी राहू लागले. विश्रामभाऊ व गावातील इतर मंडळी महाराजांकडे येत. ते त्यांना पोथ्या-पुराणातील गोष्टी सांगत. तसेच अध्यात्मिक क्षेत्रातील महान व कठीण तत्त्वे सोप्या भाषेत सांगत. हळूहळू अध्यात्माची आवड सर्वांच्या मनात वाढू लागली. इ.स. १८९८ वैशाख शुद्ध नवमीच्या अरुणोदयास श्री गुलाबराव महाराजांनी रामचंद्र भाऊ, विश्रामभाऊ, रंगूताई अशा ८-१० मंडळींना गुरुमंत्र दिला. त्या वेळी श्री महाराजांचे वय फक्त १६ वर्षे होते. शुद्ध आचार विचाराच्या लोकांनाच श्री महाराज मंत्र देत. अशा प्रकारे महाराजांची सर्वांगीण सर्वज्ञता वाढू लागली. कोणत्याही विषयावरील विद्यादानाची संधी त्यांनी कधीही सोडली नाही.

## ५) श्री ज्ञानेश्वर माऊलींचा साक्षात अनुभव

आषाढ शुद्ध दशमी शके १८२३ (सन १९०१) रोजी श्री महाराज पत्नी व ५-६ मंडळींसह प्रथमच आळंदीला गेले. माऊलींच्या समाधीपाशी ते तीन दिवस अन्न-पाणी वर्ज्य करून प्रार्थना करीत बसून होते. तीन दिवसांनंतर प्रत्यक्ष ज्ञानेश्वरांनी दर्शन देवून महाराजांना आपल्या मांडीवर घेतले व मस्तकावर हात ठेवून महाराजांचे कानात स्वतःचे नाव मंत्र म्हणून सांगितला. असे म्हणतात की, त्या क्षणापासून महाराजांना "उह शक्ती"चे सामर्थ्य मिळाले. या शक्तीमुळे त्यांना कोणत्याही भाषेतील लिखाणाचे व बोलण्याचे भाषांतर करून दाखवावे लागत नसे. पुस्तक/लिखाण ते हाताने चाचपडत व त्यांना त्या ग्रंथातील शब्दन् शब्द सांगता येत असे. अनेक डॉक्टरांना त्यांनी हा प्रयोग करून दाखविला होता. पाश्चात्य तत्त्वज्ञ डार्विन, स्पेन्सर, हॅमिल्टन मायर्स, ॲनी बेझंट यांची अनेक पुस्तके त्यांनी याच पद्धतीने समजावून घेतली होती. उह शक्ती ही बहुधा सर्वव्यापी शक्ती असावी, यात अनोळखी व्यक्तीच्या नाडीवरून त्या व्यक्तीची माहिती सांगणे, शीघ्र कवित्वाची कल्पनातीत पराकाष्ठा असणे, सुक्ष्मातिसूक्ष्म ध्वनीमुळे भविष्य कथन करणे, शिष्याला आयुष्य वाढवून देणे, सांप्रत जीवनातील आवाजावरून भूतकाळातील जीवांची ओळख वगैरे शक्तींचा अंतर्भाव असावा.

## ६) कात्यायनी व्रत

दर वर्षी हेमंत ऋतूत कात्यायनी व्रताचा समारंभ होतो. स्वतःला गोपीभाव धरून श्रीकृष्णाला पती कल्पून भक्तीपूर्वक समर्पणाची परिसीमा म्हणजेच कात्यायनी व्रत. नारद भक्ती सूत्रातही हे समर्पित भक्तीचे सूत्र महत्त्वाचे मानले आहे. अमरावतीपासून १५-१६ मैलांवर पयोष्णीनदी आहे. त्याचेकाठी शुक्लेश्वर वाठोडा या ठिकाणी कार्तिक वद्य प्रतिपदा शके १८२५ (सन १९०३) मध्ये या व्रताची सुरुवात झाली व मार्गशीर्ष वद्य पंचमी १८२५ या दिवशी सांगता झाली. याच सुमारास महाराजांनी प्रीतीनर्तन हे काव्य रचले.

## ७) अनंताचे आगमन

चांदूरबाजारचे श्री कुर्याभाई व त्यांची पत्नी यांचे महाराजांचेवर पुत्रवत प्रेम होते. श्री महाराजांचा वंश वाढावा अशी त्यांची इच्छा होती व त्यासाठी या दांपत्याने महाराजांकडून एक वचन मागून घेतले. श्री महाराजांनी वचन दिल्यावर त्या दांपत्याने सांगितले की, शास्त्राधारे गृहस्थाश्रमी माणसाला एक पुत्र तरी हवा. पण वचनात अडकल्याने त्याच्या परिपूर्ततेसाठी, त्यांना बुधवार कार्तिक शुद्ध पंचमी शके १८२७ रोजी त्यांच्या एकुलत्या एक पुत्राचा माधान येथे जन्म झाला व त्यांचे व्यवहारी नाव अनंत ठेवण्यात आले. पुत्र प्राप्तीनंतर सौ. आईच्या मनात "पुत्र पालन वा प्रतिज्ञापालन" या बाबत काहूर उठले. महाराजांच्या दिव्यचक्षूंना या गोष्टीची जाणीव होतीच. सौ. आईच्या मनातील मोह दूर करणे त्यांच्या अध्यात्मिक प्रगतीसाठी आवश्यक असल्याने महाराजांनी सौ. आईच्या मनातील पुत्रमोह अशा प्रकारे दूर केला.

## ८) पूर्वजन्म आख्यायिका

नित्य नियमाप्रमाणे हरिभाऊ वगैरे मंडळींसमवेत महाराज देवीचे दर्शनास गेले होते. तेथून परत येत असता मंदिरात दर्शनार्थ आलेल्या एका अपरिचित वृद्धाने देवालयातील घंटानाद करून "जय जगदंब" अशी गर्जना केली, तो आवाज ऐकताच महाराज म्हणाले, "कोण? बळवंतराव मराठे काय?" "होय" तो वृद्ध पुटपुटला. पण काहीसा बुचकळ्यात पडला. तेव्हा महाराजांनी त्यांना काही खुणा सांगितल्यावर त्यावरून काठेवाडीतील झुंझुर वाडा येथे "बेचरानंद गुरुमहाराज" नावाचे एक महात्मा पुरुष होते तेच श्री महाराजांच्या रूपाने परत जन्मास आले आहेत, अशी बळवंराव मराठे यांची खात्री पटली. बेचरानंद महाराजही दोन्ही डोळ्यांनी अंध असून त्यांना संस्कृत भाषा उत्तम येत होती व वेदशास्त्रे मुखोद्गत होती. आई-वडिलांच्या आग्रहास्तव या बेचरानंदांनी तीन वेळा विवाह केला पण प्रत्येक वेळी पत्नीचा मृत्यू झाला. नंतर झुंझुरवाड्याजवळील जंगलात बारा वर्षे केवळ लिंबाचा पाला खाऊन तपश्चर्या केली. वयाच्या ८५ वर्षी इ.स. १८७९/८० मध्ये ते ब्रह्मीभूत झाले.

## ९) प्रज्ञाचक्षूंचा दिव्य अनुभव

अ) नागपूरचे श्री. वासुदेवराव मुळे यांच्या आग्रहाच्या बोलावण्यावरून महाराज तेथे गेले असता निरुपणाचे वेळी प्रमाणार्थ त्यांनी नारद पंचरात्री

या ग्रंथातील एक श्रुती म्हटली. पुढे असेही सांगितले, हा ग्रंथ छापलेला नाही. त्याच्या लेखी प्रतीही दोनच उपलब्ध आहेत. एक प्रत भोसले सरकारच्या वाड्यात व दुसरी मथुरेच्या एका चोब्याकडे आहे. भोसले सरकारच्या वाड्यातील प्रत महाराजांनी आणावयास सांगितली. प्रत वाचनालयात होती. वाचनालय बंद होते. ती दुर्मिळ प्रत कोणत्या कपाटात व कोणत्या जागी, त्याला कसले वेष्टन आहे तसेच कोणत्या ग्रंथाचे शेजारी आहे ते श्री महाराजांनी सांगितल्यावर वाचनालयाच्या कर्मचाऱ्याला ती प्रत अचूकपणे तेथेच सापडली. प्रत आणल्यावर महाराजांनी सांगितलेली श्रुती त्यांनी सांगितलेल्या पृष्ठावरच पहावयास मिळाली. अशी महाराजांच्या दिव्य चक्षूबाबत सर्वांना प्रचीती आली.

ब) अमरावतीचे श्री. नाना कविमंडन हे नेहमी महाराजांच्या सेवेत असत. यथाकाळ आपण अशक्त होत आहोत अशी जाणीव होत होती. त्यांनी ही गोष्ट श्री महाराजांना सांगितल्यावर महाराजांनी त्यांना अभय दिले होते. पुढे बसल्या बसल्या नानांना झोप येऊ लागली व एक भयानक सर्प चाल करून येत आहे असा त्यांना भास होई. इतक्यात महाराज तेथे येऊन हातातील तलवारीने सर्पाचे तुकडे करीत आहेत असे दिसे. हा प्रकार जवळ जवळ ५/६ महिने चालू होता. पण त्या कालावधीत त्यांची प्रकृती चांगली सुधारली.

पुढे अमरावतीस गेल्यावर नानाजींना ताप येऊ लागला. या बाबत महाराजांनी त्यांना सांगितले की "तू लवकरच खूप आजारी पडणार आहेस. पण माझ्याजवळ रहा. या आजारात तुला एक भयानक पुरुष दिसेल. स्वतः ज्ञानेश्वर महाराज अनेक रूपाने नटलेले आहेत. कधी ते शिवशंकराचे तर कधी विष्णूचे रूप घेतात, तर कधी ते यमाजीचेही रूप धारण करतात. आपल्या आचरणाप्रमाणे आपल्याला त्यांच्या स्वरूपाचे दर्शन होते. त्यांनी तुला आपल्या पदरात घेतले आहे. कोणत्याही स्वरूपात ते दिसले तरी चिंता करू नकोस." झालेही तसेच. त्यांचा ताप १०६ डिग्रीवर गेला. त्यांना पुढे सन्निपात झाला व मूर्च्छा आली व त्यांना एक भयानक पुरुष दिसला. महाराज नागपूरात होते. नानाजींना मूर्च्छा आल्याचे त्यांना समजताच ते अमरावतीस आले. त्या वेळी नानाजीच्या जिभेला काटे आले होते. त्यांचा श्वास बंद होता. श्री महाराजांनी आपला उजवा हात त्यांच्या गळ्यावरून फिरवला व "नानाऽऽ" अशी हाक मारली आणि काय आश्चर्य? महाराजांचा अमृतमय हस्तस्पर्श होताच नानाजी बोलू लागले. त्यांची प्रकृती सुधारली व त्याच रात्री त्यांना श्रीरामदर्शन झाले.

## १०) ह.भ.प. ल.रा. पांगारकरांची भेट (अध्यात्मिक दृष्टिकोन)

इ.स. १९०३ मध्ये श्री महाराजांनी कात्यायनी व्रताचा प्रारंभ केला होता. ते व्रत पाहण्यासाठी अमरावतीच्या राष्ट्रीय विद्यापीठाचे मुख्याध्यापक ल.रा.पांगारकर १९०६ मध्ये ८-१० मंडळींसमवेत वाठोडा येथे गेले होते. "मुमुक्षु" या वैचारिक वाङ्मयाला वाहिलेल्या नियतकालिकेचे ते संपादकही होते. महाराज व यासर्व मंडळींचा पूर्वपरिचय नव्हता. श्री महाराजांचे कीर्तन झाल्यावर त्यांनी आलेल्या एकेकाचा हात आपल्या हातात घेवून व त्याच्या हाताच्या नाडीवर बोट ठेवून त्यांची नावे अचूकपणे सांगितली. श्री. ल. रा. पांगारकरांच्या नाडीवर आपला हात ठेवून ते म्हणाले, "हे पांगारकर" आणि स्वतः पांगारकर आश्चर्याने थक्क झाले. त्यांनी या घटनेपूर्वी अनेक सत्पुरुषांची दर्शने अनेक वेळा घेतली होती. पण फक्त नाडीवरून अनोळखी पुरुषाचे नाव सांगणारा महात्मा पाहिला नव्हता. हा त्यांचा अनुभव आगळा-वेगळाच होता. महाराजांचे हे सामर्थ्य अर्तक्य तसेच अगाध होते.

या घटनेच्या दुसऱ्या दिवशी महाराजांनी श्री. ल. रा. पांगारकरांना एका शिवमंदिरात नेले. या वेळी नेहमीप्रमाणे ४०-५० जाणकार मंडळी हजर होती. तेथे महाराजांनी पांगारकरांना सांगितले,

"पांगारकर, आज तुम्ही सांगाल त्या विषयावर मी तुम्हाला प्रवचन ऐकवणार आहे."

पांगारकर स्वतः विद्वान होते व त्यांनी विचारपूर्वक ज्ञानेश्वरीतील बाराव्या अध्यायातील एक अवघड ओवी

***हे विश्वची माझे घर । ऐसी मती जयाची स्थीर***
***किंबहुना चराचर । आपण जाहला***

निवडली व तोच विषय सुचविला आणि काय आश्चर्य महाराजांनी स्वतः सुमारे १३०० ओव्या या विषयावर स्वतः शीघ्र कवित्वाने रचल्या व ज्ञानेश्वरांच्या ओवीचे निरूपण केले. प्रत्येक ओवी अशी प्रौढ व प्रासादिक होती की, पांगारकरांचे पूर्ण समाधान झाले. त्यांना वाटले असेल की साऱ्या अर्वाचीन कवितांच्या तुलनेने हे कवित्व कितीतरी श्रेष्ठ आहे व ते करणारा कवीही कसा? माता सरस्वतीने ज्ञानाचे व शब्दांचे भाण्डार याला पूर्ण मोकळे करून दिले आहे.

***तो कनकचंपकालचा कळा । की अमृताचा पुतळा***
***नाना सार्तिनला मळा । कोवळिकेचा***

ह.भ.प. पांगारकरांनी असेही नमूद करून ठेवले आहे की "महाराजांच्या संगतीत भक्तीने व प्रेमाने ओथंबलेला जो अद्भुत रोमहर्षक अनुभव मला मिळाला तसा तो कुठेही मिळालेला नाही."

महाराजांचे वरील निरूपण ३॥ तास चालू होते. ते अस्खलित व प्रवाही होते. त्यांच्या शब्दांचे माधुर्य भक्तीने व प्रेमाने दुथडी वहात असे. गंगाजळाच्या प्रवाहाप्रमाणे भारदस्त ओव्या हातात हात घालून येत राहिल्या. सखोल अभ्यास व अमोघ शैली याचे ते मूर्तीमंत स्वरूप होते. तसेच शीघ्र कवित्वाची परिसीमा झाली होती. महाराजांच्या पूर्वजन्मीच्या तपोबलाने वा उपासना बलाने त्यांना अलोट भक्ती, संपूर्ण ज्ञान, सर्वज्ञतेचा परिचय अशा अनेक गुणांचे एकत्रिकरण सत्पुरुषाशिवाय इतर कोठेही दिसत नाही. महाराजांची सद्‌गुरुंवर अपार श्रद्धा होती, ती केवळ शाब्दिक नव्हती तर ते ती प्रत्यक्ष श्रद्धा जगत होते. त्याचे असे झाले –

महाराज पांगारकरांसमवेत एकदा आळंदीला गेले असता श्री. पांगारकर पंचामृताने माऊलीच्या समाधीची पूजा करीत होते. त्यांच्या बोटातील अंगठीचा अतिसूक्ष्म स्पर्श समाधीला झाला व शेजारी असलेल्या महाराजांचे अंगावर काटा उभा राहिला.

"पांगारकर बोटातील अंगठी काढा" माझ्या माऊलीला बोचेल की." माऊलीबद्दल इतकी कोवळीक व मृदुभावना होती. मोगऱ्याच्या फुलांचा हार माऊलीला घालताना फुलांची डेखे काढूनच हार करावा अशी श्रद्धा ते जगत होते. ते म्हणत,

***माझे ह्रदयी ज्ञानेश्वर । मुखी सतत तोचि उच्चार***
***हस्त पादादिकांचे व्यवहार । नव्हेत ज्ञानेश्वराविरहीत ।***

## ११) पुणे-मुंबई भेट

सन १९०४ मध्ये आळंदीहून परत येताना ते पुण्याला श्री. केशवराव देशमुख यांचेकडे उतरले होते. तेथे रोज शास्त्रचर्चा व प्रश्नोत्तरे चालत.

त्या वेळी श्री. केशवरावांचे चुलते मुंबईचे डॉ. नानासाहेब देशमुख कामानिमित्त पुण्यास होते. महाराजांच्या असामान्य ज्ञानाने डॉ. देशमुखही भाराहून गेले होते व त्यांनी महाराजांना मुंबईला नेले. मुंबईच्या अनेक विद्वान, शास्त्री, पंडित, वकील, डॉक्टर यांची महाराजांची ओळख करून दिली. पंडित व्यंकटाचल शास्त्री, बॅ. सेटलवाड, डॉ. भाजेकर, मनोहर गवई इ. अनेक ज्येष्ठ व श्रेष्ठ जाणकार श्री महाराजांचे बरोबर विविध विषयांवर चर्चा करीत. यात ॲलोपाथी, आयुर्वेद, कायदा, न्याय, व्याकरण, वेदांत, संगीत इत्यादी विषय असत. श्री महाराज तर्कनिष्ठ धर्माधारीत तत्त्वावर सोप्या भाषेत समजावून सांगत. त्यांची अस्खलित वाणी, कुशाग्र बुद्धी, विविध विषयांचे सखोल ज्ञान यामुळे सर्वांवर छाप पडे. दिवसाकाठी १९-२० तास चर्चा चाले व असे १० दिवस गेल्यावर श्री महाराज एक दिवस कोणालाही न सांगता मुंबईहून निघून गेले. कारण त्यांना उपाधी वाढवावयाची नव्हती. याच काळात श्री महाराजांनी स्त्री गीतांची रचना केली. यात १०९२ ओव्या असून अशिक्षित स्त्रियांनाही समजतील अशा भाषेत त्या लिहिल्या असून त्या गेयही आहेत. साधना दशेपासून सिद्ध दशेपर्यंत सद्गुरूभक्ती कशी वाढते व ती कशी फलरूप होते याचे वर्णन यात आहे. परिपूर्ण प्रेमात स्वतःच्या सर्व वृत्ती त्यांनी श्रीकृष्णाला अर्पण केल्या होत्या इतके की ते स्वतःला श्रीकृष्णाची पत्नी मानत. तसेच संपूर्ण अद्वैतावस्था येण्यासाठी ते स्वतःला ज्ञानेश्वरांची कन्या मानीत व माऊलीला 'तात' संबोधीत.

## १२) सौ. मनकर्णिकाबाईचा मृत्यू

सौ. आईची प्रकृती दिवसेंदिवस खालावत चालली होती. त्यांना आम्लपित्ताची बाधा झाली होती. कृष्णाष्टमीच्या नवरात्रीचे पहिल्याच दिवशी त्यांना वांत्या सुरू झाल्या. त्यांची शुद्ध हरपली. शुद्धीत आल्यावर औषध घेण्यासाठी त्यांना तोंड उघडता येईना पण ज्ञानेश्वर महाराजांचे तीर्थ घेण्यासाठी तोंड उघडता येत असे. अखेर श्रावणवद्य चतुर्थी इ.स.१९०६ रोजी त्यांनी इहलोकीचा निरोप घेतला. महाराजांचे त्यांच्यावर नितांत प्रेम होते. त्यांचे प्रेम व शोक ''पत्नि प्रेमपराग' या काव्याच्या रूपाने बाहेर पडला. या काव्यात २६ ओळी आहेत. त्यातील एक निवडक ओळ अशी आहे.

***यक्ष निरोपी भ्रमला धन छाया दूत घे न मम नमना***
***यास्तव असशील तेथे वराने पाठवीन मी स्वमना ॥***

## १३) पत्नि पश्चात जीवन –

पत्नीच्या पश्चात श्री महाराजांनी समाज हिताचे कार्य चालूच ठेवले कारण धर्माचे पुनःश्च उत्थान करण्यासाठीच त्यांचा जन्म होता. मधुराद्वैत वाङ्मयाचे निर्माण, प्रसार व प्रचारासाठी त्यांनी सन १९०७ मध्ये नागपूर येथे श्री ज्ञानेश्वर प्रासादिक मुद्रणालय चालू केले. तेथे भक्तिपद तीर्थामृत व सुक्तिरत्नावली या मालेचे २० भाग छापून प्रसिद्ध केले. नंतर मनीषा पंचक या स्तोत्राचा मराठी अनुवाद व अंतर्विघान संहिता नावाची मोलाची रचना याच कालावधीत झाली. नंतर ते कलकत्यास प्रि. प्रियनाथ मुखर्जी यांचेकडे व तेथून जगन्नाथपुरी यात्रा करून आले. या वेळी भैरवी चक्र होते आणि ''प्राप्तेतु भैरवी चक्रो सर्वे वर्णाः द्विजातयः'' प्रमाणे जगन्नाथाचा प्रसाद एकत्र बसून घेतला. महाराज कानळी येथे असताना चित्तोपदेशाचे श्लोक व सद्वैजयंतीच्या आर्या रचल्या. मथुरा-वृंदावनाची यात्रा याच कालखंडात झाली. याच काळात शिवपार्थीव पूजनास आरंभ केला व प्रियलीला महोत्सवादी ग्रंथाची रचना झाली. ध्यानयोगदिवाकर या ग्रंथात ध्यानयोगाची प्रक्रिया सविस्तरपणे वर्णन करून सांगितली आहे. योगांग यम-लक्षण ह्या ग्रंथात योग कसा प्राप्त करून घ्यावा याचे मार्गदर्शन आहे. हिरण्ययोग या ग्रंथात भगवत प्राप्ती कशी करून घ्यावी याचे विवेचन आहे. ह्या सर्व वाङ्मयीन रचना १९०९ ते १९१३ या काळात केलेल्या होत्या.

## १४) देवासच्या महाराजांचे निमंत्रण

इ.स. १९१३ मध्ये देवास नरेश तुकोजीराव पवार यांनी श्री महाराजांना देवास भेटीसाठी आग्रहाने बोलावले. त्याप्रमाणे ११ सप्टेंबर १९१३ रोजी भक्तमंडळींसह श्री महाराज देवासला पोहोचले. तेथे संस्थानी पाहुणचार घेऊन सर्वांच्या शंकांचे निरसन करून ते १८ सप्टेंबर १९१३ रोजी इंदोरला गेले. तेथे त्यांची पालखीतून मिरवणूक काढण्यात आली. श्री महाराज इंदौरहून मुंबईला गेले. तेथे श्री. पांगारकर त्यांना सरदारगृहात घेऊन गेले. तेथे रोज प्रवचने होत. वाईचे सुविख्यात लेले शास्त्री त्यांच्या प्रवचनाला येत. ''अशी अपूर्व प्रवचने कधीही ऐकलेली नव्हती. हे विदुराचे अवतार आहेत.'' असे उद्गार लेलेशास्त्रींनी काढले होते. मुंबईला महाराजांचा मुक्काम अठरा दिवस होता.

भक्तिनिष्ठ संगीत हे श्री महाराजांच्या जीवनाचे सूत्र होते. श्री महाराजांनी गानसोपान हा ग्रंथ १९१५ मध्ये लिहिण्यास सुरुवात केली पण त्या ग्रंथाच्या समाप्तीपूर्वीच श्री महाराजांचे महाप्रयाण झाले व ग्रंथ अपूर्णच राहिला. फेब्रु. १९१५ मध्ये पार्थीवाची पूजा करताना त्यांच्या हातातील शिवलिंग भंगले. ''आजपासून मला क्षय सुरू झाला, जायचे दिवस आले' या महाराजांच्या उद्गारांनी साऱ्यांनाच धक्का बसला. डॉ. भट व डॉ. जोशी यांनी महाराजांची प्रकृती तपासली व महाराजांना क्षय झाल्याचे निदान केले. औषधोपचारासाठी पुण्याला आणले. महर्षी अण्णासाहेब पटवर्धन यांचे औषध चालू केले. त्यांना धन्वंतरीचा अवतार मानीत. जन्माष्टमीचा दिवस चिंतेतच पार पडला. नंतर द्वादशीची पहाट उजाडली. बाह्य व्यवहार संपत चालले. महाराजांनी नारायण पंडित यांना हाक मारली व म्हणाले, ''मृत्यूच्या वेळी सहस्त्र विंचू चावल्याच्या यातना होतात असे सांगितले आहे. ते अगदी खरे आहे.'' आणि महाराजांची जीवन यात्रा संपली. त्यांची महायात्रा अत्यंत साधेपणाने काढण्यात आली. लकडीपुला जवळील स्मशानभूमीत त्यांचा पार्थीव देह अग्निनारायणाच्या स्वाधीन करण्यात आला. श्रीमहाराजांचे विविध विषयावरील सखोल ज्ञान व विद्यादानाची आवड पाहून सर्व जाणकारांसमवेत पांगारकर, कृष्णानंद सरस्वती सारख्या दिग्गजांना असेच वाटले असेल की,

***''ज्ञानाचे भरले अथांगहि इथे भाण्डार सर्वा खुले ।***
***घे जे काढुनि मानवा तुज रुचे हस्तद्वया आपुले ॥***
***या या हो जन हो लुटाच अवघे अल्पांश हो ना उणे***
***अत्यानंदि पहा गुलाब दिसतो लोकार्थ याचे जिणे ॥***

श्री. गुरुनिरोयिन शब्दांकन

**श्री. शांताराम गोपाळ पोतदार**
१५८८, सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.

# प्रज्ञाचक्षूंचे विविध ज्ञानक्षेत्रातील योगदान

डॉ. कृष्णा [illegible]

*एम.ए., 'श्रीगुलाबराव महाराजांची विचार संपदा' या विषयावर पीएच.डी. श्री. बाबाजी महाराज पंडित यांचा अनेक वर्षे सहवास व सेवेचा लाभ. धर्मसमन्वयाच्या विचारावर अखंड लेखन व प्रबोधन.*

**प्र**ज्ञाचक्षू श्रीगुलाबराव महाराजांनी अत्यंत विपरीत परिस्थितीतही जे काही अमूल्य योगदान भारताला दिले त्याला तोड नाही. महाराजांच्या काळातील युरोपियन विचारांचा धक्का एवढा जबरदस्त होता की अजूनही हिंदू त्यातून बाहेर येऊ शकलेला नाही. उलट अधिकाधिक गुरफटतच चालला आहे. अशा भयानक अंधःकारयुगात महाराजांनी अनेक सांस्कृतिक विषयांचा परामर्श घेतला. हिंदु संस्कृतीला उज्ज्वल करणाऱ्या मूलभूत विचारांची योग्य दिशा दिली. एका प्रज्ञाचक्षूंनी दिलेली सत्त्वसंपन्न भारतीय जीवनमूल्यांची तर्कशुद्ध चौकट हीच भावी काळाला मार्गदर्शन करणारी गाइडलाईन आहे. महाराज म्हणतात –

(१) **"मी प्रत्येक कलियुगात धर्माचार्य म्हणून येत असतो आणि भक्तीची पुनर्स्थापना करीत असतो. (संप्रदाय सुरतरू व सुखवर सुधा)**

(२) **"आर्यांचे म्हणणे बरोबर आहे, हे सिद्ध करण्याशिवाय मला आणि माझ्या हितचिंतकांना जीवनात दुसरे कोणतेही काम नाही."** (पत्र)

याच एका भूमिकेतून त्यांनी नानाविध विषयांवर पत्रे, लेख, भाष्य आणि ग्रंथ निर्मिती करून संस्कृत, मराठी व हिंदी या तिन्ही भाषांतून आर्येतर मतांचे खंडन आणि ऋषि परंपरेतील सिद्धान्तांचे पुनर्स्थापन सडेतोड युक्तिवादाच्या चौकटीत केले आहे. ते म्हणतात,

(३) **युक्तीने पेटवून देण्याचा माझा बाणाच आहे (समयोपदेश)**

(४) **धर्माचा निर्विकारपणे विचार करणारा शुद्रवर्णात आज मी एकटाच आहे हे तू पक्के समज. (पत्र)**

अशा प्रकारच्या त्यांच्या आत्मविश्वासपूर्ण महा-जाणीवेतून त्यांची जीवनधारणा व्यक्त होते.

## अध्यात्म

विदर्भातील नाथ, वारकरी, दत्त, गाणपत्त्य, देवी, वगैरे बहुतांश संप्रदायांतून उपास्य दैवते आणि उपासना पद्धती भिन्न भिन्न असल्या तरी सर्वांनी शंकराचार्यांचे अद्वैतच स्वीकारले आहे. त्या सोबत त्यांनी भक्तिसाठी स्वीकारलेले 'आहार्य द्वैत' गौण आहे अशी बहुतांश विचारवंतांची धारणा झाली आहे. त्यामुळे तत्त्वज्ञानाला आलेला रूक्षपणा काढून टाकून, सर्व संतांनी स्वीकारलेल्या अद्वैत ज्ञानोत्तर परमप्रेमरूपा पराभक्तीची जोड अद्वैत तत्त्वज्ञानाला महाराजांनी दिली. तर्ककर्कश युक्तिवादाच्या चौकटीतून शुद्ध शांकर अद्वैताच्या भूमिकेतून पूर्वपक्ष, उत्तर पक्ष, 'मध्यस्थ' आणि महाराजांनी मांडलेला नवा 'सिद्धान्त पक्ष' अशा विशेष शास्त्रीय पद्धतीने महाराजांनी भक्तिसिद्धांताची स्थापना केली. त्यामुळे मुकुंदराजांपासून ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास आणि विदर्भातील देवनाथांपर्यंत सर्व संतांची भक्ति आणि शांकर अद्वैत यांची एकरूपता स्पष्ट झाली आहे.

***शांकरज्ञानसंयुक्तं भगवद्भक्ति-अलंकृतम्। यद्वाक्यं तत्प्रमाणं स्यादिति स्वमतनिर्णयः ॥***

हे करताना महाराजांनी प्रेमानिकुंज ग्रंथात वेदान्ताचे ११ पूर्वपक्ष मांडून शेवटी भक्तिसिद्धांताचा निष्कर्श काढून त्याला 'अनध्यस्तविवर्त' या नव्या संज्ञेने संबोधिले आहे. शंकराचार्यांच्या अध्यस्तविवर्त या संकल्पनेच्या पार्श्वभूमीवर ही नवी परिभाषा योजल्याने शांकर वेदान्ताला या भक्तिसिद्धांताचा नवा आयाम आणि योगदान मिळाले आहे.

हे सर्व करताना परब्रह्माच्या सत्-चित्-आनंद या तीन अंशांचे ज्ञानदेव-एकनाथांच्या संकेतानुसार सविस्तर विवेचन करून आनंदाशांवर भक्तीची स्थिति कशी आहे हे महाराजांनी स्पष्ट केले आहे.

***सच्चिदानंद भेदे । चालली तिन्ही पदे । परी तिही उणी आनंदे । केली येणे***
***(अमृतानुभव)***

***सत्पद ते ब्रह्म । चित्पद ते माया । आनंदपद जया । म्हणती हरी ॥***
***(श्रीएकनाथ)***

सदंश हा स्फुरण पावत नाही. चिदंशाच्या स्फुरणात सदंश व आनंद आनंदांश गौण असतो तर आनंदाच्या स्फुरणात सदंश (सत्ता) चिदंश (ज्ञान) लीन असतो. आणि वृत्तीचे स्फुरण असूनही ती जाणली जात नाही. म्हणून वृत्तीचे स्फुरण असो किंवा लय असो, समाधी असो की व्युत्थान असो, दोन्ही अवस्थेत वृत्तिव्याप्तीच असते. फलव्याप्ती मुळीच नसते. म्हणजे दोन्ही ठिकाणी शुद्ध निर्वृत्तिक ब्रह्मस्थिती असते. हीच ज्ञानेश्वरांची पराभक्ति किंवा सहजावस्था किंवा सहजसमाधी होय. संत देवनाथ या स्थितीचे वर्णन करताना "समाधि व्युत्थानी हरि विलसे" असे म्हणतात.

## उपासना भक्ति

उपासना आणि भक्ति हे दोन्ही शब्द अनेकदा एकाच अर्थाने वापरले जातात. पण महाराजांनी त्यातील सूक्ष्म भेद दाखवून दिला आहे.

* अज्ञान दशेत सगुण विग्रहाची उपासना करताना "उपास्य माझ्याहून भिन्न आहे" असे द्वैत असते म्हणून तिला उपासना म्हणतात.

* ज्ञान झाल्यावर 'उपास्य आणि मी एकच आहे' असा अद्वैताचा अनुभव असतो तरीपण सगुण भगवंताचे ठिकाणी प्रेमाची उत्कट ओढ कायम असते. तिला ज्ञानोत्तर पराभक्ति म्हणतात. अशी ही भक्ति प्राप्त झाल्यानंतर -

***प्रीतीवृत्तिसंधीत निर्गुणानंद । प्रीतिवृत्तिस्थ सगुणानंद ।***
***एवं निःशेष आटला भेद । ब्रह्मानंद चहूकडे ॥***

***(भगवद्भक्ति सौरभ अ. ८)***

दोन प्रेमवृत्तींच्या संधीत निर्गुणसमाधी असते आणि प्रीतिवृत्तीत सगुणसमाधी असते. अशा रीतीने स्फुरण होवो की लय होवो दोन्ही

ठिकाणी ब्रह्मानंदच असतो. असे नव्या पद्धतीने विवेचन करून, उपासना व भक्तीतील फरक दाखवून भक्तिशास्त्रात नवे योगदान दिले आहे.

## अनध्यस्त विवर्त

उपासना आणि भक्तीला आलंबन असलेला सगुण साकार भगवंताचा विग्रह ज्ञानानंतर नाश पावतो काय? याचे उत्तर महाराजांनी नकारार्थी दिले आहे. त्यांनी शंकराचार्यांच्या अद्वैताचा पूर्ण रूपाने स्वीकार करून "अनध्यस्त विवर्त" ही नवी संज्ञा - नवी परिभाषा वेदान्ताला दिली. प्रीतिनिर्तन-निदिध्यासनप्रकाश-भगवद्भक्तिसौरभ-प्रेमनिकुंज वगैरे ग्रंथातून हा विषय अत्यंत विस्ताराने खंडनमंडनपूर्वक सिद्ध केला आहे.

**अध्यस्त विवर्त** म्हणजे दोरीच्या ठिकाणी अज्ञानाने सर्प भासणे. दोरीचे ज्ञान झाले की सर्प निवृत्त होतो. सर्पाचा भास देखील रहात नाही. तसेच जग हे अध्यस्तविवर्त असून त्याला अधिष्ठानरूप असलेल्या परब्रह्माचे ज्ञान झाले की जगाची निवृत्ती होते. पण अध्यस्त विवर्त अज्ञानजन्य असतो म्हणून ज्ञानाने तो निवृत्त होतो. पण –

**अनध्यस्त विवर्त =** सुवर्णाच्या अलंकारात सोने असते पण सोन्याचे ज्ञान झाले असता अलंकार नाहीसा होत नाही. त्याप्रमाणे ब्रह्मज्ञान झाले तरी प्रेमवृत्तीला आलंबन असलेला भगवंताचा विग्रह अज्ञानजन्य किंवा मायाकार्य नसल्यामुळे नाश पावत नाही. हा अनध्यस्त विवर्त होय.

सर्व संतांच्या साहित्यात हा विषय मधून मधून आला आहेच, पण महाराजांनी खंडनमंडनाच्या शास्त्रीय पद्धतीने वेद-उपनिषदे-पुराणे व संतवाणीतील अनेक प्रमाणे देऊन अनध्यस्त विवर्तच्या सिद्धांत अनेक ग्रंथांतून शास्त्रीय पद्धतीने सिद्ध केला आहे. या प्रमाणे अद्वैत तत्त्वज्ञानात "अनध्यस्त विवर्त" ही नवी परिभाषा देऊन अद्वैताला मधुर केले आहे आणि आपल्या या दर्शनाला 'श्री ज्ञानेश्वर मधुराद्वैत दर्शन' असे नाव दिले. म्हणून ते मधुराद्वैत दर्शनाचे प्रथम आचार्य म्हणून ओळखले जातात.

या भक्तिसिद्धांतानुसार अधिष्ठान ब्रह्मावर जो आनंदाश स्फुरण पावतो तोच भगवंताचा सगुण साकार विग्रह असून तो पूर्ण ब्रह्मस्वरूप आहे. अविनाशी आहे. मायाकार्य नाही. दोरीच्या ज्ञानाने सर्प नष्ट होतो तसा ब्रह्मज्ञानाने भगवंताचा देह नाश पावत नाही. या प्रेमाच्या स्थितीत वृत्तीचे स्फुरण असूनही जाणीव/नेणीव नाहीशी होऊन भक्ताला शुद्ध ब्रह्मस्थिती प्राप्त होते. आणि ही स्थिती प्राप्त झाली की स्वतः भक्तही अनध्यस्त विवर्तच होतो.

## 'तत्त्वमसि' या महावाक्यातून भक्ती

"तत्त्वमसि" या महावाक्यातून आतापर्यंत शांकरपरंपरेत केवळ ज्ञानबोधच दिला आणि घेतला जात असे. महाराजांनी या अद्वैतज्ञानबोधाचा पूर्ण स्वीकार करूनही- ज्ञानानंतर भक्ति प्राप्त करून घेण्यासाठी- व्यतिरेकानंतर अन्वय प्राप्त करून घेण्यासाठी - याच महावाक्यातून भक्ति देखील कशी प्राप्त करून घ्यावी याचे 'भक्तिपदतीर्थामृत' ग्रंथात सविस्तर विवेचन केले आहे.

***धारावाही रसो भक्तिरीशे तत्पदगोचरे । त्वं-पदज्ञो परो भक्त इति***
***स्वमतनिर्णयः ॥४७॥***

**त्वंपद** जाणणारा जीव = अद्वैतज्ञानसंपन्न भक्त

**तत्पद =** ईश्वर = भक्तीला आलंबन सगुणाकार अनध्यस्तविवर्त.

**असि =** ऐक्य = ज्ञानोत्तर परमप्रेमस्वरूप माधुर्यभक्ति.

या माधुर्यभक्तीची म्हणजे पराभक्तीची १६ प्रकारांत नव्याने मांडणी केली. त्यात प्रथम नवविधा भक्ति असून पुढे लालन-वात्सल्य-माधुर्य अशा चढत्या श्रेणी आहेत. शेवटच्या चार पायऱ्या संयोग वियोगरूपी भक्तीच्या असून ही भक्ती सर्वश्रेष्ठ आणि सर्वंकष असल्याचे सविस्तर दाखवून दिले आहे. या भक्तित विषयवासनेचा किंवा शारीरिक प्रेमाचा अंशही नसतो. स्त्री-पुरुष प्रेमातील स्त्रीचे प्रेम पुरुषापेक्षा उत्कट आणि समर्पणरूप म्हणजे 'तत्सुखसुखित्वा' चे असते. उलट पुरुषाचे प्रेम 'स्वसुखसुखित्वा'चे म्हणजे भोगरूप असते. म्हणून या भक्तिचे लक्षण सांगताना महाराज म्हणतात –

***जारिणीचे परपुरुषी मन । की विरहिणीचा विरह गहन ॥***
***तो विषयभाव वेगळा करून । हरिरूपी प्रेमयोजन ते भक्ति ॥***

या प्रमाणे माधुर्य प्रेमातील स्त्रीप्रेमाची उत्कटता अद्वैतज्ञानपूर्वक असण्यातच परब्रह्माची शुद्ध आनंदमयस्थिती प्राप्त करणे होय. (न तत्र महात्म्यज्ञानविस्मृत्यपवादः- नारदीय भक्तिसूत्र) पण या माधुर्य प्रेमाचा अधिकार आत्मज्ञानसंपन्न भक्तालाच आहे, इतरांना नाही असा स्पष्ट दंडक महाराजांनी सांगितला आहे.

ज्ञान होण्यापूर्वी सामान्यतः पुरुषांनी दास्य किंवा लालन भक्ति करावी आणि स्त्रियांनी वात्सल्य भक्ति करावी असे महाराज सांगतात. त्यांनी स्वतःला ज्ञानेश्वरांची कन्या ही भावना दृढ करून श्रीकृष्णावर गोपींप्रमाणे प्रेम केले आहे. (पण हा दंडक न पाळल्यामुळे काही ठिकाणी मधुराभक्तीच्या नावाखाली स्वैराचार आढळतो आणि सामान्यांचा विलक्षण गैरसमज होतो.)

***"यथा व्रजगोपिकानाम्" (नारदभक्तिसूत्र)***
***ज्ञानेश्वरतात आणि कृष्णपती । सौभाग्यसंपत्ती नित्य मज***

## योगशास्त्रातील योगदान

श्रीमहाराजांनी योगसाधनेच्या अनेक नवीन नवीन प्रक्रिया निर्माण करून योगाच्या प्रक्रियांवर आठ ग्रंथ आणि अनेक अभंग लिहिले आहेत. चक्रे-कुंडलिनी वगैरे संबंधी नवीन शास्त्रीय माहिती सांगितली आहे आणि चक्रे-कुंडलिनींच्या जडत्वाचा निरास करून भावनेने प्रकट होणारे त्यांचे चिन्मयस्वरूप विशद केले आहे.

## वेदांचे श्रवण

वेदांच्या नित्यतेविषयी सांगताना योगसाधना करताना महाराज म्हणतात की - नादावर संयम केला असता **दहा प्रकारचे अनाहत नाद** ऐकू येतात व त्यानंतर समाधिस्थितीत **ॐकार** ऐकू येतो आणि भक्ती असेल तर त्यानंतर **चारी वेद** ऐकू येतात. याचे योगप्रभाव व संप्रदायसुरतरू ग्रंथात ज्ञानेश्वरी, भागवत व पतंजलींचे संदर्भ देऊन स्वानुभवाच्या आधारावर सविस्तर विवेचन केले आहे.

समाधीचा विचार करताना वृत्ती लय पावल्या की निर्गुण आंतरसमाधी आणि वृत्ती स्फुरण पावल्या की भक्ती असेल तर सगुणभक्तिरूप बाह्यसमाधी साधल्या जातात. आणि असे एकदा झाले की आत आणि बाहेर - समाधी असो की व्युत्थान असो - निर्वृत्तिक पूर्णब्रह्मस्थिती म्हणजे अखंड सहजसमाधी प्राप्त होते. हे अभंगादी रचनेतून देखील स्पष्ट रीतीने सांगितले आहे. यांनाच **'तत्पदनिष्ठ समाधी'** आणि **'त्वंपदनिष्ठ समाधी'**

अशी नवी नावे महाराजांनी दिली आहेत.

तसेच योगी, ज्ञानी व भक्त यांच्या आंतरिक त्वंपदनिष्ठ समाधींची एकरूपता असली तरी योगी व ज्ञानी हे व्युत्थानात नामरूपांना ('नेति नेति' असे म्हणून) मिथ्या पाहतात, तर भक्त सगुणावर प्रेमवृत्ति अर्पण करून अखंड आणि अन्तर्बाह्य सर्वत्र परब्रह्माचा आणि ब्रह्माच्या आनंदांशाचाच अनुभव घेतात. म्हणून भक्तांची समाधिस्थिती अखंड कायमच असते. त्यांना व्युत्थानच नसते.

संत देवनाथांनी 'समाधिं व्युत्थानिं हरि विलसे' हे भक्तितत्त्व विस्तारपूर्वक विशद केले आहे.

## समन्वयाचे प्रणेते

महाराजांनी समन्वयाचे नऊ प्रकार केले आहेत. आजच्या भारतीय समाजाच्या परस्पर विद्वेषाच्या काळात त्यांचा आधार घेऊन भारतीय एकात्मता सहज साधली जाऊ शकते.

रा.स्व. संघाचे पूज्य गोळवलकर गुरुजी तर म्हणतात -

''हा समन्वय विचार म्हणजे देशातील सामाजिक बंधुभावाला महाराजांनी दिलेले अधिष्ठान आहे. या समन्वयविचाराचे फार दूरगामी परिणाम होण्याजोगे आहेत. मुसलमान-ख्रिश्चन-पारशी वगैरे सर्व प्रमुख तत्त्वे - त्या त्या धर्मापेक्षा ऐतिहासिक दृष्टीने प्राचीन असलेल्या हिंदु संस्कृतीत कशी सापडतात, याचे महाराजांनी विवेचन केले आहे व त्यानुसार प्रबोधन झाले तर केवळ भारतीय समाजच एकात्म होईल असे नसून जगातील सर्व धर्मांचे समाज परस्पर सामंजस्याने राहू शकतील, इतका महाराजांचा समन्वयविचार प्रभावी आहे.''

## समन्वयाचे लक्षण

महाराजांनी समन्वयाचे लक्षण केले आहे ते असे –

**१) एकाधिकरणक, २) भिन्नवृत्तित्वे सति, ३) संप्रदायविच्छेदरहितत्त्वे सति च ४) पूर्वानेकफलावष्टंभानन्तरम् ५) एकफलजनकत्वम् समन्वयलक्षणम् ॥ पत्र.**

***अर्थ***

***सर्व संप्रदायांचा आधार एक आहे,***
***मात्र वृत्ती भिन्न भिन्न आहेत.***
***सर्व संप्रदायांचा समन्वय केला तरी***
***कोणत्याही संप्रदायपरंपरांचा विच्छेद होत नाही.***
***उलट, सर्व संप्रदायानुसार त्यांना अपेक्षित असलेली***
***अनेक भिन्न भिन्न फले प्राप्त होऊन,***
***शेवटी एकच ईश्वरप्राप्तिरूप फल सर्वांना प्राप्त होते,***
***हे लक्षात घेणे म्हणजे समन्वय करणे होय.***
***''भिन्नानां समानरूपता समन्वयः ॥''***

हेही समन्वयाचे लक्षण जुन्या शास्त्रात सांगितले आहे.

भारतीय सहा दर्शनांचा विचार केला तर सांख्य-योग, न्याय-वैशेषिक, पूर्व व उत्तर मीमांसा ही सहाही दर्शने परस्परविरोधी नसून परस्पर पूरक आहेत. या समन्वय दृष्टीनुसार महाराजांनी या सर्वांवर ग्रंथरचना केल्या आहेत. तसेच इस्लाम- ईसाई- पारशी - बौद्ध- जैन वगैरे सर्व उपासना पद्धती वैदिक तत्त्वांचेच अधिकारनुसार नवे नवे उन्मेष आहेत, हे त्यांनी दाखवून दिले आहे.

## सर्व धर्मांचे मूळ आधारसूत्र

साकल्याने विचार केला असता महाराजांनी सर्व धर्मांना मूळ असलेले सर्वांगपूर्ण आणि समजण्याला अगदी सोपे असे लक्षण सांगून नंतर दुसरे ठिकाणी सर्व धर्मांचे आधारसूत्र देखील स्पष्ट शब्दांत मांडले आहे.

***सत्त्ववृद्धिर्भवेद् येन अन्य गणुत्रयपातिनी ॥ स हि धर्मो न चान्यः स्यादिति स्वमतनिर्णयः ॥५॥***

हे धर्माचे मूळ तत्त्व मनुष्यभक्षक रानटी मानवांपासून वेदान्ती ब्राह्मणांपर्यंत सर्वच धर्मांना तंतोतंत लागू पडते. या धर्मलक्षणातून महाराजांनी जगातील सर्व धर्मांना नवे योगदान दिले आहे.

या संबंधी महाराजांचे अत्यंत आत्मविश्वासपूर्ण असलेले एक वाक्य उद्धृत केल्याशिवाय राहवत नाही. साधुबोधात महाराज म्हणतात –

***धर्माचा निर्विकार पद्धतीने विचार करणारा,***
***शूद्रवर्णात सृष्टीमध्ये,***
***मी एकटाच आहे,***
***असे पक्के समज.***

या प्रखर आणि दृढ आत्मविश्वासाने केलेली धर्माची तत्त्वमीमांसा त्यांनी त्यांच्या ''संप्रदाय सुरतरू'' या आकर ग्रंथात विस्तारपूर्वक मांडली आहे. एके ठिकाणी तर ते म्हणतात –

''वेद, पुराणे यांचा वरवर विरोध वाटला तरी समन्वयच केला पाहिजे किंवा समजत नाही म्हणून सोडून दिले पाहिजे - हा आमच्यात 'विशेष' आहे.''

अशा अनेक संदर्भावरून त्यांचे श्री दत्तोपंत ठेंगडी यांनी दिलेले 'समन्वय महर्षि' हे विशेषण सार्थ होते.

धर्मासंबंधी विचार करताना धर्मसंकर - धर्म सुधारणा - धर्मसमन्वय यांचे तुलनात्मक विवेचन त्यांनी केले. त्यानुसार आधुनिकांच्या मतांची चिकित्सा करताना विवेकानंद-रामतीर्थ-लो. टिळक वगैरेंच्या मतांचाही परखड परामर्श घेतला. आधुनिक काळातही प्राचीन धर्मतत्त्वांचा गाभा कायम ठेवून ऋषिपरंपरेचे सूत्र तुटू न देता - त्यांचा अनादर न करता - परिस्थित्यनुसार धर्मपालन कसे करता येते, याचेही मार्गदर्शन केले.

## संगीतशास्त्र

श्रीमहाराजांनी 'गानसोपान' हा ग्रंथ लिहून संगीतशास्त्रात नवी भर टाकली आहे. श्री. भातखंडे यांच्याशी झालेल्या पत्रव्यवहारातून भातखंडेंचे नवे विचार प्राचीन ऋषिपरंपरेवर आघात करणारे असल्याने तार्किक आणि अनुभाविक दृष्टीने कसे एकांगी झाले आहेत याचे निदर्शन महाराजांनी केले. 'मातंगमुनी' वगैरे प्राचीन संगीतशास्त्रकारांचा परामर्श घेऊन आपल्या संगीतविषयक चिंतनातून ''परंपरेला धरून असलेले पण आजच्या संगीतविषयक रागदारीच्या नवीन धारणांनाही स्वीकारणारे'' महाराजांचे नवे योगदान आजच्या संगीत-तज्ज्ञांनी समजावून घेणे अगत्याचे आहे.

सामवेदीय संगीत- मार्गीसंगीत- देशी संगीत आणि भक्तीने परतत्त्वाचा स्पर्श लाभलेले ''कलिमार्गी संगीत'' इत्यादी प्रकारांवरील त्यांचे विवेचन नवीन तर आहेच पण त्यातही ''कलिमार्गी संगीत' ही त्यांची संकल्पना आधुनिक संगीतशास्त्राला नवे योगदान आहे.

*(१) काव्याने रस, (२) छंदाने काललालित्य,*
*(३) स्वराने हृदयरंजन व (४) अर्थाने मोक्ष.*

हे महाराजांनी गानसोपानात सांगितलेले प्रयोजनचतुष्ट्य भारतीय संगीताच्या तत्त्वज्ञानाचा गाभा विशद करते.

***छंदशास्त्रातील मात्रारचना । जेणे प्रबंध ताल मिळे अनुमाना ।***
***काव्यशास्त्रातील रसभावना । आणि अर्थ वेदान्त-भक्ति शास्त्रचि ॥***
***तेथे स्वरे हृदय आकर्षिजे । छंद ताले पुनःपुनः तेथचि स्थापिजे ।***
***रसे द्रवत्व आणिजे । अर्थे मिळीजे भगवंती ॥***

याप्रमाणे अनेक नवी नवी सूक्ष्म तत्त्वे उलगडून दाखवून संगीताच्या तत्त्वज्ञानात नवे नवे योगदान देऊन संगीतशास्त्राची निर्मिती केली आहे. पण अजूनही ती लोकांपुढे आलेली नाहीत.

## काव्यशास्त्र

महाराजांनी काव्यसूत्रसंहिता हा १९२ सूत्रे असलेला ५ अध्यायांचा ग्रंथ निर्माण करून काव्यशास्त्रातही नवे योगदान दिले आहे.

१) संसारातील भोगरूप आनंद. २) काव्यातील अलौकिक रसाचा आनंद.

३) भक्तितील स्वयंरूप आनंद

अशा चढत्या पायऱ्या सुचविल्या आहेत.

* काव्यशास्त्र आणि भक्तिशास्त्र यांचे परस्परावलंबन शास्त्रीय पद्धतीने दाखवून 'रसो वै सः' या आत्मतत्त्वापर्यंत म्हणजे परतत्त्वस्पर्शापर्यंत काव्याला नेऊन पोचविले आहे.

विकार आणि विचार मिळून स्थायीभाव होत असतो हा नवा सिद्धांत मांडला आहे.

***सृष्टीच्या ईश्वरनिविष्ट असलेल्या स्वरूपाला काव्य म्हटले आहे.***
***कवीचे प्रकार सांगितले आहेत.***
***स्फूर्तीचे प्रकार स्पष्ट केले आहेत.***

या प्रमाणे काव्यशास्त्रातील अनेक नवे नवे सूक्ष्म धागे उलगडून दाखविले आहेत. पण हे करताना वैदिक आणि पौराणिक परंपरेचा धागा मात्र अगदी मजबूत आहे. परंपरेचा पूर्ण स्वीकार असूनही नवे असलेले हे काव्यविषयक तत्त्वज्ञान अभूतपूर्व आहे. श्रीरामदास-तुकारामादी संतांच्या काव्यविचारांबद्दल तिटकारा दाखवणाऱ्या आधुनिक साहित्यिकांना श्रीगुलाबराव महाराजांचे काव्यशास्त्र हे एक आव्हान आहे. महाराजांच्या काव्यसिद्धांन्तानुसार पाहिले असता पाश्चात्य काव्यविचारांचा तोकडेपणा लक्षात येतो आणि आपल्या भारतीय काव्य परंपरेची वैचारिक खोली किती अगाध आहे याची किंचित् कल्पना येते.

महाराज स्वतः संत होते, कवी होते, शास्त्रज्ञ होते आणि शास्त्रनिर्मातेही होते. या चारही भूमिका त्यांचेकडे एकवटल्यामुळे, यापुढे पाश्चात्त्य असो, प्राचीन भारतीय असो किंवा अत्याधुनिक साहित्याची समीक्षा असो - महाराजांच्या काव्य विचारांचा अभ्यास करून परामर्श घेतल्याशिवाय काव्यशास्त्रीय अध्ययनाला पूर्णताच येऊ शकत नाही; इतके मोलाचे योगदान महाराजांनी दिले आहे.

भारतीय रससिद्धांताचे जागतिक कीर्तीचे विद्वान डॉ. ग.त्र्यं.देशपांडे विश्वसंतसाहित्य प्रतिष्ठानच्या एका व्याख्यानमालेत म्हणाले होते की,

***''श्रीगुलाबरावांची अनध्यस्तविवर्ताची संकल्पना भविष्यकाळात काव्यशास्त्र-शिल्पशास्त्र-संगीतशास्त्र-सौंदर्यशास्त्र-वास्तुशास्त्र-तत्त्वज्ञान-वगैरे सर्व ज्ञानक्षेत्रातील सूक्ष्म प्रमेये उलगडून दाखविणारी सर्वंकष ठरेल यात मला तरी संशय नाही.''***

## आयुर्वेद

वैद्यकशास्त्रावरील श्रीगुलाबरावमहाराजांच्या मानसायुर्वेद ग्रंथात आयुर्वेद आणि ॲलोपॅथी यांची तुलना आहे. त्यात पाश्चात्यांच्या जंतुकारणवादापेक्षा आर्यांचा मनोविकार-कारणवाद हाच रोगनिर्मितीच्या मुळाचे विश्लेषण करणारा कसा आहे हे दाखवून दिले आहे. तसेच त्यांचे द्रव्यगुणसंबंधीचे विवेचन पूर्वसूरीपेक्षा नवीन आहे.

## नीतिशास्त्र

नीतिशास्त्रातील तत्त्वांचा तुलनात्मक विचार मांडताना श्रीमहाराजांनी पाश्चात्त्य नीतिमूल्यांना गौण ठरविले आहे. पाश्चात्यांनी केवळ भौतिक सुखप्राप्तीचा विचार केला आहे तर भारतीयांनी पारलौकिक आणि पारमार्थिक उन्नतीला अनुसरून भौतिक सुखासाठी असलेले आचरण परस्परपूरक आणि सामंजस्याचे कसे असावे, हे सांगितले आहे. म्हणजेच नीतीमध्ये धर्माचा अन्तर्भाव केला आहे त्यामुळे बरेच वेळा धर्म आणि नीती हे दोन्ही शब्द एकाच अर्थाने वापरले जातात. आणि म्हणूनच धर्माला अनुसरून असलेली 'सन्नीति' आणि अधर्माकडे झुकलेली ती 'कुटिलनीति' असे भेद झाले आहेत.

पाश्वात्त्यांच्या (१) **ॲथोरिटी** (आप्तवचन) (२) **इंट्यूशन** (अन्तस्फूर्ती) (३) **युटीलिटी** (बहूपयोगिता) आणि (४) **इव्होल्यूशन** (विकासवाद) या चारही मतांचे महाराजांनी खंडन केले. पण शेवटी मात्र त्यांच्या समन्वय पद्धतीनुसार महाराजांनी पाश्चात्यांच्या ग्राह्य भागाचा भारतीय नीतितत्त्वांशी समन्वयही करून दिला आहे.

नीति संकल्पनेत जर परलोकविषयक पापपुण्य संकल्पनेचा अन्तर्भाव केला नाही तर 'लोकांना कळू न देता' चोरी करणे - व्यभिचार करणे, फसवणे वगैरे सर्व नीतीतच अन्तर्भूत होतात. त्यामुळे ''लोकांना दाखवण्यापुरता नीतिमान्' असा अर्थ झाल्याने सर्वत्र गोंधळच होईल. आणि नीतिमान पुरुष म्हणजे दांभिक (हिपोक्रॅट) असा अर्थ झाल्याने सर्व समाजाचीच अधोगती होईल.

हे सर्व टाळण्यासाठी नीतीला धर्माचे आणि परमार्थाचे अधिष्ठान हेच कसे उचित आहे हे तर्कनिष्ठ युक्तिवादाने नीतितत्त्वविचारातून महाराजांनी स्वमतनिर्णयात मांडले आहे.

***धर्मेऽन्तर्भावयेन्नीतिं नीत्यां धर्मं विपर्यदि ॥***
***नीतिः कालानुरोधेन इति स्वमतनिर्णयः ॥४॥***
***धर्माविरुद्धो भूतेषु कामो ऽस्मि भरतर्षभ ॥ गी.७.११***

या प्रमाणे महाराजांनी भारतीय नीतीची भूमिका नव्या संदर्भात स्पष्ट प्रतिपादन करून भारतीयांच्या नीतिसंकल्पनेला नवे योगदान दिले आहे.

## पाश्चात्त्य तत्त्वज्ञानांचा परामर्श

पाश्चात्त्य तत्त्वज्ञानांचा परामर्श घेताना महाराजांनी डार्विनचा उत्क्रांतिवाद-स्पेन्सरचा अज्ञेयवाद- अणुवाद - संशयवाद वगैरे पाश्चात्त्य

मतांची चिकित्सा भारतीय न्यायघटित तर्कपद्धतीने तावून, सुलाखून केली आहे. डार्विनच्या उत्क्रांतिवादाचे खंडन करून शेवटी ते म्हणतात,

"केवळ उत्क्रांती मानणे हे बुद्धीला पटण्याजोगे नाही. उत्क्रांती आणि अपक्रांती दोन्ही होत असतात. म्हणून परस्पर सहकार्याची भावना वाढणे, द्वेष कमी करणे, विकार नाहीसे करणे, विकारांवर विचारांचा ताबा मिळवणे ही भारतीयांची उत्क्रांतीची संकल्पना आहे. आणि ती डार्विन स्पेन्सरांच्या मतानुसार नैसर्गिक होत नसून प्रयत्नपूर्वक होत असते."

या प्रकारे म्हणून महाराजांनी पाश्चात्त्यांचा नैसर्गिक उत्क्रांतिवाद अमान्य केला असून भारतीयांचा प्रायत्निक उत्क्रांतिवाद तात्त्विक दृष्टीने स्पष्ट केला आहे. तसेच अज्ञेयवाद, संशयवाद, अणुवाद वगैरेंचेही त्यांनी खंडन केले आहे.

त्यांचे अलौकिक व्याख्यानमाला या ग्रंथातल्या ९ व्या व्याख्यानातील अणुवादखंडनाचे तात्त्विक विवेचन हे आधुनिक संदर्भातील योगदान आहे.

## इतिहास

पाश्चात्त्यांनी भारतीय इतिहासाची केलेली विकृती पाहून महाराजांनी इतिहासाची आर्यसंमत मार्गदर्शक तत्त्वे सांगितली.

***(१) आर्य हा वंश नसून संस्कृती आहे.***

***(२) आर्य भारतात बाहेरून आले नाहीत.***

***(३) शूद्रवर्ण आर्यांचाच एक भाग आहे.***

***(४) आर्यसंस्कृती प्राचीन काळी सर्व विश्वात पसरली होती.***

हे सिद्ध केले. नंतर शैक्षणिक मूल्ये असलेली इतिहास लेखनाची मीमांसा केली. 'सुसंस्काराचे दान म्हणजे शिक्षण' या शैक्षणिक निकषानुसार लिहिला गेलेला खरा इतिहासच भारतीय संस्कृतीत प्रमाण मानला जातो. तसेच शत्रूंनी केलेली निंदा आणि मित्रांनी केलेली स्तुती यापेक्षा शत्रूंनी केलेली स्तुती आणि मित्रांनी केलेली निंदा या खऱ्या परिस्थितीच्या निदर्शक असतात, म्हणून –

***इतिहासाचे प्रयोजन काय?***

***इतिहास कोणी लिहावा?***

***कोणत्या इतिहासावर विश्वास ठेवावा?***

वगैरे अनेक बाबींचे सविस्तर विवेचन केले आहे. भारतीय इतिहासाचे खरे लेखन करताना महाराजांच्या तात्त्विक आणि मार्मिक भूमिकेचा आधार घेऊन भारतीय इतिहास सादर होणे आवश्यक आहे.

## सामाजिक आणि राजकीय तत्त्वज्ञान

आज लोकशाही आणि समता ही चलनी नाणी झाली आहेत. पण यासंबंधी श्रीगुलाबराव महाराज आणि त्यांचे उत्तराधिकारी श्रीबाबाजी महाराज पंडितांनी लोकशाही एकमत-बहुमत वगैरेबद्दल परखड मते मांडली आहेत.

लोकशाही कुठे असावी? कशी असावी? कोठे असू नये? कशी असू नये? यासंबंधीची स्पष्ट मते मांडली आहेत. लोकशाहीतील दोषनिवृत्तीचे उपायही सांगितले आहेत.

आज सरसकट प्राचीन भारतीयांच्या वर्णव्यवस्थेवर निंदेचे आघात होत असतात. त्या वर्णव्यवस्थेमागील प्राचीन ऋषींची भूमिका या गुरुशिष्यांच्या जोडीने उकलून दाखविली आहे. आणि भारतीयांच्या तात्त्विक भूमिकेचा-पूर्वग्रह सोडून विचार केला असता लोकशाही-समानता आणि वर्णव्यवस्था यांचा परस्पर विरोधच शिल्लक राहत नाही, हेही स्पष्ट दिसून येते.

आज जरी वर्णव्यवस्था कालबाह्य वाटत असली तरी हजारो वर्षे नीती, धर्म, तत्त्वज्ञान, शास्त्रांच्या उन्नत परंपरा आणि याबरोबरच सात्विकपणा, त्यागवृत्ती, सर्वभूती दयावृत्ती, माणुसकी टिकवून समाजाला उन्नत आणि सात्विक ठेवणाऱ्या समाजव्यवस्थेची मीमांसाही समजून घेणे आणि त्यातील आजच्या काळातही ग्राह्य असलेल्या गोष्टींचा स्वीकार करणे अगत्याचे आहे.

समानतेच्या पोकळ घोषणा करणारे साम्यवादी तत्त्वज्ञान किती फोल ठरले आणि व्यक्तिस्वातंत्र्याचा आणि ह्यूमन राईटचा पराकोटीचा उद्घोष करणारे युरोपियन हिंसक समाजस्वार्थासाठी किती पतन पावले आहेत हे लक्षात घेऊन सामाजिक आणि राजकीय पार्श्वभूमीवर भारतीय नीतिमूल्यांची नित्यनूतनता मनावर अधिक ठसली जाते. त्यामुळे प्राचीन भारतीयांच्या सामाजिक आणि राजकीय विचारांची अभ्यासपूर्वक दखल घेऊन आपल्या विचार पद्धतीत, शिक्षणात आणि आचरणात बदल करणे हीच आजची सामाजिक गरज आहे.

## बहुमत आणि एकमत

महाराज बहुमत आणि एकमत यासंबंधी म्हणतात –

वय, विद्या, शील, पैसा, व्यसन (संकट) आणि कुळ यांहीकरून समान असलेल्यांमध्येच बहुमताचा न्याय शोभतो. यातून जर एखाद्याला एखादी गोष्ट जास्त असेल त्या त्या संबंधात त्याचे एकट्याचे मत प्रमाण धरले जाते.

बलाचे काम बहुमताने आणि बुद्धीचे काम एकमतानेच होत असते.

मला विकतची किंवा पैशाची गुलामगिरी पसंत नाही पण गुणांची गुलामगिरी पसंत आहे.

हिंदुस्थानात जी वर्णव्यवस्था आहे ती गुलामगिरी सारखी भासते पण ती सद्गुण मिळवण्यासाठी आहे, पोटासाठी नाही.

समाज कितीही सुधारणेच्या शिखरावर गेला तरी गुलामगिरी ही राहणारच असे माझे स्पष्ट मत आहे.

**श्रीबाबाजी महाराज पंडित** आर्यधर्मोपपत्ती या ग्रंथात म्हणतात –

लोकशाहीच्या स्थापनेबरोबर अनीतीची स्थापना होत असते व लोकशाहीच्या या दोषावर ऋषिप्रणीत धर्मावर श्रद्धा हाच उपाय आहे.

हे विचार जुन्याचे समर्थन करणारे म्हणून टाकाऊ समजण्यापेक्षा त्यासंबंधी योग्य चिंतन करून समाजाच्या धारणेसाठी व समाजाची सत्त्ववृद्धी होण्यासाठी योग्य तो निर्णय घेता आला पाहिजे.

## समारोप

वरील विषयांप्रमाणेच महाराजांनी सौंदर्य, शास्त्र, ज्योतिष, स्फोटवाद, व्याकरण, लिपी, क्रीडा वगैरे अनेक विषयांवर मूलभूत चिंतन केले आहे. जुन्या व नव्या शास्त्रांमधील संकल्पनांचीही न्याय आणि सांख्य दर्शनानुसार तार्किक आणि तात्त्विक चिकित्सा केली आहे. आणि त्यातील उणीवा दाखवून भारतीय विचार पद्धतीतील ग्राह्य भाग उकलून दाखविला आहे. त्या सर्वांचा परिचय करून दिल्यास फार विस्तार होईल म्हणून संक्षेपाने येथे नामोल्लेख करणेच इष्ट वाटते.

**डॉ. कृष्ण माधव घटाटे**
गोकुळ, घटाटे बंगला, सिव्हील लाइन्स, नागपूर ४४०००१.

# संत श्री. गुलाबराव महाराजांची 'मधुरा' भक्ती

प्रा. डॉ. सौ. समिता टिल्लू

*बी.ए. (तत्त्वज्ञान) पुणे विद्यापीठ परिक्षेत प्रथम. एम.ए. पहिला वर्ग, पीएच.डी. प्रबंध Social & Politicial Philsophy of Ramdas १९८४. १९९३ मध्ये संत साहित्यावरील उत्कृष्ट प्रबंध म्हणून गुरुदेव रानडे-दामले पुरस्कार. सज्जनगड, समर्थदर्शन मासिकांत लिखाण. नवरोजी वाडिया महाविद्यालयात तत्त्वज्ञान विभाग प्रमुख व प्रपाठक.*

**मा**नवी जीवनाला पूर्णत्व, आनंदमयत्व, दिव्यत्व कशाने येईल याचा विचार भारतीय तत्त्वज्ञानाच्या परंपरेत वेदोपनिषदांपासून ते संतवाङ्मयापर्यंत अखंडपणे चालू असलेला दिसतो. या विचारमंथनामध्ये मोक्षप्राप्तीमुळे हे शक्य होईल ही भूमिका मांडलेली दिसते. याचेच वर्णन आत्मसाक्षात्कार किंवा आत्मानुभव, ब्रह्मानुभव यासारख्या शब्दांनीही केले आहे. आत्मानुभवाच्या या आनंदमयतेची अनुभूती वैदिक ऋषींना व साक्षात्कारी संतांना लाभलेली आहे असे ही परंपरा मानते.

मानवाला उन्नत पदाला पोहोचविणारे साहित्य म्हणजे संतवाङ्मय. आनंदाचा झरा हा मनुष्याच्या अंतःकरणात आहे, बाहेर नाही. संत साहित्य हे विस्तार प्रकार व खोली या दृष्टीने लोकविलक्षण आहे. असे जरी असले तरी तथाकथित तत्त्वज्ञानाच्या संकल्पनेत संत तत्त्वज्ञान दर्शन चपखल बसत नाही. संतांचा तत्त्वविचार हा पद्यात - काव्यात लिहिलेला आहे तो साधकांसाठी आहे, तार्किकांसाठी नाही. त्याचा उद्देश तार्किक चिकित्सा नसून जीवन मार्गदर्शन हा आहे.

असे जीवन मार्गदर्शन करणाऱ्या संतांच्या परंपरेतील प्रज्ञाचक्षु, मधुराद्वैताचार्य श्री. गुलाबराव महाराज ही विसाव्या शतकातील अलौकीक विभूती, थोर विचारवंत होते. त्यांनी परंपरेचा धागा तुटू न देता परमार्थापासून ऐहिक व्यवहारापर्यंत नानाविध विषयांवर तौलनिक अध्ययन करून नवे योगदान दिले. जगातील सर्व धर्मांचे मूळ सत्ववृद्धि, सर्व धर्मातील समानता शोधून काढून अत्यंत प्रभावी असा समन्वय विचार त्यांनी मांडला आणि त्यातून जागतिक बंधुभावाला एक नवा आयाम दिला. त्यांचा काल हा इ.स. १८८१ ते १९१५ म्हणजे अव्वल इंग्रजी गुलामगिरीचा. तत्कालीन भारतीय समाजात पाश्चात्य तत्त्वज्ञान, विज्ञान आणि नीति यांना अति गौरवाचे स्थान होते. अशा वेळी पाश्चात्य तत्त्वज्ञानातील स्वानुभूतितील उणिवा निदर्शनास आणून देण्याचे आणि भारतीय दर्शनांचे श्रेष्ठत्व युक्तिवादांच्या सहाय्याने पटवून देण्याचे आत्यंतिक मोलाचे कार्य कोणीतरी करावयास हवे होते. श्री. गुलाबराव महाराजांच्या वेळी पाश्चात्यांच्या संस्कृतीची पकड सुशिक्षितांच्या मनावर होती. पाश्चात्य व पौर्वात्य शास्त्रांचे सूक्ष्म अध्ययन करून दोघांमध्ये श्रेयस्कर मार्ग कोणता हे चिकित्सक बुद्धीला निःसंदिग्धपणे पटवून देणारा मार्गदर्शक पाहिजे होता. ते कार्य बालान्ध व शिक्षणाचा अभाव असूनही ३४ वर्षांच्या अल्प आयुष्यात महाराजांनी केले. त्यांची प्रज्ञा ऋतंभरा व विमलदर्शी असल्याने वेदांत, पदार्थविज्ञान, मनोविज्ञान, तत्त्वज्ञान, संगीत, व्याकरण, आयुर्वेद साहित्यशास्त्र, काव्य इ. विविध शास्त्रांना स्पर्श करणारी त्यांची ग्रंथ संपदा असून त्यामध्ये भाष्यग्रंथ, सूत्रग्रंथ, वैचारिक लेख यांचा समावेश आहे. तसेच लोकगीते, स्त्रीगीते, तुंबडी, विरहिणी, गौळणी, अभंग, पदे यांसारखे लोकवाङ्मयही त्यांनी अत्यंत रसाळपणे लिहिले आहे. हिंदी, मराठी, व्रज, संस्कृत इ. भाषांमध्ये लिखाण करून ते अनेकांना उपलब्ध केले आहे.

'सकल शास्त्रे स्वयंभे निघती मुखे' असे यथार्थ वर्णन ज्यांचे करता येईल असे मधुराद्वैत संप्रदायाचे आचार्य संतश्रेष्ठ श्री. गुलाबराव महाराज म्हणजे विज्ञान व मानसशास्त्रातील चमत्कारच होय. श्रीशंकराचार्यांचे तत्त्वज्ञान आणि संतांच्या परमप्रेमरूप भक्तीचा सुमधुर संगम असे त्यांचे चरित्र, तत्त्वज्ञान व भक्ति यांचे स्वरूप पाहता लक्षात येते. श्रीज्ञानेश्वरांच्या नंतर ६०० वर्षांनी त्यांची मानसकन्या मातेच्या कार्याचे पुनर्प्रसारण करण्यासाठी अल्पकाळ अवतीर्ण झाली असावी. अलौकीक भक्ति, अगाध ज्ञान, शास्त्रशुद्ध कर्माचरण, तर्कशुद्ध विवेचन पद्धती यांतून महाराजांची साहित्य संपदा निर्माण झाल्याचे दिसून येते.

श्री महाराजांनी भक्तीला अद्वैताची बैठक देऊन भक्तीशास्त्राची मांडणी केली. त्यात मधुराभक्तीचे सर्वश्रेष्ठत्व तर दाखवून दिलेच पण त्याबरोबर स्वतः ज्ञानेश्वरकन्या होऊन गोपीभावात रममाण झाले. संतश्रेष्ठ ज्ञानेश्वर महाराजांबद्दल ते म्हणतात,

***माझा सद्गुरू करूणाघन । आळंदीपती कल्याण निधान ।***
***जेणे आपुलिया नामाचा मंत्र देऊन । कृतार्थ केले मजलागी ॥***
***कैवल्य कनकाचिया दाना । जो न कडसी थोर साना ।***
***द्रष्ट्याचे दर्शना पाठाऊ जो ॥ या साच करावया निजवचना । अंकी***
***घेऊनी खुणा । सांगितल्या स्वनामाच्या ॥ न देखोनी मम पात्रपत ।***

माऊलीच्या कृपेने मला वेदांतापासून परमाणू विज्ञानापर्यंत सर्वकाही अवगत झाले असे कृतज्ञतापूर्वक नमूद करताना महाराज म्हणतात,

***घेऊनी मजला निज मांडीवरी । स्नेहे पान्हावली । वो माय माझी***
***ज्ञानेश्वर माऊली ।***

तत्कालीन परिस्थिती विचारात घेता प्रार्थना, ब्राह्मो, सत्यशोधक समाज या सर्वांचा भगवंत कल्पनेवर विश्वास असला तरी रूपावर विश्वास नाही, शक्तीमान परमात्मा एखादे रूप घेऊ शकतो यावर विश्वास नव्हता तेव्हा तत्त्वज्ञानाचा अतिशय सुंदर उहापोह करीत 'मधुरा' भक्तीचा प्रसार त्यांनी केला.

## मधुरा भक्तीचे स्वरूप

या मधुरा भक्तीचे स्वरूप समजावून घेत असता त्याचा उगम आपणास वेद, उपनिषदे व गीतेत सापडतो. परमेश्वराशी पती-पत्नी वा प्रियकर - प्रेयसीचे नाते जोडून जी भक्ती केली जाते तिला मधुरा भक्ती असे वैष्णवकारांनी म्हटले आहे. श्रीकृष्ण व गोपी यांची भक्ती या मधुरा भक्ती प्रकारची होती. भारतीय संतांमध्ये ही भक्ती प्रामुख्याने चैतन्य महाप्रभु, संत मीराबाई, चक्रधर, रामकृष्ण परमहंस, संत गोरा कुंभार इत्यादी संतांनी केली. मानवी जीवनात सार्वत्रिक असणारी अज्ञात सत्याकडे

वारंवार ओढ घेणारी, त्यांच्याशी नाना प्रकारे संबंध प्रस्थापित करू इच्छिणारी, आदर, आत्मसमर्पण इत्यादी भावनांनी परिपुष्ट बनलेली मनाची जी अनुभवगम्य, निरामय स्थित वृत्ती बनते तिला भक्ती असे नाव आहे. आत्याने परमात्म्याशी, जीवाने शिवाशी, ससीमाने असीमाशी हा जो मीलनात्मक संबंध स्थापन करण्याचा अनुरागयुक्त प्रयत्न त्याच वृत्तीतून मधुरा भक्तीचा उगम झालेला दिसून येतो. भागवत ग्रंथामध्ये मधुरा भक्तीचा संपूर्ण विकास श्रीकृष्ण कथेच्या रूपात झालेला दिसतो. तरी मधुरा भक्तीची बीजभूत अंगे भगवद् गीतेतही अस्पष्ट रूपाने प्रकट झालेली दिसतात.

## भक्तिची वेदकालीन व भागवत कालीन कल्पना

शांडिल्य सूत्रात शांडिल्य मुनींनी 'सा परानुशक्तिरी धरे' अशी भक्तिची व्याख्या दिली आहे. 'योगे वियोगवृत्ती प्रेम' अशी प्रेमाची उत्कट अवस्था सूत्रात व्यक्त झाली आहे. ईश्वरावर परम प्रीति करणे हे जरी प्रमुख सूत्र असले तरी महानुभावांच्या कृष्णभक्तीपासून ते थेट श्री. गुलाबराव महाराजांपर्यंत पाहिले तर भागवत ग्रंथाचा फार मोठा परिणाम मराठी साहित्यातील भक्तीतत्त्वावर झालेला आहे, असे संतांच्या विरहिण्या, गौळणी वाचल्यावर लक्षात येते. भारतीय शृंगार भक्तीस मधुरा भक्ती हे नाव उत्तरेतील साधुसंतांनी किंवा बंगाली साहित्य शास्त्रांनी दिले असले तरी मधुरा भक्तीच्या मुळाशी 'भागवतातील गोपीप्रेम' हाच स्थायीभाव दिसून येतो.

भागवत, नारदीय भक्तीसूत्रे, हरिभक्तीरसामृतसिंधु, उज्वल नीलमणी या आधारे भक्तीची अशी व्याख्या करता येईल की, परमेश्वराच्या चरणी आपल्या चित्ताच्या सर्व वृत्ती उत्कट प्रेमभावाने अर्पण करणे. म्हणजे भक्तिमहर्षि नारदांनी 'तदर्पिताखिलाचारता, तदस्मरणे परमव्याकुलता, महात्म ज्ञान, तत्सुखसुखित्वम्' ही चार लक्षणे भक्तीची सांगितली आहेत. नारदांनी भक्तिसूत्रात 'कांताभक्ती' हा स्वतंत्र भक्तीप्रकारही मान्य केला. परमेश्वराचे रूप मधुर, त्याचे हावभाव मधुर, त्याच्या लीला मधुर, त्याचे सर्वकाही मधुर म्हणून कांता भक्तीस **मधुरा भक्ती, उज्वल भक्ती** हे नामाभिधान प्राप्त झाले. मधुरा भक्तीत विरह, मीलन, दिव्यानंद याला खूप महत्त्व आहे. या मधुरा भक्तीत भगवंतावर अहेतुक प्रेम करणे आणि या प्रेमात अर्थातच लालन, सख्य, वात्सल्यादि सर्वच प्रकारच्या प्रेमाचा अंतर्भाव झालेला असतो. ही मधुरा भक्ती श्रृती, स्मृती, पुराणांपासून संतांपर्यंत अव्याहतपणे चालत आलेली आहे. वेदातील मधुरा भक्तीचे स्वरूप भागवतातील गोपीप्रेमाप्रमाणे बहरलेले दिसून येत नसले तरी अंकुर रूपाने ते वैदिक सूक्तांमध्ये अस्तित्वात आहे यात तिळमात्र शंका नाही. श्रीकृष्णाने पत्नी होऊन शिवाला माधुर्य प्रेम दिले आहे. अशी ही माधुर्य भक्ती करूनही अद्वैतात यत्किंचितही उणेपणा येत नाही. असे हिचे वैशिष्ट्य असल्याने हिलाच 'पराभक्ती'ही म्हणतात. वैदिक सूक्तांमध्ये अनुस्यूत असलेली माधुर्य भक्ती हीच महाराजांच्या मधुराद्वैत संप्रदायाची अधिष्ठात्री देवता आहे. वेदात असलेली माधुर्य भक्ती व शंकराचार्यांनी सांगितलेले अद्वैत ज्ञानाचे महत्त्व या दोहोंना एकत्र करून महाराजांनी मधुराद्वैत संप्रदाय स्थापन केला.

महाराष्ट्रातील मधुरा भक्ती भागवत संप्रदायाच्या आधारे विकसित झालेली आहे. ज्ञानदेव, तुकाराम, निळोबाराय यांच्या विरहिण्या पाहिल्या तर असे लक्षात येते की, भक्तीत सर्वत्र थाट शृंगारी पण अनुभूती मात्र वैराग्याची किंवा ज्ञानाची. भक्ती व ज्ञान यांचे सुंदर मिश्रण येथे दिसून येते. 'प्रितीनर्तन' या ग्रंथात श्री. गुलाबराव महाराज म्हणतात -

***हे आत्मनिवेदन ज्ञान पूर्ण । तेणे शिवटलिया अज्ञान । प्रेमद्वारा दृढकरण ।***
***ज्ञानपश्चात सुजाण भक्तिही ॥६७॥***

आत्मनिवेदन झाले म्हणजे ज्ञानस्थितीची प्राप्ती झाली. त्या स्थितीमुळे अज्ञानाचा नाश झाल्यावर प्रेमाच्या योगाने ती ज्ञानस्थिती दृढ करणे यालाच ज्ञानोत्तर भक्ती असे म्हणतात.

## मधुरा भक्तीचे विश्लेषण

महाराजांनी भक्तीची संकल्पना गोविंदानंद सुधा, प्रितीनर्तन, भगवद्भक्ती सौरभ या ग्रंथात प्रामुख्याने विवरून सांगितली आहे. गौणी म्हणजेच ज्ञानपूर्व भक्तीचे म्हणजेच उपासनेचे आठ प्रकार सांगितले आहेत.

***गौणी आणि परा । या भेदासी थारा नाही थारा । अवघी एकाकारा ।***
***प्रेमलक्षणा ।***

एकदा का पराभक्ती प्राप्त झाली की, नंतर अंतःकरणात उठणारे सर्व प्रकारचे प्रेम हे पराभक्तीचेच उद्रेक होतात. आत्मज्ञान होईपर्यंतच ते गौण असतात. गौणी भक्तीत द्वैत असते. मी भक्त आहे आणि भगवान माझ्यापेक्षा वेगळा अशी भेदबुद्धी कायम असते. ही भेदबुद्धी आत्मनिवेदन केले असता नाहीशी होते.

ईश्वराला अहंता व ममता समर्पण करून (आत्मनिवेदन करून) त्याचाच मी आहे (तस्यैवाहम्) असे झाल्यावर मृदु संवेदनारूप भक्ती पुढे वाढून तो माझाच आहे (ममैवांसी) या मध्यसंवेगरूप भूमिकेवर येते. ही मध्यसंवेगरूप भक्ती उत्कट प्रेमाने मी तोच आहे (स एवाहम्) या माधुर्य प्रेमात परिणत होते. या परा/मधुरा भक्तित व्रजगोपिकांप्रमाणे संयोग व वियोग या दोन्हीं अवस्थांत प्रीतीच राहात असते. भगवंताकरिता दोन्ही अवस्थेत कायमच रहाते.

भक्ति परमप्रेमस्वरूप असून परब्रह्माच्या आनंदांशावर स्फुरत असते. या आनंदांशाचे स्फुरण म्हणजेच भक्ती होय असा महाराजांनी मांडलेला सिद्धांत आहे. महाराज म्हणतात –

***आकाशी पवन सागरी तरंग । तैशा ब्रह्मरंग वृत्तीसाऱ्या ।***
***तुज वाटे वृत्ती सकळही जाव्या । जडाचिये ठेव्या का घेतोस ।***
***चेतन ही वस्तू विश्वमय स्फूर्ति । तोचि नानावृत्तीरूप होय ।***
***ब्रह्मीचे तरंग तैसे जाण जग । जाणुनिया रंग आत्मरंगी ।***

महाराजांच्या ग्रंथात नाना ठिकाणी या चिद्विलासाचे वर्णन प्रासादिक शब्दात मांडलेले पहावयास मिळते. नामरूपाचे नानाविध प्रकारांनी स्फुरण पावणे हे परब्रह्माचे स्वाभाविक लीला विलास आहेत. या विलासांचा प्रत्यय घेणे हाच पूर्णब्रह्मानुभव होय. परब्रह्म एकच असून ते सद्रुप, चिद्रुप व आनंदरूप आहे.

***सत् तेचि चित्त । सत् तोचि आनंद । वस्तु नोहे त्रिविध । एकपद निजानंदे ।***
***आनंद चैतन्य आणि सत्ता । वृत्तिवछिन्नचित् ज्ञानवत्ता । प्रीत्यवछिन्न आनंदता।***
***परी एकी एकता मोडेना । तैसे सच्चिदानंद एक । परी वत्सुपधिजे भिन्न देख ।***

***भगवद भक्तिसौरभ अ-५***

प्रत्येक जीवाला विनाश, अज्ञान, दुःख या त्रयींचा अनुभव क्षणोक्षणी येत असतो. हे तिन्ही अब्रह्म प्रत्यय नाहीसे होऊन सत्, चित्, आनंद प्राप्त करून घेणे हे प्रत्येक जीवाचे ध्येय आहे. प्रथम नामरूपाचा व्यतिरेक

करून निर्गुण आत्मप्रत्यय हृदयात घ्यावयाचा असतो. त्यानंतर तेच आत्मतत्त्व बाहेर अनुभूत होणाऱ्या नामरूपातही व्याप्त आहे असा अन्वयानुभव घेण्याची आवश्यकता असते. हा अन्वयानुभव भक्तिनेच येतो. सच्चिदानंदाचा प्रत्यय वृत्तीच्या भिन्नत्वामुळे भिन्न भिन्न येतो यावरच भक्तिशास्त्राची सारी इमारत उभी आहे. हे तीन प्रत्यय भिन्न स्वरूपात अनुभवाला येत असले तरी एक आनंदाचा प्रत्यय प्रधान झाला की, सत् व चित् त्यात मिसळून जातात आणि पूर्णब्रह्माची एकविध स्थिती प्राप्त होते. हृदयात असलेला अंतरात्मा म्हणजे मीच हे त्रिकालाबाधित सत्य असून चिदानंदरूप आहे असा अहम् ब्रह्मास्मिचा प्रत्यय येतो हीच निर्गुण समाधिस्थिती होय. महाराज म्हणतात,

***सतपदे जड जग भासे । चित्पदे जग विलसे । आनंदपदे प्रत्यय असे श्रीहरीचा ।***

***भक्तिपद तीर्थामृत अ-५***

ही वृत्ती जेव्हा आनंद घेऊन उठते तेव्हा तिला प्रीतिवृत्ती म्हणतात. ही प्रीतिवृत्ती जेव्हा सगुण भगवंताच्या चरणाकडे धाव घेऊन अर्पण होत असते तेव्हा व्यतिरेक निर्गुण समाधि नसूनही व्युत्थान दशेत भक्तांना ब्रह्मानंद मिळत असतो. ही प्रीतिवृत्ती स्फुरण पावून सगुण ब्रह्मानंद भोग घडतो. भगवत् संयोगाची जाणिव होऊन 'धन्यो ऽ स्मि' अशी वृत्ती उठते. जी अहम् वृत्ती स्फुरण पावते ती ज्ञानज व प्रेमज अशा दोन प्रकारची असते. ज्ञानज वृत्तीत जाणिवेचा, चित्ताचा अंश प्रधान मानला जातो तर प्रेमज वृत्तीत प्रेमाचा, आनंदाचा, भक्तिचा अंश प्रधान मानला जातो. तस्यैवाहम् (लालन) ममैवांसी (वात्सल्य) सएवाहम् (माधुर्य) असे तीन प्रकार आहेत.

माधुर्य प्रेमात काम, क्रोध, लोभाविकार भगवंताकडे लावले की आपोआप ज्ञानज सएवाहम् प्रत्यय नाहीसा होऊन प्रेमज सएवाहम् प्रत्यय माधुर्य प्रेमाने विकसित होतो. माधुर्य प्रेमात एक देखिल वृत्ती भगवंताला सोडून उत्पन्न होत नाही हीच माधुर्य प्रेमाची सर्वकषता, व्यापकता, श्रेष्ठता आहे. महाराजांनी 'तत्तवमसि' या महावाक्यातून पराभक्ति कशी प्राप्त करून घ्यावी आणि चिद्विलासाचा प्रत्यय अंगी कसा बाळगावा याचे विवेचन अपूर्व रीतीने केलेले आहे. प्रेमार्पण म्हणजेच व्युत्थानातील आंनदघनस्थिती होय. म्हणून महाराज म्हणतात –

***धारा वाही रसो भक्तिरीशो तत्पद गोचरे ।***
***त्वंपंददशो परोभक्त इति स्वमन निर्णयः ।***

## श्री ज्ञानेश्वर आणि श्री गुलाबराव महाराज यांची विरहिणी व अभंगपदांतून व्यक्त होणारी भक्ति

***शब्दही उसणा अर्थही उसणा । संबंध उसणा साजणीचे । वृत्तीमात्र माझी येर सर्व तुझे ॥***

***अर्पिले सहजे तुझ्या पायी । अर्पिण्याचे सोंग परी साच करी । नको टाकू दुरी मायबाई ।***

***आळंदी वल्लभे सद्गुरू जननी ।***

असा कृतज्ञता भाव व्यक्त करणारे श्री गुलाबराव महाराज व ज्ञानेश्वर या दोघांमध्ये परमेश्वराची अनन्यसाधारण भक्ती व प्रीति, सामाजिक व आध्यात्मिक जीवनातील दुःखासंबंधी कणव, अखंड जीवन चिंतन, मानवी जीवनाच्या अभ्युदयाची अखंड ओढ, श्रेष्ठ उपासना, साक्षात्कारी वृत्ती व आत्मोद्धाराची ओढ दिसून येते.

'अवघाची संसार सुखाचा करीन आनंदे भरीन तिन्ही लोक' ही ज्ञानेश्वर महाराजांची भूमिका लक्षात घेऊन ज्ञानेश्वरांच्या अभंग, पदे व गवळणी यांचा अभ्यास केला तर असे दिसून येते की, त्यांनी कृष्णविरहपर पदे जेवढ्या उत्कटतेने लिहिली तितक्याच तन्मयतेने ऐक्यभाव व्यक्त करणाऱ्या गवळणीही लिहिल्या. ज्ञानेश्वरांनी आपल्या शृंगारपर गवळणी व विरहिणी रचताना एक सुंदर काव्यात्मच नव्हे तर अध्यात्मिक समतोल साधला असून त्याचे मूळ त्यांच्या तात्विक भूमिकेत जाणवते. त्यामुळे त्यांच्या मधुरा भक्तिपर कवितेला एकाच वेळी लौकिक, शृंगारिक, श्रेष्ठ अध्यात्मिक व अत्युच्च तात्त्विक संदर्भ लाभून ती श्रेष्ठ काव्यात्मतेची विविध लक्षणे प्रकट करू लागते. उदा. निळे हे व्योम निळे हे सप्रेम, अवचिता परिमळु, सखे सारंगधरू भेटवा का, धनु वाजे घुणघुणा, यामध्ये ज्ञानेश्वरांनी स्त्रीमनाच्या भावावस्था वर्णन केल्या आहेत. ज्ञानेश्वरांचे मन हे ज्ञानसिद्ध योग्याचे तसेच मूलतः सौंदर्यलक्षी असल्याने पराभक्ति, उत्कट कांताभाव, मीलनोत्सुकता, शृंगार, विरह यात आंदोळणारी सतेज प्रेमानुभुती महत्त्वाची आहे असे दिसते.

समाधिसुख क्षणोक्षणी अनुभवण्याची किमया गुरूकृपेने ज्ञानेश्वर व गुलाबराव महाराजांना अध्यात्मिक जीवनाच्या प्रारंभीच लाभल्याने त्यांची विरहावस्था क्षणिक स्वरूपात अवतरताना दिसते. त्या विरहावस्थेत ज्ञानेश्वर व गुलाबराव महाराज आनंद अनुभवताना दिसतात. या दोघांची मधुरा भक्ति अभंगरूपाने चिरंजिवी ठरली ती तिच्या देखण्या रूपलावण्यामुळे, अत्युत्कटतेमुळे, सौंदर्यलक्षित्वामुळे व निखळ प्रीतीत पर्यवसित होणाऱ्या ज्ञानोत्तर भक्तिमुळे. गौळणी व विरहिणी या खरे तर या दोघांच्या भावसंपन्न मनाच्या दोन स्थायी अशा परस्परसापेक्ष भावावस्था आहेत. गौळणी ही एक निखळ, शृंगारप्रधान अवस्था सूचित करणारी काव्यरचना तर विरहिणी विप्रलंभ शृंगारातील भावोत्कट अवस्था प्रकट करणारी भावकाव्याची निर्मिती म्हणून आपल्याला असे म्हणता येईल की, विरहिणी व गौळणी या एकाच कृष्णप्रेमी स्त्रीमनाच्या दोन भूमिका परस्परावलंबी व परस्परसापेक्षी होत.

ज्ञानेश्वरांनी ज्या गौळणी लिहिल्या त्यामध्ये गोपिकांची बाल, शोडषवीन, तरुण, प्रौढ अशी विविध रूपे रेखाटली. याच मातीत जन्म घेणाऱ्या गवळणींनी मधुराभक्ति कशी अनुभवावयाची, आस्वादायची, शरीराच्या कणाकणातून कशी जगायची याचे अत्युच्च असे आदर्श घालून दिले म्हणून गौळणींच्या परमश्रेष्ठ भक्तितून मधुराभक्तिचे तत्त्वज्ञान प्रकट झाले. ज्ञानेश्वर व गुलाबराव महाराजांच्या अभंग गाण्यात शृंगारपर भक्ति आपल्या माधुर्यासह अभिव्यक्त होताना दिसते. बाळगौळणींच्या मधुरा भक्तीतील निर्व्याजता, बोबडी गवळण, तारुण्यावस्थेतील मधुरा भक्ति तसेच कृष्णवियोगाचे दुःख ज्यात व्यक्त करतात अशा गवळणींना 'विरहिणी' हे नाव सार्थ झाले.

सगुणभक्ति उत्कटतेने करीत असताना गुलाबराव महाराजांनी श्रीकृष्णास पती मानून स्वतःकडे पंचलतिका गोपिकेची मनोभूमिका घेऊन लिहिलेली 'आंधळी गवळण' तर प्रसिद्धच आहे.

ज्ञानेश्वरही भिन्न वयाच्या, भिन्न प्रकृतीच्या, भिन्न भावांच्या गौळणींच्या माध्यमातून श्रीकृष्ण प्रेमाला सामोरे जातात. म्हणून त्यांच्या गौळणी, विरहिणीपर अभंगात अनेक पदरीपणा, ताजेपणा व चैतन्य जाणवते. उदा. असून दुडिया, भरोनिया सांजवनी गे माये, सावळीये निजी भूलली एक नारी इत्यादी.

ज्ञानेश्वर व गुलाबराव महाराजांची स्त्री मनोभूमिका इतकी सच्ची, उत्कट, कलात्मक, सौंदर्यात्मक होती की, ती उपरी ठरली नाही. स्त्रीमनास लाभणाऱ्या प्रेमानुभूतीत एक प्रकारचे अंतर्बाह्य सुसंवादित्व जाणवते. एका पदात गुलाबराव महाराज म्हणतात -

***सावळे परब्रह्म आवडे या जीवा । मने मन राणिवाघर केले काय करू सये ।***
***सावळे गोविंदा । तुजविण येकली रे कृष्णा न गमे राती ।***

ज्ञानेश्वर व गुलाबराव महाराज या दोघांना भक्ति साधनेच्या आत येणारे विक्षेप विशेष जाचणे शक्य होते. अशा विरोधाला सामोरे जाण्यात या दोन्ही संतांची बरीच शक्ती खर्च झाली. या संबंधातून दोघांचे संतत्व उजळून निघाले. कोणत्याही संताचे व्यक्तित्व, कालसंदर्भ, समाज संदर्भ, सांस्कृतिक संदर्भ यातून जन्माला येते, विकसित होते. व्यक्तित्वास कमी अधिक प्रमाणात ही परिमाणे लाभलेली असतात. अशा व्यक्तित्वाचा जेव्हा तत्त्वज्ञानाच्या अंगाने विचार होतो तेव्हा अर्थवत्ता व गुणवत्तेच्या दृष्टीने विचार करता असे लक्षात येते की, आत्मोद्धारा इतकीच विश्वोद्धाराची आकांक्षा बाळगणाऱ्या ज्ञानसिद्ध, योगसिद्ध, ज्ञानेश्वरांची भक्तिसाधना स्वान्तसुखाय न रहाता ती अधिक लोकसन्मुख, विश्वसन्मुख झाली. त्यांची मधुरा भक्ति, श्रीकृष्ण प्रेमभक्ति सगुण रूपात व्यक्त होताना त्यांचे मन कायम सर्व व्यापक पातळीवर झेपावते. तरीही दोन्ही संतांच्या विरहिण्यात भावजीवनाच्या, भावानुभावांच्या भावावस्थांच्या आविष्कारास विशेष प्राधान्य आहे.

संत गुलाबराव महाराजांच्या प्रभाती, स्त्रीगीते, तुंबडी यांचा विचार करता ज्ञानेश्वर कन्येचा पती, गोपींचा नाथ, वज्रभूमिचा स्वामी, देवकी-यशोदा-नंद यांचा बालक या नाना रूपांनी तो श्रीकृष्ण गुलाबराव महाराजांनी सहज साकारलेला आहे. तरीही त्यांनी स्वतःच्या आत्माविष्काराला वस्तुनिष्ठता दिलेली आहे. महाराजांच्या पदांच्या रचनेतून प्रासादिकता, पारंपारिकता, सांप्रदायिकता जशी विशेषत्वाने जाणवते त्याचप्रमाणे आध्यात्मिक प्रगती तेवढीच जोरकस ठरली आहे. पदांतून जाणवणारी रंगसंगतीची उत्तम जाण पाहिल्यावर त्यांना दिव्य स्पर्श असावा याची खात्री पटते. महाराज म्हणतात –

***वृंदावनी तुज बहु भाग्याच्या भेटती व्रजबाळी । स्वीकारी त्यामधील एक ही काळी ।***
***पिवळ्या ढवळ्या तुज भजनी या वनमाळी । मजवरी ही ये हळद धुमाळी ।***

तसेच

***पती मशी सोडूनी गेले ऋतु समयात गे ।***
***कृष्णवर्ण बालपण निघोनिया गेले । ऋतु येता लाल वर्ण ते ही गेले ।***
***पाहोनिया निळा रंग शुक्ल निपटिले । सुखी राही माझा ज्ञानेश्वरतात गे ।***

महाराजांनी रचलेल्या सर्व गीतामधून श्रीकृष्णरूपाचा ध्यास, श्रीकृष्ण दर्शन हाच मुख्य विषय असून निरपेक्ष कवितेने सर्वस्व अर्पणाची मनःस्थिती त्यांनी साकारलेली दिसून येते.

## समारोप

पाश्चात्य प्रभावाने झाकाळून गेलेल्या काळात जेव्हा भक्तिमार्गाकडे उपेक्षेने पाहिले जात होते, भक्ति फक्त भोळ्याभाबड्या अज्ञ लोकांचीच मिरासदारी आहे, अशा प्रकारचे अपसमज लोकांना दिक्‌भ्रांत करीत होते त्या विषम काळात महाराजांनी माधुर्य भक्तिचे सर्वोच्चतेचे शास्त्रशुद्ध व तर्कनिष्ठ प्रतिपादन केले. शांकर अद्वैत व नारदीय भक्तिसूत्रे यांचा अपूर्व समन्वय साधला व भक्तिला एक स्वतंत्र शास्त्राचे स्थान व प्रतिष्ठा मिळवून दिली. त्यांची भक्ति हा आंधळा भावावेग किंवा कोरडे पांडित्य नाही तर अत्यंत डोळसपणे केलेल्या मीमांसेचा प्रबुद्ध परिपाक आहे. तसेच खरी भक्ति ज्ञानावाचून संभवतच नाही हा फार मोठा मोलाचा सिद्धांत पुनःप्रस्थापित केला. मधुराद्वैताची प्रतिष्ठापना करून शुष्क, अभक्त तर्कवाद्यांना निरूत्तर केले आणि भोळ्या श्रद्धाळू जनांना अध्यात्माचा खरा अर्थ समजण्यास प्रवृत्त केले.

जन्मान्ध संत श्री. गुलाबराव महाराजांनी लिहिलेले लहान-मोठे, पूर्ण-अपूर्ण असे एकशेतीस ग्रंथ हा चमत्कार आहे असे मत क्षणभर बाजूला ठेवून त्यांच्या ग्रंथांचा वर्तमानकाळात अभ्यास का करावा याचे उत्तर आपण शोधीत असता असे जाणवते की, विज्ञान युगात माणूस कितीही बुद्धिजीवी झाला तरी त्याचे अंतर्मन एकाकी असल्याची जाणिव आणि माणूस म्हणून बुद्धिजीवी जीवन जगण्याची ओढ त्यास अध्यात्माच्या क्षेत्रात नकळत प्रवेश करायला लावतात. मनाचा व माणुसकीचा धर्म व्यवहार नीतीतून तो शोधीत असतो. विज्ञाननिष्ठ कर्मयोग्यासही त्याच्या कर्मक्षेत्राव्यतिरिक्त ही शोध घेण्याची वृत्ती आवश्यक वाटते. अशा वेळी व्यष्टि व समष्टिच्या भूमिकेतून लिहिलेले श्री गुलाबराव महाराजांचे साहित्य आंधळ्याच्या काठीप्रमाणे विचारगर्तेच्या वावटळीत सापडलेल्या व्यक्तिला निश्चितच आधारभूत होत असते हेच आपले भाग्य.

## निबंधासाठी आधारभूत ग्रंथसूची


१. श्री गुलाबराव महाराजांची विचार संपदा – डॉ. कृष्ण माधव घटाटे
२. मराठी साहित्यातील मधुरा भक्ति – डॉ. प्र. न. जोशी
३. अभंगांची गाथा (समग्र ग्रंथावली) – संपादक : वेदांत केसरी श्री नारायण पैकाजी पंडित
४. गुलाब गुच्छ – संपादक डॉ. वि. ग. कावळे
५. माधुर्य कल्लोळ - श्री गुलाबराव जन्मशताब्दि प्रकाशन
६. संत ज्ञानेश्वर आणि संत मीराबाई यांची मधुरा भक्ति - डॉ. दीपा क्षीरसागर
७. गुलाबराव महाराज (पूर्वार्ध व उत्तरार्ध) - कै. राजेश्वरशास्त्री त्रिपूरवार
८. प्रीतिनर्तन - प्रज्ञाचक्षु संत गुलाबराव महाराज विरचित
९. पदांची गाथा नवम्यष्टि उत्तरार्ध - श्री शंकर जयराम सोमवंशी
१०. मधुराद्वैताचार्य श्री गुलाबराव महाराज - कै. राजेश्वरशास्त्री त्रिपूरवार
११. नामामृत गोडी - डॉ. सौ. अलका इंदापवार
१२. गुलाबराव महाराज चरित्र - डॉ. लीना रस्तोगी
१३. गुलाबराव महाराज यांच्या रसाळ गीतांची संहिता व परिचय - श्री. वा. ना. पंडित
१४. उपदेशामृत पत्रे - श्री गुलाबराव महाराज
१५. वाङ्मयीन परंपरा व ज्ञानेश्वर कन्या - श्री. म. रा. जोशी
१६. चिद्विलास आणि भक्तितत्त्व - डॉ. श्री. वा. ना. पंडित



**प्रा. डॉ. सौ. समिता टिल्लू**
सेक्टर २७, प्लॉट नं. ४४२, प्राधिकरण, आकुर्डी रेल्वेस्टेशनजवळ, आकुर्डी, पुणे ४११०४४.

# पंचलतिका गोपीची मधुराभक्ती : का व कशी?

प्रा. डॉ. अरविंद स. जोशी

*एम.ए., बी.कॉम., एल.एल.बी., पीएच.डी. संस्कृत विशारद. १९५७-६१ यवतमाळ अर्थशास्त्र प्राध्यापक. १९६१-९१ मेहेकर-कलावाणिज्य कॉलेजचे प्राचार्य. फोर्ड फौंडेशनसाठी संशोधन. संतवाङ्मय, अर्थशास्त्र, समाजशास्त्र शिक्षण याचा गाढा अभ्यास. विविध स्तरांवर लेख व समाज प्रबोधन.*

## मधुराभक्तीवरील आक्षेप

महाप्रभू चैतन्य, मीराबाई, ज्ञानदेव, श्री एकनाथ, श्री तुकाराम महाराज, अशा अनेक संतांनी अलौकिक अशा माधुर्य प्रेमाची प्रचिती घेतली. त्या अनुभवलेल्या पराप्रीतीची अभिव्यक्ती त्यांच्या वाङ्मयात स्पष्टपणे दृष्टोपत्तीस येते. शास्त्रानुसार भक्तीत सर्वात श्रेष्ठ भाव माधुर्य मानला गेला आहे हे खरे; पण सर्वात अधिक गैरसमजही या मधुराभक्तीविषयी आढळतात, हे ध्यानात घेतले पाहिजे. तथाकथित विद्वानांची व अध्यात्म क्षेत्रात अधिकारी असणाऱ्यांची या बाबत दिशाभूल झालेली दिसते. पती-पत्नी नात्याने देव-भक्तांचे प्रेम म्हटले म्हणजे वैषयिक वासनांचा वास कित्येकांना येऊ लागतो. काम भावनेतूनच याचा जन्म आहे, अशी अत्यंत चुकीची कल्पना ते करतात. तर काहीजण अन्य नातेसंबंधाने भगवंताची प्राप्ती होते मग मधुरा भक्तीची आवश्यकता काय असा प्रश्न विचारतात. असे अपसमज अज्ञानामुळे उत्पन्न होणे स्वाभाविकच म्हटले पाहिजे. कोणत्याही दुर्मिळ, श्रेष्ठ गोष्टीविषयी सर्वात जास्त गैरसमज व गोंधळ निर्माण होतो हा जगाचा सामान्य नियमच आहे. माधुर्य भक्ती अर्थातच त्याला अपवाद नाही.

सुदैवाने 'मधुराद्वैताचार्य' म्हणूनच ख्यातनाम झालेल्या श्रीगुलाबराव महाराजांनी मधुराद्वैत भक्तीविषयी समाजात असलेला वैचारिक गोंधळ पूर्णपणे दूर सारला आहे. काव्य, संगीत, आयुर्वेद, इतिहास, मानसशास्त्र, इ. अनेक क्षेत्रात मौलिक योगदान करून आपला अमिट ठसा उमटविणारा श्री महाराजांसारखा महात्मा जगाच्या अर्वाचीन इतिहासात झाला नाही. माधुर्य भक्तीची प्रतिष्ठापना हीदेखील इतिहासाने नोंद घ्यावी अशी अमोल देणगी मानवाला श्रीमहाराजांच्या अलौकिक प्रतिभेमुळे प्राप्त झालेली आहे. किंबहुना विविध क्षेत्रांतील विद्याशाखेत (academic faculties) श्रीमहाराजांच्या अपूर्व योगदानापेक्षाही भक्तिशास्त्रातील सिद्धांत व प्रक्रिया या संदर्भातील त्यांचे जगाला प्राप्त झालेले अलौकिक देणे पारमार्थिक कल्याणासाठी अधिक उपकारक ठरणार आहे, असे वाटल्याशिवाय रहात नाही.

## आता उरी मारावी ग सुरी

श्रीमहाराजांच्या वयाच्या पाचव्या वर्षापासूनच भगवान श्रीकृष्णाचे दर्शन होत असे. जेवताना एक सवंगडी म्हणून श्रीकृष्णाला ते आवडनिवड विचारीत, त्याला प्रेमाने जेऊ घालत. परंतु त्यांचा मधुरभाव अगदी स्पष्टपणे प्रथम बघायला सापडतो, तो त्यांनी वयाच्या केवळ १३ व्या वर्षी रचलेल्या लावणीत-१ कृष्णकांत-विरहाचे उत्कट, चटका लावणारे वर्णन करणाऱ्या या लावणीतील काही चरण असे :

***सखुबाई मजविषयी कसे कोपले गडे नारायण ।***
***चातक पक्षापरी लक्ष सख्याकडे रात्रंदिन ॥धृ.॥***
***सखुबाई मजला आता धीर नाही धरवत ।***
***कोठवर दम सोसावे ग झाले दुःखाचे पर्वत ।***
***प्राणसख्याला कशीहो माझी पडली नाही मुरवत ।***
***रात्रंदिवस जैसी प्राणाला हो करवत ॥***
***असे कोणी जाऊन सांगा देउनिया भरवरी ।***
***असे वाटते मला की जाऊन बसावे पंढरपुरी ॥***
***टीप : अशी सुंदरा हळहळीत उभी राहून बंगल्यावरी ।***
***असे वाटते मला की आतां उरी मारावी ग सुरी ॥***

लहानपणी मधुरा भावाचे हे झालेले बीजारोपण फलीत होऊन त्याचे वटवृक्षात रूपांतर झाले ते श्रीमहाराजांच्या वयाच्या २२ व्या वर्षी ! इ.स. १९०३ साली माधानला मार्गशीर्ष महिन्यात गोपीभावाने त्यांनी पहिला कात्यायनीचा सोहळा संपन्न केला. भागवतातील दशम स्कंधातील २२ व्या अध्यायात नमूद केलेल्या गोपींच्या वृंदावनातील कात्यायनी व्रतानंतर गेल्या काही हजार वर्षांत तेच व्रत, पंचलतिका गोपी असल्याचे उद्‌घोषित करून पूर्ण महिनाभर यथासांग केल्याचे श्रीमहाराजांचे बहुधा पहिलेच उदाहरण असावे. श्रीकृष्ण पती म्हणून प्राप्त झाल्याचा आनंद व्यक्त करताना ते म्हणतात,

***आज मी भाग्याचे झाले । नंदसुता करि देऊनि बापे कन्यादान केले ॥६॥***
***होते जरी नयनांध मी बाई । परि सगुणाकृति होऊनि हरिने ठेवियले पायी ॥***
***अपवर्गादिक सांडावे ओवाळूनि हरि पायी । सुकृत बहुजन्माचे फळले ॥***

## भक्तीतील आनंदाच्या श्रेणी

मानवाची धडपड सतत आनंदासाठी असते. मनाच्या वृत्तीला बाह्य विषयाचे आलंबन असले तर नाशवंत, स्वल्पकाळ सुख देणारा विषयानंद प्राप्त होतो. पण याच मनात स्फुरण पावणाऱ्या वृत्ती, भगवंताचे आलंबन देऊन, अखंड सुखनिधान श्रीकृष्णाला समर्पित केल्या की अवीट, अविनाशी अशा आनंदाचा अनुभव येतो. भक्तीतील हा आनंद चढत्या श्रेणीने साधकाच्या तीन अवस्थांमध्ये प्रतीत होतो. भक्त्यानंदाच्या या तीन अवस्थांमध्ये भक्तीचे जे १६ प्रकार पडतात ते श्रीमहाराजांनी खालीलप्रमाणे नमूद केले आहेत :

आनंद

(वृत्ती स्फुरण पावल्या असता सगुण व्यक्त)

विषयानंद — सगुण परमेश्वराला वृत्ती समर्पिल्याने

परावलंबी, नाशवंत — भक्त्यानंद

| १ | | २ | ३ |
|---|---|---|---|
| गौणी भक्ती | | मध्यमा भक्ती | माधुर्य पराभक्ती |
| १. श्रवण | ५. अर्चन | ९. ममता समर्पण | १३. गुप्त संयोग |
| २. कीर्तन | ६. वंदन | १०. अहंता समर्पण | १४. स्पष्ट संयोग |
| ३. स्मरण | ७. दास्य | ११. लालन | १५. गुप्त वियोग |
| ४. पादसेवन | ८. सख्य | १२. वात्सल्य | १६. स्पष्ट वियोग |

गौणी व मध्यमा या दोन निम्न अवस्थांमध्ये साधकाचा बराचसा अहंकार क्षीण झाला असतो. अखेरच्या माधुर्य भक्तीत 'स एवाहम्' तो मीच आहे या समानाधिकरणाने भक्त भगवंतावर पती म्हणून प्रेम करतो व सर्वोच्च आनंद सागरात विहार करू लागतो. येथे विषयविषाला, कामनेला किंचितही स्थान नसते.

***जारिणीचे परपुरुषी मन । की विरहीणीचा विरह गहन ।***
***तो विषयभाव वेगळा करून । हरिरूप प्रेम योजन, ते भक्ति ॥४४॥***
***(अ. १ भक्तिपद तीर्थामृत)***

***त्यजुनि काम आज श्याम दृष्टी पाहिला ।***
***ज्या स्थळी मी जाई तेथे नित्य राहिला ॥***

हा त्यांचा अभंग प्रसिद्धच आहे.

एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे मधुराभक्ती ही वरील सर्व प्रकारच्या भक्तीचा समुच्चय आहे. वात्सल्य भावाने भक्ती करणाऱ्या कौसल्याला दास्य वा सख्य भक्ती नाही करता यायची ! सख्य भावाने भक्ती करणाऱ्या अर्जुनाला कौसल्येचा वात्सल्य भावाचा आनंद नाही मिळायचा ! तसेच वीर हनुमंताला दास्य भक्तीच्या मर्यादेमुळे कौसल्या किंवा अर्जुनाचे सुख नाही उपभोगता येणार ! एका नात्याची विशिष्ट वृत्ती परमेश्वराकडे लावायची व अन्य सर्व भावभावनांचा रोध करायचा. त्यांना दाबून ठेवायचे ! फक्त एक पती, पत्नीचे नाते असे असते की, ज्या नात्यात दास्य, सख्य, वात्सल्य इ. सर्व भाव विविध निमित्ताने प्रगट होत असतात, अशा सर्व भावनांचे निःसंकोचपणे निःशेष समर्पण मधुरा भक्तीत होऊ शकते. सर्व प्रकारच्या भगवत संबंधाच्या सुखाचा संगम साधणारे माधुर्य प्रेम म्हणूनच सर्वश्रेष्ठ मानले गेले आहे. या अवीट आनंदाच्या अनुभवाचे वर्णन करताना श्रीमहाराज म्हणतात,

***जैसा आम्रवृक्षाचा सार । फळामाजीच अवघा साचार ।***
***तेवि रासक्रिडेमाजी निर्धार । रसलीला सकळही ॥५८॥***
***रसरूप रसात्मा श्रीहरि । प्रेमरस यावा त्या माझारी ।***
***मग रस पावूनि अविकारी । सुखाकारी नांदावे ॥६०॥***
***अ. ५ (भक्तीपद तीर्थामृत)***

***'वासुदेवः पुमान एकः । स्त्रीरूपं इतरं जगत्'***

सर्व रस ज्यात एकवटले आहेत अशा रसराज श्रीकृष्णाच्या रासक्रीडेत सहभागी होण्याचे अहोभाग्य माधुर्य भक्तीने लाभते. ब्रह्मपुराणात अर्जुनाने रासक्रीडा पाहण्याची इच्छा श्रीकृष्णाजवळ व्यक्त केली अशी कथा आहे. तेव्हा भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाला एका सरोवरात स्नान करावयाला सांगितले. स्नान करताच तो स्त्री झाला व नंतर श्रीकृष्णाने त्याला रासक्रीडा बघण्यासाठी नेले. सुप्रसिद्ध गुजराथी संत नरसी मेहता यांनीही भगवान शंकराला कुणी मागितला नसेल असा विलक्षण वर मागितला. 'तुम्हाला जे अत्यंत प्रिय वाटते, आवडते ते मला द्या.' असे मागणे मागताच संत नरसींना शंकराने सरोवरात स्नान करण्यास सांगून स्त्रीरूप दिले. स्वतःही स्त्रीरूप धारण केले व रासक्रीडेत सहभागी झाले. रासाच्या आनंदोत्सवात गोपीवल्लभ वासुदेव हे फक्त पुरुष व अन्य सर्व जग स्त्रीरूपाने नटलेले असते. 'वासुदेवः पुमान एकः स्त्रीरूपं इतर जगत' श्रीगुलाबराव महाराजांना श्रीकृष्णपत्नीचा श्रेष्ठ अधिकार असल्याने त्यांनी आपल्या काही प्रिय शिष्यांना रासक्रीडेचा अनुपम अवर्णनीय आनंद मिळवून दिला. भागवतातील दशम स्कंधातील रासपंचाध्यायीतील अध्याय ३२ श्लोक २२ चा आशय स्पष्ट करताना

***वास्तव भगवंताहूनि श्रेष्ट । गोपीपद मी मानी वरिष्ट ।***
***साधनांचा उपकार नसता प्रतिष्ट । उपकार मानी हरी ज्यांचा ॥२८॥***
***(गोपिका पादपियूष लहरी)***

गोपीपद हे श्रीकृष्णाहूनही श्रेष्ठ आहे याकडे लक्ष वेधले आहे. मधुरा भक्तीत स्त्रियांना विशेष सवलत आहे हेही ध्यानात घेतले पाहिजे. सामान्यतः पुरुषाला माधुर्य भक्तीचा अधिकार नाही. मात्र मनाची हळुवारता व समर्पण प्रवृत्ती या गुणांमुळे स्त्रियांना पतीलाच परमेश्वर मानून माधुर्य प्रेमाची मोकळीक देण्यात आली आहे. साधनेच्या सर्व खालच्या पायऱ्या ओलांडून पतिव्रता माधुर्य भक्तितील सर्वोच्च सुख प्राप्त करू शकते. पुरुष असूनही श्रीमहाराजांनी गोपींप्रमाणे स्त्रीवेश धारण करून स्वतःचा आदर्श समोर ठेवला. ते गळ्यात मंगळसूत्र धारण करीत, वेणी घालत व कुंकू लावत. हा भाव इतका उत्कट असे की श्रीकृष्णाचे नाव घेताना त्यांना संकोच होई. एकदा कात्यायनीत श्रीमहाराजांनी घेतलेला मार्मिक उखाणा असा :

***नाव घ्या म्हणावयासाठी निगम झाले भाट ।***
***पंचलतिकेच्या मंदिरी वासुदेवाचा थाट ॥***

वटपोर्णिमेची पूजा श्रीमहाराज न चुकता करत. श्रीकृष्णाला जे जे प्रिय ते सर्व त्यांना विशेष आवडे. आदर्श पतिव्रतेप्रमाणे एकूण त्यांचे वर्तन असे.

## कात्यायनी व्रताची शास्त्रीय प्रक्रिया

आपल्या अनेक ग्रंथात विविध युक्तीवाद करून माधुर्य भक्तीचे महात्म्य इतके समर्थपणे केले आहे की कोणतीही शंका कुणाच्या मनात राहू नये. त्याचे सोपपत्तिक विवेचन करण्यासाठी स्वतंत्र प्रबंध लिहावा लागेल. या लेखात ते शक्य नाही. मात्र श्रीमहाराजांचा विशेष असा की, केवळ या संदर्भात सैद्धांतिक भूमिका मांडून ते थांबले नाहीत तर गोपींनी आचारलेल्या कात्यायनी व्रताची प्रक्रियाही त्यांनी प्रथमच विश्वाच्या कल्याणासाठी उद्घाटित केली. अगदी लहान-सहान तपशीलासह या व्रताची संकल्पना त्यांनी साकार केली.

'श्रीकृष्ण पती म्हणून प्राप्त व्हावा' या अर्थाचा संकल्प सोडूनच या व्रताचा प्रारंभ होतो. यमुना नदीची प्रतिष्ठापना करावयाची असल्याने, दर वर्षी नदी असलेल्या सोयीच्या गावी मार्गशीर्ष महिन्यात पूर्ण महिनाभर हे व्रत संप्रदायातर्फे यथासांग केले जाते. श्रीमद्भागवत, ज्ञानेश्वरी, देवी सप्तशती, विष्णुसहस्त्रनाम इ. ग्रंथाचे पारायण, काही मंत्राचा जप व रोज सकाळी यमुनेवर जाऊन वाळूच्या पार्थिवांचे व देवीचे पूजन इ. कार्यक्रम असतात. दुपारी स्वाध्याय, हरिविजयाचे वाचन, रात्री भजन असा भरगच्च कार्यक्रम दिवसभर असतो. व्रताची समाप्ती यज्ञ व अवभृत स्नानाने होते.

अखेरचा दिवस श्रीमहाराजांचे पुण्यस्मरण करून गोपी दिवस म्हणून काल्याच्या भजनाने व चर्चेने संपन्न होतो. मोठ्या संख्येत सांप्रदायिक मंडळी कात्यायनी महोत्सवाच्या समाप्तीला येतात.

मात्र एक गोष्ट येथे स्पष्ट करायला हवी की सर्व सांप्रदायिकांनी माधुर्यभावाने भक्ती करावी, हे श्रीमहाराजांना कधीच अभिप्रेत नव्हते. कारण माधुर्य प्रेम ही भक्तीची अंतिम अवस्था आहे. प्रत्येकाने आपल्या आवडीनुसार दास्य, लालन, वात्सल्य संबंधाने उपासना करावी असेच श्रीमहाराजांचे सांगणे असे. मात्र मानवी जीवनाचे अखेरचे उद्दिष्ट गाठण्यासाठी त्यांनी ज्ञानेश्वर मधुराद्वैत संप्रदायाद्वारे मार्ग दाखवून दिला. श्री महाराजांनी स्वतःच्या अनुभवाच्या पावलांनी पुसत चाललेली ही पाऊलवाट अधिक प्रशस्त केली. पहिल्या कात्यायनीच्या वेळी श्रीमहाराज जवळच्या मंडळींना म्हणाले, ''गडे हो ! आपण सर्व गोपी आहोत अशी भावना करा. व श्रीमद्‌भागवतातील कथेत वर्णन केल्याप्रमाणे गोपकुमारींनी कात्यायनी व्रत करून श्रीकृष्णाच्या रासक्रीडेचा अधिकार मिळवला तसा आपणही मिळवू या.''

पुढील वर्षी कात्यायनी महोत्सवाची शताब्दी ! श्रीमहाराजांनी प्रस्फुटित केलेल्या या असामान्य, अलौकीक व्रताचे १०० वे वर्ष ! भक्तीशास्त्रावर श्रीमहाराजांनी निर्मिलेल्या मननीय वाङ्मय संपदेचे वाचन, मनन या निमित्ताने मुमुक्षूंनी करावे हे विनम्र आवाहन ! 'कल्याणी' वार्षिकाने साधकांच्या सर्वांगिण कल्याणासाठी, श्रीमहाराजांवर विशेषांक काढून, वाचकांना सुवर्णसंधी उपलब्ध करून दिली आहे हे निःसंशय !

**प्राचार्य डॉ. अरविन्द स. जोशी**
३२२, गांधीनगर, नागपूर.



# सन्त श्रीमद् गुलाबराव !

संतजनांच्या परंपरेतील अलौकिक अवतार तुम्ही !
आयु वेचिलें परमार्थी; तव चित्त चिरंतन रत ब्रह्मीं !!....

सतेज देही, अजानुबाहू, नयनांतें नव्हती दृष्टी,
खंत, खेद ना तरी तयाचा, उदास नच कधिं मन कष्टी !....

नेत्रांतें अंधत्व जरि, तुम्ही देखिली न गोचर सृष्टी,
दृश्-अदृश् तें पाहत होती प्रज्ञाचक्षुतुन दृष्टी !....

परमार्थास्तव प्रपंचांत तव सहयोगिनि साध्वी कान्ता,
अखण्ड केली साथ जीवनी, उदण्ड हृदयीं पतिनिष्ठा !....

अमित जाच, आघात सोशिती अन्तरिच्या अविचलवृत्ती,
'अंगीं ज्याच्या मोठेपण'!.... - या सार्थ उक्तिची ती प्रचिती !....

जन्मजात तव वाचासिद्धी, कुशाग्र तव बुद्धीमत्ता,
अतींद्रिय जाणिवा अन्तरीं, अगाध तुमची विद्वत्ता !....

ऋषीमुनीसम त्रिकालज्ञ तुम्ही, वरदहस्त दे बृहस्पती,
आद्यकवीसम प्रगल्भ प्रतिभा, रसवन्ती दे सरस्वती !....

काव्यस्फूर्तीचा फुले फुलवरा, बहरून आलीं चित्सुमनें,
दलादलांतुनि दरवळलीं मधुगंधित बोधामृतवचनें !....

स्वरगानांतुन तुम्हि आळविली गोपीसम मधुरा भक्ति !
मधुराभक्तितुन त्या व्हावी परमपदाची संप्राप्ति !....

तुम्हि प्रासादिक काव्यरसात्मक सदुपदेश सकला केलें,
जाति-जमातिंत समता निर्मुनि, भक्तिपथीं जन तुम्हि नेलें!....

समागमीं जे येती त्यांचा जीवनिं होई उद्धार,
जीव रंजले-गांजले तया सदैव तुम्ही आधार !....

हरी-हराची नितान्त भक्ति, अद्वैताची आराधना,
तत्त्वसमन्वयसाधक तुम्ही, लोकहिताचा ध्यास मनां !....

वाचस्पति तुम्हि खण्डण केलें विविध तत्त्व, मत, वादांचे,
तुम्ही केलें श्रेष्ठत्व सिद्ध जनिं आर्यधर्म, श्रुति - वेदांचे !....

ज्ञानेश्वर दे तुम्हास दर्शन घडलासे साक्षात्कार,
अन्तर्यामीं नित्य निरंतर ध्यानरूप ते साकार !....

महावैष्णव ते तुम्हास साक्षात् घेऊनिया अंकावरती,
शिव-अमृत शिरीं ठेविता अद्भुत लाभे उद्दशक्ति !....

नमो समन्वयमहर्षे ! नमो, मधुराद्वैताचार्य नमो !
विदुराचे अवतार महात्मन् ! - चिन्मयमूर्ते नमो नमो !!

**विश्वनाथ जोशी**
१०/४६८, व्यंकटराव प्रशालेमागे, इचलकरंजी - ४१६११५

# आळंदीश कन्येची अभंगवाणी

प्रा. डॉ. सुधाकर शं. देसाई

*एम.ए. (सुवर्णपदक प्रथम क्रमांक, प्रथम वर्ग) पीएच.डी. (विष्णु शास्त्री चिपळूणकरांच्या समग्र वाङ्मयावर) पाटकर महाविद्यालय गोरेगांव, मुंबई मराठी विभाग प्रमुख व उपप्राचार्य निवृत्त १९९९. १९८३ पासून विद्यार्थ्यांना पीएच.डी. मार्गदर्शन. कथासंग्रह, कविता संग्रह, प्रबंध प्रकाशित. भाषा शास्त्र व संत साहित्यावर लेखन. शिवराम कारंतांच्या कादंबऱ्यांवरील मराठी परिभाषांचा अनुवाद.*

मराठीतील आध्यात्मिक वाङ्मयात अभंग या छंदरचनेस खूप प्राधान्य आहे. भक्तीच्या उमाळ्यात केलेली, आत्माविष्कारास खूप अवसर देणारी, प्रसंगी परखड समाज भाष्य करणारी अशी ही स्फुट रचना असते. ज्ञानदेव, त्यांची भावंडे, सावता-सेना-गोरा आदी संतमेळा, नामदेव व दासी जनी, एकनाथ, तुकाराम, रामदास, निळोबा यांनी अभंगाकडे पारमार्थिक साधनेचे एक अंग म्हणून पाहिले. त्यांना कवित्वाची ऐट मिरवायची नव्हती. स्वतःला व भोवताली पारखीत ब्रह्मरूप व्हायचे होते. म्हणून त्यांनी संस्कृत, आध्यात्मिक वाङ्मयात उपलब्ध नसूनही आत्माविष्काराचे सुकर साधन म्हणून हा सोपा सुटसुटीत छंद निर्माण केला. भक्तीतील आर्तता, तळमळ, प्रामाणिकपणा, आवेग या साऱ्यांचा परिणामकारक आविष्कार करण्यासाठी संतांना अभंगवाणी उच्चारावी वाटली. अर्थात जो जो संत असेल. त्याने काव्य लिहिलेले असले पाहिजे, संतत्त्वाची ती अट आहे असे मुळीच नाही. पण संतत्व व कवित्व यांची मराठी मनात साहचर्यभावाने एक पक्की गाठ बसलेली आहे हे खरे. नामदेव, तुकाराम यांच्या अभंगात भावोत्कटता अधिक आहे तर निवृत्तिनाथ, मुक्ताबाई, बहिणाबाई यांच्या अभंगात ज्ञानाचे तेज वा विचारगुरुत्व यांवर भर आहे.

या आध्यात्मिक पर्यावरणात संत गुलाबराव महाराजांची अभंगवाणी मधुराभक्ती, योग, ज्ञानदेवांचे तत्त्वज्ञान, वेदान्त, श्रीकृष्णप्रेम हा आशय, शूद्रत्व-अंधत्व-लौकिक शिक्षणाचा अभाव - सनातनत्व हे व्यक्तित्वविशेष, युक्तिवादचातुर्य हा आविष्कार, विशेष व मौखिक उत्स्फूर्त निर्मिती या अंगभूत वैशिष्ट्यांनी अपूर्व ठरेल. वरील विशेषांचे एक अपूर्व रसायन महाराजांच्या वाणीत आकारलेले आहे. नामदेव, तुकाराम यांच्या अभंगात दृष्टान्तांची विपुलता असते. दृष्टान्तासाठी लौकिक व्यवहाराचे सृष्टीचे सूक्ष्म निरीक्षण करणे आवश्यक ठरते. दुर्दैवाने महाराज आठ महिन्यांचे अर्भक असताना त्यांचे डोळे गेले. स्वाभाविकच बाह्यसृष्टीच्या निरीक्षणास अवसर उरला नाही. त्या निरीक्षणातून प्रकटणारी दृष्टान्त सृष्टीही मम प्रकट होऊ शकली नाही. दृष्टी आत वळली. स्वतःला ज्ञानेश्वरकन्या व कृष्णसखी मानल्यावर अंतरंगातील भावनांचे नाजूक पदरव टिपू लागली. त्यातून अभंगवाणी प्रकटू लागली.

संत गुलाबराव महाराजांना काव्यशास्त्राचे ज्ञान उत्तम होते. त्यांनी मधुरा भक्तीचे रसदृष्ट्या जे विवेचन केले ते त्यांच्या ऊहबुद्धीचे द्योतक आहे. तथापि महाराजांच्या अभंगवाणीत व्यंजनेपेक्षा अभिधेवर भर आहे. एक प्रकारचा ग्रामीण रोखठोकपणा आहे. महाराजांच्या पदांचे, अभंगांचे संपादक व मर्मज्ञ नारायण पैकाजी पंडित यांनासुद्धा महाराजांच्या अभंगवाणीचा हा विशेष जाणवला होता. श्रीगुलाबराव महाराजांच्या प्रसादमय वाणीतून कीर्तनभजनादी प्रसंगी ही रचना झाल्याचे ते सांगतात. प्रकाशक शं.ज. सोमवंशी म्हणतात, ही वाणी 'साधी पण तेजस्वी व अर्थपूर्ण, वेचक पण अकृत्रिम अशी आहे.' ते पुढे म्हणतात, 'दांभिकांचा रहस्यस्फोट करताना नास्तिक अभक्तांबर गहजब उडविताना व हानिकारक रुढींच्या शृंखला तोडताना हे अभंगपदात्मक वाङ्मय प्रसंगानुसार बेमुर्वतीचे, भेदक, जहाल व खड्गाप्रमाणे खणखणणारे असे झालेले आढळते.' (प्रस्तावना पृ. २)

महाराजांनी २,५०० अभंग लिहून संतपरंपरा उजळली. त्यांच्या अभंगांच्या गाथेत मात्र १६०४ अभंगच मुद्रित केलेले आहेत. वयाच्या अवघ्या पंधराव्या वर्षी महाराजांनी पहिला अभंग रचला. त्यानंतर उत्स्फूर्त व मौखिक स्वरूपात ही अभंग मंदाकिनी कीर्तनभजनादी प्रसंगानुषंगाने वहात राहिली. साहजिकच मौखिक स्वरूपाच्या वाङ्मयाच्या साऱ्या गुणविशेषांनी ती युक्त आहे. तिच्यात वक्तृत्वानुगामित्व, रसाळपणा, रंजकता, खटकेबाजपणा, गेयता, पुनरुक्ती, प्रसंगी ग्राम्यता, आवेश, आवेग आणि स्पष्टवक्तेपणा आहे. महाराज अनेक शास्त्रे जाणत. त्यांच्या विद्वत्तेची बैठक या अभंगांना आहेच आहे. तर्ककर्कश बुद्धी आणि प्रणयिनीच्या कोमल भावना यांचे रंग आलटून-पालटून आणि कधी कधी तर एकत्रित व्यक्त झाल्यामुळे महाराजांची अभंगवाणी 'तिच्यासारखी तीच' अशी पृथगात्म झाली आहे.

महाराजांची ही अभंगरचना कशी आकारास येई? समकालीनांनी डोळ्यांपुढे चित्र उभे राहावे अशा रीतीने आठवण सांगितलेली आहे. कोणीतरी तुकोबांचा अभंग, ज्ञानेशांची ओवी वगैरे म्हणत. त्यावर महाराज स्वकृत भजन करीत. एक चरण महाराज म्हणत व त्यालगोलग तोच चरण इतर मंडळी म्हणू लागे. त्याचे पुढचे चरण तावडतोब रचून महाराज म्हणू लागत. तीन तीन तासपर्यंत हा भजनाचा सोहळा चाले. ज्या रसात भजन होई तो त्या वेळी मूर्त होई. मंडळी अगदी तन्मय होऊन जाई. महाराजांची वाणी एवढी अनावर असे की चारचार जण लिहून घेण्यास बसत पण त्यांना ते काम झेपत नसे. लेखनबद्ध न झालेली महाराजांची कितीतरी रचना कालौघात नष्ट झाली. अमरावतीला आल्यानंतरच अभंग लिहून ठेवण्याचा नियमित क्रम सुरू झाला.

या अभंगांचे वर्गीकरण पुढीलप्रमाणे आहे. १) मंगलाचरण, २) श्रीहरीचे रूपवर्णन, ३) नामसंकीर्तन, ४) संतमहिमा, ५) सद्गुरुमहिमा, ६) उपासना, ७) करुणापर अभंग, ८) स्तुतिशतक, ९) भक्तिपर अभंग, १०) वेदान्तपर अभंग, ११) उपदेशपर अभंग, १२) श्रीकृष्णलीला, १३) विरह, १४) प्रणयकलह, १५) पौराणिक लीला, १६) योगपर, १७) रूपकपर, १८) संकीर्ण.

ही अभंगवाणी ज्ञानदेव, तुकाराम यांच्या संस्कारात चिंब भिजलेली आहे. ती या संतपूर्वजांचा वारसा मिरवणारी व त्यात धन्यता मानणारी

आहे. 'सुंदर ते ध्यान कैलासशिखरी' (अ. ४१) व 'सुंदर ते ध्यान उभे विटेवरी' (तुकोबा). बरा शूद्रयोनि दिला जन्म मज । निगर्व सहज लीनतेने ।। (अ. ७०) व 'बरा कुणबी केलो । नाही तरी दंभेचि असतों मेलो ।। (तुकोबा) 'धन्य तेचि जाति धन्य तेंचि कुळ । जन्मला प्रेमळ विष्णुभक्त' व 'पवित्र ते कुळ पावन तो देश । जेथे हरिचे दास घेती जन्म (तुकोबा); 'मज माझे सर्व ठावे अवगुण' व 'माझे मज कळों येती अवगुण' (तुकोबा); मायबापबंधुसुत गणगोत । मरो हे समस्त नारायणा (अ. २२७) व बाईल मेली मुक्त जाली ।... पोर मेले बरे जाले ।... माता मेली मज देखतां तुका म्हणे हरली चिंता ।। अशी संत गुलाबराव व तुकोबा यांच्यातील असंख्य साम्यस्थळे दाखवता येतील.

ज्ञानदेवांचे तत्त्वज्ञान, त्यांचे वाङ्मय यात तर संत गुलाबराव यांचे मन मुरलेले होते. 'अवयव जैसे झांकी कुलांगना । न ये अनुमाना साधु तैसा' (अ. १०९) व 'आढ्यु आतुडे आडवी । मग आढ्यता हारवी । नातरी कुळवधू लपवी । अवेवांते ।। (ज्ञानेश्वरी, दांडेकर प्रत, १३।२०५) यातील साम्य किंवा गीता वेदाहून श्रेष्ठ आहे. 'वेद तो केवळ स्वप्नींचा उच्छावस । जागृतीत त्यास मान नाही । ब्रह्मजागृतीत स्वमुखे ही गीता । स्वये कृष्णा अर्था प्रतिपादिले ।। (अ. १५६४) हे संत गुलाबरावांचे म्हणणे व "येथ गीता मूळ वेदां । ऐसें पां केवी आलें बोधा । हें म्हणाल तरी प्रसिद्धा । उपपत्ति सांगो ।।४२७।। तरी जयाचा निश्वासीं । जन्म झाले वेदराशी । तो सत्यप्रतिज्ञ पैंजेसी । बोलिला स्वमुखें ।।४२८।। (दांडेकर प्रत, अ. १८) हे ज्ञानदेवांचे प्रतिपादन एकरूपच नव्हे का? गुलाबराव महाराजांचा विषयासक्त माणसांना कोणत्या भरवशावर उन्मत्त झालास (अभंग १२५१) आणि ज्ञानदेवांनी 'अगा माते न भजावयालागी । कवण बळ पां आपुलं अंगीं । काइ घरीं कीं भोगीं । निश्चिती केली ।। (दांडेकर प्रत, ज्ञाने. अध्याय ९.४९३) हा भेदक प्रश्न सारखाच आहे. द्वैतात अद्वैत कसे जाणायचे? संत गुलाबराव दृष्टान्त देतात, 'दोन डोळे परी एक दिसे वस्तु । दो ओठी निघतु एक शब्दु" (अ. १३५) ज्ञानदेव 'अमृतानुभवा'त शिवशक्तिसमावेशन प्रकरणात नेमका हाच दृष्टान्त देतात. 'दो ओठी एक गोठी । दों डोळां एक दिठी ।। तेवी दोघी जिंही सृष्टी । एकीचि जेवी.' (ओ.१९) अशी इतर उदाहरणे बरीच देता येतील. महाराज म्हणतात, 'देव न दावी सद्‌गुरू । गुरु दावी शारंगधरू' म्हणून देवाहून गुरु श्रेष्ठ ! (अ. १३८) कबीर म्हणतात, 'गुरु गोविंद दोऊ खडे, काके लागूँ पाय । बलिहारी गुरु अपने, गोविंद दियो बताय.' महाराज कबीरासारखाच युक्तिवाद करतात. सारांश, महाराजांचे अभंग वाचताना पूर्वज संतांची पावले वाजत राहतात.

अशा या वाणीने ही आळंदीशकन्या ज्ञानदेवांविषयीची असाधारण ओढ आणि श्रीकृष्णाविषयीची अ-सामान्य प्रीती व्यक्त करीत राहते. मंगलाचरणात 'ज्ञानेश्वरप्रभू आणि गजानन । न पाहूचि भिन्न कोणे काळी' ही ग्वाही येते. ज्ञानेश्वररूपात काशीराज शिवाने भेट द्यावी, ही विनवणी येते. 'सोळा वरुषांची मूर्ति गोजिरवाणी । पाहावी लोचनी वाटे माये' ही तळमळ व्यक्त होते. ज्ञानदेवांपुढे काही बोलणे म्हणजे 'सूर्या धूपदीप, पवना विंझणा । सर्वज्ञीं वल्गना तैसी माझी' (अ. ६७३) ही नम्रता दिसते. ज्ञानेश्वर हे देवच. त्यांना कशी करुणा येईल?

'केव्हा मी पडीन एकटा धुळींत । मुखें आरोळीत नाम तुझे । केव्हा अपमान होईल या जनीं । थुंकिती पाहोनि केव्हां मज । केव्हा मी झाडीन आळंदीची वाट । करीन बोभाट त्वन्नामाचा । आळंदीवल्लभे, केव्हा माझे मनीं । देव गुरुपणी उमगेल । (अ. ६८२) महाराजांसारखी शरणागती, अशी आर्तता विरळा. यमदूतांनी प्रहार केल्यावर तुझे नाम मुखी येवो, एवढेच नव्हे तर 'पाहीन, मी कढे कुंभीपाकजळ । तेव्हा तू स्नेहाळ चित्ती राहे' भ्यालेल्या बालकाने आईचा आधार शोधावा तसा विश्वास येथे व्यक्त होतो. (अ. ७२७) आणि महाराज आळंदीला इतके पवित्र मानतात की ते भावविव्हळ होऊन उद्‌गारतात 'देहाचे परमाणु काढूनि वेगळे । पूजीन सगळे शिलावृक्ष' ज्ञानदेवांच्या कृपेमुळेच दुर्लभ देव, सुलभ झाला हे महाराजांना माहीत आहे. म्हणून ते म्हणतात, 'एक्या ज्ञानेश्वरनावाचे हे फळ । नाचे घननीळ मागे पुढे ।। (अ. १४१४)

या घननीळाविषयी अपार प्रेम महाराज व्यक्त करतात. त्या प्रेमात मराठी संतसाहित्यात दुर्मिळ असणारा मधुर भाव ओसंडून वाहतो आहे. परमेश्वर पती आपण पत्नी हा भाव जोपासणे म्हणजे नारदभक्तिसूत्र क्र. ८२ मध्ये सांगितलेली 'कांतासक्ती'. राधा, गोपी, मीरा, चैतन्य महाप्रभू या मालिकेत बसणारे आधुनिक मन म्हणजे संत गुलाबराव. प्रियकराच्या विरहामुळे झालेली मनाची तगमग, प्रतीक्षेने येणारा शीण, त्याच्या चाहुलीने पुलकित होणारे मन, त्याच्या मीलनात होणारी तृप्ती, इतर प्रेमिकांविषयी मत्सर, प्रियकरावरील लटका राग व खोटे भांडण, त्याच्यावरील एकनिष्ठ प्रेमाचा पुनरुच्चार... महाराजांच्या अभंगात प्रियकर प्रेयसीच्या भावविश्वाच्या एकूण एक मनोहारी छटा प्रकट झालेल्या आहेत. म्हणूनच महाराजांची ही रचना मराठी अभंगसृष्टीचे एक मनोहारी दालन झालेली आहे.

एखाद्या कुळवंताच्या कन्येप्रमाणे महाराज म्हणतात, 'ज्ञानेश्वर तात आणि कृष्ण पति । सौभाग्यसंपत्ति नित्य मज ।' (अ. १६) या प्रणयिनीचे प्रेम इतके उच्च कोटीचे आहे की 'आखिया सामने मूर्ति चाहूं तेरी । और नाहिं मोरी अभिलाखा ।।' (अ. २२१) अशी ती नंदलालास फक्त डोळे भरून पाहू इच्छिते. 'काह्याचा उजेड पडला आंगणी । कोण हें साजणी येत आहे?' अशी ती सावळे ब्रह्म आलेले पाहून स्तिमित होते. (अ. १४१०) कृष्णाचा विरह झाला की, 'रडता रडता गुंजा झाले डोळे) (अ. १४०७) अशी तिची स्थिती होते. तर कधी तिला आपल्या भाग्याचा हेवा वाटतो कारण 'कान्ताने खांद्यावर वाहून नेण्याचे भाग्य' तिला श्रीकृष्णाश्रयाने प्राप्त झाले आहे. (अ. ११२५) श्रीकृष्णास भेटायची इतकी लगबग होते की 'उडोनि जाईन । 'अंगें क्षेम मी देईन' (अ. १४२८) असे ती म्हणते. कधी ती मत्सराने जळते 'कोणे सवतीने स्वामी भुलविले । धुळें मेळविलें घर माझें ।। (अ. १४१८) तर कधी ती स्वतःला निखंदिते 'आंधळे लोचनीं न घडेचि काज । उगें कां मी तुज पर्णू मग? वामांकी इंदिरा, राधा कंठमणि । आणि आलिंगनीं गोपबाळा'... माझे ते महत्त्व काय ! पण एक काम मी करीन म्हणून तरी माझे पाणिग्रहण करा. 'तुमच्या दासांच्या पुसाया वाहणा । नाही मजविणा दुजी योग्य ।। (अ. १४२६) अशी ती लीन होते. तिचे कोवळे मन तिला विरहातच काय पण कांताच्या मीलनातही हुरहूर लावते. 'न देखितां वाटे दिसावे पुढती । दिसलिया तुटी होईल की ।। ऐसे दोहींकडे वाटे भय जीवा । क्षणही, माधवा सौख्य नाही (अ. १४२१) न दिसता वाटे कृष्ण दिसावा, दिसल्यावर वाटते या दर्शनसुखात खंड तर पडणार नाही? महाराजांनी टिपलेला काय हा सूक्ष्म प्रेमतरंग ! कधी तिचा उजवा डोळा लवू लागतो व विघ्न कोणते येणार म्हणून ती धास्तावाते. (अ. १४२२) विरहाने 'चहूंही देहांसी लागला वणवा' अशी तिची स्थिती

असह्य होऊन ती म्हणते, त्या चित्तचोराला शोधून आणा नाहीतर अनल म्हणजे अग्नी चेतवा. 'म्हणा तुम्ही सख्या श्रीकृष्णाय स्वाहा । होईन मी तेव्हा प्रेममय' (अ. १४२३) अशी निर्वाणीची भाषा तिच्या तोंडी येते. प्रणयकलहात ती वार करते 'प्रियेसी छळावे ब्रीद तुमचे की । छळिली जानकी रामजन्मीं ।।' (अ. १४७९) एखाद्या जाच झालेल्या मुलीने नवऱ्याला स्वतःच्या पित्याचा धाक दाखवावा त्याप्रमाणे महाराज 'ना तरी सांगेन, ज्ञानेश्वरा' (अ. १४६८) 'ज्ञानेश्वरताता सकळ सांगोनि' (अ. १४७१) 'कळवीन सारे उद्यां ज्ञानेश्वरा' (अ. १४७२) असे श्रीहरीला धमकावतात. पण हे सारे विभ्रम आहेत. या प्रणयिनीला श्रीहरीवाचून चैन पडणे, त्यावाचून विभक्त राहणे शक्यच नाही. ती मोकळेपणाने सांगते, 'वाटे प्राणनाथा देऊं आलिंगन । म्हणोनियां मन कल्पी योनि ।। होवोनी कामिनी हृदया हृदय । मेळवीन पाय प्राणेशाचे ।। अधरामृताचे घुटके घेईन । अमर होईन याचि देहीं ।।... ज्ञानेश्वरस्वामी सर्वांगी साजिरा । पाहोनी सुंदरा जीव निवे ।। (अ. ८७९)

ही ओढ शेवटी द्रष्टा आणि दृश्य, ज्ञाता आणि ज्ञेय, भोक्ता आणि भोग्य हे द्वैत मिटवून टाकते. ज्ञानदेवांनी अमृतानुभवात म्हटल्याप्रमाणे 'जो प्रियुचि प्राणेश्वरी' हा अद्वैताधिष्ठित सामरस्याचा प्रत्यय येऊ लागतो. ''आपणचि फूल । आपणचि भृंग । सुगंधाचे अंग एक मग ।। आपणचि पत्नी आपण भ्रतार । मग रतिवर एकानंदे ।। आपणचि भक्त आपणचि देव । तेव्हा भक्तिभाव शुद्ध भेटे ।। (अ. ७७६) हा मधुराभक्तीचा परमोत्कर्ष होय.

एकूणच, भक्तिमार्गाकडे महाराजांचा वेदान्ती असूनही जबरदस्त ओढा होता. त्यांना स्वर्गाची मातब्बरी नव्हती. मुक्तीची चाड नव्हती. 'वैकुंठ कैलास काचांचे तुकडे' (अ.३२७) असे ते तुच्छतेने म्हणतात. देवावर ते आळ घेतात. भजकाच्या भये भक्ति लपविली । मुक्ति पुढे केली ठकवाया ।। (अ. १४७०) निर्गुणाच्या चर्चेने भाव चूर होतो (अ. ५४१) हा त्यांचा इशारा आहे. योगापेक्षा नामसाधन सुलभ आहे (अ.४७) 'योगाची अष्टांगे नामींच मिळती' हे यमनियमांपासून थेट समाधिअवस्थेपर्यंत महाराज विस्ताराने दाखवतात. या भक्तीमुळे साक्षात्कार होतो तो गूढानुभव 'चैतन्य सावेव पुढे उभे' (अ. ३३) या शब्दात ते सांगतात. साक्षात्कारात 'आंधळ्याने रूप देखियेले नयनीं । मुकें बहिऱ्या कानीं गोष्टी सांगे' (नामदेव) अशी अतींद्रिय प्रतीती येते. महाराज म्हणतात, 'लोचनांवाचूनि हीन मी करंटा' पण ज्ञानदेव कृपा अशी अलौकिक की 'श्रीरघुनायक डोळां दावी' (अ. १४८६) ते आनंदाने असेही म्हणतात की, अनुकूल काळ आला 'देखिला हा बाळ कौसल्येचा' (अ. १४८८). अनाहत नादाची आलेली प्रचीती 'दृष्टीचिया आत एक वेणू वाजे' (अ. १५००) या शब्दात महाराज सांगतात.

हे सर्व नामस्मरणाने होते म्हणून महाराज वारंवार नामाचा गौरव करतात. 'राम तेचि नाम । नाम तोचि राम' (अ.५५) नाम व नामी एकच असे ते प्रतिपादितात. 'तोंचि सुलग्न सुदिन । तोचि नक्षत्रादि गण । ताराशशिबल पूर्ण । हरिस्मरण सर्वदा' असा नामाचा महिमा ते गातात (अ.२) 'नामीं प्रकाशे चित्तीं मेघश्याम' (अ. १०६४) असे नामाचे रोकडे सामर्थ्य महाराजांनी अनुभविलेले आहे.

अभंगांतून महाराजांनी साधकांना फार मोलाचा उपदेश केला आहे. भोगनिवृत्तीचा अभ्यास केला पाहिजे (अ. ९८१) 'अझून प्रत्यय का हो नाही?' या उतावीळ शंकेखोरास' निश्चय दृढ नाही' हे चरचरीत उत्तर महाराज देतात (अ.९८२) साधकांसाठी सबंध गीतासार ते एका अभंगात (क्र.९८३) सांगतात, तर दुसऱ्या एका अभंगात वेदसिद्ध परमार्थ मार्गावरील टप्पे ते सांगतात. (क्र.९८६) एकाग्रतेचे महत्त्व बिंबवताना 'समाधि लावोनि भोगाचे चिंतन । तेथ ब्रह्मज्ञान नाही नाही' असे ठासून म्हणतात (अ. १११४). अंतरंग शुद्ध होणे महत्त्वाचे आहे 'आधी देव व्हावें मन । मग जग नारायण' हा क्रम सहज आहे. (क्र. ११३१) देव सुखासुखी मिळत नाही. 'विषय भोगोनी नव्हे सोपा देव' (क्र. ११३३) 'वेळ मिळे तेव्हा वेदान्ती भाषण । सर्वदा चिंतन विषयांचे' (क्र.११३७) हे चालणार नाही. उलट धड ना अरत्र ना परत्र अशी स्थिती होईल. 'चंचळ मानसी देव ना संसार' (अ. ११३६) म्हणून एक निश्चय पाहिजे. दृश्य लटके आहे हे जाणून तू 'नको धनांगना चित्त देऊ (अ.११४३)' विषयांत दुःख जोंवरी कळेना । तोंवरी गळेना देहाहंता (अ.११६५) देवभेटीपूर्वी हे तरी पाहशील, इंद्रिये ताब्यात आहेत का? मन चिंतनात स्थिर किती? (अ.११६३) नाम घेऊन पाप करू नको. 'नामाच्या विश्वासें न वागे मोकळा' (अ.११७२) 'विश्वास सायासें जतन कर यासाठी तार्किकांना टाळ. 'जेणें अंतरंग द्विधा होय' (अ.१२३९) मन कधी दगा देईल याचा भरवसा नाही. 'मरणापर्यंत विश्वास मनाचा । धरू नये साचा कदाकाळीं' (अ.१२४९) दगाबाज मन काहीही युक्तिवाद करते पण 'करविता देव म्हणोनि कुकर्म । आचरितां, वर्म चुकलें की ।।' (अ.१२८१) विषयवैराग्य पाहिजेच. अरे, 'कामिनीमंचकीं सांपडतो देव । ऐसा काय भाव तुझे मनीं?' (अ. १२८४) गुरुवर श्रद्धा ठेव. कारण देव कृपावंत होतो व गुरुरूपात भेटतो (अ.१२९६) धनमान प्रारब्धाधीन तर देव प्रयत्नाधीन आहे. (अ.१३०९) रामाकार मन महत्त्वाचे, रामदर्शन नव्हे. (अ.१४९०) 'लावोनिया डोळे झगमग रूपा । जपती अजपा श्वासामध्ये ।। छेदन चालन दोहन जिव्हेचे । होती खेचरीचे अधिकारी ।।' पण विषयाकडे धावणाऱ्या वृत्ती निरोधिल्या नाहीत तर हैं 'अवघे चाळे' काय कामाचे? असा हा लाखमोलाचा साधकबोध आहे.

इतरांना बोध करून महाराज थांबत नाहीत. ते आत्मबोधासाठी स्वतःचे दोष परखडपणे मांडतात. खरे तर अतिशयोक्त स्वरूपात मांडतात. आपल्या निष्ठेत अनन्य भाव नाही. अर्धे मन कृष्णाकडे, अर्धे गुरूकडे ओढ घेते (अ.५६९) आपण ब्राह्मणांकडून सेवा करवून घेतो. (अ.५७३). 'नोहे दीन ना श्रीमंत । वरी मूढ दुर्विनीत' (अ.५७८) असे आपण आहोत. योषिन्मूत्रपात्र आवडीचे, असे आपण लंपट आहोत. परस्त्री, परधन, यांपासून अलिप्त नाही. 'मिष्टान्नीं रसना सुखे धावे' आपण द्वेषरागवर्जित नाही. माझे काव्य वाचून इतर द्रवतात पण 'माझिये लोचनीं न ये अश्रुजळे'. थोडक्यात मी दुर्गुणांचे आगर असून शेष त्यांचे वर्णन करताना थकेल ! संत तुकारामांनी स्वतःवर जे कोरडे ओढले आहेत, रामदासांनी करुणाष्टकांत जशी आत्मनिंदा केली आहे तसाच हा महाराजांचा प्रकार आहे.

महाराजांनी आपले पूर्वचरित्र काही अभंगांतून सांगितले आहे. त्यात ज्ञानेश्वरांपूर्वी वेगळ्या गुरुंकडून घेतलेला दत्तमंत्र, त्याची नावड, ज्ञानेश्वरांनी केलेला अनुग्रह, आपली उपासना, आपले अंधत्व व शूद्रत्व हे सारे आले आहे. काही अभंगांतून नैतिक तळमळ व्यक्त केली आहे.

महाराजांच्या अभंगांचे विषय व आशय यांचा आपण एथवर विचार केला. आता हा आशय ज्या स्वरूपात व्यक्त होतो त्याचे म्हणजे आविष्काराचे

विशेष पाहू. त्यात सूत्रमयता, कल्पकता, कूटरचना, दृष्टान्त, ग्राम्यता व तत्त्वजडता यांचा विचार प्रस्तुत आहे. अभंगांत सहजासहजी दृष्टीस पडणारी ही काही सूत्रवाक्ये 'धरिलिया भाव । होती पाषाणाचे देव' (क्र.५३५) 'गुरु सर्व दे आणून । गुरु देई ऐसा कोण?' (क्र.६०१) 'प्रतीतिविना बोल चोरीचे' (क्र. ७२४) 'प्रेम भोगानेच वाढे' (क्र.८९०) 'प्रेमामाजी विधि । दावी तो मंदबुद्धी' (क्र. ८९१) 'गुरु तोचि हरि । हरि तोचि गुरु' (क्र. ९३२) 'क्षणात विरक्त क्षणीं भोगजाळ । तयाचा विटाळ वाटे नारायणा ।।' (क्र. ११४४) 'उपाधीवेगळा जीव । याचे नाव ब्रह्मज्ञान' (क्र. १३१०)

कल्पक आविष्कार म्हणून महाराजांनी शंकराशी घातलेला वाद पाहण्यासारखा आहे. जटेत पवित्र गंगा धरलीस, मी मात्र पातकी पुत्र कसा? तू भालचंद्र, माझा ताप जसाच्या तसा ! वामांगी अन्नपूर्णा मी भुकेलाच ! 'ज्ञानेश्वर ताता शूलपाणि । करुणालोचनीं पाहे पाहे ।। (क्र.३७३) मी पापी नाहीच म्हणून तुझी कृपा होत नाही. तू पाप्यांना प्रसन्न होतोस! हिंसक व्याध, महानंदा वेश्या, बहुला जारिणी, श्रियांक बाळघाती, परस्त्रीहारक रावण, देवद्वेषी बाणासुर, गुणनिधि चोर कुबेर, भस्मासूर... महाराज ही यादी देऊन देवाला कल्पकतेने कोंडीत पकडतात (अ.३९७) आळंदीस चंदनपाखरासवे निरोप पाठवतात (अ.४२८) एका गोविंदापासून नवरसप्राप्ती कशी होते ते कल्पकतेने दाखवतात. मुक्ताईप्रमाणेच महाराज 'उंट झाला मुंगीपोटी... माय खाऊन बाईल पूजा... कुमारीतें झाले पोर । नपुंसक तो भरतार ।। (अ. १५१८) या पद्धतीची कूटरचना करतात.

महाराजांचा दृष्टांतावर भर कमी आहे व जे दृष्टान्त ते देतात त्यातही नावीन्य नाही, याची कारणमीमांसा सांगितली आहेच.

महाराजांच्या अभंगांत ग्राम्यता हा दोष काही वेळा आहे. ज्यांना नंदपुत्र आवडतो 'सावडीन त्याचे विष्ठा आणि मूत्र' (अ.१९०) कृष्णा, विडा घ्या. 'मुख माझे पिकदाणी । पीक सोडा न लाजोनी ।। (अ.२५९) ज्ञानेश्वरांपुढे अशी प्रतिज्ञा करणे की, निकृष्ट जन्म मिळणार असेल तर तुमच्या विष्ठेत किडा म्हणून मी जन्मेन ! (अ.७४३) हे लोक 'नारायण' का म्हणत नाहीत. 'पुढे हे लेकाचे रडतील... भिताती मरणी लवंडीचे' (अ.११२१) याचप्रमाणे 'पुढे यमदंड बैसतील लाता' (अ.११२४) मूर्तिपूजेवर आक्षेप घेणारास तुझ्या 'थापडीन तरी दोन्ही गाला' (अ.१३२४) ज्ञानेश्वरा, 'परीक्षा पाहता, नाही आम्हा बळ । किती वेळोवेळ बोंबलावे।।' (अ.१४५७) ही या ग्राम्यतापूर्ण आविष्काराची काही उदाहरणे म्हणावी लागतील.

काही अभंगांत तत्त्वजडता आली आहे. 'देहाहूनि आधीं व्यतिरेक व्हावा । अन्वये पहावा कृष्ण मग' (अ.९७७) म्हणजे प्रथम देहाहून पृथकपणे परमेश्वर ओळखून मग तोच देहादि सर्व आहे असे अनुभवावे हा अर्थ ! परमेश्वर 'स्वरूप-तटस्थ लक्षणांचा' आहे, असे वर्णिणे (अ.१००३) परमेश्वराचे चरण दिसावे असे वाटत असेल तर 'सोहंभावे आधी त्वंपद निवडीं । मग घाली उडी तल्लक्ष्यांशी' असे म्हणणे. यामुळे अभंग तत्त्वजड व गद्यप्राय होतो. परंतु महाराजांच्या उत्स्फूर्त अभंगवाणीच्या लोटात हे दोष कोठच्याकोठे वाहून जातात व तिचे गुणाधिक्य हेच मनावर ठसते.

सारांश, मधुराभक्तीने विनटलेले, तत्त्वज्ञानाची भक्कम बैठक असणारे, भक्तीची कोमलता व ज्ञानाची तार्किकता यांचा प्रत्यय देणारे, प्राचीन संतपरंपरेचे प्रभावी पुनरुज्जीवन करणारे असे हे संत गुलाबराव महाराजांचे अभंग आहेत. या कृष्णप्रियेने व आळंदीश कन्येने परमार्थाचे व मराठी अभंगवाणीचे दालन स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाची खास अशी नाममुद्रा उमटवून समृद्ध केले आहे.

**प्रा. डॉ. सुधाकर शं. देशपांडे**
५/५, चंद्रशेखर सहनिवास, नित्यानंद मार्ग, अंधेरी (पूर्व) मुंबई ४०००६९.

## व्हावे त्यांच्या चरणी लीन

जगीं सात आश्चर्यांत
एक नवल अजून
विदर्भात अंध कवी
संत गुलाबराव म्हणून ।।

महाज्ञानी प्रज्ञावंत
परम कृष्णभक्त होते
त्यांनी रचियेली रचना
आपणास विस्मित करिते ।।

नेत्र नसुनि अंध असती
परी दिव्य द्रिष्टी होती
स्तिमित व्हावे आपण सारे
जाणुनिया त्यांची महती ।।

नाहीं शिक्षण कसलेही
नाहीं विद्या वेद पठण
तरी ही सांगती आपणाला
गीतेचेही तत्त्वज्ञान ।।

अनपढ प्रज्ञावंत
सांगे ज्ञान पंडिताला
असा संत ज्ञानी थोर
नाही कुणी देखीयेला ।।

आपणासी लाभलेला
असा एक संत महान
थोर विभुति जाणूनीया
व्हावे त्यांच्या चरणी लीन ।।

**सौ. कमला ना. दातार**
१६१३, सदाशिव पेठ, टिळक रोड, पुणे ३०.

# श्रीगुलाबरावमहाराजांची स्त्रीगीते

डॉ. सौ. शालिनी मोहोड

*एम.ए.बी.एड., पीएच.डी. 'साहित्यातील संभाजी राजे' या विषयात डॉक्टरेट नियतकालीकातून व वर्तमानपत्रातून ऐतिहासिक आणि आध्यात्मिक विषयांवर लेखन. प्राध्यापक वाघिरे कॉलेज सासवड*

**या** जगामध्ये महान विभूति जन्माला येतात. लोकोत्तर पुरुष म्हणून मान्यता पावतात. जगाच्या गाड्याला प्रचंड चालना देतात. एखादा बुद्ध, एखादा ख्रिस्त, एखादा संत येतो आणि कधीही न संपणारी गती जगाला देवून जातो. विदर्भाच्या कुशीत जन्मलेली अशीच एक थोर विभूति म्हणजे मधुराद्वैताचार्य श्रीसंत गुलाबराव महाराज होय. या थोर महात्म्याचा जीवनपट पाहिला तर सर्वच काही आश्चर्यकारक वाटते. बालांध आणि शिक्षणाचा अभाव असूनही केवळ ३४ वर्षांच्या आयुष्यामध्ये त्यांनी आत्मविश्वासपूर्वक प्रभावी शैलीमध्ये पाश्चात्य मतांचा उहापोह केला. त्यांनी भक्तीला अद्वैताची बैठक देऊन भक्तिशास्त्राची नव्याने मांडणी केली. मधुरा भक्तीला सर्वोच्च स्थान देवून स्वतः ज्ञानेश्वर कन्येची भूमिका घेऊन गोपीभावाने श्रीकृष्णाची भक्ती केली.

महाराजांनी स्वतःच्या चमत्काराचा निषेध केला असला तरी महाराज स्वतःच एक चमत्कार होते. हाच चमत्कार यावश्चंद्रदिवाकरौ अशा भूमंडळावर विराजमान होण्यास पुरेसा आहे. त्यांची धर्मविचारांची मूलगामी विवेचन करणारी वाङ्मयनिर्मिती म्हणजे खरोखर त्यांच्या सर्वज्ञतेचाच हा वाङ्मयीन आविष्कार. हाच केवढा महान बौद्धिक चमत्कार होय.

महाराजांची बाह्यदृष्टी क्षीण झालेली असली तरी अंतर्दृष्टी मात्र प्रगल्भ होती.

***ज्ञानेश्वरकन्या आणि कृष्णपती ।***
***सौभाग्यसंपत्ती नित्य मज ।***

असे त्यांचे भावजीवन होते. आपले सर्व लिखाण म्हणजे ज्ञानेश्वरमाऊलीच्या ग्रंथावरील भाष्यच होय असे ते स्वतः म्हणत. त्यांच्या वाङ्मयात प्राचीन आणि आधुनिक विषयांची इतकी वैभवसंपन्नता आहे की, साहित्यसम्राट श्री. नरसिंह चिंतामण केळकर यांनी म्हटल्याप्रमाणे 'महाराजांचे ग्रंथ म्हणजे एक मोठा ज्ञानकोशच झाला आहे.' याला त्यांचे स्त्रीगीतसंग्रह तरी अपवाद कसे राहतील?

महाराजांच्या 'स्त्रीगीते' आणि 'स्त्रीगीतसंग्रह' यामध्ये अनुक्रमे १६३ ओव्या आणि विविध विषयांवरील १०९२ ओव्या आहेत. या सर्व ओव्या गेय असून त्या आठ चालीमध्ये बांधलेल्या आहेत.

महाराजांच्या स्त्रीगीतांची अधिष्ठात्री देवता म्हणजे त्यांच्या पत्नी सौ. मनकर्णिका बाई होय. त्या महाराजांची पतिनिष्ठ स्त्री असून साध्वी होत्या. तशाच त्या त्यांच्या सत्‌शिष्याही होत्या. पतिसेवेचे वेड असलेली पुण्यशील साध्वी अशी ही स्त्री. महाराज रागावले असतानाही शांत राहून वृत्त्यनुकूल वागणे, मंडळींची दगदग सोसणे, भजन-कीर्तनात रात्रभर जागून दमून निजलेल्या मंडळींची काळजी वाहणे इ. कामे कंटाळा न करता करीत होत्या व सदैव संतोषी वृत्तीने राहात होत्या. 'पतीच्या परमार्थमार्गात मी आड येणार नाही', असे महाराजांना दिलेले वचन उत्तम पतिव्रता - धर्म पाळून मायबाईने खरे करून दाखविले. महाराजांचेही त्यांच्यावर अत्यंत प्रेम होते. त्यांचे कंठमाधुर्य महाराजांच्याच तोडीचे असून दोघेही झोपाळ्यावर बसून एकत्र गाणी म्हणत तेव्हा लालन, वात्सल्य, माधुर्य इ. नवरसात्मक भावनांचा आविष्कार त्यांच्या अष्ठविध चालीतून प्रकट होत असे. या वेळी त्या प्रसंगाला अपूर्व बहार येई अशी साक्ष तत्कालीन श्रोतेमंडळी म्हणजे श्री. पांगारकर, भागवत मास्तर, मुळे मास्तर इ. देतात. पण दुर्दैवाने श्रावण वद्य ४ (इ.स. १९०६) मध्ये सौ. मनकर्णिका बाईचे देहावसान झाले. त्यानंतरची गीतरचना मात्र कमी झाली.

महाराजांनी संतपरंपरेला अनुसरून अद्वैत ज्ञानोत्तर भक्तीचा सिद्धान्त सामान्य जनांपर्यंत पोहोचविण्याचे साधन म्हणून मराठी लोकसाहित्यामध्ये प्रचलित असलेल्या स्त्रीगीतांचा उपयोग केला. ही स्त्रीगीते मुख्यतः स्त्रियांकरिता रचलेली असली तरी परमार्थामध्ये स्त्रीपुरुष हा भेद नसल्यामुळे ती सर्वच मुमुक्षुंकरिता अभ्यासनीय आहेत.

चुकीच्या मार्गावरून परावृत्त करून योग्य दिशेने वाटचाल करण्यास मार्गदर्शन करण्यासाठी शास्त्राची निर्मिती झाली आहे. आपल्याला दुःखाचा स्पर्श न होता नित्य सुख प्राप्त व्हावे ही सर्वसामान्य माणसाची प्रवृत्ती आबालवृद्धांपर्यंत हीच वृत्ती दिसून येते. शास्त्र मार्गाने जाण्याची त्यांची धडपड असते. शास्त्राची नवी दिशा म्हणजेच परमार्थ होय. यासाठी प्रथम आपल्या वैषयिक सुखाला आळा घालणे कठीण असले तरी नवीन शास्त्रीय दृष्टिकोनाप्रमाणे तो विषयाकडील आपली स्वाभाविक ओढ हळूहळू कमी करतो. संसारात राहूनही परमार्थ साधता येऊ शकतो हे तत्त्व तो जाणतो. हीच शिकवण महाराजांनी स्त्रीगीतरचनेतून दिली आहे. परमार्थाचे बाळकडू बालपणीच मिळावे यासाठी त्यांनी जशी बाराखडीची रचना केली त्याप्रमाणेच संसारात राहूनही परमार्थ साधता येतो आणि पर्यायाने मोक्षाप्रत जाता येते ही शिकवण देण्यासाठी स्त्रीगीत लिखाण केले.

या स्त्रीगीतसंग्रहामध्ये मंगलाचरण, सद्‌गुरुमहिमानिरूपण, सद्‌गुरुसेवानिरूपण, संसारात दारापुत्रादिकांची धनाविषयी ओढ, जन्ममृत्यूच्या फेऱ्यात टाकणाऱ्या वासनाडाकिणीचे भयंकर स्वरूप, विविध तापांची जांचणी, भक्तिवैराग्यपूर्वक विनंतीरूप गुरुप्रश्नवर्णन, यथार्थ परिक्षापूर्वक सद्‌गुरुलक्षण आणि आपल्या अधिकारानुसार बाह्यांतरंगसाधनपूर्वक गुरुपदेश इ. विविध विषय आहेत.

सर्व स्त्रियांनी जीवन्मुक्तिसुख प्राप्त करवून घेण्यासाठी नास्तिक पांखडमतांचा त्याग करून वेदाज्ञेने चालावे. त्यांनी प्रथम वैराग्य प्राप्त करण्यासाठी पतिव्रताधर्म पाळून पतीची अनन्यभावे सेवा करावी. वरिष्ठांची सेवा करावी, मैत्रिणीस साह्य करावे, दासदासींवर कृपा करावी, दारिद्र्य आले तरी पतिसेवा करावी. हे सांगण्यासाठी महाराज म्हणतात –

***पतीचा त्रास जीवी । इतरांसवे सुख ।***
***पतिव्रता स्त्रियांनी । त्यांचे पाहू नये मुख ।***

*देवाची दंभपूजा । पतिलागी वाकडे ।*
*तिचा व्यर्थ गेला जन्म ।*
*कल्पभरी नरकी पडे ॥*

पतीचा कंटाळा आणि देवाची दंभपूजा असेल तर त्याचे फळ नरकवास हेच होय, असे समजावे. आपल्या वडिलांचे आज्ञेत राहावे. निजकन्येलाही तसेच सांगावे. पतीला सत्कार्यात मदत करावी, पतिसेवेत आनंद मानावा, सासू-सासऱ्यांना पूज्य मानावे. मुलांशी गोड बोलून त्यांना कुमार्गापासून परावृत्त करावे. कोणाजवळही हट्ट न करता गोड बोलावे. पतीने आणलेल्या सामानातून थोडे थोडे राखून ठेवावे. विपत्तीसमयी तेच पुरवावे. अतिथी, गुरू, देवता, यांना संतोष द्यावा. जावा-नणंदांवर प्रेमभाव ठेवावा. सासरला सुखाची ठेव मानावी. माहेरी जाण्याची हाव धरू नये. आपल्या जेवणामध्ये पाचवा सामावेल असा चौघांचा स्वयंपाक करावा. लेकुरांकरिता अन्न झाकून ठेवावे. संपत्तीत गर्व करू नये. आणि विपत्तीत धैर्य सोडू नये. लीनता अंगी बाणावी. कोणाशीही तुसडेपणाने वागू नये. गृहकृत्यदक्ष असावे. पती गावी नसेल तर क्रीडा, नटणे, मुरडणे, उत्सवाला जाणे, हास्यविनोद आणि परगृही राहणे हे कटाक्षाने टाळावे. विधवा स्त्रियांनी ईश्वराला पती मानून भवगत चिंतनात मग्न राहावे.

*स्वासीनी बाईयांनो । भावे करा पतिसेवा ।*
*विधवांनो तुम्ही मनी । आठवा रमामाधवा ।*
*किंवा*
*अहेव स्त्रियालागी । पतीच गुरुदेव ।*
*विधवांसाठी आहे । स्वामी तो रमामाधव ॥*

अशासारख्या गीतांतून सुवासीनी व विधवा यांना स्त्रीधर्माची लक्षणे सांगून पुढे विवेक, वैराग्य, शम, दम, उपशम, तितीक्षा, श्रद्धा, समाधान, मुमुक्षुत्व इ. साधनपूर्वक गुरूपदेश वर्णन करून अखेरीस यथार्थपरिक्षापूर्वक सद्गुरुलक्षण सांगतात. हे करीत असताना

*वेदार्थ जाणोनीया । झाला जो ब्रह्मनिष्ठ ।*
*तयासी शरण जाता ग बाई । नासती भवकष्ट ।*
*केवळ अनुभवी । परि वेदार्थ न जाणे ।*
*ऐसा तो उपदेशा ग बाई । पात्र नाही वाचागुणे ।*

अशा तऱ्हेचे अयथार्थ गुरूचे दोष दिग्दर्शन करून योग्य गुरूला शरण गेले असतानाच भवबंधमुक्ती अवस्थेला जाऊन पोहोचण्यास महाराज उपदेश करतात. हे करीत असताना –

*'म्हणोनी गुरु करावा । वेदार्थी ब्रह्मवेत्ता ।*
*चुकती भवपाश ग बाई । तयासी शरण जाता ।*

असा आत्मविश्वास स्त्रियांच्या ठायी निर्माण करतात आणि त्याचबरोबर –

*जातीवर्ण कुळ काही । सद्गुरुचे पाहू नये ।*
*अंत्यज हो का कोणी ग बाई । धरावे चि दृढपाया ।*
*वेदवेत्ता ब्रह्मनिष्ठ । तोचि म्हणावा ब्राह्मण ।*
*इतर शूद्र सारे ग बाई । जाऊ नये शरण ।*

असे सद्गुरुचे लक्षणवैशिष्ट्य सांगताना जो आपल्या शिष्यावर पुत्रवत प्रेम करणारा गुरु कोणत्याही जातीवर्णाचा असला तरी चालतो. कारण तोच खरा वेदवेत्ता, वेदनिष्ठ असतो, असे महाराज स्पष्टपणे सांगतात.

एकूण साध्या साध्या गीतांमधून सद्गुरुभक्ती आणि त्याबद्दलचा दृढ विश्वास वाढविण्याचे कार्य उत्तम रीतीने साधल्याचे निदर्शनास येते. शुद्ध भक्तिभावाने सद्गुरु चरणी लीन झाल्याने परमेश्वर आपला उद्धार करतो ही शिकवण देण्यासाठी ते म्हणतात,

*सद्गुरू ग स्तुतीगीत । वाचतील ग ज्या कोणी ।*
*देईल ग चक्रपाणी । स्वपद त्यां ।*

स्त्रीपुरुष चातुर्यासंबंधी विवेचन करणाऱ्या पद्यरचना सविस्तर असून त्या महाराजांच्या सूक्ष्म निरीक्षणशक्तीचे द्योतक मानाव्या लागतील. प्रथम वैराग्यअवस्था प्राप्त होण्यासाठी स्त्रियांनी पतीला परमेश्वर मानून त्याची सेवा करावी. पुढे वैराग्यवृत्ती अंगी बाणल्यावर मात्र संसाराचा त्याग करून सद्गुरुंस शरण जावे आणि त्यांनी सांगितलेल्या मार्गाने ईश्वरोपासना करून भक्तिसंपन्न व्हावे. अखेरीस जीवनन्मुक्तिसुख अनुभवू लागावे. यासाठी महाराज स्पष्टपणे सांगतात की,

*गुरुसी शरण जावे । निर्लज्ज होवोनिया ।*
*गुरुचे गुणदोष । पाहूच नये ग कधी ।*

एकूण पारमार्थिक तळमळ लागल्याशिवाय भगवत्सुख प्राप्त होणे शक्य नाही. डॉ. कृ. मा. घटाटे म्हणतात, त्याप्रमाणे महाराजांच्या लोकगीतात्मक लोकाभिमुख स्त्रीगीतसंग्रहातील रचना म्हणजे महाराजांच्या गोड वाणीतून निघालेला अमृतत्व प्रदान करणारा, अनाहत नादाचा मुरलीरव आहे की, ती सामवेदीय सूक्ते आहेत, याचा संभ्रम उत्पन्न होतो.

स्त्रियांना भक्तिमार्गाचे श्रेष्ठत्व पटवून देत असताना महाराजांनी स्त्रीशिक्षणाला महत्त्व दिले. यासाठी त्यांनी प्रथम पत्नीला व नंतर इतर स्त्रियांना संस्कृत, व्याकरण इ. शिकविले. त्यांच्या मते ईश्वरावरील आत्यंतिक प्रेम हीच भक्ती होय. त्यांचे जीवनकार्यही याच भक्तिभावनेतून आकाराला आले होते. सर्वभूती परमेश्वर जाणून घेण्यासाठी ज्ञानाची गरज आहे. म्हणूनच

*'समबुद्धिर्ब्रह्मदृष्ट्या - विश्वदृष्ट्या तु वर्तनम् ।'*
*या वृत्तीतूनच खरा भागवत्भक्त तयार होतो.*
*महाराजांनी पत्नीला लिहिलेल्या पत्रांतून –*
*आधी प्रपंच करावा नेटका ।*
*मग साधावे परमार्थविवेका ।*
*याविण मार्गी आम्बिका । जाऊचि नये ।*

अशा तऱ्हेचा स्वामी समर्थांचाच विचार जणू काही व्यक्त होतो. स्त्री-पुरुष ही देहाला दिलेली नावे आहेत. पण त्याहून आत्माराम वेगळा आहे हा महाराजांचा विचार म्हणूनच –

*पतिपुत्र गोत्र बंधू । हे अवघेची स्वार्थसाधू ।*

असा उपदेश ते करतात. सत्कर्माने चित्त शुद्ध होऊन बुद्धीला स्थिर करावे. अशा तऱ्हेचा स्पष्ट विचार सर्व स्त्री-वर्गाला द्यावा. हा त्यांचा उद्देश. सर्वसाधारणपणे संतवाङ्मयात नेहमी संतांवर स्त्रीदोषाचा आक्षेप घेतला जातो. पण येथे तर महाराजांनी स्त्रियांना वैराग्य धरून पुरुषाचा, पतीचा संबंध तोडून टाकण्यास सांगितले. स्वतःच्या पत्नीलासुद्धा.

लक्ष्मणराव केंकरेंना पाठविलेल्या पद्यात्मक पत्रामध्ये चतुर्थ खंडात अतिशय सोप्या भाषेमध्ये स्त्रियांना पातिव्रत्याचा आणि सुशीलतेचा व्यावहारिक उपदेश केला आहे. प्रापंचिक विषयातून बाहेर पडून गुरुप्रेम, हरिहरोपासना, अद्वैतज्ञान आणि पराभक्ती या क्रमाने स्त्रियांची पारमार्थिक उन्नती करण्याचा महाराजांनी केलेला प्रयत्न उल्लेखनीय आहे. तो असा –

*मायबाप बंधू । सोयरे गणगोत ।*
*संसारी बुडविती । धरूनि माझा हात ।*
*जववरी धन । तोवरी याना याना ।*
*आपुल्या अर्थासाठी । लोक म्हणती काना काना ।*

महाराज गोपीभावाने श्रीकृष्णपत्नीरूप झाले होते. ज्ञानेश्वरकन्येकेचे सारसर्वस्व म्हणजे ज्ञानेश्वर माऊली. तिनेच त्यांना १९०१ साली अनुग्रह दिला. तेव्हापासून महाराजांचे सर्व काव्य ज्ञानेशकन्या याच नावाने मुद्रांकित झाले आहे. त्यांची माता, पिता, गुरु सर्व काही माऊलीच ! मोठ्या आनंदाने या माऊलीने आपल्या कन्येचे कन्यादान केले आणि म्हणूनच तिला कृष्णासारखा सोज्वळ असा पती लाभला. प्रेमाचा स्वभावच असा आहे की, प्रेमाच्या ऋणातून मुक्त होण्याऐवजी प्रेमाचे ऋण वाढतच जाते. म्हणूनच –

*'श्री ज्ञानेशकन्ये प्रेमपाशे तया ।*
*बांधोनि ह्रदयामध्ये ठेवू ।'*

ही महाराजांची अखेरची मागणी होती. त्यांना स्त्रीत्वातील प्रेमभाव सर्वोत्कृष्ट वाटून त्यांनी स्वतःच्या सर्व वृत्ती श्रीकृष्णाला प्रेमभावाने अर्पण केल्या. साहजिकच अशा समयी पुरुषत्वाचा अभिमान नाहीसा होऊन 'तत्सुखिरूप' असे प्रेम प्राप्त होऊन पूर्ण अद्वैतस्थिती अंगी बाणविण्यासाठी ज्ञानेशकन्या होऊन भगवंताशी ते एकरूप झाले. येथे संतश्रेष्ठ मीराबाईने रूपगोस्वामींना 'वासुदेवः पुमानेकः स्त्रीरूप मितरं जगत्' असे उत्तर दिल्याची आठवण होते.

महाराजांची स्त्रीगीतरचना म्हणजे एक प्रकारचे लोकसाहित्यच होय. त्यातील रूपके उलगडल्याशिवाय त्यातील मतितार्थ आकलन होत नाही. अर्थात् या सर्व रचना प्रामुख्याने आध्यात्मिक बैठकीतून निर्माण झालेल्या असल्याने त्याच्या बाह्यरूपापेक्षा त्याचे आंतररूप वेगळे आहे.

*तीन वर्षांच्या कुमारिकेला । वृद्ध बालक झाले ।*

अशा सारख्या रूपकातून भक्तिमार्गाचा विचार अनुस्यूत असतो.

ईश्वरभक्ती हाच स्त्रीगीतांचा स्थायीभाव असल्याने आईचे दूध पिणारा कृष्ण, शय्येवर झोपविणारा कृष्ण अशी कृष्णाची विविध रूपे स्त्रीभूमिकेतून विशद केली असल्याने प्रत्येक प्रसंगामध्ये महाराज रमलेले दिसतात. ज्ञानेश्वर कन्येचा पती, गोपींचा नाथ, व्रजभूमीचा स्वामी, देवकी-यशोदा-नंद यांचा बालक इ. नाना रूपांनी नटलेला श्रीकृष्ण सहजतेने साकार होतो.

*'बाई माझा प्राणनाथ । मेघ श्यामल तनु ।'*

– असे वर्णन करणारी स्त्री आपल्या सखीला कृष्णाच्या विविध रूपांची ओळख करवून देते. हे करीत असताना शेजारीण सखु हे सर्व ऐकत असल्याचा आणि त्याला प्रतिसाद देत असल्याचा भास निर्माण होतो.

लहान बाळाला झोपविताना गायिल्या जाणाऱ्या अंगाई गीताच्या धर्तीवर महाराजांनी शय्यागीते रचली आहेत. या गीतामध्ये श्रीहरीला झोपविणारी माता शेजारणीजवळ कृष्णाचे कौतुक करते. बालरक्षेत तर तिच्या चौघी सख्या तिच्यासोबत कृष्णाला लिंबलोण करीत आहेत. काही गीतांमध्ये तर याच सख्या जन्मलेल्या हरीला पाहण्यासाठी निघालेल्या आहेत. यामध्ये वर्णिलेली कृष्णाला लागलेली दृष्ट या मनोरम कल्पनेतून मनोज्ञ दर्शन घडवते.

जेवणाच्या वेळी गायिलेली गीते तर मजेशीर आहेत –

*भजा भात कढी भाजी । बाई तिखट सर्व देवा ग ।*
*म्हणूनी तुम्ही आधी । तूप पुरणपोळी ही जेवा ग ।*

जेवतेवेळी श्रीकृष्ण आपल्याबरोबर जेवीत आहेत, या जाणिवेतून या गीतांची निर्मिती झाली असल्याने त्या त्या समयी निर्माण होणाऱ्या भाववृत्तीचा यातून परिचय होतो. आणि मग कृष्ण एक देव न राहता आपल्याच कुटुंबातील एक अविभाज्य घटक बनून जातो.

प्राचीन मराठी संतांच्या काव्य परंपरेच्या सांप्रदायिकतेच्या जनकत्वाचा मान श्रीज्ञानेश्वर माऊलीचा आहे हे निर्विवाद. त्यानंतर एकनाथ, नामदेव, तुकाराम या संतांनी सांप्रदायिकतेची सरिता सतत प्रवाहीत ठेवली. नाथांनी जनतेमध्ये शिक्षण देताना 'भक्तिविण विद्याशास्त्र केवळ भारवाहक' अशी जाण निर्माण केली. नामदेवांनी त्यात मधुरता ओतली आणि तुकारामांनी प्रांजळपणाबरोबर सडेतोडपणाची शिकवण दिली. हीच सांप्रदायिकता महाराजांच्या स्त्रीगीतरचनेतून ठायी ठायी निदर्शनास येते. त्यांनी स्वानुभूतीच्या आत्माविष्काराला वस्तुनिष्ठ रूप देवून श्रीकृष्णपत्नी या नात्याने तेवढ्याच उत्कटतेने ते त्याच्याशी समरस झाले. परिणामी स्त्रीगीतरचनेतील आध्यात्माची बैठक अधिक भक्कम झाली.

एखादी नवपरिणीता जशी मोठ्या उत्कटतेने आपल्या पतीची वाट पाहते तोच भाव महाराजांच्या विरहिणीमध्ये व्यक्त झाला आहे. पतीविषयीची प्रणयी - भावना व्यक्त करताना त्यातील प्रणय - भावनेपेक्षा सगुणरूप श्रीकृष्णाच्या सेवेचा भक्तिरूप समभाव अधिक उत्कटतेने व्यक्त होतो. तसेच यामध्ये कृष्णाविषयीची हर्षनिर्भरता, वत्सलता आणि उत्कट भावभक्ती प्रतीत झाल्याने ही गीतेही तेवढ्याच प्रमाणात वात्सल्ययुक्त बनली आहेत.

*'पती मशी गे सोडूनि गेले ।'*
*किंवा*
*'विरहदुःखे ते प्रारब्धही नेले ।*
*अजूनि का गे हरी नाही आले ?।'*

अशासारख्या स्वगतातून कृष्णभक्तीची ओढ प्रकट होते. कधी कधी आपल्या सख्यांना कृष्णाची माहिती देण्याच्या रचनेत दुपारच्या गप्पांतील सहजताही प्रत्ययास येते.

पुरुषांप्रमाणे स्त्रियासुद्धा परमार्थाच्या अधिकारी असल्यामुळे त्या वेदान्तातील प्रमेये सहज समजू शकतात असा महाराजांना त्यांच्याबद्दल दृढ विश्वास आहे. त्यामुळेच –

*सदेव सदेवेत्यादि वाक्यैः । ब्रह्मणः परोक्षता ग ।*
*गृहीत्वा गृहीत्वा तत्वमसि । जायते ऽ परोक्षता ग सखुगडनी ॥*

अशासारख्या गीतातून 'सदैव सौम्य इदमग्र आसीत' या श्रुतीवरून परब्रह्माचे परोक्ष ज्ञान करवून घेतल्यावर 'तत्त्वमसि' या महावाक्याने ब्रह्माचे अपरोक्ष ज्ञान होते हे महाराज सहजपणे सांगून जातात. यातील 'सखुगडनी' हे मनावर अधिकच ठसणारे विशेषण. महाराजांची ही एक विशेष खुबी असून त्यातून सामवेदीय स्वरांचा भास होतो.

हातामध्ये कधी लेखणी धरली नाही. अक्षरही डोळ्यांनी पाहिले नाही. साक्षात् अक्षरभेटीचा योग कधी आलाच नाही. तरीपण या मानसकन्येने आपल्याच माऊलीचे काव्यगुण अंतर्ज्ञानातून आत्मसात केले. तरीपण स्वतःचा स्वतंत्र असा एक मानदंड ठेवला. त्यामुळे यातील आशयाचा पिंड पारंपरिक गीतापेक्षा थोडा वेगळा वाटल्याशिवाय राहात नाही.

'एकूण भावनेच्या विशुद्ध आविष्कारातून साकार झालेली गीते त्यातून

व्यक्त झालेला आध्यात्मिक क्षेत्रातील अनुभव आणि व्यवहारातील त्यांचे व्यक्तित्व यातून निर्माण झालेली ही स्त्रीगीते शब्द-सूर-ताल-रूप-भाव-स्पर्श-अर्थ यातून एकबद्ध झालेली आहेत. यातील विचारांची एकता' तत्त्वदर्शनाची मौलिकता यांनी ती परिपूर्ण आहेत. तसेच भाषा, रचना, संस्कृतप्रचुरता, प्रासादिकता यामुळे प्रत्येक गीताचे बाह्यस्वरूप वेगळे असले तरी त्यातील स्वसंवेद्य अशा आशयातून भावपूर्ण अशा समाधीत साधक अलगदपणे जाऊन पोहोचतो.

महाराजांसमोर विशेषकरून वऱ्हाडातील तत्कालीन स्त्रीसमाज असल्यामुळे ग्रामीण भागातील स्त्रिया ज्या पद्धतीने गाणी गात त्याच चालीवर त्यांनी गीतरचना केली आहे. यामुळे यातील भाषा सोपी, सरळ असली तरी यातील आशयामुळे ती अधिक भारदस्त झालेली आहे. यामध्ये भावनांची उत्कटता तर आहेच पण त्याचबरोबर बुद्धी आणि भावना यांचा सुरेख मिलाफ साधलेला आहे.

आजच्या समाजातील व्यावहारिक जीवनाच्या पातळीवर जाऊन महाराजांच्या स्त्रीगीतरचनेचा सखोल अभ्यास केला तर असे जाणवते की, सामान्य व्यवहाराची सर्व बंधने लोप पावून सातशे वर्षानंतर पुन्हा जाणवणारी विरहिणी अवस्था अनुभल्याचे समाधान वाटते.

**डॉ. सौ. शालिनी मधुकरराव मोहोड**

प्लॉट नं. ५०, युनिट नं. ३, 'ओम' बंगला, गणंजय सोसायटी, गांधी भवन रोड, कोथरूड, पुणे २९.



॥ श्री ज्ञानेश्वर माऊली ॥

## ''प्रज्ञाचक्षू श्रीगुलाबराव महाराजांचे ग्रंथ म्हणजे ज्ञानकोशच''

— साहित्यसम्राट न. चिं. केळकर

## ''गागर मैं सागर भर दिया है ॥''

— पंतप्रधान मा. अटलजी वाजपेयी

## सर्व ग्रंथसंपदा विक्रीसाठी उपलब्ध

*(१) मधुराद्वैताचार्य सिद्धप्रज्ञाचक्षू ज्ञानेशकन्यका श्रीगुलाबराव महाराज आणि*
*(२) वेदान्तकेसरी प.पू. बाबाजी महाराज पंडित तसेच*
*(३) शांकर तत्त्वज्ञानाचे गाढे अभ्यासक डॉ. वा. ना. पंडित यांनी लिहिलेले समग्र ग्रंथ विक्रीसाठी उपलब्ध आहेत.*
*(मराठी तसेच हिंदी अनुवादित ग्रंथही छापून विक्रीसाठी उपलब्ध आहेत)*

## समग्र ग्रंथसूची व अधिक माहितीसाठी लिहा

### ● प्रकाशक ●

*१) श्रीज्ञानेश्वर मधुराद्वैत सांप्रदायिक मंडळ, दहीसाथ, अमरावती ४४४ ६०१.*
*२) पंचलतिका ग्रंथ न्यास, बी-५/८, सुमन नगर, चेंबूर, मुंबई ४०० ०७१.*
*३) स्कंददास स्मारक ग्रंथन्यास, १४/४५९ नेहरूनगर, कुर्ला (पूर्व) मुंबई ४०० ०२४.*

॥ श्री ज्ञानेश्वर माऊली ॥

## श्रीगुलाबराव महाराज (ज्ञानेश्वर कन्या)

यांची

## वाङ्मयपताका (ग्रंथवैभव)

युक्तीने पटवून देणे हा माझा बाणा आहे.

*श्रीगुलाबराव महाराजांचे लोकोत्तर ज्ञान 'आचार्य' पदवीचे असे. त्यांची लौकिक अलौकिक तत्त्वज्ञानाचे व विशेषतः भक्तिशास्त्रावरील मोठे व छोटे ग्रंथ मिळून शंभरावर रचना असून त्रुटित अशी ३०/४० प्रकरणे आहेत. हे समग्र वाङ्मय सध्याच्या संक्रमण दशेमध्ये जनतेपुढे येणे फार फार गरजेचे आहे. हे वाङ्मय भक्तिज्ञान दृष्टीनेही विद्वत्ता प्रचुरतेने भरलेले असे आहे. सकल जीवांच्या भिन्न भिन्न बहुतेक मनोभूमिकांस उपयुक्त असा बोध या एकाच सत्पुरुषाच्या अद्वितीय वाङ्मयात आढळतो. या ग्रंथसंपदेत वेदान्त, सूत्रविचार, योग, धर्म, ज्ञान, भक्ति, सांख्य, आयुर्वेद, अभंग व पदे, संगीत, लोकगीते, मधुराभक्ती इ. अनेक विषयांवर अत्यंत तर्कशुद्ध मांडणी आहे. सुशिक्षित, विचारवंत व इतर भाविकांपुढे श्रीमहाराजांची भूमिका मांडली जावी म्हणून हा एक प्रयत्न !*

### ● समग्र ग्रंथ मिळण्याची स्थाने ●

१. डॉ. राम पंडित
१४/४५९ नेहरू नगर, कुर्ला (पूर्व) मुंबई ४०० ०२४
दूरध्वनी : ५२२ ०४१३

२. श्री. सु. शं. फणसळकर
३१९ शनवार पेठ, पुणे ४११०३०
दूरध्वनी : ४४८ ०६४५

३. श्री. श्रीरंग कृ. घटाटे
'गोकुळ' सिव्हील लाईन्स, नागपूर ४४० ००१.
दूरध्वनी : ५३३ ९९७

## श्रीगुलाबराव महाराज यांचे विक्रीसाठी उपलब्ध ग्रंथांची सूची

| | किंमत रु. | | किंमत रु. |
|---|---|---|---|
| १. निगमांथपतसंदीपक (विवरणासहीत) | ४०-०० | २. प्रीतिनर्तन (विवरण) | ५०-०० |
| ३. प्रथम व द्वितीय यष्टी उत्तरार्थ | ५-०० | ४. भक्तीपदतीर्थामृत सार्थ | १५-०० |
| ५. तर्काने ईश्वरसिद्धी सच्चिन्निर्णय | २५-०० | ६. भक्तीतत्त्व (प्रिय पाहुणेर) | ३५-०० |
| ७. पांडुरंग चौसष्टी | १-०० | ८. चिरंजीवपदाभ्यास | १०-०० |
| ९. भगवत्‌गीतासंगति | ६०-०० | १०. चित्तोपदेश | १०-०० |
| ११. गोविंदानंद सुधा नारदीय भक्त्याधिकरण न्यायमाला | २-०० | १२. अलौकिक व्याख्यानमाला | ३०-०० |
| १३. स्वमंत व्यांश-सिद्धांत तुषार | २०-०० | १४. पत्रव्यवहार खंड १, २ व ३ | ८०-०० |
| १५. साधुबोध | ४०-०० | १६. पदांची गाथा | १०-०० |
| १७. गान सोपान | १०-०० | १८. मोक्षपट | १०-०० |
| १९. मणि मंजुषा | १०-०० | २०. योगवासिष्ठ तत्त्व (समयोपदेश) | ३०-०० |
| २१. संस्कृत रचना | ५०-०० | २२. श्रीमद्‌भगवद् गीतेवरील प्रवचने (समयोपदेश) | ८०-०० |
| २३. योग रहस्य | ४०-०० | २४. योगप्रभाव भाग १ व २ | १२०-०० |
| २५. भगवद्‌भक्तिसौरभ | ६०-०० | २६. नित्यतीर्थ आळंदी महिमा | ६-०० |
| २७. मानस आयुर्वेद | २०-०० | २८. भक्तितत्त्वविवेक | ५०-०० |

## श्री बाबाजी महाराज पंडित विरचित ग्रंथ

| | किंमत रु. | | किंमत रु. |
|---|---|---|---|
| १. हरिपाठ रहस्य | ४०-०० | २. अमृतानुभव कौमुदी | १५०-०० |
| ३. श्रीज्ञानेश्वरी गूढार्थ दीपिका खंड १ व २ | ३००-०० | ४. अभंग गाथा | ५०-०० |
| ५. आर्यधर्मोपपत्ती | ६-०० | ६. श्रीमद् भागवतावरील प्रवचने | ५०-०० |
| ७. पंचदशी प्रवचने | ३०-०० | ८. विविध लेख संग्रह : भाग २ रा | ४-०० |
| ९. परमार्थ बोध | ३०-०० | १०. परमार्थ सार | १५-०० |
| ११. श्रीज्ञानेश्वर महाराजांचे भक्तितत्त्व | ५०-०० | | |

## डॉ. का. वा. तथा अण्णासाहेब पंडित यांचे ग्रंथ

| | किंमत रु. | | किंमत रु. |
|---|---|---|---|
| १. शांकर तत्त्वज्ञानांत भक्तीचे स्थान | २०-०० | २. चिद्‌विलास आणि भक्तितत्त्व | ४५-०० |
| ३. श्री गुलाबराव महाराज विभूति आणि तत्त्वज्ञान | ७०-०० | ४. अद्वैत भक्ति | ३०-०० |
| ५. वेदस्तुती दीपिका | ६०-०० | ६. श्री गुलाबराव महाराज विभूति आणि वाड्मय | १००-०० |

## इतर ग्रंथ

| | किंमत रु. | | किंमत रु. |
|---|---|---|---|
| १. गुलाब गुच्छ | १०-०० | २. श्री गुलाबराव महाराजांचे चरित्र भाग १ व २ (श्री. त्रिपुरवार लिखित) | १००-०० |
| ३. विश्वव्यापिनी संस्कृति | ५-०० | ४. बुवाबाजीचा दंभस्फोट | २०-०० |
| ५. श्री गुलाबराव महाराजांचे १३० ग्रंथांचा परिचय | १०-०० | ६. सार्थ चांगदेव पासष्टी | १०६-०० |
| ७. नामामृत गोडी | १२५-०० | ८. श्रीबाबाजी महाराज पंडितांची विचार संपदा | १००-०० |

# भगवन्नामाचे अनध्यस्तविवर्तत्व

श्री.सौ. [illegible]

*एम.ए.(मराठी) 'नामामृत गोडी' या ग्रंथाद्वारे पीएच.डी. नागपूर महाविद्यालय एम.ए. साठी अध्यापन. संतसाहित्य व शिक्षण यांवर व्याख्याने व लेख. आकाशवाणीवर उद्‌बोधन.*

'**ना**म संकीर्तन साधन पै सोपे' हे संतवचन सर्वपरिचित आहे. परंतु नाम हे केवळ साधनरूप नसून ते साध्यस्वरूपही आहे हे प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांनी 'अनध्यस्त विवर्त' ह्या संकल्पनेद्वारे सिद्ध केले आहे. भगवंताशी एकरूप होण्याचा सुलभ उपाय म्हणजे नामस्मरण. नामस्मरणात भगवंताचे नाम व रूप दोन्ही अंतर्भूत असून प्रेम हाच त्याचा मूळ पाया असतो. भगवंताचे सगुण रूप मायिक नसून सच्चिदानंदघन पूर्णब्रह्मच आहे हे श्री महाराजांनी प्रामुख्याने सिद्ध केले. व्यास नारदादी पूर्वसूरींच्या विवेचनातील अद्वैत ज्ञानोत्तर सगुण भक्तीचे उत्तम व अचूक प्रतिपादन करण्यासाठी 'अनध्यस्तविवर्त' ह्या नवीन शब्दाची योजना सर्वप्रथम केली. त्यामुळे भक्ती ही फक्त भोळ्याभाबड्या भाविकांसाठी नसून आत्मज्ञानसंपन्नासाठीही आहे, असे शास्त्रीय रीतीने सिद्ध झाले. संप्रदाय सुरतरू, भक्तिभाष्य, प्रेमनिकुंजादी ग्रंथात ह्या विषयाचे प्रतिपादन श्री महाराजांनी खंडनमंडनपूर्वक केलेले आहे.

## अनध्यस्तरूप मेघश्याम

नामस्मरणाचा महिमा सांगत असताना भगवन्नाम हे नित्य आहे असे म्हटले जाते असे श्री महाराज व सर्व संतही अभंगातून सांगतात. अद्वैत शास्त्राच्या प्रमेय व्यवस्थेत हे कितपत बसते? ही एक कूट समस्या आहे कारण अद्वैत म्हणजे परब्रह्मच नित्य आहे. ते नामरूपातीत आहे व त्यामुळे इतर सर्व नामरूपे मिथ्या खोटी आहेत हा विचार, म्हणजे अद्वैत विचार होय. परंतु भगवन्नामा नित्य म्हणून स्विकारल्यास परब्रह्म व नाम ह्या दोन वस्तू नित्य ठरतात व त्यामुळे अद्वैत सिद्धांताला पूर्ण तडा जातो. परंतु अनध्यस्त विवर्त ह्या संज्ञेमुळे ह्या कोंडीतून मार्ग सापडतो व अद्वैत प्रमेयाला धक्का न लागता भगवंत नामाचे सत्यत्व व नित्यत्व कायम रहाते. या बाबत श्रीगुलाबराव महाराज संप्रदाय सुरतरुत लिहितात,

***म्हणाल नाम नित्य, ब्रह्म नित्य, तरी द्वैत होईल सत्य ।***
***तरी हे नोहे,जैसे अज्ञान नाशी असत्य***
***परी नाम त्याहोनी सत्य हरिरूपी मिळे ॥***
***अनध्यस्तविवर्त शब्द तो नाम । अनध्यस्तरूप मेघश्याम***
***येथ प्रधानगौणसंभ्रम । करू नये हे तुकाराम वदती ॥***

ब्रह्म नित्य व नामही नित्य मानले तर द्वैतमताला सत्यता येईल व दोन सत्ता मानाव्या लागतील व अद्वैत विचाराला बाधा निर्माण होईल. परंतु व्यवहारातील नामे आपण असत्य का मानतो? तर ते नाम व ती वस्तू यात एकरूपता नसते विभिन्नता असते. परंतु मूळ परब्रह्म व एखादे नाम यात जर एकरूपता असेल तर अद्वैताला विरोध न येता नामही राहू शकते. म्हणूनच श्री महाराज म्हणतात 'नाम त्याहोनी सत्य हरिरूपी मिळे' कारण भगवंतवाचक नाम हे अनध्यस्तरूप आहे. त्यामुळे नाम-रूपात प्रधान व गौण असा भेद करू नये ह्या आपल्या मताला बळकटी येण्यासाठी श्री महाराजांनी संत तुकारामांची साक्ष दिलेली आहे. ज्ञानेश्वरकन्या श्री गुलाबराव महाराजांनी 'नामाचे अनध्यस्त विवर्तत्व' सिद्ध केल्याने नाम व नामीचा तादात्म्य संबंध सिद्ध होतो. त्यामुळे अनध्यस्त विवर्ताची संज्ञा लक्षात घेणे आवश्यक आहे.

## अनध्यस्तविवर्त म्हणजे काय?

***'अपर रूपत्वे सति भेदभानपूर्वकमधिष्ठान ज्ञानावदरकत्वे***
***सति च अधिष्ठान ज्ञाननिवर्त्यमध्यस्तविवर्तत्वम्'***

भ्रमेकरून वस्तूचे अन्यथा ज्ञान याला अध्यस्त विवर्त म्हणतात,
ज्ञानेकरून प्रीतीनुसार वस्तूचे विशेष ज्ञान तो अनध्यस्त विवर्त होय.

***'अभिन्नेसति, अपरुपत्वे सति च प्रीतिमात्रत्वात्***
***अधिष्ठान ज्ञान अनवर्त्यम्, अनध्यस्तविवर्तलक्षणम्'***

अधिष्ठानभूत मूळ वस्तूवर भ्रमाने दुसऱ्याच वस्तूची कल्पना केली तर मूळ वस्तू लपून जाते परंतु मूळ वस्तूचे ज्ञान झाले तर कल्पित वस्तू नाहीशी होते त्यास अध्यस्त विवर्त म्हणतात. उदा. दोरीवर सापाचा भास झाला तर दोरीच साप आहे असे वाटू लागते व मूळ वस्तू दोरी लोप पावते. परंतु दोरीचे ज्ञान होताच काल्पनिक साप नाहीसा होतो. अनध्यस्त विवर्त ह्या संकल्पनेतही मूळ वस्तूवर काल्पनिक वस्तूचा भास होतो हे साम्य आहे. परंतु मूळ वस्तूचे ज्ञान झाल्यावरही कल्पित वस्तू नाश पावत नाही तसेच कल्पित वस्तूच्या अध्यारोपाने मूळ वस्तू झाकल्या जात नसल्याने कल्पित वस्तूला विरोध करण्याचे कारणच उरत नाही. जसे सोन्याचा अलंकार घडविला तरी मूळ वस्तू सोने लोप पावत नाही व सोन्याचे ज्ञान झाल्यावरही कल्पित अलंकार कायम राहतो. मूळ वस्तूच्या ज्ञानात प्रतिबंध न करणारा हा भास असल्याने यास 'अनध्यस्त विवर्त' म्हणतात.

## नाम व नामीचा अभेद

व्यवहारातील सर्व शब्द हे अध्यस्तरूप आहेत म्हणजेच कल्पित आहेत. कारण व्यवहारात शब्द व पदार्थ यांचा संबंध संकेतरूप असतो. एकात्मरूप नसतो. त्यामुळेच अग्नी शब्द उच्चारला तरी आपल्या जिभेला चटके बसत नाहीत. अग्नी ही वस्तू व अग्नी हे आरोपित नाम एकरूप असते तर अग्नी शब्द उच्चारताच जीभ पोळली असती.

परंतु भगवंताचे नाम मात्र अनध्यस्त रूप आहे. कारण भगवंत नाम व स्वतः भगवंत एकरूप आहेत. नाम व नामीचा हा अभेद असल्याने भगवंताच्या गुणांचे ज्ञान झाल्यावरही नामाला विरोध करण्याचे कारण उरत नाही. परंतु व्यावहारिक इतर नामांचे तसे नाही कारण अधिष्ठानभूत एका परब्रह्माचे ज्ञान झाल्यावर सर्व नामरूपे भिन्न असल्याने नाश पावतात.

परंतु भगवंतनामे ही परब्रह्मवाचकच असल्याने ब्रह्मज्ञानानेही नाम नाश पावत नाही तर उलट ते परब्रह्माचे बोधन करून देणारे असल्याने त्या नामाबद्दलचे प्रेम निर्माण होते. त्यामुळे भक्तिमार्गातील प्रारंभी साधनरूप असणारे नामस्मरणच पुढे ज्ञानानंतरही कायम रहाते व साध्यरूप बनते. कारण अनध्यस्त विवर्त शब्द तो नाम / अनध्यस्तरूप मेघश्याम असा अनुभव ज्ञानी भक्ताला येत असतो. ही सर्व भूमिका मांडून श्री महाराज म्हणतात त्यामुळेच रूप साक्षात्कार श्रेष्ठ व नामसाक्षात्कार कमी दर्जाचा असे काही नसून दोन्ही समान आहेत. कारण भगवंतनाम व भगवंतरूप यात अभिन्नता, अफूटता, अद्वितीयता आहे.

नाम म्हणजे नारायण । नाम भिन्न कल्पू नये असे श्री महाराज सांगतात.

## भगवन्नाम अनध्यस्त

अध्यस्त व अनध्यस्त यांच्या व्याख्या डोळ्यांसमोर ठेवल्या तर व्यवहारातील संकेतरूप शब्द हे अध्यस्त नाम असून भगवंताशी तादात्म्य संबंध असणारे शब्द म्हणजे ॐ, हरि, गोविंद, रामकृष्ण हे अनध्यस्तनाम होय. संपूर्ण जगाचे मूळ कारण ब्रह्म असल्याने सर्व जगाला ब्रह्माचे अधिष्ठान आहे. जर या मूळ अधिष्ठानभूत परब्रह्माचा क्षणभरही विसर न पडता विविध शब्द उच्चारले तर ते इतर शब्दही भगवंतवाचक ठरू शकतील. श्री महाराज म्हणतात,

***विवक्षा असली ईश्वराची । तरी लौकिकादिहि शब्दांची***
***अर्थवक्ता साची । परमेश्वरीचि घटे ॥***
***विवक्षेविण सकळ शब्दार्थ । जरी नारायण हा सिद्धांत***
***तरी अवघियाते घडत । नामस्मरण म्हणावे ॥***

बोलणाऱ्याच्या मनात निरंतर भगवंत स्मरण कायम असून जर त्याने व्यावहारिक शब्द जसे घर, कपाट, पेरू, वांगे, पेटी असे शब्द उच्चारले म्हणजे विवक्षा भगवंताची व शब्द लौकिक असले तरी त्याचा अर्थ परब्रह्मच होईल व कोणताही शब्द उच्चारला तरी भगवंत नामस्मरण होत राहील.

ही गोष्ट तत्वतः पटू शकणारी आहे. परंतु दैनंदिन व्यवहारात आचरणे महाकठीण ! अनेक जन्मांच्या संस्कारांमुळे, वैषयिक वासनांमुळे व भ्रममूलक अज्ञानामुळे प्रत्येक शब्द ईश्वरवाचक आहे हे अनुभवाला येणे दुरापास्त ! परंतु अनध्यस्तरूप भगवंत वाचक नामे आपले लक्ष्य असो नसो ती उच्चारल्यावर नामस्मरणाचे फल प्राप्त होते.

***अवघीयाते नामस्मरण । हे बोलणे नाही अकारण***
***परी वासना महादारूण । ते घेई पूर्ण लौकिक शब्दार्थ ॥***

म्हणूनच जगातील इतर सर्व शब्द हे अध्यस्त नामे असून अनध्यस्तरूप भगवंत नामाचे महात्म्य अनन्यसाधारण आहे.

***विवर्त तो द्विविध । अध्यस्त अनध्यस्त ग***
***अध्यस्त विश्व सारे । असमत्कान्त (श्रीकृष्ण) तो अनध्यस्त ग ।***

भगवंताचे नाम व रूप यात अन्वय आहे हे सिद्ध झाले की साहजिकच नामाबद्दलची उपेक्षाबुद्धी नाहीशी होते व भगवंत नामाचे प्रेम वृद्धिंगत होते. परब्रह्माच्या नामरूपात्मक स्वरूपावर प्रेम जडणे ह्यालाच हरिभक्ती म्हणतात. ह्या हरिभक्तीत नामधारक अखंड नामस्मरणात तल्लीन असतो.

***गोविंद गोविंद नाम गाता । गोविंदमय वृत्ती ग।***
***क्षण एक क्षण एक स्थिर होता । गोविंद सर्वाभूती ग ॥***

ही नामस्मरणाने व्यक्त होणारी भक्ती त्रिगुणरहित सच्चिदानंद स्वरूप असते. ज्याप्रमाणे सौभाग्यवती स्त्रीने आपले सौभाग्य आरशात पाहिले तर त्या सौभाग्यदर्शनाने सुख वाढते त्याप्रमाणे आपले आत्मरूप सच्चिदानंदस्वरूप आहे, असे अनुभवाला आल्यावर त्यातील आनंद वाढतो. त्यामुळेच भगवन्नास्मरण हे साधन असून साध्यही आहे.

**सौ. अलका सं. इदापवार**
'मंगेश' जे ३, लक्ष्मीनगर, नागपूर.

# तेजो भास्कर

संतकुळीचा हा राणा
जणू तेजाचा भास्कर ।
ज्ञानकिरणे फाकिता
प्रकाशले की भूवर ॥१॥

नाही चर्मचक्षू जरी
प्रज्ञा अगाध अंतरी ।
झाली साहित्य निर्मिती
त्याची वर्णवेना थोरी ॥२॥

संत गुलाब रूपाने
भक्ती जणू साकारली ।
नित्य हृदयात ज्याच्या
कृष्णमूर्ती स्थिरावली ॥३॥

कृष्णमाझा प्राणसखा
मी हो असे त्याची कांता
ऐसा भाव माधुर्याचा
जपतसे मनी सदा ॥४॥

ज्ञानेश्वर माऊलीचा
ध्यास घेतला जयाने ।
'ज्ञानेश्वर कन्यका' मी
सांगतसे अभिमाने ॥५॥

ज्ञानमाऊलीच्या मुखे
मंत्र जयासी लाभला ।
नाम अखंडीत घेता
स्वये नामरूप झाला ॥६॥

अनध्यस्त विवर्ताचा
दिला मौलिक विचार ।
नामसाधनाची निष्ठा
त्याची कशास ना सर ॥७॥

ज्ञानयोगी भक्त ऐसा
अलौकीक ते जीवन ।
ऐशा साक्षात्कारी संता
भावभक्तीने वंदन ॥८॥

**सौ. प्रभा टेंभेकर**

# प्रज्ञाचक्षु श्रीगुलाबराव महाराज यांचे मराठी सारस्वतातील योगदान

डॉ. अशोक कामत

*एम.ए., पीएच.डी (मराठी), पीएच.डी. (हिंदी). १९८५ पासून प्रमुख - नामदेव अध्यासन पुणे विद्यापीठ. हिन्दी, मराठी संत साहित्याचे अध्ययन, अध्यापन, अनुबंध, लेखन, संशोधन व शोध कार्यासाठी मार्गदर्शन. सामाजिक प्रबोधन व व्याख्यान. एम.फिल्., पीएच.डी. पदवीसाठी २८ शोध प्रबंध पूर्ण. ७५ संशोधन प्रकल्प संत साहित्याच्या अभ्यासकांकडून करवून घेतले. संशोधन प्रकल्प कार्यरत. विविध पुरस्कार प्राप्त.*

## आरंभिक

विसाव्या शतकाच्या आरंभी ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या प्रभावामुळे जेव्हा पाश्चात्य ज्ञानविज्ञान, तत्त्वज्ञान आणि जीवनसरणी भारतीयांना मोहीत करू लागली, तेव्हा श्रीगुलाबराव महाराजांसारखे प्रज्ञाचक्षु संत उदयाला आले. इंग्रज गुलामगिरीमुळे पराभूत होत असलेली आपली सनातन धार्मिक अस्मिता, त्यांनी पुन्हा एकदा विजिगीषु केली. भारतीय संस्कृती आणि येथील प्राचीन ज्ञानभाण्डाराची महती त्यांनी पुन्हा एकदा लोकभाषेतून स्पष्ट केली.

त्यांची अद्‌भुत जीवनयात्रा आणि विलक्षण ज्ञानसाधना त्यांच्या विराट ग्रंथरचनांच्या रूपाने आजही आपल्यापुढे आहे. नव्या अभ्यासकांना ती प्रेरक ठरू शकेल.

विसाव्या शतकात होऊन गेलेल्या या महामानवाचे, मराठी आधुनिक संतांचे साहित्यसंस्कृतीस लाभलेले योगदान अमोल आहे. त्याची ही साक्षेपी ओळख....

## काही अद्‌भुत घटनाप्रसंग

सहा जुलै अठराशे एक्क्याऐंशी या दिवशी विदर्भातील अमरावती नजीकच्या लोणीटाकळी या लहानशा गावी एका सामान्य कष्टकरी-शेतकरी परिवारात श्रीगुलाबराव महाराजांनी जन्म घेतला. पूर्ण नाव श्री. गुलाब गोदुजी मोहोड. आई अलोकाबाई. वडील गोदुजी माघानला शेतीच्या कामात व्यग्र असत.

नवव्या महिन्यात डोळे आल्याचे निमित्त झाले. गुलाबला अंधत्व आले. कशीबशी तीन वर्षे गेली. अलोकाबाईंचे अचानक निधन झाले. गुलाब आजोळी राहू लागला. त्याच्या ठिकाणी दैवी गुणसंपदा असल्याचा हरघडी प्रत्यय येऊ लागला. लोक काही प्रश्न पुढे करीत.गुलाब चटकन उत्तर देऊन जाई. प्रश्न सुटून जायचे. कधी गुलाब काही भाकीत करी. कुणाला काही जागवून जाई. लगेच प्रत्यय यायचा. जणू त्याच्यात दैवी शक्तीच होती.

गुलाब मात्र लोकांकडून ग्रंथ वाचून घेण्यात आनंद मानीत असे. नित्य नवे ज्ञान संपादन करणे, प्राचीन पंडितांची अध्ययननिष्ठा ध्यानी घेणे, हाच त्याचा ध्यास असे. लौकिक व्यवहारात तो असायचा पण अलौकिकाशी तो समरस होऊन वावरायचा. १८९६ साली त्यांचा विवाह झाला. पुढल्याच वर्षी पितृवियोगाला सामोरे जावे लागले. १९०० सालीच त्याने आपल्या बालसवंगड्यांना अनुग्रह दिला आणि जवळपासच्या गावातून लोकोद्धारासाठी प्रवास केला. १९०१ साली त्यांना श्रीज्ञानदेवांनी अनुग्रह दिला. १९०२ साली ते पंढरपूरला आले. १९०३ मध्ये देऊरवाडा येथे त्यांच्या कात्यायनी व्रतास आरंभ झाला. १९०४ साली त्यांना पूर्वजन्माचे स्मरण झाले. आर्वी येथील महात्मे दामोदर आपाजी यांची भेट घडली. पुढे ज्ञानेश्वरीच्या निरुपणास सुरुवात केली. अनेक विषयांवरील ग्रंथरचना सुरू झाली. १९०५ मध्ये त्यांनी भगवान श्रीकृष्णाशी विवाह केला. मग श्रीकृष्णप्रतिमा आणि ज्ञानदेव पादुका यांची नित्यपूजा सुरू झाली. याच वर्षी त्यांचा मुलगा अनंत जन्मला. १९०७ साली त्यांनी नागपूर-कलकत्ता प्रवास केले. अनेक सभा बैठकांतून वैचारिक संवाद केला. ग्वाल्हेरचे श्रीमंत जठार, आर्वीचे दामोदर आपाजी, ह.भ.प.ल.रा.पांगारकर, लोकनायक बापूजी अणे, कलकत्त्याचे प्रा. प्रियनाथ मुखर्जी, नागपूरचे धर्मवीर मुंजे, साहित्यसम्राट न. चिं. केळकर, देवासचे महाराज, संगीतकार पं. भातखंडे इत्यादींशी त्यांच्या सविस्तर भेटींचा योग आला.

अंधत्वामुळे महाराजांच्या जीवितकार्यावर कोणताच विपरीत परिणाम झाला नाही. त्यांनी अल्पकाळात इतका सखोल व्यासंग कसा केला, इतकी प्रचंड ग्रंथरचना कशी केली, याबद्दल विस्मय वाटतो. ईश्वरी कृपेने काय होऊ शकते याची जाणीव होऊन आपण त्यांच्यापुढे विनीत होऊन जातो.

वयाच्या एकोणिसाव्या वर्षी चंद्रपूर येथील नारायण पैकाजी पंडित आपले घरदार - गणगोत, शिक्षण सारे सोडून महाराजांच्या सेवेसाठी आले. १९०५ पासून अखेरच्या क्षणापर्यंत त्यांनी महाराजांची सर्व प्रकारे मनोभावे सेवा केली. लेखनिक म्हणून सेवा श्री. हरिभाऊ केवले, गंगाधर मुळे इत्यादींनी निरपेक्षपणे केली. महाराज शेवटच्या काळात एकदा म्हणून गेले : 'मी पंडिताला वश झालो आहे... पंडित, आजवर मी तुला काही दिलं नाही. माझे ग्रंथ वाच. तुला ते समजतील.'

... आणि पंडितांचं जीवनच उजळून गेलं. त्यांना महाराजांचे ग्रंथ तर समजलेच पण त्यांनी महाराजांची वाङ्‌मयीन श्रीमूर्ती साकार केली. म्हणूनच आज आपल्यापुढे श्रीगुलाबराव महाराज आहेत. आपण त्यांना अनुभवू शकतो.

## अल्पायुष्य : विलक्षण कार्य

१९१५ साली पुण्याला आल्या वेळी देह ठेवला. पण त्यांची साधी समाधी वा स्मृतिमंदिरही पुण्यात नाही. आपल्या मागे असे काही करू नये अशी त्यांची आज्ञाच होती. शिष्यपरिवाराला ती प्रमाण आहे.

अवघ्या चौतीस वर्षांचे त्यांचे मानवी जीवन. अंधत्व आलेले. अवतीभवती दैन्यदारिद्र्य, अज्ञान, अंधश्रद्धा, आलस्य आणि अकर्मण्यता यांचा अंधार होताच. पण महाराज अलौकिक बुद्धिमत्तेमुळे प्रज्ञाचक्षु होते. अद्‌भुत ईश्वरी शक्तीमुळे ते सूक्ष्मातिसूक्ष्म वेदान्तसिद्धान्त सुलभ स्वरूपात सांगू शकले. प्राचीन, पौर्वात्य ज्ञानाबरोबरच अर्वाचीन पाश्चात्य ज्ञानविज्ञानही त्यांना चांगल्या रीतीने ज्ञात झाले होते. डार्विनने मांडलेला उत्क्रांतिवाद

असो, स्पेन्सरने कथन केलेला अज्ञेयवाद असो, अणुवाद वा जडवाद असो की, मानसशास्त्रीय अधुनातन प्रमेये असोत, महाराज हे नवे ज्ञानवैभवही पाहू शकले होते. पण त्याने ते दिपून गेले नव्हते. भारतीय दर्शन-तत्त्वज्ञानाची सर्वंकषता आणि श्रेष्ठत्व त्यांना ठाऊक होते. आणि तुलनात्मक अध्ययनातून ते पुरेपूर पटवून देण्याची अपार शक्ती त्यांच्यापाशी होती. म्हणूनच अवघ्या दोन दशकात त्यांनी अफाट वाटावी अशी ग्रंथनिर्मिती केली. त्यांच्याइतके विद्वत्ताप्रचुर, वैविध्यसंपन्न तात्त्विक लेखन क्वचितच कुण्या मराठी सारस्वताने केले असेल !

## विराट ग्रंथप्रकाशन

महाराजांची आज उपलब्ध आणि प्रकाशित ग्रंथसंपदा एकशे सत्तावीस आहे. तेवीस हजारांवर ओव्या, अभंगपदे मिळून चारहजार पाचशे, गीते बाराशे पन्नास, श्लोक एकहजार आणि आर्या, दोहे, चौपाई, सेवेया, चूर्णिका अशी विविध वृत्तातील रचनाही विपूल मिळते. त्यांनी स्वतः नवीन केलेली वृत्ते एकशे बावीस असून त्यांना चाल, राग, ताल आहे.

हे विशाल वाङ्मयधन मराठी बरोबर संस्कृतात आहे. ब्रजभाषा हिंदीतही आहे. काही वऱ्हाडी बोलीत दिसते.

अंतर्विज्ञानसंहिता, ईश्वरदर्शन, समसूत्री, पुराणमीमांसा इत्यादी नऊ सूत्रग्रंथ; भक्तिसूत्र भाष्य, आमंत्रणविलास, ब्रह्मसूत्र व्याख्या, भगवद्गीतासंगति, ऐश्वर्यदीपिका, ऋग्वेदटिप्पणी, योगवासिष्ठ तत्त्व इत्यादी पंचवीस भाष्यग्रंथ; सुखवरसुधा, आगमदीपिका, शांतिसुधारक वेदान्तनिरूपण, षड्दर्शनलेखनसंग्रह असे अकरा शास्त्रग्रंथ; भक्तिपदतीर्थामृत, भगवद्भक्ति सौरभ, भक्तितत्त्वविवेक, गोविंदानंदसुधासारखे दहा भक्तिग्रंथ; योगप्रभाव, ध्यानयोगदिवाकर, हिरण्ययोगादि आठ योग ग्रंथ; स्वमतनिर्णय, चित्तोपदेश, त्रिकांडसार, प्रसाद कल्लोळ इत्यादी नऊ प्रकरण ग्रंथ; साधुबोध, मणिमंजुषा, वृत्तिक्षीरसागर, प्रश्नोत्तरे असे आठ संवादग्रंथ; बौद्धनिबंध, सिद्धिसार, गुरुचरणकौमुदी इत्यादी दहा निबंधसंग्रह; तीस चरित्रपर आख्याने, स्तोत्रांचे तीन आणि लोकगीतांचे चार संग्रह, एकशेसतरा पत्रांचे पाच संग्रह, तीन आयुर्वेदविषयक ग्रंथ, दोन संगीताचे ग्रंथ, असे एकूण वीस 'यष्टी' अर्थात खंडात महाराजांनी **'सूक्ति रत्नावली'** साकारलेली आहे.

महाराजांनी हेतूपूर्वक केलेल्या उदात्तमंगल ज्ञानयज्ञातून सनातन वैदिक (हिंदू) धर्माचा पाया ब्रिटिश काळात पुन्हा एकदा मजबूत झाला. तो ढासळावा यासाठी अनेक प्रकारचे उद्योग त्या काळात परधर्मीय पाद्री वा मिशनरी करीत होते. इंग्रज शासन अल्पसंख्यकांना हाताशी धरून नाना प्रकारे सामाजिक असंतोष वाढवीत होते. धर्मसुधारणेच्या गोंडस नावाखाली काही सुधारक म्हणविणारे लोकपुरुष अज्ञ वृत्तीने सत्यसंशोधन करीत बेदिली माजवीत होते. एखादा चारित्र्यसंपन्न लोकमान्य भारतीयांमध्ये परकियांविरुद्ध स्वराज्यक्रांती करण्यासाठी असंतोष निर्माण करीत, तुरुंगवासात राहून **'गीतारहस्य'** उलगडून दाखवू शकला. पण तो श्रीगुलाबराव महाराज यांच्या निर्वाणानंतर. आद्यशंकराचार्य आणि ज्ञानेश्वर महाराज यांचे सहजी स्मरण व्हावे, असे श्रीमहाराजांचे कार्यकर्तृत्व आहे.

## [illegible]

समन्वय हा संतांचा ठळक विशेष असतो. विद्वान मंडळींच्या तर्कपाण्डित्यापेक्षा प्रेमाने आणि समजुतीने सांगणे संतांनी महत्त्वाचे मानले. गुलाबराव महाराजांनी वेदान्तसिद्धान्तांची भक्कम बैठक ठेवली पण युक्तिसंपन्न विचारांचा तार्किक पद्धतीने खंडनमंडणात्मक उहापोह करण्यावर भर दिला नाही. अवैदिक मतांविरोधी न लिहिता वैदिक दर्शने सुस्पष्ट करण्यासाठी त्यांनी विलक्षण अनुभवसंपन्नता प्रकट केली. त्यांचे प्रतिपादन तर्काला हरविणारे, भक्तिपंथाला जागविणारे आणि अखेरीस ईश्वरावतारापुढे आपल्याला नतमस्तक व्हायला लावणारे असते.

श्रीमहाराजांच्या वाङ्मयसंपदेमध्ये श्रुतिस्मृती, रामायण महाभारतादी इतिहास, त्याच्याशी निगडित नाना पुराणग्रंथ, त्याचबरोबर संतवचनामृत, पंडितांची सुभाषिते, विविध युक्तिवाद आणि या सर्वांचा साधलेला समन्वय सजीव करण्यासाठी प्रभावी ठरणारा साक्षात्कारी स्वानुभवही आहे.

श्रीज्ञानदेवांच्या भावार्थदीपिकेमध्ये आलेला 'भाष्यकाराते वाट पुसतु' हा सूचक उल्लेख परंपरेकडे पाठ फिरविणाऱ्या बहुसंख्य अभ्यासकांच्या मतमतांतराचा विषय होतो. गुलाबराव महाराजांनी बहुधा हे ध्यानी घेऊन म्हटले आहे : 'ज्ञानेश्वर माऊलीने अनुग्रह दिल्याप्रमाणेच अनुभव घेऊन उगीच धर्माधर्ममध्ये द्वेष वाढू नये, म्हणून शांकरभाष्याचे (अद्वैत) ज्ञान व इतर मतांच्या भावना यांची योजना मात्र मी केली आहे.'

इतके निवेदन करूनच महाराज थांबले नाहीत. कोणकोणत्या आचार्यांपासून कोणकोणती विचारसंपदा त्यांनी ग्रहण केली, त्याची सविस्तर नोंद त्यांनी **'संप्रदाय कुसुममधु'** नामक स्वतंत्र ग्रंथ रचून करून ठेवलेली आहे.

## सावधपणे नवे हवे

श्रीमहाराज केवळ जुने ते सोने म्हणणारे वा भारतीय संस्कृतीचे एकांतिक अभिमानी नव्हते. त्यांनी जसा पाश्चात्त्य तत्त्वज्ञान आणि सिद्धान्ताचा अभ्यास केला तसा जागतिक जनव्यवहाराचा, आधुनिक लोकशाही समाजवादाचाही बारकाईने विचार केला होता असे म्हणता येते.

महाराज म्हणत : 'बळाचे काम बहुमताने आणि बुद्धीचे काम एकमतानेच होत असते.' त्यांना गुलामीविषयी चीडच होती मग ती परकीयांची असो की स्वकीयांची - गुलामगिरी समर्थनीय नव्हे. पण वर्णव्यवस्था म्हणजे गुलामगिरी असे त्यांना वाटले नाही. ते सांगत – 'हिंदुस्थानात जी वर्णव्यवस्था आहे ती गुलामगिरीसारखी भासते. पण ती सद्गुण मिळविण्यासाठी आहे. पोटासाठी नाही.' हे एखाद्याला समजून घेणे अवघड जावे इतका त्या काळात काही सुधारकांनी तथाकथित गुलामगिरीबद्दल गदारोळ उठविला होता. मौज म्हणजे साऱ्या देशाला पराधीन करून आपल्या देशाचा स्वार्थ साधण्यासाठी मूठभर इंग्रज इथं धूर्तपणानं प्रशासन करीत एत्तद्देशियांमध्ये बेदिली कशी वाढेल यासाठी खटाटोप करीत होते. आर्थिक शोषणाबरोबरच ते सामाजिक विषमता, धार्मिक कलह, सरंजामदारी यांना खतपाणी घालीत भारतीय समाजाचे सांस्कृतिक ऐक्य कसे कमकुवत होईल याकडे डोळे लावून होते. गुलाबराव महाराजांसारखे साक्षात्कारी संस्कृतिपुरुष त्यांना आपल्या हाताशी धरता आले नाही. महाराज म्हणाले, 'समाज कितीही सुधारणेच्या शिखरावर गेला तरी गुलामगिरी राहणारच असे माझे स्पष्ट मत आहे.' याला ते असे कारणही देत : 'मला विकतची किंवा पैशाची गुलामगिरी पसंत नाही पण गुणांची गुलामगिरी पसंत आहे.' त्यांनी लोकराहाटीही अशी परखडपणे सांगून टाकली होती : 'वय - विद्या - शील - पैसा - व्यसन आणि कूळ

आदीकरून समान असलेल्यांमध्येच बहुमताचा न्याय शोभतो. यातून जर एखाद्याला जास्त असेल तर त्या त्या संबंधात त्याचे एकट्याचे मत प्रमाण धरले जाते.'

– आज तर हरघडी आपण हे अनुभवीत आहोत. लोकशाही राज्यपद्धती कितीही चांगली असली तरी लोकशाहीत दुर्जन दुष्ट अनीतिमान शक्तींचे संघटनही प्रभावी ठरते. म्हणून लोकशाहीच्या सीमामर्यादांवर डोलस धर्मश्रद्धा, नीति-भक्ती हाच उतारा ठरतो, हे शतकापूर्वीच महाराजांनी ठासून सांगितले. इथे त्यांचा द्रष्टेपणा आणि महात्मता पाहता येते.

समतेचा उद्घोष करणारे साम्यवादी आज उघडे पडले आहेत. समाजवादाच्या घोषणा देत भाषणबाजी करणारे मानवतावादी सत्ता मिळाली की काय काय करतात ते स्पष्ट झाले आहे. व्यक्तिस्वातंत्र्याचा टेंभा मिरविणारे आणि लोकशाहीची शेखी सांगणारेच अतिरेकी चळवळींना कसे जोपासतात आणि आपापसात स्पर्धा करीत हिंसक होतात, अनेक रीतीने पतनाकडे झुकत राहतात, हे अलिकडील इतिहास दाखवून देतो आहे. या दृष्टीने आपण एकूण जागतिक राजकारण आणि पोषाखी विचारवंतांचे समाजकारण यांचा पुनर्विचार करायला हवा. असा केला तर श्रीगुलाबराव महाराजांसारखे महापुरुष भारतीय सामाजिक विचारांची कास धरून मानवी मनाचा आणि गुणवत्तेचा विकास साधण्यासाठी काय आणि कसे सांगत होते, त्याचे महत्त्व कळू शकेल. तसे ते कळले तरच आपल्या विचारात, आचारात आणि त्यासाठी शिक्षणात आवश्यक तो बदल होईल.

## तत्त्वचिंतनाचे वेगळेपण

श्रीगुलाबराव महाराजांचे भक्तिदर्शन मधुराद्वैती आहे. आद्यशंकराचार्यांचे अद्वैत प्रतिपादन आणि संतभक्तांनी स्वानुभवाने व्यक्त केलेली परमप्रेमरुपिणी पराभक्ति यांचा सुमधुर संगम त्यांच्या भक्तिदर्शनात साधण्यात आला आहे.

श्रीमहाराजांच्या मनात भगवान श्रीकृष्णाविषयी बालपणापासूनच माधुर्यभक्ती होती. ते स्वतःला श्रीकृष्णपत्नी आणि श्रीज्ञानेश्वर महाराजांची कन्या मानीत. गळ्यात मंगळसूत्र परिधान करीत. कपाळाला कुंकू लावीत. वेणी हे सौभाग्यचिन्ह म्हणून घालीत. महाराजांनी आपली गुरुपरंपरा नाथसांप्रदायिक सांगितली आहे. आदिनाथ शंकर भगवान - गुरु मत्स्येंद्रनाथ - गुरु गोरक्षनाथ - गुरु गहिनीनाथ - गुरु निवृत्तिनाथ - गुरु ज्ञानेश्वर महाराज अशी ही परंपरा आहे. आपली भक्ती ज्ञानदेव नामदेवादींप्रमाणे वारकरी पंथाचीच शाखा असून आपल्या अनुयायांनी सद्गुरुस्वरूप शिवाची पार्थिव पूजा करावी. उपास्यदेवता म्हणून भगवान श्रीकृष्णाची उपासना करावी. प्रपंच सोडून परमार्थ करू नये. गृहस्थाश्रम धर्माचे पालन चांगल्या रीतीने करावे अशी महाराजांची सांगी असे.

कात्यायनी व्रत, श्रीकृष्णजन्मोत्सव, शिवरात्री हे श्रीगुलाबराव महाराजांच्या सांप्रदायिकांचे मोठे उत्सव आहेत. महाराजांच्या नंतर श्रीबाबाजी महाराज पंडित यांनी १९६४ पर्यंत त्यांची सांप्रदायिक ध्वजा फडकती ठेवली. पुढे सांप्रदायिक मंडळ संप्रदायाची धुरा सांभाळीत आहे.

महाराजांचे स्वतःचे ग्रंथसंग्रहालय विशाल आहे. त्यांची विपुल ग्रंथसंपदा पुनःपुन्हा जनसमाजासमोर ठेवणे, त्यांनी दाखवून दिलेला समन्वित भक्तिमार्ग प्रशस्त करणे हेच त्यांचे अनुयायी आपले ध्येय समजतात.

## समारोप

श्रीगुलाबराव महाराजांचा काळ, त्यांची जीवनयात्रा, त्यांचे जीवनदर्शन आणि त्यांचे अक्षर वाङ्मय पाहिले की आपण स्तिमित होऊन जातो. स्वातंत्र्यपूर्व काळात ज्यांनी देशाची संस्कृती आणि अस्मिता यांचे रक्षण केले त्यापैकी एक श्रीमहाराज होत. त्यांच्याविषयींचे चमत्कार अद्भुत आहेत. पण तोच आपल्या विचारप्रतिपादनाचा विषय होऊ नये. त्यांची विपुल साहित्य संपदा हा नव्या पिढीच्या चिंतनमननाचा विषय व्हायला हवा. आज जागतिकीकरणाचे जोरदार वारे वाहात आहेत. स्वदेशी, स्वभाषा, स्वसमाज, स्वसंस्कृती पुन्हा एकदा संकटात आहे. अशा काळात आपला लढा धूर्त परकीयांबरोबरच आततायी आणि करंट्या वृत्तीच्या स्वार्थांध स्वकीयांशीदेखील आहे. तो यशस्वी करण्यासाठी महाराजांची समन्वित विचारधारा खचितच उपयोगी ठरेल.

**प्रा. डॉ. अशोक कामत**
प्राध्यापक व प्रमुख संत नामदेव अध्यासन, संत अध्यायन व संशोधन केंद्र,
पुणे विद्यापीठ, पुणे.



# धर्म समन्वयाची व्यापक भूमिका

डॉ. कृ. मा. घटाटे

एम.ए., 'श्रीगुलाबराव महाराजांची विचार संपदा' या विषयावर पीएच.डी. श्री. बाबाजी महाराज पंडित यांचा अनेक वर्षे सहवास व सेवेचा लाभ. धर्मसमन्वयाच्या विचारावर अखंड लेखन व प्रबोधन.

प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज जन्मांध होते. त्यांचे आयुष्य केवळ ३४ वर्षाचे १८८१ ते १९१५ पर्यंत. त्यांनी संस्कृत-मराठी-हिंदी व्रजभाषांतून १३० च्या वर ग्रंथरचना केली आणि त्यातून भक्ति-ज्ञानाबरोबर आर्यांची विश्वव्यापकता, सर्व धर्म व संप्रदायांचा समन्वय आणि योगशास्त्र, वेद, पुराणे वगैरे अनेक सांस्कृतिक विषयांवर मौलिक लेखन करून त्या त्या क्षेत्रात नवे नवे योगदान देऊन, स्वतःची पदमुद्रा उमटविली आहे. हे सारे करताना त्यांनी धर्म-समन्वयाचे नऊ प्रकार सांगितले आहेत.

हिंदु धर्म जगातील कोणत्याही धर्माला परका समजत नाही. सर्व धर्म एका सनातन वैदिक धर्माच्या शाखोपशाखा आहेत. काल, परिस्थिती व अधिकारानुसार सर्वांचे आचारधर्म भिन्न भिन्न असले तरी सर्व धर्मातील मूळ भूमिका एकच आहे आणि ती म्हणजे 'नराचा नारायण करणे - जीवाने परमेश्वररूप होणे'. परंतु हे अंतिम ध्येय असले तरी अधिकार कमी-जास्त असल्यामुळे प्रत्येक समाजाचा, नव्हे प्रत्येक व्यक्तीचा धर्म वेगवेगळा असतो आणि तेच इष्ट आहे. जशी जशी मानवाची प्रगती होईल - स्वार्थाकडून दुसऱ्याच्या सुखाकडे व त्यातून पुढे परमार्थाकडे त्याची वाटचाल होईल तेव्हा त्याला उपासना, ज्ञान, योग, भक्ति यांचा उपदेश करून जगातील सर्व साधूसंतांनी व धर्मसंस्थापकांनी त्याला नराचा नारायण केले आहे. प्रवृत्ति धर्मापासून निवृत्ति धर्माकडे नेले आहे.

ही भूमिका कायम असल्यामुळे भारताने सर्व जगाला त्यांचा आचारधर्म कायम ठेवून योग-ज्ञान-भक्तीचा उपदेश केला. आक्रमण करून तलवारीच्या बळावर धर्म प्रसार केला नाही तर केवळ सद्विचार देऊन जगाला सुसंस्कारित करण्याचा प्रयत्न केला व आजही तोच प्रयत्न भारत करीत आहे. याबाबतीत संत गुलाबराव महाराजांचे विचार फार स्पष्ट आहेत.

***जयाची उपासना तेणे सांभाळावी ।***
***निषेध तो स्वभावी आणू नये ॥ (अभंग १०७९)***
***तेवी जैसी जैसी ज्याची उपासना ।***
***तैसीच ती जाणा वाढवावी ॥***
***तरीच ते संत उपदेश मूर्ति ।***
***ज्ञानेश्वरकीर्ति अगाधचि ॥ (अभंग ११०४)***

प्रत्येकाने स्वतःची उपासना अत्यंत निष्ठापूर्वक सांभाळावी आणि दुसऱ्याच्या उपासनेचा कधीही निषेध करू नये. (अभंग १०७९)

तसेच सत्पुरुषाने त्यांच्याजवळ येणाऱ्या व्यक्तीची जी उपासना असेल तीच वाढवावी आणि त्यातूनच पुढील आत्मोन्नतीचा मार्ग त्याला सांगावा. असे संतच खरे "उपदेशमूर्ति" होत. (अभंग ११०४)

यावरून दोन संकेत स्पष्ट होतात – (१) स्वतःच्या उपासनेवर दृढनिष्ठा ठेवून ती करीत राहणे "उपासनेला दृढ चालवावे" (रामदास स्वामी) आणि (२) दुसऱ्या व्यक्तीच्या उपासनेचा निषेध मनात देखील येऊ न देणे. या दोन संकेतातून परस्पर सामंजस्याची म्हणजे समन्वयाची भूमिका राहते आणि धर्मद्वेषाचे मूळच नष्ट होते.

स्वतःचे बाबतीत स्वधर्म पालनाचा आग्रह असावा
पण
दुसऱ्याने माझाच धर्म स्वीकारावा असा दुराग्रह नसावा.

असे असेल तर धर्मप्रसार/धर्मस्थापना/कृण्वन्तो विश्वमार्यम् हे कसे संभवते?

या शंकेचे निरसन असे की, ज्यांनी कोणती वैयक्तिक उपासना स्वीकारली नसेल किंवा ज्यांनी सर्व धर्मनियम सोडून दिले असतील, त्यांना त्यांच्या योग्यतेनुसार उपासना, संप्रदायनियम आणि ज्ञानविचार सांगणे आवश्यक आहे. त्यांना पटले तर ते स्वीकारतील आणि सद्धर्माचा प्रसार होईल. पण दुसऱ्या संप्रदायातील लोकांना मुद्दाम आपल्या धर्मात आणण्याचा प्रयत्न करणे हे मात्र बरोबर नाही. त्यांचा पारंपरिक सदाचार कायम ठेवून भक्ति-ज्ञानयोगाचा उपदेश करणे व त्यांना खालच्या पातळीवरून वरच्या पातळीवर आणणे म्हणजे सुसंस्कारसंपन्न करणे हेच "कृण्वंतो विश्वमार्यम्" होय. याचे स्पष्टीकरण संत गुलाबराव महाराजांच्या दोन श्लोकांतून चांगल्या रीतीने आले आहे.

***सत्त्ववृद्धिर्भवेद् येन अन्यगुणद्वयघातिनी ।***
***सहि धर्मो न चान्यः स्यादिति स्वमतनिर्णयः ॥७॥***
***स्वधर्मे परधर्मे वा यत् सत्वफलसाधकम् ।***
***तत् तद् अस्तु परं धर्म्य इति स्वमतनिर्णयः ॥९॥***

ज्या मार्गाने सत्वगुणाची वाढ होईल म्हणजे तमोगुणातून रजोगुणात व रजोगुणातून सत्वगुणात वाटचाल होईल तो धर्म होय. पण याच्या उलट होत असेल किंवा सत्वगुणाकडे प्रवृत्ति होत नसेल, सत्वगुण वाढत नसेल, तर मात्र तो अधर्म होय.

हा संकेत आपण स्वतःच्या धर्मासंबंधी पाळायला हवा. आपल्या धर्मोपासनेतून क्रोधादि तमोगुण आणि कामादि रजोगुण कमी कमी कसे होत जातील आणि सत्वगुण कसा वाढेल याकडेच लक्ष दिले पाहिजे. जर सत्वगुणाकडे वाटचाल नसेल तर त्या धर्माचरणाचा चित्तशुद्धीसाठी काही उपयोग नाही हे महत्त्वाचे आहे.

दुसऱ्या श्लोकात परधर्मासंबंधी महत्त्वाचा संकेत महाराज सांगतात. "स्वधर्मातील असो की परधर्मातील असो ज्याने सत्वगुण वाढेल तेच फक्त "परमधर्म्य" समजावे इतर नव्हे."

पण परधर्मातील सात्विक धर्म त्या त्या धर्मियांसाठी परमधर्म आहे आपल्यासाठी नव्हे हेही लक्षात ठेवले पाहिजे. निष्काम कर्माने चित्तशुद्धी होते- चित्तशुद्धीने मन एकाग्र होण्यास उपासनेत मदत होते, मन आत्मस्वरूपाचे ठिकाणी एकाग्र झाले की जगत्कारणाशी एकरूपता होते.

म्हणजेच शेवटी समाधी साधून ईश्वरप्राप्ती होते.

हा अनुभव व्यवहाराहून म्हणजे आचार धर्माहून वेगळा आहे. पापपुण्याच्या संकल्पनेपेक्षा उच्च दर्जाचा आहे. संतांनी, ऋषिमुनींनी आणि धर्मसंस्थापकांनी या अनुभवाच्या आधारानेच आपल्या भोवतालच्या समाजाला त्यांच्या अधिकारानुसार - त्या काळच्या परिस्थितीनुसार अनेक आचारधर्म आणि अनेक उपासना सांगितल्या. त्या इतक्या व्यक्तिसापेक्ष आहेत की परस्पर विरुद्ध देखील दिसतात. पण निवृत्तिधर्म मात्र सर्व धर्मात सारखाच आहे. हिंदु धर्मात कर्मकांड-उपासना कांड व ज्ञानकांड आहेत तर इस्लाममध्ये शरियत, तारिकत व हकीकत आहेत व दोन्ही धर्मात हे परमेश्वरानेच सांगितले असे मानतात.

परमेश्वराला विसरणे - हाच संसार. या मुसलमानी तत्त्वात व वेदान्तात काहीच फरक नाही.

हिंदूंचा योगी संन्यासी आणि मुसलमानांचा फकीर हे शरीराने भिन्न असले तरी मनाने एकच आहेत. याचप्रमाणे पार्शी, ख्रिश्चन वगैरे सर्व धर्मात तात्त्विक समता सहज दाखविता येते.

***संत दिसती वेगळाले । परी अंतरी असती मिळाले ॥***

## ऐतिहासिक समन्वय

सर्व जगात ३००० वर्षापूर्वी एकच आर्यधर्म होता. त्या वैदिक सनातन धर्माचेच पुरावे उत्खननातून आर्क्यालॉजीनुसार उपलब्ध होत आहेत व त्यावरून ''कृण्वन्तो विश्वमार्यम्'' आम्ही सर्व जगाला सुसंस्कृत करणारे आहोत हे वैदिक ऋषींचे वाक्य सार्थ झाले होते हे स्पष्ट आहे. त्यामुळे भारतातून आर्यसंस्कृती बाहेर पसरली किंवा आर्य बाहेरून भारतात आले, या दोन्ही कल्पनांना काही अर्थ राहत नाही. पूर्वीपासून सर्व जगात आर्य म्हणजे सुसंस्कृत समाज होता. वर्णाश्रमधर्म सर्वत्र होता पण संस्कारलोप झाला. आणि आर्यसंस्कृति संकोचित होत होत भारतापुरती मर्यादित राहिली.

***यदा यदा ही धर्मस्य ग्लानिर्भवति भारत***
***अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥***
***धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ गीता ॥***

या गीतावचनावरून आणि महाभारतातील शांति पर्वातील मोक्षधर्मात असा इतिहास आहे की पूर्वी नारायणापासून अपांतरतम ऋषी निर्माण झाले. त्यांना नारायणाने वर दिला की, तू अनंत कल्पनेपर्यंत माझे गुणानुवाद गात राहशील. तुला सगळे समजेल. तूच व्यास होशील. कलियुगात तू नाना देशात नाना कर्मांचा प्रवर्तक होशील व लोकांना तारण्याचा प्रयत्न करशील. (अलौव्या. पा. १७,१८).

याप्रमाणे अपांतरतम मुनींच्या निमित्ताने परमेश्वरच सर्व जगातील सर्व धर्मांचा प्रवर्तक असल्याने आणि आचार भिन्न असले तरी निवृत्तीधर्म आणि शेवटी परमेश्वर प्राप्ती ही सर्व धर्मात समान आहे व त्या त्या धर्मस्थापकांच्या रूपाने परमेश्वरच अवतार घेत असल्याने कोणाबद्दलही द्वेष करण्याचे कारण नाही. ही हिंदुधर्माची सामंजस्याची भूमिका आहे.

सत्वगुणाच्या वृद्धीचा प्रयत्न सर्व धर्मात सारखा असला तरी त्या पलीकडील आत्मस्थितीच्या प्राप्तीसाठी योगाचे नाना मार्ग आणि ज्ञानाच्या नाना प्रक्रिया हिंदु धर्मातच टिकून राहिल्या आहेत. म्हणून त्यांचा उपदेश पुनः पुनः जगाला देण्यात आर्यांना नेहमी कृतकृत्यता वाटली आहे. त्यामुळेच बौद्ध भिक्षू पूर्वेकडे गेले आणि बौद्ध धर्म व तत्त्वज्ञानाचा प्रसार झाला. भारतीय ज्ञानशाखा पश्चिमेकडे गेल्या. ख्रिश्चनधर्म बौद्ध धर्माचेच रूपांतर आहे. कालचक्रानुसार सुसंस्कृत समाज पतित होत असतो तर असंस्कृत समाज सुसंस्कृत होत असतो. म्हणून मानवाला पुनः पुनः सुसंस्कृत करण्यासाठी आपल्या घरातील बालकापासून तर तद्वत जगातील कानाकोपऱ्यातील दूरदूरच्या मानवापर्यंत सर्वांनाच संस्कार देण्याचा अथक प्रयत्न प्राचीन काळापासून आजपर्यंत आर्यांनी सतत केले आहेत. हेच खरे ''कृण्वन्तो विश्वमार्यम्'' होय. संत गुलाबराव महाराज म्हणतात –

''सुसंस्काराचे दान देणे हेच खरे शिक्षण'' (उलट पाश्चात्य संस्कृतीत ज्ञानाची विक्री अभिप्रेत आहे.)

वरील सर्वांचे थोडक्यात सार महाराजांनी एका प्रश्नाच्या उत्तरात दिले आहे.

प्रश्न : ''मुसलमान ख्रिश्चनांनी देशच्या देश बाटविले असतानाही आर्यधर्म का टिकला?

उत्तर : १) हे सर्व धर्म आपल्या आर्यधर्माचीच अधिकारानुसार रूपे आहेत हे आर्यांना ठाऊक आहे.

२) इतर धर्मात जे नाही, ते सर्व आर्यधर्मात आहे.

३) इतर धर्मात ''आहे'' ते सर्व आर्यधर्मात आहे.

४) आर्यधर्मात जे ''नाही'' ते कोठेच नाही. हे आर्यांच्या सहवासामुळे इतर धर्मियांनाही हे कळून येऊ लागले आहे.

५) इतर धर्मियांनी आर्यधर्म मोडण्याची खटपट केली पण आर्यांनी इतर धर्म सोडण्याची खटपट केली नाही.

अशा आर्यांच्या मतभेद सहिष्णुत्वामुळे आर्यांचा नायनाट झाला नाही.''

शेवटी महाराज म्हणतात –

६) ''दुसरीकडे कितीही जड सुधारणा झाली तरी तिचा जेव्हा कंटाळा येईल तेव्हा सर्वांना शांती आर्यावर्तीच मिळेल व याचमुळे आर्यदेश टिकला आहे आणि टिकणार आहे.''

महाराजांनी जगातील सर्व उपासना आणी तत्त्वज्ञाने आर्यधर्माच्या एकेका अंशावर आधारलेली आहेत हे विस्ताराने दाखवून दिले आहे. फडा, केरसुणी, नदी, डोंगर, गायबैल, वृक्ष, सर्प यांच्या पूजा, पूर्वजांच्या पूजा, अनेक निसर्ग देवतांच्या पूजा, द्वैतमार्ग आणि शेवटी परमेश्वराशी होणाऱ्या ऐक्यापर्यंतच्या निरनिराळ्या उपासना, योगाच्या प्रक्रिया व शेवटी तत्त्वज्ञान सांगणारे असंख्य धर्म जगात आहेत. त्या सर्वांचा समावेश सनातन अशा आर्यधर्मात होतो. यावरून आर्यधर्म किती व्यापक आणि सर्व समावेशक आहे याची कल्पना येऊ शकते.

संत गुलाबराव महाराजांनी एक चांगले उदाहरण दिले आहे. ते म्हणतात –

पृथ्वी एकच आहे. त्यावर प्रत्येक जण आपापले घर उभारतो तसेच सर्वांचा आधार असलेला धर्म एकच आहे. पण प्रत्येकाला अधिकारानुसार निरनिराळे मार्ग ईश्वराने संत महात्म्यांच्या मुखातून सांगितले आहेत.

सर्व प्रजा मूळ धर्मासहितच परमेश्वराने उत्पन्न केली.

''सहयज्ञा प्रजा सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः'' गीता. म्हणून अधिकारानुसार कर्ममार्ग आणि उपासना वेगवेगळ्या असल्या तरी सर्व धर्मांचा आधार असलेले ज्ञान व भक्ति हे सर्वांचेच प्राप्तव्य एकच आहे. म्हणून स्वतःचे कर्म व उपासना न सोडता ज्ञानभक्ती मिळवून घेणे सर्वांना

योग्य आहे. याप्रमाणे आर्य धर्म इतरांचा द्वेष न करता त्यांची संगती लावतो, त्यांच्या पायऱ्या कल्पितो आणि समन्वय करतो यातच आर्य धर्माची व्यापकता व मोठेपणा सामावला आहे. या दृष्टीनेच महाराजांनी केलेली समन्वयाची व्याख्या अभ्यास करण्याजोगी आहे.

***एकाधिकरणक, भिन्नवृत्तित्वे सति,***
***संप्रदायविच्छेद - रहितत्वे सति च***
***पूर्वानेक - फलोपष्टभानन्तरम्***
***एक फलजनकत्वम् समन्वयलक्षणम् ॥***

या लक्षणानुसार स्वतःचा संप्रदाय निष्ठेने पालन करणे, इतरांचा द्वेष न करता "सर्वदेवनमस्कारः केशवं प्रति गच्छति" सर्व धर्म जीवाला ईश्वराकडेच नेतात हे समजून सर्व धर्माचा सन्मान राखणे महत्त्वाचे आहे.

स्वतःचा धर्म सोडून दुसऱ्यांचा धर्म स्वीकारण्याने श्रद्धाभंग होतो आणि त्यामुळे आत्यंतिक पतन होते म्हणून आचारधर्म कायम ठेवून तत्त्वज्ञान आणि भक्ति यांचा मात्र कोठूनही स्वीकार करावा आणि प्रसारही करावा म्हणजे सर्व मानवांना सुसंस्कारित बनवावे असा श्री संत गुलाबराव महाराजांचा समन्वय विचार आहे. यासाठी त्यांनी वेद-पुराणे-रामायण-महाभारतादी इतिहास आणि संत वचने यांचा आधार घेऊन युक्तिवादपूर्वक विस्ताराने लिहिले आहे. त्या सर्व विचारांचा मुळातून अभ्यास करणे इष्ट आहे. महाराजांच्या समन्वयविचारासंबंधी रा.स्व.संघाचे पू. गुरुजी म्हणतात—

"हा समन्वयविचार म्हणजे देशातील सामाजिक बंधुभावाला संत गुलाबराव महाराजांनी दिलेले तात्त्विक अधिष्ठान आहे. या समन्वय विचाराचे फार दूरगामी परिणाम होण्याजोगे आहेत. मुसलमान, ख्रिश्चन, पारशी, बौद्ध वगैरे सर्वांची प्रमुख तत्त्वे, त्यांच्यापेक्षा ऐतिहासिक दृष्टीने प्राचीन असलेल्या हिंदु संस्कृतीत म्हणजे पर्यायाने वैदिक आर्य संस्कृतीत कशी सापडतात, याचे महाराजांनी विवेचन केले. त्यांनी दाखविलेली दिशा महत्त्वपूर्ण आहे. त्यानुसार प्रबोधन झाले तर केवळ भारतीय समाजच एक होतील असे नसून; जगातील सर्व धर्मांचे समाज परस्पर सामंजस्याने राहू शकतील इतका महाराजांचा समन्वय विचार प्रभावी आहे."

ही संत गुलाबमहाराजांच्या समन्वयसूत्रांची पू. गुरुजींनी दाखवून दिलेली सामाजिक व्याप्ती आहे. आज जगात जो हिंसाचार आणि अनाचाराचा डोंब उसळला आहे त्याला शांत करण्याचे सामर्थ्य भारतीय संस्कृतीच्या समन्वय विचारात आहे. म्हणून नव्या पिढीला शालेय शिक्षणापासूनच सर्व धर्मांची मूळ तत्त्वे संतांच्या भाषेतून शिकविणे आवश्यक आहे. त्यातूनच समन्वय आणि परस्पर प्रेम जोपासणे शक्य होणार आहे. हीच जागतिक शांततेकडील वाटचाल राहील.

**डॉ. कृ. मा. घटाटे, गोकुळ**
**सिव्हिल लाईन्स, नागपूर.**



# प्रज्ञाचक्षूं श्रीगुलाबराय : चरित्र आणि काव्य...

*एम.ए., पीएच.डी. मराठी विभाग प्रमुख दयानंद कॉलेज सोलापूर. २९ वर्षे अध्यापन. ८ वर्षे सोलापूर संचार व समाचारमध्ये सहसंपादक अध्यात्म विषयावर विपूल लेखन. १२ पुस्तके प्रसिद्ध. संतकृपा, सज्जनगड, प्रसाद इ. मासिकांत लेखन. व्याख्यान व प्रवचन अनेक ठिकाणी. १९७८ पासून श्रीस्वामी समर्थ अक्कलकोट महाराज यांचे वार्षिक पुण्यतिथीचे संयोजन. निंबर्गी संप्रदायाचे श्रीगुरुदेव रानडे यांचेकडून अनुग्रह. मातृमंदिर पुस्तक पुरस्कार, निगडी. मु. श्री. कानडे, पुरस्कार.*

### ज्ञानेश्वरकन्येची भक्तिसुधा –

मधुरा भक्तीतून अद्वैतमताचा पुरस्कार करणारे विसाव्या शतकातील एक अलौकिक संत म्हणजे श्रीगुलाबराय महाराज हे होत. त्यांचा काल इ. स. १८८१ ते १९१५ असा असून आयुष्य अवघे ३४ वर्षे लाभले. ते जन्मांध होते आणि अल्पायुषी होते. त्यांचे कवित्व आणि कार्य पाहिले तर एखाद्या 'पूर्वजन्मीच्या योगी-सत्पुरुषांचे' ते एक 'उत्तर जन्मीचेच अवतारित्व' होय, अशीच खात्री पटते. हिंदी संतकवी सूरदास यांचाच मराठी प्रांतीचा पुनर्अवतार म्हणजे श्रीगुलाबराय महाराज होय, असे भक्तिसाहित्याच्या विमर्षकांनी म्हटलेही आहे. जन्मांध असूनही प्रचंड साहित्यनिर्मिती त्यांनी केली असल्याने त्यांना 'प्रज्ञाचक्षूं श्रीगुलाबराय महाराज' असेच सर्वत्र संबोधिले गेले आहे. श्रीज्ञानदेवांना ते आपले पिता मानीत असत आणि श्रीकृष्णास ते आपला पती मानतात. स्वतःस त्यांनी 'ज्ञानेश्वर कन्या' म्हणविले असून 'कृष्णपत्नी' च्या नात्याने, परंतु गोपीभावनेने मधुराभक्ती करीत ते ईश्वराशी आत्मरत होतात. आषाढ शुद्ध दशमी ही त्यांची जन्मतिथी होय. त्यांची ११३ वी जयंती नुकतीच साजरी झाली. जन्मांध असून, काहीही शिक्षण झालेले नसून, तरीही त्यांची प्रचंड साहित्यनिर्मिती पाहिली म्हणजे त्यांचे अलौकिकत्व आणि अवतारित्व हे सहजपणे ध्यानी येते. संस्कृत, मराठी, हिंदी, वऱ्हाडी आणि व्रज भाषेत त्यांनी एकूण १२५ ग्रंथ लिहिले आहेत. एकूण २५०० अभंग, १२५० गीते, २२,००० ओव्या, २५०० पदे, १००० श्लोक एवढी साहित्यसंपदा त्यांची असून ती ग्रंथरूपाने एकूण ३६ खंडात उपलब्ध आहे. त्यांच्या साहित्याचा परामर्ष घेणारे शोध-प्रबंधही पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले आहेत. त्यांच्या जन्मस्थानी (माधान येथे / अमरावतीजवळ) मोठा उत्सव साजरा होतो.

### मधुराद्वैताचे आचार्य...

श्रीगुलाबराय महाराजांचा कालखंड हा अव्वल इंग्रजी सत्तेचा असल्याने पाश्चात्य विज्ञान, तत्त्वज्ञान आणि नीती यांचा प्रभाव समाजमनावर पडू लागला होता. त्या काळात त्यांनी भारतीय अध्यात्मविद्या श्रेष्ठ कशी आहे हे युक्तिवादासह पटवून देण्याचे मौलिक कार्य केले आहे. भारतीय अध्यात्मविद्येचे आधुनिक काळात पुनरुज्जीवन करण्याचे ऐतिहासिक कार्य त्यांनी केले आहे. पाश्चात्य आणि पौर्वात्य मतांचा समन्वय करून भक्तीला उपकारक अशा सिद्धांतांची त्यांनी फेरमांडणी करून दाखविली आहे. त्यातल्या त्यात हिंदी कवी सूरदास आणि हिंदी कवयित्री मीराबाई यांनी मधुराभक्ती आपल्या साहित्यातून प्रकट केली होती. सूरदास आणि मीराबाई ही नुसती कवित्व करणारी मंडळी नव्हती, तर त्यांनी ईश्वराचा साक्षात्कार करून घेतला होता. संतांच्या मांदिआळीत त्यांचेही स्थान विशेषत्वाने लक्षात घेतले जाते. कृष्णभक्तीतील प्रेमभाव अनुभवणारी गोपीभावना तिथेही प्रकट झालेली आहे. मीराबाईने कृष्णास पती-प्रियकर या दोन्ही नात्यांनी भजले आहे. सूरदास आणि मीराबाई यांच्या भक्तिसाहित्यातील प्रेमभाव पुन्हा एकदा श्री गुलाबराय यांच्या अवतारित्वाने प्रकटला आहे. महाराष्ट्रातला हा वैदर्भीय संत भक्तिपरंपरेत उत्तरेकडील हिंदी संतांच्या भक्तिरसाशी आंतरिक-उत्कटतेने असा जुळून राहिला आहे. मधुराभक्तीचे श्रेष्ठत्व त्यांनी आधुनिक काळाला पटवून दिले हे त्यांचे बहुमोलाचे कार्य असल्यानेच त्यांना 'मधुराद्वैताचे आचार्य' असे संबोधिले जाते. भक्त आणि देव हे द्वैत असले तरी भक्तीने देवाशी एकरूप होऊन जाणे, हीच अद्वैतावस्था होय. कन्या आणि पत्नी अशा नात्याने श्रीगुलाबरायांनी परमेश्वराशी ऐक्य पावण्याचा प्रयत्न केला.

### साहित्यविषयांचा चौफेरपणा...

त्यांनी आपल्या ज्ञानचक्षूंनी भारतीय अध्यात्म शास्त्रावर जसे लिहिले आहे, तसेच भौतिकशास्त्र, मनोविज्ञान, आयुर्वेद, संगीत, इतिहास, शिक्षण यावरही लिहून आपली परखड मते व्यक्त केली आहेत. त्यांनी काही लोकगीते लिहून समाजप्रबोधन केले आहे. १२३ नवीन मात्रावृत्तांची रचना करून त्यांनी काव्यशास्त्र समृद्ध केले आहे. व्याकरण, नाटक, आख्याने अशीही साहित्य रचना त्यांनी केली आहे. पदे आणि अभंग यांची रचना मोठी रसाळ, भावमधुर, भक्तिरसाने ओथंबलेली अशी आहे. तर शास्त्रविषयक मतांचे स्पष्टीकरण करताना वादपटुत्व प्रकटलेले आहे. त्यात तर्काधिष्ठित-वैचारिक भूमिका प्रामुख्याने दिसून येते. श्रीगुलाबराय हे वैदर्भीय संत म्हणून गणले जातात. संतांनी जनजागरणाचा 'स्वधर्म' अनुसरला असल्याने श्रीगुलाबराय महाराज यांच्याही काव्यरचनेतून 'भक्तिधर्म' विवरला गेला आहे. त्याचेच स्वरूप चिंतन-मननाच्या दृष्टी-धर्माने पहावयाचे आहे. प्रज्ञाचक्षूं श्रीगुलाबराय महाराज हे 'परमार्थप्रवृत्तीपासून शरण्य भावापर्यंत' भक्तिसुधारस पाजतात. भाविकाने 'सेवन' करायचे, एवढेच.

### परमार्थ प्रवृत्तीसाठी सद्‌गुरुंस प्रार्थना...

ग्रंथारंभ करताना सर्वच संतांनी 'श्रीगणेश वंदना' केली आहे. ज्ञानेश्वर महाराजांनीही श्रीज्ञानदेवी ग्रंथात श्रीगणेशस्तवन करून मग सद्‌गुरुस्तवन केले आहे. परंतु श्रीगुलाबराय महाराज यांनी श्रीगणेशस्तवन करताना प्रथम श्रीसद्‌गुरुंना वंदन केले आहे. 'ज्ञानेश्वरप्रभु तात मात गुरू' असून तेच गणेशस्वरूप आहेत, असे ते सांगतात. 'गुरू हेच गणेश' होत, अशी त्यांची श्रद्धा-धारणा आहे. विघ्नहर्ता जसा गणेश आहे, तसाच विघ्नहर्ता सद्‌गुरुही आहे. म्हणून ते श्रीगणेशचरणी/श्रीसद्‌गुरु चरणी माथा टेकवितात. पुढे शारदेला ते वंदन करतात. महाकाव्य म्हणजे गुरूनाम होय. माझे सद्‌गुरू ब्रह्मस्वरूप असून ते नामरूपाने मला प्राप्त आहेत. संत हे समाजरूपानेच उपस्थित असून ते लोकोद्धाराचे कार्य करीत आहेतच. श्रोत्यांनी अंतःकरणापासून भक्तिमार्ग 'श्रवण' करावा, अशी श्रोत्यांना विनंती त्यांनी केली आहे.

## ज्ञानप्रकाशस्वरूप सद्गुरू...

गुरू वा गणेश यांना वंदन करून भक्तिमार्गाची वाटचाल करण्याची 'तयारी' साधकाने करावयाची असल्याने प्रथम त्यांनी सद्गुरुंचे स्वरूप नेमकेपणाने सांगितले आहे. सद्गुरु हे ज्ञानप्रकाश-स्वरूप असे असून अज्ञानी आणि आंधळे असलेल्या माणसांना ते ज्ञानबोध करून ईश्वर पाहण्याची आत्मदृष्टी देतात. भक्तितला 'डोळसपणा' तो हाच आहे. देव कसा आहे? तो कशामुळे प्राप्त होईल? प्राप्तीचा साधनमार्ग कोणता? हे प्रश्न जोपर्यंत उभे राहतात तोवर माणूस भक्तिमार्ग आणि देवप्राप्ती या संदर्भात अज्ञानीच म्हणविला पाहिजे. आंधळेपणा ही स्थिती तशीच आहे. देव संतांनी खूप वर्णून सांगितला आहे आणि तो मिळविण्याचा नामस्मरणात्मक - साधनमार्गही विशद केला आहे. असे असतानाही 'देवाची आम्हास काय गरज आहे?' किंवा 'भक्तिमार्ग कुठला? हाच का? श्रेष्ठ कोणता' वगैरेच्या विकल्पातच सदैव स्वतःला गुंतवून ठेवून त्यापासून दूर राहण्याचाच खटाटोप करणे हाच आंधळेपणा होय. दृष्टी असून डोळेझाक करणे प्रवृत्ती (?) त्यात दडलेली असते. डोळे असून आंधळे, कान असून बहिरे आणि मुख असून मुके अशी अवस्था त्यांची झालेली असते. ही अवस्था फक्त देव, भक्ती, संत, साधन एवढ्यापुरतीच असते. परमार्थाकडे दुर्लक्ष हीच आंधळेपणाची स्थिती होय. प्रपंची मात्र कान, डोळे, मुख सदैव 'उघडे'च असते. तिथे मात्र परनिंदा ऐकू नये, पाहू नये, करू नये असे मुळीच वाटत नसते. ते हळूहळू ज्या क्षणी वाटू लागेल तो क्षण 'डोळस' होत जाण्याचा पुण्यकाळ समजला पाहिजे. श्रीगुलाबराय जन्मांध होते. परंतु सद्गुरूंस शरण जाऊन त्यांनी भक्तिमार्ग अनुसरला आणि भक्तिपर काव्यरचना करून 'ज्ञानप्रकाश' देणारा महामार्ग सर्वांसाठी खुला करून ठेवला, हे त्यांचे 'डोळस-कार्य' होय. समाजाला सन्मार्ग दाखविणे हेच संतांचे थोर कार्य होय. सद्गुरू हे 'ज्ञान' देतात, 'कृपा' करतात आणि साधक हा त्यांच्या बोध-शक्तीने भक्तिमार्गाची वाटचाल करू लागतो. 'जया पाहता आंधळी ज्ञानदृष्टी, प्रकाश स्वये इष्टरूपेचि सृष्टी' असा श्लोक त्यांनी लिहिला असून, श्रीसद्गुरुस वंदन, हेच श्रीगणेशवंदन... असे प्रतिपादन त्यांनी केले आहे.

## विघ्न कोणते?

सद्गुरू आणि गणेश हे विघ्नहर्ते आहेत. 'ते कोणते विघ्न दूर करतात? विघ्न तरी कोणते आहे? या प्रश्नाचे उत्तर श्रीगुलाबराय महाराज यांनी दिले आहे. 'माझे मन देवाकडे लागत नाही' हेच मोठे विघ्न असून, ते तू दूर करावेस अशी प्रार्थना त्यांनी केली आहे. माझा मनोभाव तुझ्या पायी लागू दे. मी कीर्तन करीत असेन तर तिथे माझे लक्ष तुझ्या चरणी लागू दे. कीर्तनामध्ये आरंभी 'हरि चरणी लक्ष लागू दे' असे म्हणण्याची प्रथा रूढ आहे. पुढे श्रीगुलाबराय म्हणतात, 'रंगा येई वो माय, मम जननी, आळंदीवासिनी'. श्रीज्ञानेश्वर ही त्यांची गुरू-माऊली आहे. तिने भक्तिरंगी / कीर्तनरंगी यावे आणि मनोभावे माझ्या कडून हरिगुणगायन व्हावे, अशी आळवणी ते करतात. दुर्गुण हेच माझ्या ठिकाणी प्रबळ झाले असल्याने हरिचरणी लक्ष लागत नाही. हेच महाविघ्न होय. ते नष्ट व्हावयाचे असेल तर हरिभजन, हरिगुणगायन, हरिकीर्तन मी करावे आणि त्यात माझे लक्ष / मन लागावे. गुरूने माझा भक्तिमार्ग हा असा 'निर्विघ्न' करावा अशी त्यांची प्रार्थना आहे. परमार्थ प्रवृत्ती व्हावी आणि परमार्थमार्गाही अनुसरता यावा ही तळमळ प्रथम लागून राहायला हवी. तळमळीतून सद्गुरूंस प्रार्थना घडते. गुरूकृपा झाली तरच भक्तिमार्ग सुलभ होतो. ('पदांची गाथा' वरील मुक्तचिंतन).

## जया बुद्धी, ते मला प्राप्त होती...

परमार्थविषयक तळमळीतून, देवप्राप्तीच्या ध्येयवादाने, जे सद्गुरूस शरण जातात, 'त्यांचा मी दास होऊन राहतो', अशी भगवंताची ग्वाही आहे. देव हा भक्तांचा दास होऊन राहतो, ही गोष्ट खरी. पण प्रथम त्याने (भक्ताने) दास होऊन शरण जाऊन, नामसेवेचे श्रम घेतले पाहिजेत, असा उपदेश श्रीगुलाबराय महाराज यांनी केला आहे. 'जे मजसाठी श्रमती पळपळ, मी तैसा त्या मान' असे पद त्यांनी लिहिले आहे. एकविधभावनेने किमान क्षणभर का होईना, भक्ताने माझे नामस्मरण करण्याचे श्रम घेतलेच पाहिजेत. 'मी काहीच करणार नाही. देवाने मला उद्धरावे' अशी भूमिका ही ढोंगीपणाची आणि नाकर्तेपणाची आहे. ज्याला काहीच करावयाचे नसते तो एरव्ही प्रपंचात/व्यवहारात देखील 'माझ्यासाठी दुसऱ्याने काहीतरी करावे' अशी भूमिका घेत असतो. यात पलायनवाद आहे. परमार्थासाठी पलायनवादी भूमिका घेणे तर फारच सोयीचे असते. 'देवाला माझी गरज असल्यास त्याने माझेवर कृपा करावी' वगैरे थाटाची विधाने बुद्धिवंतांच्या सभेत ऐकावयास मिळतात. श्रद्धावंतांची टवाळी करून टाळ्या मिळविण्यात ते धन्यताही मानत असतात. इतकेच काय, संतांचे आध्यात्मिक ग्रंथ त्यांना त्यातल्या ईश्वरविषयक विचारांपेक्षा साहित्य दृष्टीने बहुमोलाचे वाटतात. शेंगदाणा हा, दाणा आणि टरफलासहित असला तरी दाण्यापेक्षा टरफल सुंदर आहे, असे म्हणण्यातलाच हा प्रकार आहे. किंवा मूर्तीपेक्षा मंदिराच्या नक्षीकामाची स्तुती करण्यातलाच तो एक भाग आहे. 'ज्ञानेश्वरीकडे आपण माबडेपणाने पहात नाही किंवा ज्ञानेश्वराला आपण देव मानत नाही. तो कवी म्हणून आपणाला श्रेष्ठ वाटतो', अशी विधाने 'एकही ओवी न अनुभवता आल्याने'च घडत असतात. देव आणि भक्तिग्रंथ यांच्याकडे पाहणारी अशीही एक 'दृष्टी' आहे, एवढे खरे. ती आंधळी की डोळस? हे ज्याने त्याने ठरवावे. असो. जन्मांध असूनही प्रज्ञाचक्षूंच्या आधारे श्रीगुलाबराय मात्र हेच अज्ञान आणि आंधळेपण दूर व्हावे अशी सद्गुरु चरणी प्रार्थना करतात.

## सद्बुद्धीने देव प्राप्त...

परमेश्वर प्राप्तीकरता भक्तिग्रंथाचे चिंतन-मननही श्रद्धापूर्वकच केले पाहिजे. ग्रंथपठण आणि नामस्मरण या दोन्ही स्वरूपात भक्तिमार्ग समजून घेतला पाहिजे. संतवाङ्मयाचे प्रधान उद्दिष्टच देवप्राप्ती आहे, तर ग्रंथातला देव आपणाला कळत नाही, अशी भूमिका (?) घेण्यात काय अर्थ? समाजशास्त्र हे जसे शास्त्र आहे, तसेच अध्यात्मशास्त्र हेही शास्त्रच आहे. त्याची उकल साधना केल्याशिवाय कशी होईल? संतांनी साधन केले. त्यांनी देव पाहिला...मिळविला... आणि तुम्हां-आम्हांस तो देव दाखविण्याचे अभिवचन दिले. संतवाणीने संतपथ, भक्तिपथ, परमार्थपथ दाखविला आहे. त्याकडे बुद्ध्याच डोळे मिटून घेणे हेच अज्ञान आणि आंधळेपण होय. श्रीगुलाबराय पुढे सांगतात, 'मत्कीर्तिश्रवणी जो, श्रम करितो मज सदाचि आवडतो' मग देव त्याला सांभाळतो. पोसतो. देवाची कीर्ती कोणती? तर त्याचे नाम ही कीर्ती आहे. श्रवणी म्हणजे गुरूमंत्र / कानमंत्र होय. तो गुरुमंत्र सदोदित स्मरणात ठेवण्याचेच तेवढे 'श्रम' आहेत. तेवढे करणारा

जो कुणी असेल तोच (भक्त) मला आवडतो. 'मूर्तिमंत भगवंत संत ते आठवी नित्य मना' या पदात श्रीगुलाबराय सांगतात, 'हे जग कसे आहे ते तुला त्या जगाकडे (हरिमय) पाहण्याचे शास्त्र (भक्तिमार्ग) कळल्यावाचून उमगणार नाही. भजन, नामस्मरण, चिंतन हे त्याला (देवाला) जाणण्याचे एक शास्त्र-अंग आहे. खरे म्हणशील तर तुला सद्बुद्धीशिवाय तो (देव) कळून येणार नाही. भगवंताचे अभिवचन जणू श्रीगुलाबराय महाराज यांनी पुढील पदात व्यक्त केले आहे. 'तया प्रिया भक्तास ध्यानयोगे, मीचि लावी देऊनि बुद्धियोगे ॥ जया बुद्धि ते मला प्राप्त होती, जाण माझे भक्त ना व्यर्थ जाती' ही बुद्धी कोणती? तर सद्बुद्धी होय. सद्बुद्धी म्हणजे नामबुद्धी होय. सामान्यबुद्धी, शुद्धबुद्धी, सद्बुद्धी, शरण्यबुद्धी ही बुद्धियोगाची विकासावस्था होय. सामान्यबुद्धी (सांसारिक/व्यावहारिक) ही जेव्हा परमार्थप्रवृत्त होते तेव्हाच ती शुद्धबुद्धी होते. नाम घेऊन ही बुद्धी साधन करू लागते तेव्हाच तिला सद्बुद्धी म्हणतात. ईश्वरी अनुभव येऊन जेव्हा साधकाच्या ठिकाणी ईश्वराविषयी शरण्यभावना निर्माण होते, तेव्हा ती शरण्यबुद्धी होय. अशा बुद्धीच्या प्रवासाने भक्तास देव प्राप्त होतो. सामान्य बुद्धीत सर्वात अधिक विकल्प असतात. विकल्प-आशंका कमी कमी होऊ लागल्यानंतर शुद्धबुद्धी ही सद्बुद्धीचा (नामानुग्रह) ध्यास धरते. तिथूनच ईश्वरार्पणभावना निर्माण होऊन शरणागत-अवस्था प्राप्त होते. ते भक्त मला येऊन मिळतात, असे भगवंताचे अभिवचन आहे. सद्बुद्धीचा ध्यास हा सर्वाधिक महत्त्वाचा आहे. ('पदांची गाथा' वरील मुक्तचिंतन).

### संसारी मी अंध, ज्ञानप्रकाश दाखवा...

सद्बुद्धीने देव प्राप्त होतो, याचा विचार श्रीगुलाबराय महाराज यांनी स्पष्ट केल्यानंतर अशा नामबुद्धीने ईश्वराचे नित्यस्मरण घडावे, अशी तळमळीची प्रार्थना त्यांनी श्रीज्ञानेश्वर तात (पिता) यांना केली आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज हे त्यांचे तातही आहेत आणि सद्गुरूही आहेत. त्यांची 'कन्या' म्हणविताना लडिवाळपणाचा सहजसुलभ अधिकारही श्रीगुलाबराय महाराज आपल्याकडे घेतात. ही आर्जव मग अगदी हट्ट करून सुरू होते. देवाजवळ असा हट्ट श्रीनामदेवरायांनी धरल्याचा दाखला भक्तिसंप्रदायात आहे. माझा नैवेद्य खाल्लाच पाहिजे, असा बालहट्ट श्रीनामदेवरायांनी धरला होता, अशी कीर्तनकारांकडून आख्यायिकाही ऐकायला मिळते. प्रेम आहे तिथे असा हट्ट आहेच आहे. श्रीगुलाबराय महाराजही श्रीज्ञानेश्वरांवरील असीम प्रेमानेच हट्ट करतात. गुरू मंत्राने साधन करून देवप्राप्त होतोच होतो. श्रीगुलाबराय म्हणतात, गुरूचे नाव घेतले तरी देव प्राप्त होईल. 'ज्ञानराज जपता हा चतुराक्षरि मंत्र सर्व योगफळे, मोडुनि येती सरसे अर्पिती तृप्ती अखंड भक्तिफळे' पण हा मंत्र (गुरुनाम) जपताना सज्जनाद्वारी हरिकथा ऐकावी आणि वदनातुनी जगनिंदा दूर करावी, हे पथ्य त्यांनी सांगितले आहे. जीभच नाम घेते आणि जीभच निंदा करते. फक्त सायास करायचे ते एवढेच कीं, निंदेऐवजी जिभेवर नाम यावे. म्हणजे ते मुख 'सज्जनद्वार' होईल.

### नाम हे मुद्दल, स्मरण हे व्याज

लोकांना भक्तिमार्ग पटविण्यासाठी श्रीगुलाबराय महाराजांनी व्यवहारातले एक उदाहरण घेतले आहे. मुद्दल कायम ठेवून व्याजावर जसा माणूस आपली उपजीविका करतो; तसेच इथे परमार्थात गुरुनाम, गुरुमंत्र हाच मुद्दल स्वरूपाचे असून, त्या नामाचे सातत्यपूर्वक स्मरण हेच त्यावरील व्याज होय. हे व्याज (स्मरण) घेतघेतच परमार्थ करावयाचा आहे. मुद्दलच विसरले वा गमावले तर व्याज कुठले येणार? तसे नामाचे विस्मरण घडले तर परमार्थ कसा होणार? नाहीच नाही. म्हणून नाम आणि स्मरण या दोन्हीविषयी साधकाने दक्ष राहिले पाहिजे. श्रीगुलाबराय सांगतात, 'गुरूमुद्दल काय करू ॥ मुद्दल ठेवुनि जैसे तैसे । तंव पद व्याज वरू ॥ जग भांडारी मुद्दल भरूनि । व्याज हृदयी धरू ॥' नाहीतरी भक्तिमार्गावरची वाटचाल अशीच आहे. संतांनी हेच मुद्दल कायम ठेवून त्याच्या व्याजावरच भक्तिमार्गाविषयीचा उपदेश केला आहे. देव नामरूपे प्रकट आहे आणि नामामुळे देव प्रकटतो अशी ही परस्परपूरक भक्तिसूत्रे आहेत. संतांनी इतके वर्षे भक्तिमार्ग विशद करूनही त्यांचे मुद्दल वा भांडवल असलेला देव संपलेला नाही. नाम घेता तो प्रकटचि आहे. संत अनुग्रह करतात. गुरू हे अनुग्रह करतात आणि देवाच्या नावाची हुंडी लिहून देतात. ही नाममंत्र कृपेची हुंडीच भक्तिपेठेत चालते... वठविता येते. 'देवा, तुझ्या नामाचा व्यवहार' असे संतांचे पदही आहे. श्रीगुलाबराय महाराजांनी देखील 'गुरू वाक्ये घ्या प्रचीत पाहुनि' असे एक पद लिहिले आहे. गुरू वाक्य म्हणजे नाममंत्र होय. तो मंत्र (नाम) हृदयी स्थिर व्हावा, अशी विनवणी त्यांनी कृष्णास (पतीस) केली आहे. कृष्णास (देवास) पती मानून पत्नीभावाने ते आळविताना म्हणतात, 'बाई, पती तो आवडला । परब्रह्म असुनि भक्तघरी । भरितो कावडीला ॥ रासमंडळी खेळुनि जो की । प्रेमळार्थ रडला ॥ गोपबाळ करूणार्थ प्रभु जो । यमुनाजळी दडला ॥ ज्ञानेश्वर प्रभु तात कृपेने । सद्विवाह घडला ॥' देवाशी एकरूप होणे हा सद्विवाह / ब्रह्मविवाह होय, अशी त्यांची भक्तिधारणा आहे.

### ज्ञानदेवाने कन्यादान केले...

श्रीगुलाबराय महाराज हे श्रीज्ञानदेवांना गुरू आणि पिता मानतात. गुरूने मंत्र दिला आणि देवाशी मला निगडीत केले, ही त्यांची भावना आहे. त्यामुळे ते म्हणतात, 'आज मी भाग्याचे झाले ॥ नंदसुताकरि देऊनि बापे कन्यादान केले ॥ होते जरी नयनांध मी बाई । परि सगुणाकृती होऊनि हरिने ठेवियले पायी ॥' देव दिसला आणि तो सदैव दिसतो, म्हणून त्याचेशी आपण विवाहबद्ध (एकरूप) झालो असल्याची जाणीव त्यांतून त्यांनी प्रकट केली आहे. हा विवाह म्हणजेच 'भक्तिप्रेमबंध' होय. ते म्हणतात, मी संसारी अंधच आहे. कारण 'अति आळसी सेवा न घडे' अशीच स्थिती माझी आहे. 'परि न्या संतामाजी' ही विनवणी आहे. कारण संत-सद्गुरू हे मला ज्ञानप्रकाशाचा मार्ग दाखवतील... माझे आंधळेपण (आळस) जाईल. 'प्रभुविण धरू कवणाचे पाय' अशी आस त्यांना लागून राहते. त्यावर उपाय काय? तर गुरूवर विश्वास ठेवून नामस्मरण करणे. पिता मुलीचे अहित करील काय? नाहीच. मुलगी जशी पित्यावर विश्वास ठेवते, तसे गुरूंवर विश्वास ठेवून हा भक्तिमार्ग अनुसरला पाहिजे. ('पदांची गाथा' वरील मुक्तचिंतन).

### सुशास्त्र-संमत नामग्रहण करावे ...

सद्गुरूंवर विश्वास ठेवूनच भक्तिमार्गाची वाटचाल केली पाहिजे; असे श्रीगुलाबराय महाराजांनी सांगितले आहे. त्यात 'सुधासम हरिनामाने' स्मरावे, असा उपदेश त्यांनी केला आहे. सुधा म्हणजे अमृत होय. अमृताने जसे मरणाचे भय वाटत नाही, तसे हरिनामसुधेने प्रापंचिक संकटांचे भय

वाटत नाही. श्रीगुरूरायांनी नाम हीच सुधा दिली आहे. स्मरण हेच ह्या नामसुधेचे सेवन करणे होय. श्रीगुलाबराय महाराज म्हणतात, 'हे ज्ञानदेवा, तात... बापा, आता उशीर न करावा.' तुम्ही कृपावंत होऊन ही नामसुधा / भक्तिसुधा आम्हास द्यावी; असेही ते विनवितात.

## मनास बोध

सद्‌गुरूंनी नामकृपा केल्यावर परमार्थाची सहजपणे आणि सुलभपणे वाटचाल होईल, असे वाटत असते. पण तसे घडत नाही. कारण लगेचच मन नामाशी एकरूप होत नाही. देवाविषयी एकदम रुची कशी काय निर्माण होणार? कारण मन संसारात, विषयात गुंतलेले आहे. त्याची आसक्ती/सोडवणूक हळूहळू करावयास हवी. तेच घडून येणे मोठे कठीण आहे. कर्तव्यकर्मे पार पाडून देखील माणसाचे मन परमार्थाकडे वळत नाही. श्रीगुलाबराय यांनी हे मानसशास्त्र जाणले होते. म्हणूनच ते म्हणतात, 'किती शिकवू या मना ।। न सोडी अजुनी कामना ।। न करी इंद्रियदमना ।। न भजे आवडी वामना ।।' मनास ईश्वरविषयक चिंतनात व्यग्र करणे हीच तर मोठी खडतर-साधना होय. 'आळंदीवल्लभा रे मज कृपादृष्टी पाही । भुलोनि पाय तुझे कैसा अडकलो देही' ही त्यांचीही अवस्था झाली होती. 'लहानपण खेळण्यात गेले, तरुणपण मायेत गेले, संसार करता करता तुझे विस्मरण झाले हेच माझे आंधळेपण होय. संतवचनांकडेही मी दुर्लक्ष केले. विद्येचा अहंकार जडला. आता मात्र माझे गुणदोष मला कळून आले आहेत. ईश्वरापायी मन जडावे अशी सद्‌बुद्धी मला द्या' अशी भूमिका त्यांनी एका पदात प्रकट केली आहे. अंतर्मुख होऊनच माणूस सत्प्रवृत्तीकडे वळतो. मनाला सारखी टोंचणी द्यावी लागते. 'चाल चाल गोपाळा माझे ध्यान तुझे पायी ।। अंध झालो संसारी मजला मार्ग काही दावी ।।धृ।। आपुल्या बुद्धीने धावुनि ज्या वाटे । तिकडे अंधार मागेपुढे गोटे काटे ।। जीव झाला घाबरा फुटले पायाचे बोटे । पाहू कोणाच्या तोंडा अवघे होती हाटे हाटे ।। तुझ्या वाचुनी यदुवीरा जगी मला कुणी नाही । अंध झालो संसारी मजला मार्ग काही दावी' मनास अशी आर्तता लागून राहिली तरच परमार्थावर प्रगतीकारक पाऊले पडतात.

## नामग्रहण कसे करावे

परमार्थात देव प्राप्ती हे ध्येय आहे. त्याकडे जाण्याचा मार्ग म्हणजे... गुरुभेट होऊन, गुरूमंत्र प्राप्त होऊन, नाम आणि नीती यांच्या आधारे स्मरणोपासना करणे, हा होय. हे नामग्रहण कसे करावे? हा प्रश्न भाविकांच्या मनास भेडसावत असतोच. त्याचे ठामपणे उत्तर श्रीगुलाबराय महाराज यांनी दिले आहे. ते म्हणतात, 'नामग्रहण करी सुशास्त्र संमत की' नाहीतरी परमार्थही निश्चयीबुद्धीने आणि श्रद्धाशीलमनाने करावयाचा असतो. त्यासाठी 'सुशास्त्र-संमत' स्वरूपातच 'नामग्रहण' केले पाहिजे. नाम हे सद्‌गुरूंकडूनच घेतले पाहिजे, हे अध्यात्मशास्त्रातील मुख्यसूत्र आहे. संप्रदायविशिष्ठ सद्‌गुरूंकडूनच ते घ्यावे. कारण त्याला परंपरा असते. परंपरा ही श्रद्धेला सामर्थ्य देणारी शक्ती आहे. साधनमार्गही सुनिश्चित असावा. 'साधनांची गरज नाही, देव भेटवू' अशी भाषा कुणाची असेल तर तिथे भोंदुगिरी आहे, हे ध्यानात ठेवले पाहिजे. संत-सद्‌गुरू यांनीही अहर्निश-साधन केले आणि भक्तिमार्ग सांगितला. अभ्यास हवाच, प्रयत्न हवाच, साधन हवेच. पुढे पुढे नामस्मरण अधिकाधिक होऊ लागले तर मग 'शास्त्र-संमत' चौकटीची बंधने नियमांपेक्षा अवस्थेशी निगडीत होतात. साधकाने वेळ ठरवून आणि सदैव मनात हरिनामसुधा सेवीत राहावे, हेच त्यांचे सांगणे आहे. 'पळ पळ पळ मोजी जीविताला यमाजी' याची आठवण ठेवलीच पाहिजे. म्हणजेच काळ सार्थक करण्यासाठी नामग्रहण आणि नामस्मरण करता येईल. सद्‌गुरू देहाने उपस्थित नसतील तर त्यांची समाधिस्थाने ही 'चैतन्य-स्वरूप' असल्याने तिथेही नामग्रहण करता येते. संत-सद्‌गुरूंना शरण जाऊन, नामग्रहण करून, साधकाला गुरूपुत्र होता येते. श्रीगुलाबराय महाराज श्रीज्ञानदेवांना शरण गेले आणि त्यांची 'कन्या' होऊन 'भक्तिसुधारस' सेवीत राहिले. ('पदांची गाथा' वरील मुक्तचिंतन).

## सरत्या आयुष्याची खंत कशी नाही?...

'पळ पळ पळ मोजी जीविताला यमाजी' अशी हाकारी देऊन श्रीगुलाबराय महाराज तुम्हा-आम्हास जागे करतात. दुसऱ्या एका पदात त्यांनी एक महत्त्वपूर्ण प्रश्न विचारला आहे. 'दिनीप्रतिदिनी आयुष्य सरत आहे याची खंत कशी नाही?' हा त्यांचा प्रश्न आहे. खंत वाटत असेल तर माणूस 'उरलेले आयुष्य' सत्कारणी लावण्याची धडपड करील. वेळ सत्कारणी लागावा किंवा आयुष्याचे सार्थक व्हावे यात त्यांना जीवाने सन्मार्गाने / भक्तिमार्गाने चालावे, असा अर्थ अभिप्रेत आहे. कुणाचे आयुष्य किती उरले आहे? हे कुणालाच सांगता येत नसल्याने निदान जन्माला आलेला माणूस एक दिवस निश्चितपणे मृत्यू पावणार आहे. याची जरी जाणीव झाली तरी माणसाने त्या क्षणापासून सन्मार्गाचा / भक्तिमार्गाचा शोध घ्यावा आणि संत-सद्‌गुरू यांनी दाखविलेल्या 'आत्महिताच्या वाटेने' स्वतःस चालते ठेवावे.

## दीन तरी, गर्विष्ठ कसा?...

मृत्यूभयाने म्हणा नाहीतर मृत्यूच्या जाणिवेने म्हणा, जर कुणी भक्तिमार्गाकडे वळत असेल तर ती गोष्ट उत्तमच. पण कधी कधी भक्तिमार्गी माणसेही विपरीत वागताना दिसतात. एकीकडे स्वतःस लीन, दीन, विनम्र म्हणतात, तर दुसरीकडे देवाच्या सत्तेचा धाक घालून अहंकाराने वावरतात. या वागण्याला काय म्हणावे? श्रीगुलाबराय महाराजांनी साधकावस्थेतला हाही टप्पा जाणला आहे. ते म्हणतात, 'दीन उगा म्हणविसी परंतु जगी अति गर्व मनात कसा रे' मग तेच प्रभूला प्रार्थना करतात की, 'गर्व हरी हरि तूंचि समस्तही मस्तक ठेवितसे तव पायी' गर्व, मद, अहंकार हा प्रपंचात आणि परमार्थात, दोन्हीकडे, माणसाची / साधकाची हानी करतो, तर सर्वप्रथम प्रयत्नाअंती देखील प्रभुसत्ता श्रेष्ठ आणि समर्थ आहे, हे समजून-उमजून घेतले पाहिजे. तरच अंगी लीनता/नम्रता येईल. अहंकाराने वागल्यास मिळविलेले पुण्यही लयाला जाईल. सावध हो. आचरणाकडे लक्षपूर्वक ध्यान दे. पण हेही समज की, नम्रता वा लीनता म्हणजे लाचारी नव्हे. लाचारीत प्रेम, सुख, आनंद नाही. पण लीनतेत वा नम्रतेत देवाचा मी दास आहे, सेवक आहे म्हणजे त्याची मी प्रयत्नपूर्वक आराधना करीत असल्याने ही लीनता/नम्रता त्याच्या आणि माझ्यात सख्य निर्माण करते. लाचारीत सख्य नसते. उपेक्षितपणाची खंत त्यात दडलेली असते. 'श्रमोनिया ज्ञानी ते भक्ती घेती, ज्ञान लोळे भक्ताचिया पदांती' असा आणि एवढा भक्ताचाही अधिकार आहे. 'देव भेटला म्हणजे भाग्यच उजळले, कृष्ण हा नवरा भेटला, पूर्वजन्मीचे संचित होते म्हणूनच भक्तिची

आवडी निर्माण होऊन संतभेट झाली. माझा पती (कृष्ण) आणि माझे तात (ज्ञानेश्वर) हे दोघेही माझ्यामुळे (भक्तिमुळे) सुखी राहोत', अशी प्रेमाची/सख्यत्वाची भाषा ते बोलून दाखवितात.

## कष्ट झाले, म्हणूनच खंत...

भक्तीकडे आपण कसे वळलो? याचे एक तर्कशुद्ध विवेचन त्यांनी पदातून मांडले आहे. 'कष्ट झाले फारसे मायबापा' म्हणूनच दुःखमार्ग संपावा या विषयी तळमळ लागून राहिली. मरण तर क्षणक्षणाः समीप येतच आहे, हे जाणून सुखमार्ग / सन्मार्ग / भक्तिमार्ग अनुसरावा, याची निकड निर्माण झाली. त्यातूनच ज्ञानेश्वरांकडे पितृत्व दिले आणि कृष्णाकडे पतिपद देऊन टाकले. माझा सर्व भार गुरूवर (ज्ञानेश्वर) आणि पतीवर (देवावर) सोपविला. त्यामुळे आपण धन्य धन्य झालो असे ते सांगतात. असे 'निश्चिंत' झाल्याशिवाय भक्ती घडत नाही, हेच खरे. आपण आपल्या सद्‌गुरूंवर एवढा विश्वास ठेवून आणि देवावर भारसर्वस्व सोपवून भक्ती करतो का? अंतर्मुख होऊन विचार करण्याजोगी ही गोष्ट आहे. एका पदात तर प्रत्यक्ष श्रीज्ञानेश्वरांना श्रीगुलाबराय यांनी असे सांगितले आहे की, 'मी तुमच्यावर एवढा भार सोपवून राहिलो आहे, तर आता आळंदी सोडून माझ्या हृदयपीठावर आपण आसनस्थ व्हावे.' ज्ञानेश्वर नामाविषयी जरासुद्धा कंटाळा न करता त्यांना आपण नीट (सुखाने) वागवू असेही ते सांगतात. भक्ताचा देवावरचा हा अधिकार म्हणावा की, प्रेमभाव म्हणावा? प्रेमभावच इथे औचित्यपूर्ण वाटतो. कारण अधिकार प्राप्त होऊनही 'देवास मी सांभाळेन' अशी दर्पोक्ती संतांना कधीही येणे शक्य नाही. ज्ञानेश्वर हा जर त्यांचा पिता आहे, तर पित्याचा सांभाळ त्यांची कन्या (श्रीगुलाबराय) ही प्रेमभावानेच करील, यात मुळीच शंका नाही. देवाला सांभाळेन, नीट वागवेन, याचा अर्थ 'देव अखंडितपणे माझ्या हृदय मंदिरीच आणून ठेवेन.' ('पदांची गाथा' वरील मुक्त चिंतन).

## गर्व सोडुनि भक्तिपर्व साधावे...

प्रापंचिक दुःखे, जगात फजिती, मृत्यूचे भय ही परमार्थाकडे प्रवृत्त होण्याची मुख्य कारणे असून ती संत-सद्‌गुरू यांनी पदोपदी सांगून 'परमार्थाची तातडी करा' असा उपदेश मोठ्या तळमळीने केला आहे. तरीही मोठ्या गर्वाने वावरणारी पुष्कळ मंडळी आहेत, हे पहावयास मिळते. रूप, धन, विद्या यांचा मद तर फार लवकर चढतो. संत मात्र याकडे वेगळ्या भूमिकेतून पाहतात. रूप आपल्या हाती नाही, धन चंचल आहे, विद्या अमर्याद आहे हे ते जाणतात. म्हणून प्राप्त-स्वरूपातील रूप-धन-विद्या या विषयी ते ईश्वराचे आभार मानतात. त्यांना विठ्ठलाचे ध्यान 'सुंदर' वाटते. नाम हे त्यांना 'महाधन' वाटते. गुरूकृपा ही त्यांना 'ज्ञान' स्वरूपातच मिळते. म्हणून त्यांना प्रापंचिक-व्यावहारिक जगातील रूप-धन-विद्या याबद्दल गर्वही वाटत नाही. परमार्थातील रूप-धन-विद्या यांचेशी तर ते 'अहर्निश-एकरूप' होऊन जाण्याचाच प्रयत्न करीत असतात. श्रीगुलाबराय महाराज यांनी एका पदात 'सोडोनिया गर्व सर्व भक्तिपर्व साधी' असा उपदेश केला आहे. वाद-विवादात आयुष्य खर्च न करता तात्काळ हरिनामसुद्धा प्राशन करण्याचा ते आग्रह धरतात. ज्ञानेश्वरनामाची कृपा व्हावी, हीच त्यांची प्रभुपदी प्रार्थना आहे.

## परमार्थासाठी वेळ द्या...

भक्तिपर्व साधायचे म्हणजे कसे? तर श्रीगुलाबराय म्हणतात, 'काही काढा परमार्थासाठी वेळ' दिवसभराच्या २४ तासात एक क्षणभर देखील देवासाठी वेळ देता येणार नाही काय? प्रपंचासाठी मनुष्याला वेळ आहे, सवड आहे. फक्त 'परमार्थासाठी वेळ द्या' म्हटले की, तो अनंत सबबी पुढे करतो. त्याला परमार्थाची तातडीही वाटत नाही आणि गरजही वाटत नाही. परंतु ज्यांना ती वाटते, ते त्या क्षणाला, (एकवटले जिये क्षणी) भक्तिपंथाकडे येतात. श्रीगुलाबराय सांगतात, 'प्रापंचिक कर्मेही करा; परंतु ती झाल्यानंतर तरी परमार्थाला वेळ द्या.' गुरू करा, नाम घ्या, देव पहा. 'ऐसी व्हावी सगुण उपासना, येणे क्षय पावती वासना, मग धुंडावा सद्‌गुरू राणा, महावाक्य उपदेश ध्यानी आणा' गोविंदाचे नाम स्मरा. कली तर मातला आहेच. तो कलह लावून दुःखभोग आणखी वाढवितो. पण त्याचेत एक गुणही आहे. कलह लावून तो जातो. पण दुःख भोगणारा हा देवाकडे वळतो. संतभेट घडवून आणण्याचे महान कार्य हा कली करीत असतो. श्रीगुलाबराय महाराज सांगतात, 'उगीच व्यर्थ वटवट करण्यात आयुष्य घालवू नका. तीच वाणी हरिभजनी लावा. अजुनि वेळ गेलेली नाही. मृत्यू झालेला नाही. मग मनास का जागे करीत नाही?' पुढे एका पदात ते म्हणतात, 'आयुष्य काळ खातो का रे निश्चिंत बैसला सकळ, ज्ञानेश्वर मुखी म्हणता होवोनी ब्रह्म जाल हे निखळ' भक्तिरसायनाचा घुटका घ्या. हरिविण नुसते कोरडे (व्यर्थ) बोलू नका. 'बैसलासि स्वस्त कसा अजुनि मानवा रे, बहुत पुण्ये पावलासी हा जन्म नवा ॥ खेळताचि बालपण हरविले गड्या रे, तरूणपणी युवतीसवे घालिसी फुगड्या रे, थर थर थर वृद्धपणी शिर कापता रे, पळ पळ पळ जाण तुला काळ मापता रे' विचार कर. सावध हो. आत्महित कर.

## शरण्य भाव धर...

आता 'एकच गोष्ट करता येईल. ती म्हणजे तू अंतर्मुख होऊन शरण्यभाव धर' असे श्रीगुलाबराय महाराज परोपरीने विनवितात. 'सदा सेवी पाया वचन मनकाया वळवुनी' असा बोध ते करतात. नाम घे. ग्रंथ वाच. 'वाचुनिया मुक्त होई ग्रंथ ज्ञानदेवी' हाही उपदेश ते करतात. संतसंगतीचा ध्यास हवा, त्यासाठी पंढरीच्या वारीचा व्रतधर्म त्यांनी सांगितला आहे. गुरुवचनसुद्धा ऐकावी आणि त्याप्रमाणे आचरण करावे हाच भक्तिधर्म होय. नुसते तळमळत बसण्यात अर्थ नाही. मुखाने गोविंदनामाचे गायन कर. 'सावधान होई मना, आयुर्जाते क्षणाक्षणा, येरझार मुख्य प्राणा, म्हणोनिया घ्या नारायणा' ज्याला इहलोकी आणि परलोकी आत्महित साधावयाचे आहे त्याने संतांचे बोल आचरणातच आणले पाहिजेत. श्रीगुलाबराय महाराज सांगतात, 'मना चल झट झट हरिहर बोल ॥धृ॥ सद्‌गुरू सेवे वाचुनि नरतनु दवडी न माती मोल ॥१॥ मधुर खाऊनी युवती सेवुनी, घेऊ नको यमझोल ॥२॥ अलंदीपकरूणेने ओळख, जीव देव समतोल ॥३॥' परमार्थ प्रवृत्तीपासून ते ईश्वरविषयक शरण्यभावापर्यंत श्रीगुलाबराय महाराजांनी हितोपदेश केला आहे. ही 'भक्तिसुधा' सर्वांसच त्यांनी उपलब्ध करून ठेवली आहे. आत्महितासाठी तिचे सेवन करावे. भक्तिमार्ग हा सामाजिक शुद्धीचाच एक उत्क्रांती मार्ग होय. वाटचाल महत्त्वाची. तातडी महत्त्वाची. कल्याण व्हावे, ही प्रार्थना संतपदी करायची. पंथ अनंत आहे. देव अनंत आहे. ('पदांची गाथा' वरील मुक्तचिंतन)

**प्रा. डॉ. नरेंद्र सदाशिव कुंटे**

प्रज्ञा ए-७४, आसरा सोसायटी, होटगी रस्ता, सोलापूर ६०००१४

# षड्दर्शनाला श्रीमहाराजांचे योगदान

*एम.ए. (संस्कृत, पाली-प्राकृत, मराठी) पीएच.डी. (संस्कृत). सेवानिवृत्त संस्कृत प्राध्यापिका. श्रीगुलाबराव महाराज चरित्र हिंदी-मराठी प्रकाशित. कविता संग्रह प्रकाशित. प्रसाद, पुरुषार्थ, चेतना वगैरे नियतकालिकांतून लेख व कविता प्रकाशित. काही पुस्तकांचे हिंदीमध्ये अनुवाद. संस्कृत पुस्तके प्रकाशित संस्कृत, हिंदी, मराठी कविता वाचन, अनेक ठिकाणी व्याख्याने शोधनिबंधवाचन. महाराष्ट्र शासनाचा 'संस्कृत पंडित' म्हणून सत्कार.*

**षड्** दर्शनांचं विवेचन आजवर अनेकांनी केलं. त्या सर्वांचा अधिकार मोठा होताच. पण ज्या एका वेगळ्या, मूलगामी पद्धतीनं श्रीगुलाबराव महाराजांनी सहाही दर्शनांची सांगड घालून त्यांना भक्तितत्त्वाशी जोडलं, आणि शांकर वेदांताला अनध्यस्तविवर्ताची जोड देऊन 'तत्त्वमसि' या महावाक्यातून भक्तीचा अनुभव घडविला त्याला खरोखरच तोड नाही. षड्दर्शनांवर महाराजांचे भरपूर लिखाण आहे. त्यातून त्यांच्या प्रगाढ व्यासंगाचा आणि मूलगामी चिंतनाचा प्रत्यय तर येतोच, पण 'संतांच्या विभूती जगाच्या कल्याणा'' कशा झटतात याचीही साक्ष पटते. आज समाज विखुरलेला आहे. वातावरण स्फोटक होत चाललं आहे. आवश्यकता आहे मतैक्याची, मनःशांतीची ! ज्ञानोत्तर भक्तीनेच ही मनःशांती मिळू शकेल. म्हणून सर्व दर्शनांचा समन्वय साधून त्या समन्वित तत्त्वज्ञानाला परा भक्तीचा ओलावा देण्याचं अलौकिक कृत्य या विलक्षण द्रष्ट्यानं शतकापूर्वीच करून ठेवलं आहे ! त्यांच्या मौलिक योगदानाचा मागोवा घेण्याचा जमेल तितका प्रयत्न - स्वतःच्या कुवतीनुसार - प्रस्तुत लेखात केलेला आहे.

## सांख्य

**सांख्यसुरेन्द्र, सांख्यसार, सांख्यनिरूपण, श्रीधरोच्छिष्टपुष्टि** इ. ग्रंथातून महाराजांनी सांख्य तत्त्वज्ञानाबद्दलचे स्वतःचे असे विचार मांडले आहेत. वरवर पाहता असं दिसतं की सांख्यांना 'ईश्वर' हे तत्त्व मान्य नाही. **मुक्त-बद्धयोः अन्यतराभावान्न तत्सिद्धिः** (I 93) -- (मुक्त आणि बद्ध यावाचून भिन्न असणारा कुणी वेगळा पुरुष अस्तित्वात नाही, म्हणून या दोहोव्यतिरिक्त ''ईश्वर'' म्हणून कुणी आहे हे सिद्ध होत नाही.) **नेश्वराधिष्ठिता फलनिष्पित्तिः, कर्मणा तत्सिद्धेः** (VI 2) - (फलनिष्पत्ती कर्मामुळे होते, म्हणून ईश्वराच्या अधिष्ठानाची काही आवश्यकता नाही) आणि ईश्वरासिद्धेः ॥ सारख्या सूत्रांवरून प्रथमदर्शनी वाटते की सांख्य दर्शन ईश्वर मानीत नाही. पण महाराजांनी विस्तृत विवेचन करून निष्कर्ष काढला आहे की, 'ईश्वर नाहीच' असे निश्चयात्मक विधान येथे कुठेच नाही. ईश्वराची सिद्धी अशक्य आहे इतकंच म्हटलं आहे. याउलट स हि सर्वविद् सर्वकर्ता । ईदृशीश्वरसिद्धिः सिद्धा । (III 56–57) या सूत्रातून ध्वनित होते की पुरुष हाच ईश्वर असू शकतो ! महाराजांच्या मते अधिकारभेदानुसार हा उपदेश वेगवेगळा आहे. सर्व वचनांचा साकल्याने विचार करूनच सांख्य सेश्वर की निरीश्वर हे ठरवावे लागेल ! ईश्वराचं ऐश्वर्य मूढ साधकानं ऐकलं तर तो त्यातच आसक्त होईल आणि 'इहामुत्र फलभोगविराग' त्याच्यात उद्भवणारच नाही. तसं होऊ नये म्हणून 'ईश्वरासिद्धेः' हा उपदेश साधारण साधकांसाठी आहे. ईश्वराचीच जर सिद्धी नाही तर त्याच्या ऐश्वर्याबद्दल आसक्ती धरून काय उपयोग? - पण देवहूतीला मात्र ईश्वरभक्ती सांगितली आहे. कारण तिचा तसा अधिकार होता. महाराज म्हणतात की, सिद्धान्त तोच असतो पण अधिकारभेदानुसार योजना मात्र वेगवेगळ्या प्रकारे करावी लागते. म्हणून अज्ञान-अवस्थेत प्रकृतीला सत्य मानूनच वैराग्य-विवेकाचा अभ्यास करायला हवा. हा अभ्यास परिपूर्ण झाला की व्यतिरेक - आत्मज्ञान उद्भवते. त्यामुळे प्रकृती मिथ्या आहे ही अनुभूती येते. (अद्वैत वेदांतदेखील प्रातिभासिक सत्ता म्हणून अज्ञानावस्थेत हे मानतोच. पुढे मात्र अविद्येचा निरास झाल्यानंतर अन्वयानुभूती होते आणि जीव ब्रह्मरूप होतो). म्हणून **सांख्यसुरेन्द्रात** महाराजांनी म्हटले आहे की

***वृत्ती करावया आत्माकार । आहे स्वतंत्र दर्शन हे ॥११॥***

महाराज मुळात अद्वैतवादी. तरीही **परा भक्ती** हेच त्यांच्या मते अंतिम प्राप्तव्य.

***शाङ्करज्ञानसंयुक्तं भगवद्भक्त्यलङ्कृतं ।***
***यद् वाक्यं तत् प्रमाणं स्यादिति स्वमतनिर्णयः ॥***

हा त्यांचा सिद्धान्त. त्याच दृष्टिकोनातून ते सांख्यांकडेही पाहतात. त्यांनी 'सांख्य' शब्दाचा अर्थही त्यानुरूपच लावला आहे. ते म्हणतात –

सं = सम्यक्. ख्या = ख्यापनरूपं सांख्यम् ।
सम्यक् म्हणजे एकं ब्रह्म ।
तस्य ख्या (कथनं) म्हणजे संख्या ।
तस्याः भावः सांख्यम् म्हणजे उपनिषदीय ब्रह्मज्ञान

चोवीस तत्त्वांचं ज्ञान हे साधन. जेव्हा प्रकृतीसोबत इतरही तत्त्वांचा निरास होतो, तेव्हा ज्ञानसंपन्न झालेला पुरुष केवळ 'साक्षी' आणि 'असंग' होऊन उरतो. म्हणून 'शुद्ध आत्मतत्त्वाच्या निर्गुण - निराकार साक्षीस्वरूपाचं यथार्थ ज्ञान सांगणारं शास्त्र ते सांख्यशास्त्र' असं महाराजांचं मत आहे. सांख्यांसंबंधी वेगळं, स्वतंत्र, अद्वैतपोषक आणि तरीही परंपरेला न त्यागता केलेलं हे चिंतन आहे. अज्ञानावस्थेतील एका विशिष्ट सीमेपर्यंत त्यांनी सांख्यांचे प्रकृती, पुरुषबहुत्व हे सिद्धांत स्वीकारले आणि ज्ञातृ-अवस्थेत अलगद सांख्याला उचलून वेदांताच्या मांडीवर बसवलं ! हे करतांना ईश्वरसिद्धीचीही भर घातली. अन् हे सारं सांख्यांच्या मूळ वचनांना धक्का न लावता ! कपिलमुनींवर पूर्ण श्रद्धा ठेवून !

## योग

हे दर्शन सांख्य दर्शनाला पूरक आहे. सांख्याद्वारे आत्म-अनात्म ज्ञान झाल्यानंतर आत्मानुभवाची पायरी. त्यासाठी योगप्रक्रिया. योगावर महाराजांनी एकूण आठ ग्रंथ लिहिले. **योगप्रभाव, निदिध्यासनप्रकाश, हिरण्ययोग, ध्यानयोगदिवाकर, योगांगयमलक्षण, कुंडलिनी, जगदंबा आणि सोपानसिद्धी** हे ते ग्रंथ. याव्यतिरिक्त इतरत्रही त्यांनी योगाबद्दल नवीन विचार आणि प्रक्रिया मांडल्या आहेत.

असंप्रज्ञात समाधी साधणं हे योगदर्शनाचं ध्येय. **ध्येय-ध्याता यांचं ऐक्य म्हणजे समाधी** (योगप्रभाव, पृ.२३) योगविषयक अनेक ग्रंथातून समाधीबद्दल विस्तृत विवेचन पूर्वीही झालं आहे. पण असंप्रज्ञात समाधीचे तीन प्रकार मात्र महाराजांनीच प्रथम मांडले. ते असे –

**१) आपोआप व्युत्थान पावणारी असंप्रज्ञात समाधी –**

योग-प्राणायामानं समाधी साधली, तरी साधकाच्या वासना 'नष्ट' झालेल्या नसतात. त्या फक्त 'निरुद्ध' असतात. त्यामुळे कालांतरानं ही समाधी आपोआप व्युत्थान पावते आणि मग जगद्भ्रम पुन्हा भासू लागतो. इथे महाराजांना ईश्वरप्रणिधान न करणारा योगी अभिप्रेत आहे.

**२) दुसऱ्याद्वारे व्युत्थान पावणारी –**

इथं त्यांनी विष्णूच्या शंखनादानं व्युत्थित झालेल्या प्रल्हादाचं उदाहरण दिलं आहे.

**३) व्युत्थानरहित असंप्रज्ञात समाधी –**

**ज्ञानोत्तर पराभक्ती करणाऱ्या अधिकारी योगी भक्ताचीच ही अवस्था** असं महाराज सांगतात. जीवेश्वरभेद संपूर्णतया नष्ट होणं, ध्येयध्याता यांचं जाणीवरहित ऐक्य साधणं म्हणजे असंप्रज्ञात समाधी. 'याची समाधी भंग झाली' असं इतरांना वाटलं तरी प्रत्यक्ष योग्याचा ब्रह्मानंद त्याची आराध्य-प्रेम-समाधी त्याही स्थितीत अभंगच असते. असे योगी जीवन्मुक्त असतात आणि तेही अगदी सहजतया ! महाराज म्हणतात.

*येथे समाधिशब्दार्थ । ध्यातृध्येयैक्यपरमार्थ ।*
*की जीवेश्वरभेद समाप्त । व्युत्थानीही जयाचा ॥ (गीतासंगती ६४ ॥)*

याच चिंतनप्रक्रियेतून त्यांनी 'त्वंपदनिष्ठ' आणि 'तत्पदनिष्ठ' समाधी हे दोन प्रकार अगदी नव्याने मांडले. **त्वंपदनिष्ठतया आत्मरूपे समाधिः आणि तत्पदनिष्ठतया प्रेमरूपे भगवति समाधिः** असं म्हणून **तयोः रक्षणं तु महावाक्यनिष्ठतया** असंही त्यांनी आवर्जून सांगितलं. हे सर्व नवीन प्रकार उकलून दाखवतात की भक्तीची समाधी कशी असते आणि तिचं मर्म काय ! त्याचसाठी त्यांनी समाधीपादातील 'ईश्वरप्रणिधानाद्वा ॥' (समाधिपाद, २३) या सूत्राचा अर्थ वेगळ्या प्रकारानं केला आहे. अनेकांनी या सूत्रातल्या 'वा' शब्दाला विकल्प मानून ईश्वरप्रणिधानाला गौणत्व दिलं आहे. महाराजांनीही 'वा' शब्द विकल्पात्मकच घेतला, पण त्याद्वारे योग आणि भक्तीची समानता दर्शविली. इतकंच नाही तर घेरंडाचार्यांचा दाखला देऊन सिद्ध केलं की योगसाधनेत ईश्वरप्रणिधान हवंच – कारण व्युत्थानरहित असंप्रज्ञात समाधीची अवस्था त्यामुळेच प्राप्त होऊ शकते !

ईश्वरप्रणिधानाचेही आत्म-अभिन्न (व्यतिरेकाने साधणारं निर्गुण ईश्वरप्रणिधान) आणि आत्मभिन्न (आधी उपासना करून मग ज्ञानोत्तर परा भक्तीनं साध्य होणारं सगुण ईश्वरप्रणिधान) असे दोन अगदी नवीन प्रकार त्यांनी मांडले.

शेवटी या सर्वांचं सार हेच की **सांख्योक्त विवेकानं** विराग उत्पन्न होऊन **'त्वम्' पदाचं शोधन होतं, योगानं इंद्रियं उपरम पावल्यामुळे 'तत्' पदाचं शोधन होतं, वेदांताच्या महावाक्यानं ब्रह्मबोध होऊन 'तत्' आणि 'त्वम्'चं ऐक्य साधतं पण शेवटी अखंड ब्रह्माकार होण्याचं सौख्य मात्र परा भक्तीनंच लाभतं.**

## न्याय-वैशेषिक

**न्याय-सूत्र** आणि **युक्तितत्त्वानुशासनम्** हे दोन ग्रंथ महाराजांनी लिहिले, पण दुर्दैवाने दोन्ही अपूर्णच राहिले. वस्तुतः मोक्षप्राप्ती किंवा पराभक्ती यासाठी या दोन्ही शास्त्रांचा फारसा उपयोग नाही पण ब्रह्मप्राप्तीसाठी अनुमानाच्या सहाय्यानं मनन करावं आणि श्रुतिसंमत तर्काच्या सहाय्यानं विचारातले दोष दूर करावेत असा विचार महाराजांनी मांडला आहे. ते म्हणतात की पूर्वी अनुमानाच्याच बळावर बौद्धांना परास्त करण्यात न्यायशास्त्र विजयी झालं. त्याप्रमाणे आजही प्रत्यक्ष खंडाचा (वैशेषिक शास्त्राचा) विस्तार केल्यास आर्य भौतिकशास्त्राचा पुन्हा उत्कर्ष होऊ शकेल. निःश्रेयसासाठी फारसा उपयोग नसला तरी अभ्युदयासाठी ही शास्त्रं निश्चितच महत्त्वाची आहेत असं महाराजांनी प्रतिपादन केलं आहे. त्यांनी स्पष्टपणे लिहिलं आहे की, या विषयावर स्वतंत्र ग्रंथ लिहिण्याची मला सवड नाही. कारण माझा आवडता विषय 'भक्ती' आणि 'वेदांत' आहे. (सप्तम यष्टि) पण तरीही त्यांचा आग्रह होता की 'तर्कशास्त्राकडे न्यायाचा जोर वाढलाच आहे, तो आता द्रव्यगुण निरीक्षणाकडे वाढवावा.' त्यामागे त्यांची तळमळ होती की, **'नवीन आर्य भौतिकशास्त्र हे पाश्चात्य भौतिकशास्त्राचे भाषांतर न ठरता 'भाषांतराचे मूळ' ठरावे, असा जोरदार प्रयत्न झाला पाहिजे.'**

या शास्त्रांचा उपयोग आज कशा प्रकारे करून घेता येईल या संबंधी त्यांनी बऱ्याच सूचना केल्या आहेत. त्या सर्वांचा हाच निष्कर्ष निघतो की ईश्वराधिष्ठित असं आर्य भौतिकविज्ञान हे शास्त्र तयार करू शकतं आणि त्यातून भौतिक सुखासोबतच मनःशांतीसाठी आवश्यक असणारा धर्मही साधू शकतो.

## पूर्वमीमांसा

वेदांच्या पूर्व भागात यज्ञयागादि कर्मकांड आहे आणि उत्तर भागात औपनिषदिक तत्त्वज्ञान. दुःखनिवृत्ती आणि अखंड सुखप्राप्ती हा परमपुरुषार्थ खरा, पण जोपर्यंत जीव संसारालाच सुख मानतो, तोपर्यंत त्याला मुक्तीचा मार्ग दाखवूनही उपयोग नाही - म्हणून ऐहिक सुखांपेक्षा स्वर्गसुख श्रेष्ठ आहे असं सांगून जीवाला स्वर्गादी फलांकडे प्रवृत्त करण्याचं काम पूर्वमीमांसा करते. नंतर 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति' हे जाणवल्यावर अखंड सुख फक्त आत्मज्ञानानंच लाभेल ही भावना बळावली की वेदान्ताचं काम सुरू होतं. पूर्व अंगातून उत्तर अंगात प्रवेश हेच पूर्वमीमांसेचं फलित. म्हणून महाराज म्हणतात, **''शब्दप्रधान वाक्यांचा पूर्वमीमांसेत विचार असून अर्थप्रधान वाक्यांचा उत्तरमीमांसेत विचार आहे.''**

मीमांसक मानतात की यज्ञातील मंत्रोक्त आहुती स्वीकारणाऱ्या देवता मंत्रांहून भिन्न नाहीत. या मंत्ररूप देवतावादाचं महाराजांनी निरसन केलं आणि तेही मीमांसेच्याच पद्धतीनं. मीमांसा ईश्वर मानत नाही असा जो सर्वसामान्य समज आहे तोही त्यांनी मिटविला आहे. ते म्हणतात की, वेदोक्त उपासना मीमांसेला मान्य आहेच. म्हणजे अप्रत्यक्षपणे का होईना, पण 'उपास्यत्व' धर्म असलेला कोणीतरी 'धर्मी' त्यांना स्वीकार्य आहे. तोच वेदान्ताचा ईश्वर ! म्हणजे पूर्वमीमांसेतूनही ईश्वराला अनुकूल असलेलं सूक्ष्म विचारसूत्र महाराजांनी नेमकं टिपलं ! इतकंच नव्हे तर नामस्मरणाचं माहात्म्यदेखील अगदी मीमांसापद्धतीनंच सिद्ध केलं. त्यासाठी मीमांसेतल्या अर्थवादाच्या तिन्ही प्रकारांचं सविस्तर विवेचन केलं आणि नामस्मरणाला अर्थवाद म्हणणाऱ्यांना ठणकावून पटवून दिलं की, गुणवाद, भूतार्थवाद, अनुवाद यापैकी एकाही प्रकारात नामस्मरण मुळी बसतच नाही, तर ते अर्थवाद कसं? नाममाहात्म्याचं इतकं काटेकोर शास्त्रशुद्ध विवेचन इतर कुणी केलं असेल असं वाटत नाही.

शेवटी त्यांनी हे सिद्ध केलं की नामस्मरण कर्तृतंत्र नसून वस्तुतंत्रच आहे. मीमांसेतल्या यज्ञीय हिंसेचं तात्पर्य शेवटी अहिंसेतच होतं हेही त्यांनी कठोर युक्तिवाद आणि विपुल प्रमाणवचनं देऊन दाखवून दिलं आहे. ते सारं मुळातूनच वाचणं श्रेयस्कर ! पूर्वमीमांसेच्याच पद्धतीनं मांडलेले हे नवीन मुद्दे त्यांचा प्रगाढ व्यासंग दर्शवितात आणि नतमस्तक व्हायला लावतात !

## वेदान्त

शेवटी ही पाचही दर्शनं पोषक होतात ती वेदान्तालाच. म्हणून वेदान्तदृष्टीनं महाराजांनी या सर्व दर्शनांचा समन्वय साधून दाखवला आहे; आणि अद्वैत वेदांताच्या मूल्यवान (पण टणक असणाऱ्या) शिरपेचाला परा भक्तीच्या भावसमृद्ध झिरमिळ्यांची जोड देऊन विलक्षण सौंदर्य प्राप्त करून दिलं आहे. ही एक अद्भुत किमयाच म्हणावी लागेल !

या समन्वयाचा सर्वोच्च बिंदू म्हणजे त्यांनी वेदांताला दिलेली **अनध्यस्तविवर्ताची** नवीन संकल्पना. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातली ही फार मोठी उपलब्धी आहे. याच अनध्यस्त विवर्ताच्या माध्यमाद्वारे महाराजांनी "तत्त्वमसि" या महावाक्याच्या विवेचनातून पराभक्तीचा विलास साधला आहे.

## अनध्यस्तविवर्त

'विवर्त' ही शब्दयोजना मुळात शांकर तत्त्वज्ञानाची. अविद्येमुळे ब्रह्मावर झालेला जगद्रूपी भ्रम म्हणजे विवर्त. हा अध्यासामुळे झालेला म्हणून अध्यस्त. रज्जुसर्प हा याचं परिचित उदाहरण. दोरीच्या जागी सापाचा भ्रम होतो तो अध्यासामुळे. पण ही प्रातिभासिक अवस्था ओलांडून जेव्हा ज्ञाता पलीकडे जातो तेव्हा त्याला प्रत्यय येतो की ही दोरीच आहे. साप नाही. दोरी या अधिष्ठानाची प्रतीती आली की विवर्त (साप) मिथ्या आहे याची जाणीव होते. या विवेचनात दोरी (अधिष्ठान) आणि साप (अधिष्ठित) यात सत्यत्व-मिथ्यात्व हे द्वैत कायमच आहे. पण महाराजांनी अनध्यस्त विवर्ताची नवीन संकल्पना मांडून हे द्वैतच नष्ट केलं आहे.

यासाठी त्यांनी सुवर्ण अलंकार आणि समुद्रलाटा हे दृष्टांत योजले. सुवर्णाचं ज्ञान झालं तरी अलंकाराचं ज्ञान नष्ट होत नाही. अलंकार मिथ्या ठरत नाही. उलट हा अलंकार निखळ सोन्याचा आहे हे कळल्यानंतर तो अधिकच प्रिय वाटू लागतो. जितकं आकर्षण मूळ सोन्याचं, तितकंच अलंकाराच्या आकाराचंही वाटतं – कारण सुवर्ण आणि अलंकार यात मुळी भेद नाहीच – त्याचप्रमाणे व्यतिरेक ज्ञानानं निर्गुण ब्रह्माची अनुभूती आल्यानंतर, सगुण मूर्तीतही तेच ब्रह्म ओतप्रोत सामावलेलं आहे असा अन्वयानुभव घेतला की मूर्तीही ब्रह्ममयच बनते. अधिष्ठान-अधिष्ठित असा भेद मुळी उरतच नाही. महाराज म्हणतात की परब्रह्म निर्गुण निराकार आहे ही अनुभूती समाधी अवस्थेतली. पुढे व्युत्थान दशेत नामरूपाचा प्रत्यय येणारच. मग स्वतःला प्रिय असणाऱ्या भगवद्विग्रहात तेच परब्रह्म आहे ही अन्वयानुभूती का नसावी?

हा भगवद्विग्रह अध्यस्त नाही. तो ब्रह्ममयच आहे, पाञ्चभौतिक नाही. कारण तो कर्मामुळे उत्पन्न झालेला नाही. महाराज म्हणतात की, ज्याची भक्ती केल्यामुळे योग्यांचा पांचभौतिक देहही दिव्यत्व पावतो, त्या भगवंताचा देह पांचभौतिक असेलच कसा? **'प्रेमनिकुंज'** मध्ये त्यांनी भगवद्विग्रहाच्या पांचभौतिकतेचं समूळ खंडन केलं आहे. ते म्हणतात की कुंभार हा घटाचं निमित्तकारण. घट बनविल्यानंतर कुंभार नसला तरी घट कायमच राहतो. म्हणून कुंभार हा 'निवृत्त-निमित्त' कारण. तद्वत भक्ताच्या आवडीप्रमाणे आकार धारण करून भगवंत त्याला दर्शन देतो. ही आवड अविद्याजन्य आहे. म्हणून माया/अविद्या हे भगवद्देहाचं 'निवृत्तनिमित्त' कारण. ज्ञान झाल्यानंतर माया निवृत्त होते पण तिनं निर्मिलेली भगवत्तनू मात्र जशीच्या तशीच राहते. भगवंताचा लीलाविग्रह हा अध्यास नव्हे, तर ते पूर्णब्रह्मच आहे. सच्चिदानंदातील **'आनंद' अंशावर स्थित** असणारा हा विग्रह म्हणजे भक्तावर अनुग्रह करण्यासाठी सगुणसाकार झालेलं पूर्णब्रह्मच. हा लीलाविग्रह स्वरूपलक्षणात्मक असून तो **महावाक्यातील 'तत्' पदाचा लक्ष्यांश आहे**. तो मूळ अधिष्ठानाचाच विलास आहे. त्याची परा भक्ती हेच परम प्राप्तव्य आहे असं महाराजांनी अनुमान आणि आगम या प्रमाणांद्वारे पटवून दिलं आहे.

**त्वम्-पद** – महावाक्यातील 'तत्' पदाचा असा परा भक्तिपर अर्थ लावल्यानंतर महाराज 'त्वम्' पदाकडे वळतात. **त्वंपदज्ञो परो भक्तः** हा त्यांचा **'स्वमतनिर्णय'** आहे. हा भक्त तरी कसा? तर व्यतिरेकज्ञानानं ज्याचा देहाभिमान विरघळून गेला आहे, अन्वयज्ञानामुळे जो भगवद्विग्रहाची भक्ती करतो आहे आणि त्या भक्तीच्याच बळावर ज्याचा देहही ब्रह्मरूप झाला आहे असा तो भक्त आहे. **ध्यानयोगविभाकर** या ग्रंथात महाराजांनी पराभक्तीस योग्य असणाऱ्या **"त्वंपदलक्ष्य"** भक्ताचं विवेचन केलं आहे.

महावाक्यातलं **'असि'** हे पद 'तत्' आणि 'त्वम्' चं ऐक्य साधतं. त्याच पदातून महाराजांनी **'तत्पदलक्ष्यांश भगवान'** आणि **'त्वंपदलक्ष्यांश भक्त'** यांचं भक्ति-ऐक्य साधून दाखवलं आहे. भगवंताच्या भक्तिचिंतनात सुखाची जाणीव न होता भक्त सुखाकार होऊन राहतो. सुखाची जाणीव झाली तर 'धन्योऽहम्' ही वृत्ती जागृत होईल. म्हणजेच 'आनंद' अंश कमी होऊन 'चिद्' अंश प्रधान होईल. पण स्वसुखाची जाणीवच नसेल तर फक्त **'तत्सुखसुखित्व'** च उरेल.

अशा वेळी भक्ताच्या वृत्ती तल्लीन असल्या तर निर्गुण समाधी साधेल आणि जर वृत्ती स्फुरण पावल्या - व्युत्थान झालं तरी प्रेमसमाधी अभंगच राहील. सगुणाच्या भक्तीत लीन झालेला तो भक्त स्वतः निर्गुणच होऊन जातो आणि भक्त-भगवान दोघेही अनध्यस्त असा विवर्त होऊन एकाकार होतात. **'शिवो भूत्वा शिवं यजेत्'** ही उक्ती अशा वेळी साकार होते. हेच ते **'असि'** पद असं महाराज म्हणतात.

अशा तऱ्हेनं महाराजांनी प्रतिपादन केलं आहे की परब्रह्माच्या 'सच्चिदानंद' लक्षणातील **'आनंद' अंशावरच परा भक्तीची इमारत** उभी आहे आणि 'तत्त्वमसि' या महावाक्यातून अद्वैतज्ञान-प्राप्ती झाल्यानंतरही **अखंड असंप्रज्ञात समाधीसाठी ईश्वरप्रणिधान** - त्यातही परा भक्ती कशी ग्रहण करावी हेही त्यांनी स्पष्ट केलं आहे. भक्तीला शास्त्रीय बैठक देऊन त्याच भरभक्कम पायावर महाराजांनी 'मधुराद्वैत' संप्रदायाची उभारणी केली आहे.

षड्दर्शनाचा गाढा व्यासंग आणि सांगोपांग विवेचनपद्धती अनेकात आढळते. पण दर्शनांना नवीन आयाम देण्याचं कसब फक्त महाराजांचंच ! षड्दर्शनांना त्यांनी दिलेले नवे प्रेरक आयाम, भक्तीला दिलेली शास्त्रीय बैठक, अद्वैत तत्त्वज्ञानाला दिलेली अनध्यस्त विवर्ताची देणगी आणि या भरभक्कम पायावर मधुराद्वैताची उभारणी या सर्व गोष्टी एकमुखानं हेच सांगतात की महाराज हे फक्त 'विद्वान्' नव्हते, फक्त 'संत' नव्हते तर 'ऋतंभरा प्रज्ञा' लाभलेले एक मनीषी 'ऋषि' होते !!!

**डॉ. लीना रस्तोगी**
'दिलासा' ६४/ब कोठारी ले आऊट उमरेड, जि. नागपूर - ४४१२०३

# १९ व्या शतकातील माऊलींचे अनुग्रहीत प्रज्ञाचक्षु संत गुलाबराव महाराज

*जी.डी.आर्ट, एफ.डी.आर्ट, ए.आय.टी.पी. (इंडिया) एफ.आय.व्ही. (इंडिया) ए.आय.आय.ए. आर्कीटेक्ट, टाऊन प्लॅनर, व्हॅल्यूअर जून १९८७ पासून. १९६७-८७ महाराष्ट्र शासन नगर रचना व मूल्य निर्धारण विभाग वर्ग १ अधिकारी. मोठ्या शहराचे विकास योजना आराखडे तयार केले. श्रीज्ञानेश्वर महाराज संस्थान आळंदी कमिटीवर १९९४-२००१ नियुक्ती. श्रीज्ञानेश्वर महाराज पोस्ट तिकीट व महाराष्ट्र शासन रु. २५/- लाख स्वस्त ज्ञानेश्वरीस अनुदान.*

**श्री** गुलाब गोंदूजी मोहोड, यांचा जन्म ६ जुलै १८८१, आषाढ शुद्ध १० रोजी अमरावतीजवळील माधान गावी सामान्य कुटुंबात झाला. परमेश्वराचे काय संकेत असतात व कोणाचे हातून काय घडावयाचे असते त्याप्रमाणे जन्मानंतर फक्त ९ व्या महिन्यात महाराजांना अंधत्व आले. तथापि हीच आपत्ती इष्टापत्ती ठरली. आपल्याला डोळे नाहीत, ह्याची महाराजांना अजिबात खंत नव्हती. घरातील व गावातील सर्व लोकांना असे वाटले की महाराजांचे लौकिक आयुष्य संपले. व हा गुलाब आपल्याला जन्मभर पोसायला लागेल.

तथापि संकेत निराळे होते. महाराजांनी ४ वर्षे माधानला वास्तव्य करून नंतर ६ वर्षे लोणी - टाकळी येथे वास्तव्य केले. जन्मानंतरच्या १० वर्षांच्या काळात महाराजांना आपले मूळ चक्षू व दृष्टी गेली असली तरी त्या जागी प्रज्ञाचक्षू जागे झाले आहेत, याची प्रचिती आली. हाच आयुष्यातील कलाटणीचा बिंदू ठरला. या नंतरच्या १० वर्षांच्या काळात माधानला वास्तव्यामुळे महाराजांमध्ये अचानक दैवी गुणांचा उदय झाला. आपल्याला सर्वज्ञ व्हावयाचे आहे, त्यामुळे आपल्या धर्माची सर्व ग्रंथ संपदा आपल्याला ज्ञात हवी, ह्या एका ध्यासाने महाराज आपले धर्मातील सर्व मूलभूत ग्रंथ, वेद, उपनिषदे इत्यादी साहित्य आपल्या नातेवाईक-गावातील लोक इत्यादींकडून वाचून घेऊ लागले. त्यासाठी जे परिश्रम घ्यावे लागतील ते सर्व महाराजांनी घेतले. सन १९०० च्या सुमारास महाराज एक उत्तम विद्वान, ज्ञानी, अभ्यासू, चिकित्सक व अभंग-निबंधाची रचना करणारे आहेत हा बोलबाला विदर्भात झाला. १८९६ मध्ये त्यांचा विवाह झाला. १८९७ मध्ये आनंद मार्ग इत्यादी गोष्टींचे अभ्यासपूर्वक खंडन केले. याच वेळेस बालसंवगड्यांना आशिर्वचन दिले. अमरावतीजवळील सिरसगाव, चांदुरबझार, टाकळी आदी ठिकाणी सामान्य जनांना ज्ञान देण्यासाठी महाराजांनी भ्रमंती केली. महाराजांना याच वेळेस आतून सारखा आवाज येत होता घर सोड, पाटीलकी सोड, तुझा जन्म या ऐहिक सुखांसाठी नाही. मनामध्ये एकसारखा नामजप चालू होता. महाराजास, संत ज्ञानेश्वर महाराजांचे वाङ्मय, कार्य व विभूतीमत्त्व कर्णोपकर्णानि ज्ञात झाले होते. ज्ञानेश्वरी या ग्रंथाविषयी त्यांना प्रेम निर्माण झाले. एकपाठी हा त्यांचा उपजत गुण होता. गावातल्या ४/५ साक्षर मंडळींकडून सर्व महत्त्वाचे ग्रंथ वाचून घेऊन ते मुखोद्‌गत केले. महिम्न स्तोत्र, काशीखंड, पांडवप्रताप वगैरे संदर्भ ग्रंथ त्यांनी केव्हाच ज्ञात करून घेतले. महाराजांना लहानपणापासून ढोंगी व फसव्या व्यक्तींचा राग येई. समाजातील निरक्षर व्यक्तींना ढोंगी लोक अंधश्रद्धेच्या पोटी फसवत, हे महाराजांनी ओळखले. माऊलींनी १२/१३ व्या शतकात जर क्रांती केली, कर्मठपणा मोडून काढला. सर्व ज्ञान भांडार प्राकृतात मराठी भाषेत आणले, तर आम्ही अजून का मागे आहोत. माऊलींनी २२ व्या वर्षी संजीवन समाधी घेतली. थोडक्या अवधीत जागतिक कीर्तीचे तत्त्वज्ञान समाजापुढे मांडले. सर्व बहुजन समाज केंद्रस्थानी धरून तळागाळात भागवत संप्रदाय पोहोचविला. हे सर्व महाराजांना प्रज्ञाचक्षूद्वारे उमजू लागले. त्यांना एकच ध्यास लागला. माऊलींनी आपल्याला अनुग्रह द्यावा ही नि:स्सीम इच्छा त्यांना ग्रासू लागली.

१९०१ साल उजाडले. नवीन शतकाचे आपण स्वागत करतो. या शतकात चांगले दिवस जावोत म्हणून आपण परमेश्वराची प्रार्थना करतो. महाराजांना बरोबर २२ वे वर्ष लागले. माऊलींचा अनुग्रह काळ समीप आला होता. वरवर बघितले तर अनुग्रह हा गुरुकडून मिळतो. गुरु साक्षात आपल्या समीप असतो. येथे माऊली आळंदीला संजीवन समाधी घेऊन बसलेल्या, गुलाबराव महाराज माधानहून आळंदीला आले. अडीच दिवस मंदिर संकेताप्रमाणे अनुष्ठान केले. माऊलींनी महाराजांना अनुग्रह दिला. महाराज धन्य झाले. यासंबंधी त्यांचे अभंग व ओव्या पहा :

अभंग

*माझे तंव काज केव्हांचेची झाले ।*
*जैसे कानी दिले वर्ण चारी ॥१॥*
*आता तुझे तुज लागे देखणे ।*
*कलंकीत होणे नोहे कुळी ॥२॥*
*पुढील समस्त नाही माझे हाती ।*
*पहावे जागृती येऊनिया ॥३॥*
*आळंदीशा तुम्हा निवृत्तीची आण ।*
*आपले चरण लोपाजरी ॥४॥*

ओव्या

*माझा सद्‌गुरु करुणाघन ।*
*आळंदीपती कल्याणनिधान ।*
*जेणे आपुलिया नामाचा मंत्र देऊन ।*
*कृतार्थ केले मजलागी ॥*
*कैवल्य कनकाचिया दाना ।*
*जो न कडतीघोर साना ।*
*ब्रह्म्याचे दर्शन ॥*
*पाठाऊ जो "या साच करावया निजवचना"*
*न देखोनि मम पात्रपणा ।*
*अंकी घेवोनी तुष्णा ॥*
*सांगितल्या स्वनामाच्या ॥*

महाराजांच्या आयुष्यातील हा एक पर्वकाळ होता. ग्वाल्हेरचे स्वानंद साम्राज्यकर्ते श्रीमत् जठार यांना महाराजांनी पत्र टाकले.त्यात बरेच नवनवीन तत्त्वज्ञान, जागतिक कीर्तीच्या शास्त्रज्ञांच्या सिद्धांतांवर महाराजांनी भाष्य केले होते. डार्विनच्या सिद्धांतावर मतसमीक्षा प्रगट केली होती. डार्विनच्या

मताचा शास्त्रीय दृष्ट्या उहापोह केला. मानभावमत समीक्षा, स्पेन्सर मतसमीक्षा, स्त्रीगीते, लोकगीतांची रचना, ओव्या झोपाळ्यावरील व जात्यावरील गीतांची रचना केली. १९०२ मध्ये महाराजांनी कात्यायनी व्रताचा आरंभ केला. यावरून कळेल की महाराजांचा आध्यात्मिक व पारमार्थिक प्रवास सुरू झाला.

संत गुलाबराव महाराजांचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे महाराजांना शास्त्रीय दृष्टिकोन होता. विज्ञानाची प्रगती १८ व्या शतकापासून सुरू झाली होती आता येथून पुढे आपल्याला वैज्ञानिक दृष्टिकोन ठेवून आपली प्रत्येक कृती विज्ञानाशी निगडीत हवी. महाराज कलकत्ता येथे गेले. व तेथे प्राध्यापक प्रियनाथ मुखर्जीकडे मुक्काम केला. मुक्कामामध्ये त्यांनी जगदीशचंद्र बोस यांच्या ग्रंथाची समीक्षा केली. तेथून जगन्नाथपुरीची यात्रा करून मायर्सच्या ग्रंथाची समीक्षा केली. उत्क्रांतवाद, अणुवाद, अज्ञेयवाद, संशयवाद वगैरे पाश्चात्य तत्त्वज्ञानांची भारतीय सिद्धांतांशी तुलना व मूल्यमापन करण्याचे कार्य महाराजांनी केले. नीतीशास्त्रातील युरोपियन मतांचे खंडन पण महाराजांनी केले. याची तुलना भारतीय नीतीशी वेगळ्या रीतिने समन्वय साधणे व दैनंदिन सदाचाराचा उपदेश आदी विचार महाराजांचे होते. ॲलोपथी व आयुर्वेदाची तुलना महाराजांनी केली व आयुर्वेद श्रेष्ठ कसा आहे, हे सोदाहरण दाखविले. मानसायुर्वेदाची निर्मिती केली. पाश्चात्य आणि भारतीयही मानसशास्त्रांची तुलना करून भारतीय पण कशात कमी नाहीत हे दाखविले. इस्लाम, इसाई, पारशी, बौद्ध, जैन वगैरे धर्मांचा अभ्यास महाराजांनी केला व संशोधनपर अभ्यास होणे गरजेचे आहे, असे प्रतिपादन केले.

१९०४-१९०५ मधे ग्रंथराज ज्ञानेश्वरीच्या निरूपणास प्रारंभ केला. निरूपण व चिंतन करीत असताना ज्ञानेश्वरीच्या उपलब्ध प्रतीमध्ये नसलेली ओवी सांगितली. या त्यांच्या प्रज्ञाबुद्धीवर समस्त समाज अवाक् झाला. मधुराद्वैत भक्तीमुळे महाराज आपल्याला ज्ञानेश कन्या म्हणू लागले. समस्त समाज महाराजांच्या निरूपणावर हेलावून जायचा. महाराजांचे गूढ ज्ञान विज्ञानाधिष्ठीत भाष्य, प्रत्येक बाब चिंतनातून समाजास सांगण्याची पद्धती हे सगळे पाहून महाराज म्हणजे एक चमत्कारच आहे, असे समाज मानू लागला. ९ व्या महिन्यांत डोळे गेले असले तरी लौकीक अर्थाने कोणतेही शिक्षण झालेले नव्हते. केवळ प्रज्ञाचक्षूंद्वारे ज्ञान प्राप्ती करून घेऊन अगदी लहान वयात सर्वज्ञता प्राप्त होणे हे साध्या माणसाचे लक्षण नाही.

१९०७ मध्ये नागपूर येथे महाराजांनी ज्ञानेश्वर मुद्रणालयाची स्थापना केली. त्यामुळे महाराजांचे ग्रंथलिखाण व छपाई याला सुरुवात झाली. १९०९ मध्ये अंतर्विज्ञान संहितेचा अभ्यास केला. व्याख्यानमाला, ग्रंथ रचना इत्यादी बाबी आता नित्याच्या झाल्या होत्या. महाराजांचा संबंध या अभ्यासामुळे खालील महत्त्वाच्या व्यक्तींशी आला. त्यांच्याशी वादविवाद, संवाद, चर्चासत्र इ. सर्व गोष्टी १९१० ते १९१३ पर्यंत पूर्ण झाले. महाराज कलकत्ता येथे प्रा. प्रियनाथ मुखर्जींना भेटले. नागपूरला डॉ. मुंजेंना पत्रे लिहिली. साहित्यसम्राट न.चि.केळकरांशी भेट व चर्चा झाली. या कालावधीत महाराजांनी विविध विषयांवर पत्रे, लेखन, व ग्रंथ निर्मिती केली. एकूण १३० ग्रंथांची रचना, २०९९ अभंग, २२५२ पदे, १२५० गीत रचना, १००० श्लोक, २३,००० ओव्या असे सगळे साहित्य महाराजांनी निर्माण केले. चर्मचक्षु नाहीत याची उणीवच भासली नाही.

१९१४ मध्ये महाराजांना श्री निवृत्तीनाथांनी दृष्टांत दिला. देवासचे राज्यांशी पत्रव्यवहार महाराजांनी केला. संगीतकार पंडित भातखंडे यांची गाठ महाराजांनी घेऊन संगीतावर चर्चा केली. अशा या प्रज्ञाचक्षू महाराजांनी २० सप्टेंबर १९१५ मध्ये पुणे येथे माऊलींना देह अर्पण केला. १८८१ ते १९१५ या ३४ वर्षांच्या अल्प आयुष्यामध्ये जन्मतः चर्मचक्षू गेले असताना समाज कार्य, ग्रंथ निर्मिती व तत्त्वज्ञानावर तज्ञ मंडळींना चकीत करून सोडणारे असामान्य संत गुलाबराव महाराज म्हणजे आमच्या महाराष्ट्राचे एक भूषण आहे. श्री ज्ञानेश्वर महाराज संस्थान कमिटीने या निःसीम माऊली भक्ताची स्मृती समाजास करून देण्यासाठी १ मे ते ८ मे या कालावधीमध्ये आळंदीच्या संजीवन समाधी मंदिरात मोठा सप्ताह घडवून आणला. आळंदीच्या हरिपाठ आश्रमाचे कार्यवाह व महाराजांच्या घराण्यातील सध्याचे त्यांचे वंशज ह.भ.प. नारायणराव मोहोड, महाराजांचे चाहते ह.भ.प. पंडित किशोरजी व्यास, ह.भ.प. गिरीधरलाल काळे, ह.भ.प. सुनील महाजन, श्री. नंदकिशोर एकबोटे व नागपूरचे डॉ. भैयासाहेब घटाटे यांनी हा सप्ताह उत्तम रीतिने साजरा करण्यासाठी फार परिश्रम घेतले. देवस्थानचे विश्वस्त मा.सु. वा. जोशी व ॲड प्रतापराव जाधव यांनी सप्ताहास बहुमोल सहाय्य केले. २१ व्या शतकाच्या सुरुवातीस या सप्ताहाचे आयोजन, मा.ह.भ.प. पंडित किशोरजी व्यास, ह.भ.प. नारायणराव मोहोड व संस्थानने करणे म्हणजे या माहात्म्याची ओळख आमच्या नव्या पिढीस करून देण्याच्या दृष्टीने फार महत्त्वाचे आहे. आज माऊलींचा जो फोटो (फेटा घातलेला) उपलब्ध आहे, तो महाराजांनी चित्रकाराकडून काढून घेतलेला आहे. म्हणजे माऊलींना प्रज्ञाचक्षूद्वारे त्यांनी प्रत्यक्ष पाहिले असल्याने, आपण त्यांना फोटोद्वारे पाहू शकतो. समस्त वारकरी हा फोटो प्रमाण मानतात. महाराजांनी जाता-जाता एक भविष्यवाणी वर्तवली आहे की, २१ व्या शतकात जगाचा/विश्वाचा धर्म भागवत धर्म होणार आहे.

सदर भविष्य खरे होण्याच्या मार्गावरच आहे व आपण सर्व माऊली चरणी प्रार्थना करू या की, पसायदानाच्या पंक्ती प्रत्यक्षात येवोत.

जय जय राम कृष्ण हरी.

**प्रा. रामचंद्र च. गोडबोले,**
नागेश, ३९/११, मोरया कृपा सोसायटी, प्रतिज्ञा मंगल कार्यालयासमोर,
कर्वेनगर, पुणे ४११ ०५२.

# लावण्याचा गाभा

श्रीहरिचे रूप पाहता, मोद होई फार चित्ता
गोकुळीचा कृष्ण कान्हा । द्वारकेचा यादवराणा
दृष्टी माजी भरूनी आजी । विटेवरी पाहिला
श्रीहरिचे रूप पाहता, मोद होई फार चित्ता ॥१॥
पंढरीचा पांडुरंग, द्वारकेचा तो श्रीरंग
दुःख हरुनी सुखवी मनी । मोक्षदानी या जगाचा
श्रीहरीचे रूप पाहता, मोद होई फार चित्ता ॥२॥
संतसंगी भजनरंगी । या अभंगी रंगला
रामहरि, कृष्णहरि या निनादे दंगला
श्रीहरिचे रूप पाहता, मोद होई फार चित्ता
श्रीहरिचे रूप पाहता, मोद होई फार चित्ता ॥३॥

**श्रीमती इंदिरा जोगळेकर**

# यश:पताका

*हे सिन्नरकर निसाळ संगनेरकर शास्त्री कै. सोमवंशीचे परिचित व स्नेही होते. श्रींच्या ग्रंथांचा परिचय त्यांना श्री. सोमवंशीमुळे झाला. काही ग्रंथ वाचून त्यांनी आर्यावृत्तांत ३० चे आसपास आर्या केल्या. त्या प्रथम छापल्या होत्या. त्यानंतर प.पू. बाबाजी महाराज असताना निसाळ शास्त्री एका कात्यायनी व्रताला उपस्थित होते. कात्यायनीवरून परत आल्यानंतर श्री बाबाजींचे घरी नागपूरला काही दिवस थांबले व अप्रकाशित वगैरे सर्व ग्रंथ त्यांनी पाहिले व श्रींवर त्यांची अलोट निष्ठा जडली व नंतर त्यांनी एकूण १११ आर्या रचल्या त्याच येथे यश:पताका नावाने पुस्तिकारूप प्रकाशित केल्या गेल्या.*

श्रीमत्सद्गुरु ज्ञानेशकन्ये ! सौशील्यवर्धने ॥
शिवभक्तिरते ! धन्ये ! कृष्णकांते नमोऽस्तुते ॥१॥
श्रीपांडुरंगनाथाय सच्चिदानंद मूर्तये ॥
स्वभक्तपारिजाताय मंगलाय नमो नमः ॥२॥
आर्या : जय जय ! श्रीज्ञानेश्वरतनये ! विनयान्विते अये ! सदये॥
करितां प्रणाम तुजला मजसमरंकाहि शरण निजपद ये ॥३॥
करिं कंकण शिरिं वेणी गळिं गळसरि भाल कुंकुमें शोभें ॥
या श्री नटेश्वरीतें कमलिनिशीं भृंगसा हरी लोभे ॥४॥
जी ज्ञानेश - हिमनगीं जन्मुनि श्रीकृष्णसिंधु-संगातें- ॥
-गेली, जनमल वारित मग मी म्हणुं कां न हेचि गंगा ते ॥५॥
हरिचरण-मंदिरे ! तूं शिवशिरसिंहासनी अहा ! बसली ॥
भोळ्या सांबा भुलवुनि ही कृति पाहून सतिसभा हंसली ॥६॥
तुज शिव.पद-वसतीचा, हिज न ज्ञानेशकन्यके ! लाहो ॥
सुशिले ! विनयवती निज चारित्र्यें धन्य जन्म केला हो ! ॥७॥
त्वां माधुर्यप्रेमें मूर्त स्वानंदकंद हरि वरिला ।
याहुनि म्हणती गोपी प्रेमा अमुचाहि मंद हरिवरिला ॥८॥
चंद्रासि चंद्रिका तसि प्रेमें अनुसरुनि जे सदा हरिला ॥
शरणागत सुजन-कुजन-ताप जिनें तो समग्रही हरिला ॥९॥
अंधांतूनि अनंधा मुक्त करी किती विचित्र अंधा ते ॥
जी ज्ञानदिवटि निवटी सत्वर अतिनिबिड मोह अंधातें ॥१०॥
विषयांध अंध खचितचि, नच तूं, कीं देशि दृढ करीं यष्टी ॥ १
अवलंबित्या न होऊं देइल भवपथिं कदापि जी कष्टी ॥११॥
भक्त्याचार्य पुरातन नारद शांडिल्य जेविं लोकरि ते— ॥
देऊनि भक्ति जीवां तेवीं तूं धन्या या कली करिते ॥१२॥
झाले, आहेत पुढें होतिल, सद्भक्त भक्तिसुरसिक ते ॥
परि त्वद्रसिकपणातें पाहुनि होतील तेहि सुर स्तिमित ॥१३॥
श्रीशारदाहि जीचे परिसुनि अमृतमधुर बोल बोल कानांहीं ॥
म्हणते धन्ये ! कन्ये ! सुरगुरु त्वत्तुल्य बोलका नाहीं ॥१४॥
श्रीशंकर -मधुसूदन-यतिसम मेधा अकुंठ वाटतसे
गुणवति गावें तुजला या मंदें कितिक सांग भाट तसें ॥१५॥
पुत्रीच पुत्र, कीं श्रीज्ञानेश्वर-सुतप दिव्य अवतरलें ॥
सच्छिष्य 'पांडुरंग'-प्रभु; यद्ग्रंथेंचि सुजन भव तरले ॥१६॥
प्रति '"सूक्तिरत्नमाला'-तेज भरा बुद्धिनयनिं सज्जन हो ! ॥
भगवन्निधि अवलोका मग परमानंदसिंधु मज्जन हो ॥१७॥
अद्वैत हृदय रखुनि मुमुक्षुजन भक्तिमार्गि वळवीलें ॥ -

'सिद्धान्त सुधारा'नें सकल दुरित दैन्य दूर पळवीले ॥१८॥
'गुरुपंचपदिं'च कोटीशास्त्रांचें सार जें नतां लाभें ॥
श्रीमंगलसूत्र गमे, कीं सतिचें; अवैदिक मताला भे ॥१९॥
'श्री भक्ति सुधवतीर्थी' "उपाधि-बाधें अनंत हरि-लीला- ॥
प्रकट पर-प्रेममयी सन्मतिला नित्य भक्ति - भरलीला ॥२०॥
स्वानंदनंदनीं तव 'प्रेम निकुंजां'त तुजसवें रमला ॥
भ्रमला भ्रमरहित हरी, न असा वैकुंठिं देखुनी कमला ॥२१॥
अनुभविक प्रामाणिक भाविक पिक-वाणिनेंचि खुलवीला ॥
'प्रेमनिकुंजां'त सखा, कोणीं न असा कधीं हि भुलवीला ॥२२॥
अभ्यस्त - विवर्त मारक, कृष्ण अनभ्यस्त तारक मनीं या—॥
—ग्रंथीं, बोधा शोधा, मग हत्पर्यंकिं प्रीति कमनियां ॥२३॥
'प्रीति-विनर्तन, संसृतिकर्तन हें मन ! सदैव अवलोकी ॥
उन्मत्त ज्ञानेश्वर कन्याकृत लोकबाह्य या लोकीं ॥२४॥
'प्रियपाहुणेर' दिधला, निज प्रिया खचित उचित जो कांहीं ॥
तो वानिजेल वाटे, शुकसनकादिक विमुक्त लोकांहीं ॥२५॥
'प्रेमोन्मादीं' गोपी व्यंग्यवचनिं करिति भक्ति उन्नत रे ! ॥
ज्यांच्या श्रवणें मननें होऊनि साधक मन प्रसन्न तरे ॥२६॥
'श्री गोपी-चरण-सुधा' लहरीं प्रेमप्रभाव अबलांचा ॥
यत्पानचि थक्कित करि बोध शुकादिक समाधि-सबलांचा ॥२७॥
हरिचरण- निश्चयानें दशदिशिं 'सद्भक्ति- सौरभ-' चि सुटला ॥
सद्भक्त - भृंग - संघहि सेवाया किति पुनः पुन्हां उठला ॥२८॥
जरि भक्तिसूत्र-भाष्याऽधिकरणं'-सद्रत्नहारही त्रुटित ॥
अत्रुटित पर-प्रेमा तरि दे सद्रत्न एकहि त्रुटित ॥२९॥
'श्रीभक्तिभाष्य' 'प्राकृत' न म्हणा गोपाळसा कृपाल हरी ॥
मज वाटे सद्गुरुंची संतांची या मिषें कृपा-लहरी ॥३०॥
'भक्तीतत्त्व-विवेकीं' पंचम पुरुषार्थ लाभ तो भजनीं ॥
जणु दिव्य चंद्रिकेचें हास्य करी लास्य भास्य जें भ-जनीं' ॥३१॥
'स्त्रीगीत-संग्रह' यश, श्री 'श्रुति-संगीत-गीत' मज गमतें ॥
अघ शमतें, मन रमतें, यच्छ्रवणें सहज पावतें समते ॥३२॥
'प्रियलीला-उत्सव' हा मूर्त 'महोत्सव' मनास वाटतसे ॥
श्रीरंग अंग विसरुनि होऊनि कीं दंग यांत नाचतसे ॥३३॥
गंभीर गद्यपद्यें यांतिल त्या सागरासि वांकवल्या— ॥
- दाखविल्या, गांभिर्यें फलदानीं अमृतवल्लि झांकविल्या ॥३४॥
'भक्तिपताका' फडके वाङ्मयमंदीरकलशिं भरजरि हो ! ॥
कंसारी अवलोका तुमचा संसारिं सुजन ! भर जरि हो ! ॥३५॥
'हरिपाठ' भक्तसंध्या, कलियुगिं कल्याणसार संसारीं ॥

ज्ञानेश-चंद्रिकेच्या अवतरणीं सुलभ ज्यांत कंसारी ॥३६॥
भेदी भेदक गीतें कोण? किती रुढ 'तुंबडीवाला !' ॥
ज्ञानेशाजाब वदतां दिसली, हसलीहि 'तुम् बडी वाला !' ॥
'सत्संप्रदाय-कुसुम-मधु' घेति अमत्सर सुसाधक भ्रमर ॥
भ्रमरहिताऽद्वैतरसें अमृतानंदें अमत्त जे अमर ॥३८॥
'उच्छिष्ट पुष्टि लेश' हि नित्य निजानंदनप्रकविराजां— ॥
-साजवि, अति विनयानें; शिकवी भक्तां 'असें सुमि विराजा' ॥
'गोविंदाऽनंदसुधा' हरिहरगुरुभक्ति-चंद्रिका साची ॥
अमृतमयी संगाजवि विबुधांची जी अनन्य दासांची ॥४०॥
एक 'प्रियप्रियामवचन' व्याख्यानहि मधुर पुष्पसौरभ; या- ॥
-संकेतें भक्त भजे, कवणाच्या धरिल ज्ञानसौर भया? ॥४१॥
'श्री नित्यतीर्थि ' नांवें ज्ञानेश्वर सूर्यकांत मणिसा रे ! ॥
अवतार श्रीपतिचा, सद्गुण वैकुंठराज वणि सारे ॥४२॥
श्रीज्ञानेशजगद्गुरुपद 'माता तात' अखिल विश्वास ॥
प्रति निश्वासीं 'अष्टक', कष्टहरी, स्पष्ट देई, विश्वास ॥४३॥
'सद्वैजयंति' सजती पतिकंठीं वधुन चकित श्री पडली ॥
क्षण अडली, परि सद्गुणवतिशीं अक्षय्य मैत्रिकी जडली ॥४४॥
सानन्यदैन्य-कृतिव हें 'अपराधक्षमापनस्तोत्र' — ॥
जहाग्राहंकृतिहय, आणी बळणी सुवेग कीं तोत्र ॥४५॥
'सुखवरसुधा' क्षुधा तूं उपासुनी याच देशिका वाच ॥
की उपकारी वन्ही बालें विनियोग परि शिकायाच ॥४६॥
देवी 'अभंगगाथा' ती 'पदगाथा' भवव्यथा हरिते ॥
अश्विनि-कुमार लोकीं अणिले तूं काय प्रार्थुनी हरितें ॥४७॥
सद्गाथा - रत्नांच्या हारिं गमे ही 'अभंग' पदक मला ॥
जी अमृत वर्षि हर्षित करित धरित जीव विष्णुपदकमलां ॥४८॥
'वृत्त-प्रदीपि' भाषा-मीमांसा, विश्व 'गान-सोपानीं' ॥
सदानंदसिद्धिपथि घे, सवितर रतिमय गा ! नसो पानीं ॥४९॥
'श्रीसंत-वेचकलि'-श्रवणें गानेंच विसरु भवगाथा ॥
कर्म-व्यथाहि सोसु, परिधरणें सुखदु मृत्युचा माथा ॥५०॥
पाळां 'दासजडि'नें, सुलभपणें शास्त्रसार जी वदवी
ही चतुर वत्सलांचा, दे सौशिल्यास थोरपदिं चढवी ॥५१॥
'चित्तोपदेश' सुंदर जेविं 'मनोबोध' रामदासाचा ॥
श्रवणें-मननें-पठणें हा मिळविल पूर्ण-कामदा साचा ॥५२॥
शास्त्रें अनंत, आयुहि अल्प, म्हणुनि गा, 'त्रिकांडसारा' या- ॥
-औषधि संसारसन्निपाति-क्षय कीं समर्थ दारापा ॥५३॥
जनसंशयभ्रमजाचें निजपूर्वें करुनि 'पत्रिके !' तुकडे ॥
भवभयभुजंग भंगा नेसी त्या शीघ्र पक्षि-केतुकडे ॥५४॥
वाचेल विषयविष कां? मणिमंत्रौषधिच 'बोध' हा 'साधु' - ॥
-साधूंचा, कवि जेणें इहपर कल्याणलक्ष जन साधु ॥५५॥
'मणिमंजुषें' त वाटे वामनपणिं 'साधुबोध' अवतरला ॥
जेणें कुशल मुमुक्षु करुनी भवसिंधु विंदुलव तरला ॥५६॥
नरनारी पुरुषार्थ व्यवस्थिती आर्यधर्ममय धर्म ॥
''सतिचरितामृतिं'' देखा, सुधारकांचे वरूं नका कर्म ॥५७॥
अनुभूति-श्रुती-युक्ति व्याख्यानचि 'संप्रदाय सुरतरु'चें ॥
नित्य रुचे साधूंना जेवीं कीं कामुकासि सुरत रुचे ॥५८॥
सिद्गगनीं घनशाखा पल्लवि सुरतरु अहा ! पहा भरला ॥
भगवत्कृति सद्दाना सकळां सविवेक एक हा पुरला ॥५९॥
''भगवद्गीता-संगती'' भवपथिं सद्गुरु कृपेंचि लागावी ॥
जीवन्मुक्ति सुफलदा साधनिं सज्ञान भक्ति जागावी ॥६०॥
''श्री कपिलगीत'' टीका-नौका भवसिंधु सं-तरायातें ॥
सांख्य विचारें भक्ती जींत असे वल्हि संतरायातें ॥६१॥
भक्तीचें योगाचें गुह्य, ''ज्ञानेश्वरी-निरूपणि'' हो ! ॥
एकांतिं वृत्तिकांते ! कांत हरिसि रम रस-स्वरूपिणि हो ॥६२॥
'शांतिसुधाकर' परि परिभवि वरिवरि तर्ककर्कशी राहु ॥
राहुत सुखी साधक-चकोर कीं किरण पसरि जो बाहू ॥६३॥
ग्रंथ 'चिरंजीव-पदाभ्यास' सखा सचित एकनाथांचा ॥
कीं अमृतमेघ भवदव-तप्तांचा होय हा अनाथांचा ॥६४॥
नाम प्रणवोपासन-विवेक सप्रत्नमेरु ! कनकाचा— ॥
-होय, 'निदिध्यासन सुप्रकाश' अनुभव मुनींद्र सनकाचा ॥६५॥
'निगमांत पथ सुदिपक' विरक्त भक्तासि भवतमीं विकटी ॥
सम्यक्सुदीप्यतेजें पिशाच्च कामादि तत्क्षणीं निकटी ॥६६॥
ही ''चौसष्टी'' माळा अनर्घ्य मुक्ताहि कां? न वाटावी ॥
संसार ज्वरितांनीं भक्तिमधुतूनि शीघ्र चाटावी ॥६७॥
'सोपानसिद्धि' सक्रम सयोग वैराग्य संधि-अभ्यास ॥
श्रुतिसार फार रुचला म्हणुनिच सत्साधकांस सभ्यास ॥६८॥
रामा देति 'अवलौकिक व्याख्यानें' ही महा परंधामा ॥
निजधर्म ज्ञानवला; लौकिक व्याख्यान पंक्ति भवधामा ॥६९॥
श्रीही क्वेल वाटे कावा हा सु-नव-रत्नहार मला ॥
उन्नत संस्कृति किरणें पाहुनि कीं यांत जीव हा रमला ॥७०॥
हा जन्म सफल श्रद्धाऽभ्यास परांचा न होय इतरांचा ॥
हा कथ 'अलौकीक प्रकार्ति' हितबोध जेविं पितरांचा ॥७१॥
'प्रणवाऽमोघनिरूपण' देतें मांडुक्यउपनिषत्स्मरण ॥
श्रीरामकृष्णनामें अमृतही सतुल्य चुकविती मरण ॥७२॥
सद्गुरुबोधें शिष्या 'प्रभावकल्लोळ' लघुबृहत् कळती ॥
ज्यांच्या श्रवणें, मननें किती पळती पापशत्रु किति जळती ॥७३॥
'श्रीवृत्तिबीरावली'-विंझुडी मज लाभ फार लांचविती ॥
कीं अध्यात्म स्वरसा देऊनि भवरोगियासि नाचविती ॥७४॥
ग्रंथ श्रीपातंजलिकृति परि योगप्रभाव हे क्षिप्रा ॥
जय भाष्यादिक सुधृतहुनि वाटे स्वहित साधकां विप्रां ॥७५॥
स्वाप्नस्मृति.संदेशें साधक उन्नत ''हिरण्ययोगानें '' ॥
कथिलें असें महत्तम तत्व श्रुतिताहि हिरण्ययोगानें ॥७६॥
ज्ञेय विभिन्न ज्ञाता 'सिद्धींचें सार' जो अमर अजर ॥
तो नीतिवंत तरि करि कीर्तीचा सिद्ध-सुंदरी गजर ॥७७॥
'ध्यानदिवाकर'-दर्शन हन्नर्पि गुरुभक्तिनें सुलभ वापा ॥
तापा हरितें, देतें हरितें, अभ्यास सफळ निष्पापा ॥७८॥
अंबे ! 'प्रश्नकदंबें' परीक्षिसी गुरुपदा असामान्य ॥
सामान्य ज्यांत कुंठित, असतवि होय होय ! कसा मान्य? ॥
'प्रश्नोत्तरमाला' ही चातुर्यें सन्मतीस नटवील ॥
धर्मज्ञान-सुसंस्कृति सद्धेतु प्रतिपदींहि पटवील ॥८०॥
नाना 'मत-सुसमीक्षणिं' खरें कळे, मत गळेंच तें लटिकें ॥

*पक्कान्न-भोजनीं सुखादुभुता पुढति केविं तेल टिके? ॥८१॥*
*'श्रीवेदान्तपदार्थोद्देशीं' ओव्यांत सकल अठराही- ॥*
*-वदति, 'बुधा परिभाषा-संकेता गुरुपदींच पठ राही' ॥८२॥*
*अनुष्टुप् :- अध्यात्मपरिभाषा ही पदार्थोद्देशदीपिका ॥*
*कीं वियानंदन-श्री हे, सुख दे विबुधां पिकां ॥८३॥*
*अविकल सद्गुण सकलहि असती हे 'मुद्रित-ग्रंथराजीं' हो ! ॥*
*कल्याणकोटिदायक अमरां सन्मान्य पामरां जी हो ! ॥८४॥*
*'स्वमत-विनिर्णय' जैसा संतांचा शास्त्रसार थोरांचा- ॥*
*-निजकल्याण पथाचा अचल असो तो मुमुक्षु पोरांचा ॥८५॥*
*अनलसपणेंच अवलोका ही सुंदर विशिष्ट 'परिशिष्टें' ।*
*इतर न शिखर महत्वा मानिति मर्मज्ञ थोर परि शिष्टें ॥८६॥*
*देवापरि संतांचें अमृत भरित चरित हें करा श्रवण ॥*
*साधकपणिं धैर्या दे, जें परमार्थी करी अति प्रवण ॥८७॥*
*(संक्षेप चरित्र)*
*देवाचें दिव्य तसें संतांचे जगतिं दिव्य हो ! जनन ॥*
*सुर गाति 'तोम् तननं' ध्याया सज्ञान भक्तिचें मनन ॥८८॥*
*तात 'श्री गोंदूजी, धन्य ! अलोकाहि माय बाळाची ॥*
*विश्वविजयिसुत भाग्यश्री ज्या देणगि हरिकृपाळाची ॥८९॥*
*किती कुटिल दैव, दावा दायावें साधिला अहा ! नीचें ॥*
*शिशुदृष्टि हरिलि, भुलवुनि दुःख करी माय याच हानीचें ॥९०॥*
*बालक्रीडन हरिचें, तैसें कितितरि गुलाबरायांचें ॥*
*चित्र विचित्र कुतूहल-लाभ स्वीजनमुलां बरा याञ्चे ॥९१॥*
*सति-पति रावति गेहीं तरि त्यावरि क्रुद्ध सर्वदा झुलते ॥*
*आपत्तीं संत टिके, ज्या पाहुनि उपलहृदयही उलते ॥९२॥*
*स्वप्नीं श्री ज्ञानेश्वर कृपा करिति परमभक्ति पाहून ॥*
*निज सद्गुरुता वेती, कोण? असे लाभ थोर याहून ॥९३॥*
*अद्भुत तरुणपणींचे चरित किती चित्र योगिरायांचे ॥*
*श्रीहरिगुरुभजकांचें, म्हणुनी वर्णिनिहि यो गिरा यांचें ॥९४॥*
*वय किति? विद्या काय? प्रभाव ज्यांचा न बोलवे वाचें ॥*
*थोरहि सुचकित होउनि वदती "देणें अनंत देवाचें !" ॥९५॥*
*निज पौरुषप्रयत्नें केलें स्वपरार्थकोटि-कल्याण ॥*
*हरिहर-गुरुप्रसादी चढविति प्रारब्धसिंहि पल्याण ॥९६॥*
*जगिं यत्तुल्य अलौकिक कर्तृत्वें धन्य ! मानवच नाहीं ॥*
*मग कां? वणवण जनहो ! अमर्मि कल्याण की कवच नाहीं ॥९७॥*
*पंडितसे, बालकसे, कधिं कवितें गोपिसेहि वेड-पिसे ॥*
*विश्वावतारि कधिं कधिं मूर्त महाश्चर्य संत हे कपिसे ॥९८॥*
*पंडित-भाग्य अखंडित शिष्यमुकुटमणि गुलाबरायांचे ॥*
*जेष्ठ चि बंधु पित्यासम अज्ञ कनिष्ठां मुलां बरा याञ्चे ॥९९॥*
*सद्वैजयंतिमाजीं बोले सज्जन-सभा सुपदक मला- ॥*
*-ज्ञानेशकन्यकेचें शोभे, यशगाय विष्णुपदकमला ॥१००॥*
*ज्ञानेशकन्यकासखि-चरणीं सप्रेम हरि ! असीम करी ॥*
*माधुर्यभक्तिला कधिं मिठि मारिन भक्तिं मी जसी भाकरी ॥१०१॥*
*मज ईषणायंत्राचा कदापि संबंध तो नसावा गे ! ॥*
*वर देशिल वरदेश्वरि ! 'वर - भक्तीचा' मनीं तसा वागे ॥१०२॥*

*दीक्षा माधुर्याची याची भिक्षा सदैव हे माते ! ॥*
*दे मातें इच्छीना, मग मी ब्रम्हाण्डवर्ति-हेमातें ॥१०३॥*
*दे, हरिपदिं रति धन्ये ! श्रीमज्ज्ञानेश-सद्गुरुकन्ये ! ॥*
*या 'वासुदेव'-बाला, न छळावें चित्त वानरें वन्यें ॥१०४॥*
*मी समकालिन जरि तरि दैवें दरुशन न मा ले ! झालें ॥*
*श्री वाङ्मयमूर्ति परी अवलोकुनि चित्त बहुत हें धालें ॥१०५॥*
*शतशः प्रणति असो या पुनरपि ज्ञानेशकन्यकेला हो ॥ !*
*कीं या सतिनें निजजन पुण्यबळें धन्य ! धन्य ! केला हो ! ॥१०६॥*
*अल्केशतः समाधी हरिस्वरूपीं सदैव गे ! जडको ! ॥*
*श्री वासुदेवविरति हो, अरति विषयिं, सद्गुरुपदीं पडको ॥१०७॥*
*हा स्तव तंव नवनवरुचिदायी हो आर्पिला तुला भावें ॥*
*येणें बळेंचि श्रीपति-पदरज मज अमृतहेतु लाभावें ॥१०८॥*
*ज्ञानेश वैजयंती । ज्ञानेश वै जयंती ॥*
*ज्ञानेश वैजयंती । ज्ञानेश वै जयंती ॥१०९॥*
*शिष्योपदेश-गीतावल्लरि फुलल्या प्रमेयसुमनांनीं ॥*
*कितिकांनीं सद्गुरुहरि त्यांनीं पुजिला असेल सु-मनांनीं ॥११०॥*
*अनुष्टप् : श्रीसंतसद्गुरो ! पूजा पदसूर्यास शोभली ॥*
सत्पुष्पप्रेम अर्ध्याची, सत्सभा जीस लोभली ॥१११॥

**वासुदेव रा. निसाळ सिन्नरकर**

# गोपालांच्या अंधगोपिला वंदित गुरुदास (भुजङ्गप्रयात वृत्त)

म्हणे **गो**पि माझा पति 'वासुदेव' ।
तया **पा**हता जागती अष्टभाव ॥
तसे **ला**भले पितृ ते 'ज्ञानदेव' ।
तयां**च्या** पदी या 'गुलाबा'स ठाव ॥१॥
अशी **अं**ध गोपि मुरलीधराची ।
सदा **ध**र्म ग्रंथांत निमग्न साची ॥
असे **गो**डी दुःखातही जी सुखांत ।
सदा **पि**डितांची करुणा मनांत ॥२॥
मना **ला**गला छंद तो ईश्वराचा ।
तया **वं**दिती ध्यास ज्ञानेश्वरांचा ।
मिळे **दि**व्य दृष्टि तसें आत्मज्ञान ।
परा **त**त्त्व लाभे 'गुलाबा'स छान ॥३॥
किती **गु**ह्य शास्त्रें प्रयत्नें कळाली ।
तशी **रु**क्ष ज्ञानांत भक्ति मिळाली ॥
'गुरु**दा**स' वंदीत त्यांच्या पदाला ।
सदा**स**र्वदा द्या शुभाशीष त्याला ॥४॥

**गुरुदास**
अहमदाबाद

# 'भक्ताचे भावाभिनिवेश' (भक्तिफल निरूपण नामक अ. ५)

एम.ए.,पीएच.डी. प्रबंध विषय 'भगवद् गीतेतील उपनिषदांचे आधार' गृहीणी.

संत - सत्पुरूष गुलाबराव महाराजांनी रचलेल्या 'भक्तिपदतीर्थामृत' या लहानशा ग्रंथाचे एकूण पाच अध्याय आहेत. या प्रत्येक अध्यायाला त्यांनी 'तरंग' असे म्हटले आहे. भक्ताच्या अंतःकरणात उसळणाऱ्या प्रेममय उर्मीच जणू 'तरंग' रूपाने प्रकट झाल्या असाव्यात, असा अनुभव या ग्रंथाच्या अभ्यासानंतर येतो. यातील पहिल्या अध्यायाच्या सुरुवातीस लेखनप्रथेप्रमाणे 'मंगलाचरण' असून पुढे भक्तिविषयीचे निरूपण करण्याचा मनोदय व्यक्त केलेला आहे. या निरूपणाचा मुख्य आधार म्हणजे श्रुत्युक्त महावाक्यातील एक महावाक्य. ते म्हणजे, 'तत् त्वं असि' हे होय. 'छांदोग्य' उपनिषदातील नवव्या अध्यायातील, आरुणि-श्वेतकेतू यांच्या संवादात पुनः पुन्हा आलेले हेच ते महावाक्य. या महावाक्यातील प्रत्येक पदाचा अर्थ भक्तीच्याच अंगाने कशा प्रकारे व्यक्त करता येतो, त्याचे निरूपण भक्तिसूत्रांचा आधार घेऊन, एका एका अध्यायातून केले आहे.

दुसऱ्या अध्यायाचा मुख्य विषय आहे 'तत्' पद निरूपण. तिसऱ्या अध्यायात 'त्वं' पदाविषयीचे विवेचन आले आहे. चवथ्या अध्यायात स्पष्टीकरणासाठी घेतलेले पद म्हणजे, 'असि'. अशा पद्धतीने तीन अध्यायात मिळून, भक्तीच्या अनुषंगाने किंवा भक्ती हेच प्रमुख सूत्र धरून या तिन्ही पदांचा अर्थ कशा पद्धतीने लागतो ते अतिशय सोपे करून सांगितल्याचे दिसून येते.

सोपी भाषा, सुलभ पद्यरचना ही महाराजांच्या निरूपणाची वैशिष्ट्ये आहेत. एखादी गोष्ट नीट समजावी, सर्वांच्या मनात ठसावी यासाठी अनेक प्रकारचे दृष्टान्त देण्याची पद्धत गुलाबराव महाराजांनी अंगिकारलेली दिसून येते. जसे –

***"आधीच सोन्याचे प्रियपण । वरी अलंकार सुंदर पूर्ण ।***
***वोही दृष्टी पाहता जाण । सौंदर्यचि पिकले ॥" (२.६२)***

त्याचप्रमाणे, गीतेतील एखाद्या श्लोकाचा आशय, भागवत ग्रंथातील दाखले, उपनिषदातील तत्त्वज्ञान यांची सुरेख गुंफण त्यांच्या विवेचनात झाल्याचे आढळून येते.

ग्रंथाचा चवथा अध्याय संपेपर्यंत भक्ताला या महावाक्याविषयी बरीच आत्मीयता वाटून त्याने त्या दृष्टिकोनातून भक्तीचा उपक्रम सुरू केलेला असतो. त्यामुळे त्या महावाक्याचे ज्ञान प्राप्त झाल्यानंतर भक्त कोणत्या अवस्थेला प्राप्त होतो, त्याचे ठायी कोणकोणत्या भावांचा अभिनिवेश होतो याचे विवेचन 'भक्तिफलनिरूपण' हे नाव असलेल्या पाचव्या अध्यायात आलेले आहे. अशा श्रेष्ठ भक्ताचे ठायी विविध प्रकारचे भाव जन्म घेत असतात. तसेच यापैकी कोणत्या ना कोणत्या भावाचा आधार घेऊनच भक्ताच्या मनात असलेल्या भगवंताविषयीच्या भक्तीची किंवा प्रीतीची अभिव्यक्ती होत असते.

## १) निष्कामभाव

***तेवि महावाक्योपदेशे भक्ती । करिता पति होय श्रीपती ।***
***मग प्रेमाचे पुत्र प्रेमचि पती । प्रेमरूप युवती आपण ॥ (५.७)***

पतीच्या सहवास सुखाचे फळ म्हणून स्त्रीला पुत्रप्राप्ती होते. त्यामुळे तिच्या मनात पतीविषयी असलेली प्रीती वाढतच जाते. तिच्या अंतःकरणात पतीचे चरण दृढ होतात. तसेच पुत्राविषयीही प्रीती असतेच. अशा तऱ्हेने उभय पितापुत्रांवर प्रीती करता करता ती स्वतःही प्रेमरूपच होऊन जाते.

त्याचप्रमाणे 'तत्त्वमसि' या महावाक्यातील, भक्तीला अनुसरून केलेल्या उपदेशाप्रमाणे भक्ती केली असता, साक्षात्-सगुण-साकार-षड्गुणैश्वर्याने युक्त असलेला भगवान-श्रीपती-पतिरूपाने प्राप्त होतो. परिणामी भक्त हा केवळ प्रेमरूप स्त्रीच्या रूपात परिणत होतो.

भगवंत केवळ प्रेमरूप पती, त्यापासून प्राप्त होणारा पुत्रही प्रेमरूप आणि स्वतः भक्तही प्रेमरूपच. त्यामुळे ज्ञेय, ज्ञान आणि ज्ञाता यांचे प्रेमरूपाने ऐक्य घडवून येते.

या ऐक्यामुळे विषयकामना रूपाने व्यापून राहिलेला अंधार नाहीसा होतो. निष्काम प्रेमाची पहाट फुलून येते. ज्ञानरवि तेजोमय झाला असता उत्पन्न होणारा ब्रह्मज्ञानाचा अहंकारही लोप पावतो.

अशा प्रकारे प्रेममय भक्तीतून निष्कामता साधली असता, परमेश्वराची अनुभूति येते. (५.९) भगवंताचे हे रूप कोटी सूर्यांच्या तेजासमान तेजस्वी, पण कोटी चंद्रांच्या किरणांप्रमाणे शीतल, शांत व आल्हाददायक असून त्या श्याम स्वरूपाने हे चराचर अंतर्बाह्य व्यापून राहिले आहे, अशी जाणीव होते. निष्काम भाव प्राप्त झालेल्या भक्ताचे मन या ईश स्वरूपात गुंतून पडते.

## २) योगी भाव –

योग मार्गाचे आचरण करणाऱ्यांसाठी आठ पायऱ्या सांगितल्या आहेत. यालाच 'अष्टांगयोग' असेही म्हणतात. याचा विचार करताना फक्त योग मार्गाचे आचरण करणाऱ्यांनाच डोळ्यांसमोर आणले जाते. परंतु भक्ताच्या भक्तियुक्त जीवनातही या अष्टांग योगाचे आचरण होत असते असे गुलाबराव महाराजांचे मत आहे. म्हणूनच त्यांनी या अष्टांग योगाच्या भक्तीशी समन्वय केला आहे, असे आढळून येते.

***प्रेमळपणी योनी । स्वये गेले विरोनी ।***
***प्रेमळाचीच खाणी । सर्वेन्द्रिया ॥***
***बुडाले लौकिकाचरण । तुटले वैदिक बंधन ।***
***जितुके दिसती आश्रमवर्ण । संन्यासचि ते ॥ (५.१७,१८)***

भक्त व भगवान यांचे परस्परांवर एकच निःसीम प्रेम असल्यामुळे त्यांचे दोनपण विरून गेलेले असते. सर्व इंद्रियांचे ठिकाणी प्रेमच उमटलेले

असते. अशा प्रेमळ भक्ताला लौकीक व्यवहाराचे किंवा वैदिक आचरणाचे बंधन राहत नाही. त्याच्या दृष्टीने सर्व आश्रमधर्म हे संन्यासधर्मच असतात.

असे प्रेमळ भक्त अंतर्बाह्य भगवत्प्रेमस्वरूपच होऊन राहतात. त्यांच्याबाबतीत हे भक्तियुक्त योगाचरण होत असते. श्रीकृष्णाच्या-भगवंताच्या प्रेमामुळे कंठ सद्‌गदित होतो. यालाच भक्ताचा 'प्राणायाम' म्हटले आहे. सर्व इंद्रियांना एकाच विषयाची ओढ असते, ती म्हणजे हरिप्रेमाची. त्यामुळे श्रीहरिमय झालेली इंद्रिये विषय-वासनांकडे वळतच नाहीत. हाच त्यांचा 'प्रत्याहार' होतो. भक्ताच्या चित्तवृत्ती आत्यंतिक प्रेमाने सगुण स्वरूपाचे ठिकाणी आकृष्ट होत असतात. हीच 'धारणा' होय. भगवंतावरील प्रेमामुळे चित्त सतत त्याच्याच चिंतनात दंग होऊन जाते हेच 'ध्यान' होय.

भगवंताविषयीच विचार करीत असता - चिंतन करीत असता - भावभक्तीचा अतिरेक होऊन भगवंताविषयीचे प्रेम सतत ओसंडून येणे, हीच भक्ताची 'समाधी' होय.

या प्रकारे प्राणायामापासून तो समाधी अवस्थेपर्यंतच्या पाच पायऱ्यांविषयीचे विवेचन करून झाल्यावर, आताच जणू आठवण झाली असे वाटून महाराज प्रारंभिक अशा, यम-नियम व आसन यांचेविषयी सांगतात. जसे —

*''प्रेम ओसंडण समाधी । पूर्वनियमासनादी ।*
*आदिअंती त्रिशुद्धी । प्रेमचि एक ॥ (५.२१)*

एकूणच भक्ताला प्राप्त होणारा योगीभाव हा हरिविषयीच्या आत्यंतिक प्रेमाने युक्त आहे, असे म्हणता येईल. असा भाव प्राप्त झाल्यानंतर द्वैतभावना नाहीशी होते आणि अद्वैत भावही रहात नाही. याचे कारण म्हणजे, द्वैत-अद्वैत यांच्याही पलीकडे असलेल्या भगवंताचे ज्ञान होऊन त्या श्रेष्ठ भक्ताला, रासक्रीडेची साम्राज्ञी असलेल्या 'राधेसह भगवंत' अशा स्वरूपाचे दर्शन होते.

## ३) भ्रमरीभाव

*''व्रजराज तात जया । आम्ही लंपट तत्पाया ।*
*कमळी भ्रामरी होवोनिया । जये रीती ।'' (५.२४)*

महाराज म्हणतात की, व्रजराज नंद हे ज्याचे पिता आहेत, त्या श्रीकृष्णाच्या चरणकमलाकडे आम्ही आकर्षित झालो आहोत. कशा प्रकारे? म्हणून विचाराल, तर भ्रमरी ज्या प्रमाणे कमळाकडे ओढ घेते त्या प्रमाणे आम्ही भगवंताचे चरणाशी लंपट झालो आहोत.

या कमळ आणि भ्रमर किंवा भ्रमरी यांच्या नात्यामध्ये प्रेम तर आहेच, शिवाय एक हळुवारपणाही आहे. जो भुंगा लाकूड पोखरण्याचे कठोर काम करू शकतो, तोच कमळासन्निध आला असता आपले कठोरपण विसरूनच जातो. हळुवारपणे कमळाभोवती गुंजन करीत, अलगद कमळात शिरतो. तेथे तो इतका तन्मय होऊन जातो - एकरूप होतो की कमळ मिटले आहे व आपण बंदी झालो आहोत याचेही भान त्याला राहिलेले नसते.

या भ्रमरीप्रमाणेच भक्ताचे मनही हळुवार होऊन भगवंताच्या चरणकमलाभोवती गुंजन करता करता त्या कमलातच अडकून पडते. हळूहळू आजूबाजूचे भान तर रहात नाहीच, परंतु त्या भक्ताचे देहभानही हरपते. आणि भ्रमर जसा कमळात, तसा भक्त भगवंताच्या चरणकमलातच अडकून पडतो. गुंतून जातो.

अशा प्रकारे एकरूप झालेला भुंगा प्रसंगी मरण पत्करतो-देह त्याग स्वीकारतो. परंतु कमळाचा त्याग करीत नाही की त्याला इजाही पोचवत नाही. श्रेष्ठ भक्ताची कृष्णभक्तीही अशीच एकनिष्ठ असते. पुन्हा महाराज म्हणतात —

*''प्रेमाचा करू कळस । हरीस अर्पू ब्रह्मरस ।*
*श्रीकृष्णपदी सावकाश । सख्यांनो । भृंगी होऊन चला ॥'' (५.३१)*

प्रेमाची आत्यंतिक परिसीमा करून, परमेश्वररूपी ब्रह्मरस भगवंताला अर्पण करू आणि आपण मात्र भृंगी-भ्रमरी होऊन श्रीकृष्णाचे चरणाशी वास करू.

## ४) गोपी भाव

*''जया स्थळी विरूपाक्ष । मृदंगवादन धरी पक्ष ।'' (५.२८ चरण १)*

भगवंत गोपींच्या समवेत रासक्रीडा करीत असता, परमेश्वर-शंकरालासुद्धा मोह आवरता आला नाही. त्याने स्त्रीरूपाने त्या रासक्रीडेत मृदुंग वाजवण्याची सेवा स्वीकारली. अशा रासक्रीडेत सहभागी झालेल्या गोपींची पायधूळ आपण मस्तकी धारण करू या. अशी इच्छा व्यक्त करून गुलाबराव महाराज म्हणतात की, त्या पायधुळीच्या प्रसादानेच आपले जीवन भगवंताविषयीच्या प्रीतीने भरून जाईल, असा दृढ विश्वास महाराजांनी व्यक्त केला आहे. ते म्हणतात —

*''का गोपिकांची रजधूळ । आम्हास करील प्रेमळ ।*
*हा विश्वास मनी प्रबळ । धरोनि घननीळ चिंतीतसे ॥'' (५.२५)*

अशा प्रकारे भगवंताचे चिंतन करीत असता, 'परमेश्वर हा, सच्चिदानंदघन आहे. षड्‌गुणैश्वर्याने युक्त आहे आणि या विश्वाच्या पसाऱ्यात तोच एक भरून उरला आहे' असे त्याचे माहात्म्य प्रत्ययास येते. अशा प्रकारचे ज्ञान म्हणजे सुद्धा प्रेमच आहे आणि ते श्रेष्ठ आहे. गोपींच्या मनातही भगवंताविषयी जो काम होता तोही असाच, अशरीरी, अलौकिक, अकृत्रिम आणि समर्पण भावाने युक्त असाच होता. म्हणून मोक्षसुखाहूनही श्रेष्ठ असलेला हा भगवंताविषयीचा कामच गोपींचा उद्धार करण्यास पात्र ठरला.

याच गोपिकांच्या चरणी प्रीतिपूर्वक आणि पुनः पुन्हा वंदन करण्याचा मानस महाराजांनी व्यक्त केला आहे. हीच सेवा केली असताना त्या गोपींच्या मनातील भाव भक्तालाही प्राप्त होतो, असे म्हणता येईल. अशा प्रकारे गोपीभाव प्राप्त झाला असता, लीलेने रासक्रीडा करणारे ते सावळे परब्रह्म आपण स्वतःच व्हावे असे महाराजांना वाटते.

भागवतात वर्णन आले आहे की (स्कंध १० पूर्वार्ध अ. ३०) श्रीकृष्णाच्या भक्तीने युक्त झालेल्या, त्याचे चरणी आसक्त झालेल्या, त्याच्या प्रभावाने भारून गेलेल्या, त्याच्या विरहाने व्याकुळ झालेल्या गोपी स्वतःलाच 'कृष्ण' समजून त्याने केलेल्या विविध लीलांचे अनुकरण करू लागल्या.

म्हणजेच भगवंत-भक्त ऐक्य हाच गोपीभाव म्हणता येईल.

## ५) उन्मनीभाव

भक्तियुक्त प्रेमामध्ये भोळा भक्त आणि ज्ञानी भक्त हे दोन्ही सारखेच असतात. त्या दोघांच्याही हाती श्रीकृष्णरूपाचे प्रेममय फळ येत असते. हे फळ प्राप्त होणे म्हणजेच 'तत् त्वं असि' या महावाक्याला वृक्षरूप प्राप्त होते व तो फोफावतो, दृढ होतो, व्यापक होतो. भक्ताला या श्रुत्युक्त महावाक्याचा प्रत्यय येतो.

परिणामी वसंत (उद्दीपन भाव), शृंगार (रस), रति म्हणजेच शृंगार रसाचा स्थायीभाव, मोह व मदन या सर्वच वृत्ती हरिप्रेमाने भारल्या जातात. त्यामुळे वृत्तींचे वृत्तीपण नाहीसे होते, जीवाचे जीवपणही रहात नाही (तो शिवरूप होतो.) आणि मुक्तीरूपी बीजाला अंकुर येतो तोही भक्तिसुखाचा. यातूनच बीजालाही आणि फळालाही भक्तिरूपच प्राप्त होते. अशी अनुभूति आली असता –

*''पडला अविद्येचा विसर । बुडाला विद्येचा अंकुर ।*
*अवघा झाला अविकार । श्रीकृष्ण प्रेम ॥'' (५.४२)*

अविद्येचा विसर पडतो, विद्येचाही अंकुर नाहीसा होतो. म्हणजेच मायेचा सागर पार केला जातो. तसेच प्राप्त झालेल्या ब्रह्मज्ञानाचीही जाणीव रहात नाही. तर एकमेव आणि निर्विकार असे श्रीकृष्ण-प्रेमच उरते. कारण हा भगवंत विद्या आणि अविद्या यांच्याही पलीकडचा आहे. श्रेष्ठ आहे. येथेच भक्ताला उन्मनीभाव प्राप्त होतो.

यामुळे बद्धस्थिती नाहीशी होते. तसेच 'मुक्ती' ही स्थितीसुद्धा लाजून दूर पळते. आणि भगवंताविषयीच्या अकृत्रिम भक्तीचा भाव मात्र प्रगट होतो.

याच भक्तियुक्त प्रेमाच्या आविर्भावाचे निरूपण शिष्यांपाशी करतानाच त्याला गुह्य ज्ञानाचे स्वरूप प्राप्त झाले. तसेच वर्णन करण्यास शब्द न सापडल्याने, दशोपनिषदांमध्ये त्याला 'निषेध-भाव' प्राप्त झाला. म्हणजेच या भावस्वरूपाचे वर्णन 'नेति-नेति' अशा निषेध दर्शविणाऱ्या शब्दांनी केले गेले.

परंतु हा 'निषेध-भावच' भक्तांच्या स्तवनाचा विषय झाला. म्हणजेच अवर्णनीय, अनिर्वचनीय असा भगवंतच प्रत्ययाला आला. म्हणून श्रुतीच जणू गोपींचा मेळा होऊन आत्यंतिक प्रेमाने श्रीकृष्णाच्या चरणांवर समर्पित झाल्या.

शेवटी पहायचा आहे तो 'पक्षीभाव'

### ६) पक्षीभाव

पक्षीभाव व्यक्त करताना महाराजांनी अतिशय रम्य कल्पना मांडली आहे.

*''करूणेचे काढोनि कोंब । श्रीकृष्ण वृक्ष स्वयंभ ।*
*प्रेमतारुण्ये सप्रभ । टवटवीत ॥*
*लता गोपिका वेष्टित । रसपुष्पे सुगंधित ।*
*ऐक्य फळभारे डोलत । प्रेमरसे ॥'' (५.४६, ४७)*

करूण रसाचे कोंब अंकुरित होऊन त्यातून फुलून आलेला स्वयंभू वृक्ष म्हणजेच भगवान श्रीकृष्ण होय. या वृक्षावर नित्य नूतन तारुण्य असल्यामुळे तो नेहमी तेजस्वी व टवटवीत असतो. तो गोपीरूपी वेलींनी लपेटलेला आहे. हा नवरसरूपी फुलांनी सतत सुगंधित आहे आणि प्रेमरसाने ओथंबलेल्या अद्वैतरूप फळांनी लहडून गेल्याने डोलत आहे.

महाराज म्हणतात की, याच वृक्षाची फळे चाखण्यासाठी आम्ही पक्षी झालो आहोत. त्यासाठी जणू प्रेमरसाचीच बनली आहे, अशी रसना आम्हाला मिळाली आहे. ही जिव्हा म्हणजेच हा भक्तियुक्त प्रेमरस आम्ही, अचल व अविनाशी अशा वृक्षरूप धारण केलेल्या श्रीकृष्ण पतीच्या चरणांवर समर्पण करतो. त्यातूनच आम्हाला आणि अर्थात भक्तांलाही स्वानंदाचा लाभ होतो.

हा स्वानंदाचा लाभ म्हणजेच वाचेला प्राप्त झालेले ऋण आहे. ते फेडण्यासाठी या वाचेने भगवंताची कितीही स्तुती केली तरीसुद्धा ते ऋण फिटणे कठीण आहे. म्हणून महाराज म्हणतात की, मी मूकपणेच भगवंताचे चरणाला वंदन करतो.

अशा प्रकारे श्रीकृष्णाचे चरणी अंतःकरण स्थिर होऊन वाणी मूक झाली असता अंतर्बाही एकमेव श्रीकृष्णस्वरूपच भरून राहते. ते स्वरूप सच्चिदानंद स्वरूप असून व्याप्य-व्यापक-वर्जित आहे. त्या रूपाचे व विश्वाचे ऐक्य करणे हाच सगुण भगवान होय. परंतु रासक्रीडा समयी मात्र तो सगुण-साकार-श्याम सुंदर रूपाने प्रगट झालेला होता. (कृष्णावतारामध्ये).

अशा या भगवंताला हृदयात धारण करून अकृत्रिम अशी प्रेममय भक्ती साधून वाचाऋण फेडण्याचा निश्चय करू. (वाचाऋणालाच अविद्यालेशही म्हटले आहे.)

अशा प्रकारे भगवंताला वृक्षरूप देऊन पक्षीभावाने केलेली प्रेममय भक्तीही भगवंताशी सरूपता साधून देते असे महाराजांचे स्पष्ट मत आहे.

या शिवाय महाराजांनी स्वतःला श्रीकृष्णाच्या पत्नीच्या जागी कल्पिले आहे. ते स्वतःला ज्ञानेश्वर कन्या आणि श्रीकृष्णपत्नी म्हणवून घेत असत. त्यामुळे त्यांच्या निरूपणातून ठिकठिकाणी 'कन्याभाव' आणि 'कांताभाव' डोकावतो आहे असे अनुभवास येते.

एकंदर पाहता भक्ताच्या मनात जन्मलेल्या प्रेमरसपूर्ण भक्तीतून जन्म घेणारे विविध प्रकारचे भावच त्याला भगवंताच्या चरणाशी एकनिष्ठपणे गुंतवून ठेवतात.

- इति -

संदर्भ - भक्तिपदतीर्थामृत (सार्थ)
मधुर प्रकाशन (श्री बाबाजी महाराज पंडित)

**डॉ. सौ. शुभदा शरच्चंद्र कोशे**
४०१, वसंत वैभव, (५ वा माळा), १६६२ ब, शिवाजी रोड,
पनवेल (जि. रायगड) ४१०२०६.

# श्रीगुलाबराव महाराजांचे तत्त्वज्ञान

*एम.ए., पीएच.डी., तत्त्वज्ञानाचे निवृत्त प्राध्यापक पुणे विद्यापीठ. अनेक इंग्रजी-मराठी लेख. भारतीय तत्त्वज्ञान व विशेषतः संत वाङ्मयाच्या अभ्यासाची आवड. त्यावर व्याख्याने व व्याख्यानमाला. पीएच.डी.साठी अनेक विद्यार्थ्यांना मार्गदर्शन प्रसिद्ध पुस्तके. १) श्रीज्ञानेश्वर विचार दर्शन, २) चांगदेव पासष्टी इंग्रजी भाषांतर व टीपा. ३) The concept of moral obligation*

१) **स्व**तःस ज्ञानेश्वर कन्या म्हणवून घेणारे वैदर्भीय संत श्रीगुलाबराव महाराज म्हणजे आधुनिक काळातील ऋतंभरा प्रज्ञेचा एक मनोज्ञ आविष्कार होय. ते बालान्ध होते; परंतु त्यांच्या प्रतिभासंपन्न प्रज्ञेचा अक्षर-आविष्कार पाहिला म्हणजे त्यांना लाभलेली 'प्रज्ञाचक्षू' ही पदवी किती यथार्थ आहे ते समजून येते. त्यांनी चर्चा केलेल्या विषयांचा केवळ विस्तार पाहिला तरी त्यांच्या अफाट ज्ञानाची कल्पना येते. एकूणच त्यांच्या विवेचनाची खोली, तर्कशुद्धता, शास्त्रपूर्तता आणि स्वतंत्रप्रज्ञता पाहून मन आश्चर्याने थक्क होऊन जाते. अवघ्या चौतीस वर्षांच्या आयुष्यात त्यांनी सव्वाशेच्या आसपास ग्रंथांची रचना मराठी, संस्कृत, आणि हिंदी या भाषांमधून केली आहे. त्यात स्त्रीगीतांपासून खंडण-मंडनात्मक शास्त्रीय ग्रंथांपर्यंतच्या सर्व प्रकारांचा समावेश आहे. गायक जसा अनेक प्रकारच्या ताना घेऊन शेवटी समेवर येतो त्याप्रमाणे श्रीगुलाबराव महाराजांच्या विविध ग्रंथांमधून जो मूलभूत विचार (समेप्रमाणे) प्रतिपाद्य आहे तो म्हणजे 'मधुराद्वैत' त्यांना 'मधुराद्वैताचार्य' असे संबोधिले जाते ते योग्यच होय. थोडक्यात सांगायचे तर त्यांची तात्त्विक भूमिका आहे. 'मधुराद्वैत' या भूमिकेचा स्थूल मानाने परिचय करून देणे हा प्रस्तुत लेखाचा उद्देश होय.

२) श्रीगुलाबराव महाराजांनी स्वतःच आपल्या 'मता'चा निर्णय स्पष्टपणे सांगितला आहे. ते सांगतात –

*"शांकरज्ञानसंयुक्तं भगवद्‌भक्ति-अलंकृतम् ।*
*यद्वाक्यं तत्प्रमाणं स्यादिति स्वमत निर्णयः ॥"*

याचा अर्थ असा की जे मत (वाक्य) शंकराचार्यांच्या अद्वैती तत्त्वज्ञानाने युक्त आणि (संतांच्या) भगवद्‌भक्तीने अलंकृत असेल तेच मत प्रमाण होय असा स्व-मत-निर्णय आहे. महाराजांची ती तात्त्विक भूमिका आहे.यावरून एक गोष्ट स्पष्टपणे दिसून येते, ती म्हणजे श्री महाराज हे शंकराचार्यांच्या केवलाद्वैती तत्त्वज्ञानाचा पूर्णपणे स्वीकार करतात. त्यांच्या तात्त्विक विचारांचे वैशिष्ट्य असे की त्यांच्या मते न्याय-वैशेषिक, सांख्य-योग व पूर्वमीमांसा ही अन्य आस्तिक दर्शने अंततोगत्वा उत्तर मीमांसेला म्हणजे वेदांताला पोषकच ठरतात. वेदांत दर्शनांतही शंकराचार्यांचे निखळ - केवळ - अद्वैती वेदान्तच. वेदान्ताचे परिणत स्वरूप होय. याच्याही पुढे जाऊन महाराज असे सांगतात की ज्ञानेश्वरादि संतांचा भक्तिविचार हा शांकर-अद्वैत-सिद्धान्तानुसारच आहे. ते केवळ असे सांगूनच थांबत नाहीत तर अद्वैताच्या भक्कम अधिष्ठानावर भक्तिदर्शनाची भव्य इमारत उभी करून ज्ञानाचे माधुर्य आस्वाद्य रूपात ते आपणापुढे शब्दांच्या ताटी वाढतात. श्रीगुलाबराव महाराजांनी प्रतिपादिलेल्या मधुराद्वैत भक्ति-दर्शनाचा अभ्यास केल्या शिवाय भक्तिशास्त्राचा अभ्यास पूर्ण होऊच शकणार नाही असे माझे प्रामाणिक मत आहे.

शांकर अद्वैताचे तीन मुख्य सिद्धांत आहेत ते म्हणजे – 'ब्रह्म सत्यम् । जगन्मिथ्या ॥ जीवो ब्रह्मैव ॥' याचा अर्थ एकमेव ब्रह्म हेच सत्‌तत्त्व आहे. भासमान अनेकात्म विश्व किंवा जगत हे 'मिथ्या' आहे. (शाश्वत नव्हे) आणि जीव हा (स्वरूपतः) ब्रह्मस्वरूपच आहे. यापैकी 'जग मिथ्या आहे' हे म्हणणे आक्षेपार्ह वाटते कारण आपण आजन्म जगाला सत्य मानूनच सारा व्यवहार करीत असतो. अर्थात त्यामुळे सुख-दुःखाचे भोक्तृत्व स्वीकारावे लागते. जर दुःखाची पूर्णतः निवृत्ती होऊन शाश्वत आनंदाची प्राप्ती करून घ्यायची असेल तर मात्र जगाच्या सत्यत्वाचा, म्हणजे ते नित्य-शाश्वत-अक्षर आहे या भावनेचा त्याग करणे आवश्यक ठरते. शांकर दर्शनातील माया, मिथ्या इत्यादी शब्द पारिभाषिक आहेत हे ध्यानात ठेवणे आवश्यक आहे. जगत जसे दिसते तसे ते 'सत्य' नाही हा नकारात्मक सिद्धान्त आहे.त्यास 'व्यतिरेक' असे म्हणतात. परंतु त्याचीच भावात्मक बाजू म्हणजे 'एकमेव ब्रह्मच केवळ सत्य आहे' हा प्रमुख सिद्धान्त. त्यास 'अन्वय' असे म्हणतात. संतांनी हाच सिद्धान्त भक्तीच्या भाषेत मांडून सोप्या रीतीने सांगितला आहे. ते सांगतात, चराचर विश्वाच्या रूपाने एक परमेश्वरच नटला आहे. विविधतेने नटलेले जग हा त्याचा विलास होय. ज्ञानेश्वरांनी हा सिद्धान्त 'जग असकी वस्तुप्रभा' (अमृतानुभव) या विधानात मांडला आहे. त्यास 'चिद्‌विलासवाद' म्हणतात. 'अनंतरूपें अनंत वेषें देखिलें म्यां त्यांसी' अशी त्यांची अनुभूती आहे. ही भूमिका भावात्मक असल्याने ती समजण्याजोगी व मान्य होण्यासारखी आहे. मात्र मायावाद आणि चिद्‌विलासवाद या एकाच अद्वैती सिद्धान्ताच्या व्यतिरेकी व अन्वयी अशा दोन बाजू आहेत हे ध्यानात ठेवले पाहिजे. श्रीगुलाबराव महाराजांनी व त्यांचे अधिकारी शिष्योत्तम श्री बाबाजी महाराज पंडित यांनी ही गोष्ट विस्ताराने दाखवून दिली आहे.

३) 'मोक्ष' हा परमपुरुषार्थ असून त्याची प्राप्ती ही जीवनाचे सर्वोच्च अंतिम ध्येय आहे असे मोक्षशास्त्ररूप अध्यात्मविद्या सांगते. मोक्षाची साधने म्हणून ज्ञान, भक्ती आणि कर्म या योगांची चर्चा केली जाते. सामान्यपणे हे तीन भिन्न योग असल्याचे मानले जाते. परंतु आपल्या समन्वयी दृष्टिकोनानुसार श्रीगुलाबराव महाराजांनी त्यांच्या मधील अनुबंध दाखवून दिला आहे. खरे तर ज्ञान आणि भक्ती मिळून परिपूर्ण योग होतो असे त्यांच्या विवेचनावरून दिसून येते. व्यवहार तर कर्माशिवाय होऊच शकत नाही. याचा अर्थ जीवन्मुक्तीच्या संकल्पनेत ज्ञान, भक्ती व कर्म हे एकवटतात.

शंकराचार्यांचे अद्वैती तत्त्वज्ञान हे पायाभूत असल्याने त्याची मांडणी शास्त्रीय पद्धतीने श्री महाराजांनी केली आहे. एवढेच नव्हे तर त्यात त्यांनी 'अनध्यस्त विवर्त' या संकल्पनेची अत्यंत मोलाची व मूलभूत स्वरूपाची भरही घातली आहे. वस्तुतः एकमेवाद्वितीय ब्रह्मच केवळ सत्

आहे तर मग नानात्वाने प्रतीत होणारे जग आले कोठून? ते का भासते? असा महत्त्वाचा प्रश्न अद्वैतासंबंधी निर्माण होतो. त्याचे उत्तर 'अविद्येमुळे' असे दिले जाते. दुसरी सदृश संकल्पना आहे 'माया'. ती आपली फसवणूक करते व भ्रमाने जगाचा पसारा दिसू लागतो आणि तो सत्य मानून आपण व्यवहार करतो. लौकिक व्यवहार हा जगताला सत्य मानून केला जात असल्याने शंकराचार्यांनी जगताला ''व्यावहारिक सत्ता'' असल्याचे सांगितले आहे. पारमार्थिक दृष्ट्या, म्हणजे वस्तुतः मात्र जगत मिथ्या आहे. त्यास सत् म्हणता येत नाही कारण ते नित्य, शाश्वत नसून सतत बदलते आहे. पण ते भासत असल्याने पूर्णतः ते असत्‌ही नाही. म्हणून अध्यासभाष्यामध्ये (ब्रह्मसूत्र भाष्याचा उपोद्घात) ते सांगतात – 'सत्यानृते मिथुनीकृत्य प्रवर्तितोऽयं लोकव्यवहारः ।' याचा अर्थ व्यवहारात सत्य-असत्य यांचे मिश्रण असते. सत्याच्या अधिष्ठानावर नानात्वाचा मिथ्या व्यवहार होत असतो. या सर्व व्यवहाराच्या मुळाशी 'देह म्हणजेच' मी असा देहात्म भाव असतो. तो जोपर्यंत आहे तोपर्यंत माणसाला माझे सत्‌स्वरूप 'आत्मा' आहे असे ज्ञान होत नाही; आणि असे आत्मज्ञान झाल्याशिवाय सुख-दुःखाच्या चक्रातून मुक्तीही प्राप्त होत नाही. म्हणून आत्मज्ञानाचे महत्त्व !

आत्मा हा एकमेवाद्वितीय, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, निरुपाधिक व सच्चिदानंद स्वरूप असताना तो देहाच्या उपाधीने अविद्येमुळे स्वतःला सान्त, बद्ध, मर्यादित व दुःखी बनवितो. त्याच्या मुळाशी अध्यारोप आहे. तो मुख्यतः दोन प्रकारचा : व्यक्तीच्या बाबतीत आत्म्यावर देहाचा आरोप करणे आणि 'समष्टिदृष्ट्या ब्रह्मावर जगताचा आरोप करणे. या बंधातून मुक्त होण्यासाठी 'मी देह नाही' आत्मा (ब्रह्म) आहे' अशी भावना करणे आवश्यक आहे. देहभावाने आत्मा, आणि जगत भावनेने ब्रह्म झांकोळून गेले आहे. त्या भावनेचा निरास करणे म्हणजे 'अपवाद' करणे. वेदांतात त्यास 'नेति नेति' असे म्हटले आहे. श्रीगुलाबराव महाराजांनी श्री. विठ्ठलराव केकरे यांना जे संस्कृत श्लोकात्मक पत्र लिहिले आहे त्यात वेदान्ताचे रहस्य उत्कृष्टपणे विशद केले आहे. (द्वादश यष्टी). 'अध्यारोप-अपवाद' या संबंधी ते म्हणतात –

***'अध्यारोपापवादोद्गतभवविभवौ बंधमुक्त्यर्थसंज्ञौ ।***
***अध्यारोपेण मायाकृतजगदखिलं चिद्विवर्तं विभाति ।***
***श्रीताचार्याप्तबोधात् परमनिजसुखे यो न विश्वासभासः ।***
***सोऽयं बाधोऽपवादः श्रृणु जननि मिया विस्तरेण प्रवक्ष्ये ॥'***

**अर्थात्** – 'अध्यारोप व अपवाद यांच्या योगाने भासणाऱ्या संसाराला व संसारभावालाच अनुक्रमे बंध व मुक्ती अशा संज्ञा आहेत. अध्यारोपाने हे सर्व मायिक जगत चैतन्यावर भासते. आत्मनिष्ठ अशा वेदान्ताचार्यांपासून प्राप्त झालेल्या बोधाने आत्मसुखाचे ठिकाणी तल्लीन झाले असता संसाराच्या आभासाचा जो बोध होतो त्याला अपवाद म्हणतात. आई ! हे मी तुला सविस्तर सांगतो ते ऐक.'

'अध्यारोप' आणि 'अपवाद' या पारिभाषिक शब्दांचा अर्थ इतक्या मार्मिकपणे सांगितलेला क्वचितच आढळतो ! एकूणच त्यांच्या तात्त्विक व शास्त्रीय प्रतिपादनामधून त्यांची स्वतंत्रप्रज्ञा व सखोल, मार्मिक चिंतन प्रकट झाल्याचे सहज समजून येते. अद्वैतापुरते बोलायचे तर त्यांनी शांकर अद्वैत दर्शनातील 'विवर्त'-संकल्पनेत व त्याद्वारा विवर्तवादात मूलभूत मोलाची भर टाकली आहे. कशी ते आता पाहू.

४) जगताच्या स्वरूपाची चर्चा करताना भारतीय तत्त्वज्ञानात कार्यकारण सिद्धान्ताचीही चर्चा विस्ताराने केली आहे. विविध दर्शनांनी विविध सिद्धांत स्वीकारले आहेत. आरंभवाद, परिणामवाद, प्रतीत्यसमुत्पाद आणि विवर्तवाद यांचा स्वीकार अनुक्रमे न्याय-वैशेषिक, सांख्य, बौद्ध आणि अद्वैत वेदान्त यांनी केला आहे. शंकराचार्य प्रणीत विवर्तवादाचा अंगीकार श्रीगुलाबराव महाराजांनीही केला आहे. जगत हे ब्रह्माचे विवर्तस्वरूप कार्य आहे. सामान्यपणे कारणाची जी सत्ता असते तीच कार्याचीही असते. अर्थात कार्य आणि कारण हे 'समसत्ताक' मानले जातात. विवर्त वादात मात्र कार्य कारणाच्या सत्तेहून भिन्न सत्तेचे मानले जाते. कारण कार्य हे ''विषम सत्ताक' मानले जातात. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे कारणात वस्तुतः कोणताही विकार न होता, कारणाच्या मूळ स्वरूपाला कोणताही धक्का न पोहोचता जे कार्य निर्माण होते त्यास विवर्त म्हणतात. श्रीमहाराजांच्या शब्दांत - 'स्वरूपात विकार न पावून जो अपररूप होतो त्याला विवर्त म्हणतात.' (वे.प.दी. पृ.१०) जगताच्या रूपाने भासते ते ब्रह्मच. पण ब्रह्माच्या स्वरूपात कोणताही बदल या भासामुळे होत नाही. जगत हे ब्रह्माचे विवर्त होय. याचा अर्थ आपण अज्ञानामुळे नानात्वाने भासणाऱ्या जगताचा एकमेवाद्वितीय ब्रह्मावर अध्यारोप करतो, 'अध्यास' करतो. उदाहरणार्थ – व्यवहारात जसा भ्रमकाली 'दोरा' वर 'सर्पा'चा आरोप केला तरी वस्तुतः असता तो दोरच. यथार्थ ज्ञानाने सर्पाभासाची निवृत्ती होते. हे आहे अध्यासाचे स्वरूप. श्रीमहाराज त्यास 'अध्यस्त विवर्त' म्हणतात. त्यात 'सर्प'ज्ञानाने 'रज्जु' ज्ञान आवृत्त-झाकलेले असते. तसे 'जगत्'भावाने 'ब्रह्म'ज्ञान झाकले जाते; त्यामुळे मिथ्या-भासरूप-असूनही जगत सत्य वाटते.

अद्वैत सिद्धान्ताच्या पारंपारिक चर्चेमध्ये रज्जु-सर्पाबरोबर सुवर्ण-अलंकाराचाही विवर्ताचा दृष्टांत म्हणून उल्लेख केला जातो. ज्ञानेश्वरांनीही चांगदेव पासष्टीत 'सोनें सोनेपणा उणें । न येतांचि झाले लेणें ॥' असा त्याचा उल्लेख केला आहे. मात्र या दृष्टांताचे वैशिष्ट्य असे की 'सर्पा'ने जसा 'रज्जु' झाकला जातो, तसे 'अलंकारां'नी (लेणे) 'सुवर्ण' झाकले जात नाही; उलट अधिक आनंददायी, शोभायमान होते. हे दोन्ही दृष्टांत विवर्ताचेच असले तरी त्यांच्यामधील भेदही शास्त्रदृष्ट्या महत्त्वाचा आहे. रज्जु-सर्प हा अभावात्मक, व्यतिरेकी दृष्टांत आहे, तर सुवर्ण-अलंकार हा भावात्मक, अन्वयी आहे. श्रीगुलाबराव महाराजांनी अद्वैताच्या इतिहासात प्रथमच 'विवर्ता'चे दोन प्रकार सांगून शास्त्रात मोलाची भर घातली आहे. ते प्रकार म्हणजे - (अ) अध्यस्त विवर्त; आणि (ब) अनध्यस्त विवर्त. श्रीमहाराज सांगतात – 'भ्रमें करून वस्तूचे अन्यथा ज्ञान याला अध्यस्त विवर्त म्हणतात. आणि ज्ञानेकरून प्रीत्यनुसार वस्तूचे विशेष यथार्थ्य अनध्यस्त विवर्त म्हणावा. रज्जु-सर्प अध्यस्त श्रीमहाराजांनी 'अध्यस्त विवर्त' आणि 'अनध्यस्त विवर्त' यांच्या केलेल्या व्याख्या अशा –

१) 'अपररुपत्वे सति भेदभानपूर्वकम् अधिष्ठान ज्ञानावरकत्वे सतिच अधिष्ठाननिवर्त्यम् अध्यस्तविवर्तत्वम् ।' अर्थ : 'ज्या रुपाचे ठिकाणी मूळरूपाहून इतर रुपत्व आहे. ज्या रुपाने मूळ अधिष्ठानाच्या ज्ञानाला झाकले आहे आणि अधिष्ठानाच्या ज्ञानाने जे रूप नाहीसे होते त्यास अध्यस्त विवर्त म्हणतात.'

२) 'अभिन्ने सति, अपररुपत्वे सति, भेदाभानपूर्वकम् अधिष्ठान ज्ञानअनावरकत्वे सतिच प्रीतिमात्रत्वात् अधिष्ठानज्ञान-अनिवर्त्यम् अनध्यस्त विवर्तलक्षणम् ।'

३) अर्थ : 'ज्या रुपाचे ठिकाणी मूळ रूपाहून इतर रुपत्व आहे, मूळ वस्तू नव्हे असे भान नाही, ज्या रूपाने मूळ अधिष्ठानाच्या ज्ञानाला झाकले नाही, आणि ज्याचे ठिकाणी प्रीतिमात्रत्व असल्यामुळे अधिष्ठानज्ञानाने जे रूप नाहीसे होत नाही, ते रूप अनध्यस्त विवर्त होय.' (वे.प.दी. पृ.१०) विवर्त आणि कनकभूषण अनध्यस्त विवर्त आहे.' (वे.प.दी.पृ. ९,१०)

येथे एक गोष्ट ध्यानात ठेवली पाहिजे ती ही की श्रीमहाराज विश्वाला अध्यस्त विवर्तच मानतात. अनध्यस्त विवर्ताची संकल्पना त्यांनी मांडली ती मुख्यतः श्रीकृष्णाचे (ईश्वराचे-अवताराचे) शरीर पांचभौतिक नसून 'दिव्य' आहे, हा सिद्धान्त स्पष्ट करण्यासाठी. 'सगुण निर्गुण एक गोविंदु रे !' हे ज्ञानेश्वर वचन शास्त्रतः खरे आहे, अर्थवाद नव्हे. ही गोष्ट त्यांनी परोपरीने सिद्ध केली आहे. श्रीकृष्णाच्या भासमान शरीरोपाधीने त्याचे ब्रह्मत्व झाकले जात नाही, उलट ज्ञान-समाधीतून व्युत्थान पावल्यावर आत्मज्ञानी भक्ताच्या जीवनाचे ते आलंबन बनून जीवन्मुक्तीचा आनंद 'याचि देहीं, याचि डोळां' उपभोगण्यास त्यास मदत करते. पूर्वी उल्लेखलेल्या पत्रामध्ये श्रीमहाराज सांगतात - 'अध्यस्तं विद्याद्हि विश्वं स यदुपतिरनध्यस्ततो नापनेयः ।' अर्थात - जगत (विश्व) हे अध्यस्त विवर्त असून भगवान श्रीकृष्ण हे अनध्यस्त विवर्त असल्याने (ब्रह्म) ज्ञानाने त्यांचा निरास होत नाही. भगवद् गीतेमध्ये स्वतः श्रीकृष्ण सांगतात, 'जन्म कर्म च मे दिव्यम् ।' त्याचे शास्त्रीय स्पष्टीकरण आपणास अनध्यस्त विवर्ताच्या संकल्पनेद्वारा मिळते. असे जरी असले तरी दिव्य देहधारी श्रीकृष्णाप्रमाणेच (इष्टदेवा प्रमाणेच) अनध्यस्त विवर्ताची संकल्पना परमेश्वराच्या 'विश्व'रूपालाही लागू पडते असे मला वाटते. चराचर विश्वाच्या रूपाने एक परमेश्वरच नटला आहे. 'अनंत रूपें अनंत वेशें देखिले म्या त्यासी' असा विश्वात्मक ईश्वराचा साक्षात्कार ज्ञानीभक्ताला जो होतो त्याचे स्वरूपही अनध्यस्त विवर्त असेच आहे. त्यालाच 'चिद्विलास' असे म्हटले जाते. पराभक्तीचीही अवस्था आहे. या विश्वरूप दर्शनात जगताचा जगरूपाने निरास होऊन (व्यतिरेक, अपवाद) होऊन त्याची परमात्मरूपाने प्रतीती येते - 'वासुदेवः सर्वम् इति ।'. ईशावास्य उपनिषदानेही 'ईशावास्यमिंद सर्व यत् किंच जगत्यां जगत् ।' असे आत्मज्ञानी भक्ताच्या साक्षात्काराचे स्वरूप वर्णिले आहे. ज्ञानेश्वरांनीपण 'विश्व येणें नांवें । हे मी चि पैं आघवें ।' असे म्हटले आहे. थोडक्यात सांगायचे तर जगतासंबंधीच्या अद्वैती उपपत्तीची 'मायावाद' ही व्यतिरेकी बाजू (अध्यस्त विवर्त) आहे, तर 'चिद्विलासवाद' ही अन्वयी बाजू (अनध्यस्त विवर्त) आहे असे यथार्थपणे म्हणता येईल असे मला वाटते. शरीर धारण केल्याने जसे श्रीकृष्णाचे ब्रह्मत्व लपत नाही, तसे विश्वरूपाने विलास केल्यामुळेही ते लपत नाही. विश्वात सारे जीव समाविष्ट आहेत हे वेगळे सांगायला नको. अशा रीतीने श्रीगुलाबराव महाराजकृत विवर्त-विवेचनाचे शास्त्रीय स्वरूप आणि महत्त्व जाणून घेतल्यानंतर त्यांच्या आणखी एका वैशिष्ट्यपूर्ण विचाराकडे वळू.

अद्वैत दर्शनात महावाक्य-विचाराला महत्त्वपूर्ण स्थान आहे. त्यांतही 'तत् त्वम् असि' हे महावाक्य विशेष महत्त्वाचे. सामान्यपणे या सामवेदीय महावाक्याचा ज्ञानपर अर्थ स्वीकारून त्याचाच बोध सद्गुरु सत्शिष्याला करतात. भागत्याग लक्षणेने 'तत्' व 'त्वं' या पदांच्या विशेषार्थाचा त्याग करून दोन्ही पदांनी लक्षित ब्रह्म एकच आहे आणि 'ते तू आहेस' असा बोध त्यातून दिला-घेतला जातो. येथे 'तत्' म्हणजे ब्रह्म, 'त्वं' म्हणजे जीवात्मा आणि 'असि' म्हणजे दोहोंचे स्वरूपतः ऐक्यदर्शक पद. या बोधाने उदित झालेल्या ज्ञानाने शिष्यास 'अहं ब्रह्मास्मि' चा प्रत्यय येऊन जगाचे भान मावळते. पण व्यवहारामध्ये ही ज्ञानसमाधी अखंड टिकत नाही. त्यातून ज्ञान्याला व्युत्थान पावावेच लागते. त्या वेळी येणाऱ्या द्वैतानुभवातही अद्वैताची आनंदानुभूती कशी टिकवावी असा प्रश्न निर्माण होतो. त्याचे उत्तर श्रीगुलाबराव महाराजांनी 'ज्ञानोत्तर पराभक्ती' असे दिले आहे. तिचे विवेचन करताना त्यांनी 'तत्त्वमसि' या महावाक्याचा भक्तीच्या अंगाने अन्वयार्थ लावून भक्तिदर्शनात अद्वैताप्रमाणेच मोलाची भर घातली आहे, हे त्यांच्या तत्त्वज्ञानाचे वैशिष्ट्य होय.

या संबंधातील महाराजांचा 'स्वमतनिर्णय' आहे –

*'धारावाही रसो भक्तिरीशे तत्पद गोचरे ।*
*त्वंपदज्ञो परोभक्त इति स्वमतनिर्णयः ॥' (४७)*

याचा अर्थ असा की 'तत्' पदाचा लक्ष्यांश षड्गुणैश्वर्य संपन्न अनध्यस्त विवर्त असा भगवान श्रीकृष्ण आहे. आणि त्याची भक्ती करणारा आत्मज्ञान संपन्न भक्त हा 'त्वं' पदाचा लक्ष्यांश होय. 'असि'पद हे पराभक्तीचे वाचक आहे. व्युत्थान काळी उद्भवणाऱ्या सर्व वृत्ती भगवंताच्या ठिकाणी समर्पित केल्या जातात. त्यामुळे 'अद्वैत' (भज्य-भक्ताचे) कायम राहून जीवन्मुक्ती शक्य होते. ज्ञानी भक्त हा अखंडपणे सहज-समाधीची अनुभूती घेत असतो आणि 'भक्ती'मुळे आनंद-साम्राज्याचा तो चक्रवर्ती होतो. कारण भक्ती म्हणजे ईश्वराविषयीचे परम प्रेम, अखंड हरि-प्रीती. या प्रेमरसाचा आस्वाद म्हणजेच परमानंद. 'तत्', 'त्वं' आणि 'असि' या पदत्रयाचे मार्मिक व विस्तृत विवरण महाराजांनी आपल्या 'भक्तिपदतीर्थामृत' नामक लघुकाय परंतु अमूल्य ग्रंथामध्ये केले आहे. ते मुळातूनच अभ्यासायला हवे.

भक्ती ही अद्वैतानुभवातील परमानंदाची स्थिती आहे. ईश्वर हा सच्चिदानंद स्वरूप आहे. मात्र त्याच्या 'आनंद' स्वरूपाचा रसमय साक्षात्कार होतो तो पराभक्तीमध्ये. 'आनंदचि अंग आनंदाचे' अशा स्वरूपात भक्त माधुर्य भावाने परमेश्वराशी एकरूप होऊन अखंड भक्तिरसामृत स्वरूपाच्या आनंदाचा आस्वाद घेत असतो. मात्र या पराभक्तीचा-माधुर्य भक्तीचा - अधिकारी केवळ आत्मज्ञानीच असू शकतो हे महाराजांनी स्पष्ट केले आहे. म्हणून तिला 'ज्ञानोत्तर भक्ती' असे म्हटले जाते. आत्मक्रीडा, आत्मरति, चिद्विलास, आत्मलीला इत्यादी पदांनी हीच अद्वयानंदानुभूती निर्दिष्ट आहे. श्री. केकरे यांच्या पत्रात महाराज सांगतात –

*'गोविंदानंदसिंधौ द्रुतसलिलमयी प्रीतिमंदाकिनी या ।*
*प्रोल्लासैः संप्रयाता मधुररसवशात् स्वच्छवात्सल्यतो वा ।*
*सद्भावापूर्यमाणो हरिहरचरणांभोरुहस्थायिभावः ।*
*संसारासक्तिनाशे रसघनपरमानंदताम्यक्तिमेति ॥' १४*

याचा भावार्थ असा की माधुर्य भावाने किंवा शुद्ध वात्सल्य भावाने चित्त द्रवित होऊन वाहणारी प्रेमगंगा जेव्हा उल्हासाने गोविंदरूपी आनंद सागराला मिळते, तेव्हा तोच सद्भावाने पुष्ट झालेला स्थिर-दृढ- हरिहरचरणकमलानुराग, संसारासक्ती पूर्णपणे नाहीशी झाली म्हणजे अत्युत्कट भक्तिरसानंदाला प्राप्त होतो.

येथवरील विवेचनावरून एक गोष्ट सहजपणे दिसून येते ती म्हणजे श्रीगुलाबराव महाराजांचे तत्त्वज्ञान मूलतः अद्वैती आहे; परंतु त्याचे वैशिष्ट्य असे की ते अंती पराभक्तीमध्ये परिणत होते. ज्ञानेश्वरांनीही अद्वैती

ज्ञानभक्तीचा पुरस्कार केला आहे. ते म्हणतात, "तैसी क्रिया कीर न साहे । तरी अद्वैती भक्ती आहे । हें अनुभवाचि जोगे, नव्हें । बोला ऐसें ।' (१८.११५१). तसेच – 'इया ज्ञानभक्ती सहज । भक्त एकवटला मज । तो मीचि हें तुज । श्रुतही आहे ।।' (१८.११३०) याच अद्वैती ज्ञानभक्तीचे स्वरूप महाराजांनी विशद करून सांगितले आहे. तसे करताना त्यांनी नारद व शांडिल्य यांच्या भक्तिसूत्रांचा पूर्णपणे उपयोग करून माधुर्य भावाचे श्रेष्ठत्वही सिद्ध करून दिले आहे. प्रस्तुत लेखाचा विषय तत्त्वज्ञान असल्याने येथे भक्तीची चर्चा अभिप्रेत नाही. तथापि त्यांच्या दृष्टीने परा मधुरा भक्ती ही आत्मज्ञानाची पराकाष्ठा असल्याने तिचा निर्देश अवश्यकच आहे. त्यांचे एक मार्मिक वचन असे –

*'आत्मनि नारदोक्त भक्ती । अंतःकरणीं शांडिल्य रीती ।*
*दोन्ही मिळोनी श्रीहरिमूर्ती । अंतर्बाह्य ।।' (प्रीतिनर्तन ४.३८)*

*'भक्तिपदतीर्थामृता'मध्ये ते स्पष्टच सांगतात –*

*'एवं हरिभक्त्युत्कर्ष भला । नारद शांडिल्यें निरुपिला ।*
*तोचि अवलंबूनि वहिला । सांगिजेल ।।' (१.३६)*

यावरून आपल्या ध्यानात येईल की महाराजांनी शांकर-अद्वैत-तत्त्वज्ञान आणि नारद-शांडिल्योक्त सूत्रबद्ध भक्ती विचार यांचे 'मधुर' अद्वैत रसायन सिद्ध करून सर्व मुमुक्षू साधकांना मार्गदर्शनाबरोबरच शास्त्रबलही प्रदान केले आहे. ज्ञान आणि भक्ती यांच्यामधील आंतरिक संबंध त्याला तात्त्विक दृष्ट्या अत्यंत मार्मिकपणे विशद करून हरिभक्तीचे माहात्म्य प्रस्थापित केले आहे. या संबंधातील त्यांच्या विचारांचा सारांश असा की जीव हा स्वरूपतः शिव (ब्रह्म) रूप असूनही संसार बंधनाने बद्ध होऊन तो ब्रह्माशी असलेले आपले ऐक्य विसरतो व दुःख भोगतो. या बंधनाला - ग्रंथीला - कारण आहेत देहबुद्धीचे (मी देह आहे, ब्रह्म नव्हे असे) विपरीत ज्ञान आणि तज्जन्य देहसुखाची वासना. या उपाधींचा निरास झाल्याशिवाय मोक्ष नाही, आणि तो निरास केवळ ज्ञानाने होत नाही. ज्ञानाने उपाधींचे 'ज्ञान' होते. 'निरास' होत नाही, विशेषतः वासनेचा. त्यामुळे उपाधी नाशासाठी अन्य मार्ग शोधला पाहिजे व तो खात्रीचा मार्ग म्हणजे 'पराभक्ती'. हा विचार महाराजांनी 'भक्तिपदतीर्थामृता'च्या 'भक्तिउपक्रमा'त सुंदर मांडला आहे. तात्पर्य – 'केवळ ज्ञानेंकरून । उपाधीसीं नाही मरण ।।' 'ते कारण ईश्वरभक्ती । निष्कामरूपा अलौकिकी ।।'

दुसऱ्याही एका दृष्टीने महाराजांनी भक्तीचे श्रेष्ठत्व सांगितले आहे ते असे की – 'ब्रह्मवेद ब्रह्मैव भवति' या श्रुति अनुसार ज्ञानाने उपाधींचा निरास होतो असे मानले तरी ती ज्ञान-समाधी अखंड अभंग राहात नाही. त्यातून व्युत्थान झाल्यावर पुनः उपाधींचे राज्य सुरु होते. अशा परिस्थितीत प्रश्न निर्माण होतो तो व्युत्थानकालीही. या उपाधींचा निरास करून अभंग राहणारी स्वानंदरूप समाधी कशाने प्राप्त होईल. त्याचे उत्तर 'भक्ती'हेच आहे. 'सहज कर्मे ती झाली ब्रह्मार्पण' या एकनाथ महाराजांच्या उक्तीप्रमाणे ज्ञानी भक्ताच्या साऱ्या वासना ईश्वरार्पण होत असल्याने त्यांचा समूळ निरास होतो. जोपर्यंत सदेह स्थिती आहे तोपर्यंत भक्तीच जीवन्मुक्तीला कारण होऊ शकते. या मधुर अशा पराभक्तीच्या प्राप्तीसाठी मात्र आत्मज्ञानाची आवश्यकता आहे. महाराज भक्ताविषयी सांगतात की,

*'त्याच्या ब्रह्मरूप वासना । तोचि ब्रह्मप्रापक जाणा ।*
*कीं जीवन्मुक्तीच्या गृहीं पाहुणा । तोचि एक ।।' (३४)*

थोडक्यात,

*'अज्ञान काळीं देहप्रीती । ज्ञानकाळीं अहंब्रह्मासक्ती ।*
*दोहोंत्यागें अन्वयें शुद्ध प्रीती । त्या नांव भक्ती अनिर्वाच्य ।।' (४२)*

या दुसऱ्या व्युत्थानाच्या दृष्टीने महाराजांनी दाखवून दिलेले भक्तीचे माहात्म्य माझ्या दृष्टीने विशेष महत्त्वाचे व पटण्यासारखे आहे. त्यात ज्ञानाच्या महात्म्यालाही बाधा येत नाही. 'ज्ञानान्मोक्षः' हे मान्य करूनही व्युत्थानकाली मुक्तीचा सोहळा उपभोगण्यासाठी पराभक्तीची नितान्त आवश्यकता आहे हे नाकारता येणार नाही. या संदर्भात ज्ञानेश्वरांचे प्रसिद्ध मार्मिक वचन बहुमोलाचे आहे, ते म्हणजे –

'चहुं पुरुषार्थाशिरीं । भक्ति जैसी ।।' (१८.८६७) दुसऱ्या रीतीने सांगायचे तर भक्ती ही पंचम पुरुषार्थ होय. येथे पुरुषार्थ चार आहेत का पाच हा विषय नसून, भक्ती ही आत्मज्ञानाने मिळणाऱ्या मोक्षाच्या प्राप्तीनंतरही जीवनात सहजपणे होत असल्याने ती श्रेष्ठ आहे असे त्यातून ज्ञानेश्वर सुचवित आहेत. श्रीगुलाबराव महाराजांनी ही गोष्ट सिद्धांत रूपाने सविस्तर मांडली आहे. ते सांगतात –

'जीवन्मुक्तीही जालियावरी । निरपेक्ष कृष्ण सेवा करी । तयाचा विकला श्रीहरी । जीवेंभावें ।।' (भ.पद. १.३५) या जीवन्मुक्त स्थितीत आनंदाचा उत्कर्ष असतो हे निराळे सांगावयास नको. कारण सच्चिदानंद ईश्वराचा आनंदांश म्हणजेच भक्ती. श्रीबाबाजी महाराज पंडित यांच्या शब्दांत सार सांगायचे तर – 'श्रीगुलाबराव महाराजांनी आपल्या ग्रंथांतून श्रीकृष्णादि अवतारांच्या शरीराचे निरुपाधिकत्व, चिदानंदमयत्व, पूर्णत्व कसे आहे व त्याची प्रेमभक्ती केल्यावाचून व्यतिरेक ज्ञान्यांचे ठिकाणी राहणारा अविद्यालेश कसा नाहीसा होत नाही व निर्विकल्प सहजावस्था कशी बाणत नाही हे वेदान्तसिद्धांताला धरून सांगितले आहे.' आणि 'ब्रह्मज्ञान होण्यापूर्वी, ब्रह्मज्ञान होण्याकरिता, ब्रह्मज्ञानानंतर जिवंतपणीच जीवन्मुक्तीचे व विदेह मुक्तीचे सुख भोगण्यासाठी ज्ञानोत्तर-रामकृष्णादी सगुणसाकाराची भक्ती अवश्य केली पाहिजे, हे सर्व श्रीगुलाबराव महाराजांच्या ग्रंथाचे सार आहे.' (परमार्थ सार, ८१.३)

भारतीय तत्त्वज्ञान, विशेषतः वेदान्त हे मोक्षशास्त्र आहे. अद्वैत वेदान्ती तत्त्वज्ञान हे त्याचे शिखर आहे असे मानले जाते. त्यापुढे जाऊन श्रीगुलाबराव महाराजांनी संयुक्तिकपणे शास्त्रतः दाखवून दिले की मधुरा पराभक्ती हा त्यावरील कळस आहे. अद्वैताच्या पायावर आनंददायी, मधुरा भक्तीचा सुंदर राजप्रासाद उभा करून श्रीमहाराजांनी मोक्षमार्गीच्या पांथस्थांसाठी प्रशांत रमणीय असे विश्रामस्थान निर्माण केले आहे. मधुराद्वैताच्या धर्माचे प्रकटीकरण त्यांनी केवळ विचारातूनच नव्हे तर आपल्या साऱ्या जीवनातून केले. त्यांचे फार मोठे वाचा-ऋण मानव जातीवर आहे. त्यातून मुक्त होण्याचा एकच उपाय आहे असे ज्ञानेश्वर सांगतात व तो म्हणजे 'पायावर डोके ठेवणे.' ज्ञानेश्वरांच्या शब्दांत –

*'तें ऋणशेष वाचा इया । न फेडवेचि म्हणोनिया ।*
*तें पायां पडोनि मियां । सोडविलें ।।' (अमृ. ३-३२)*

इतिशम् ।

**प्रा. डॉ. शं. रा. तळघट्टी**
चैतन्य २, गणंजय सोसायटी, पुणे ४११०२९.

# चिद्‌विलास

*जन्म : मे १९१४ चंद्रपूर, शिक्षण - एम.ए.पीएच.डी. काव्यतीर्थ, वेदांत केसरी श्री बाबाजी महाराज पंडित यांचे सुपुत्र व शिष्य. माजी भाषा संचालक व उपसचिव - मध्यप्रदेश व महाराष्ट्र राज्य. माजी सदस्य भाषा विधि आयोग भारत सरकार, शांकर तत्त्वज्ञानात भक्तीचे स्थान - पी.एचडी. प्रबंध, लेखसंग्रह व विवरण - श्रीगुलाबराव महाराजांचे अनेक ग्रंथांवर चिद्‌विलास व भक्तितत्त्व, अद्वैत भक्ती, माधुर्य कल्लोळ, वेदस्तुती दीपिका, तर्कानि ईश्वरसिद्धी, भक्तीतत्त्वविवेक, प्रियपाहुणेर इ. विपुल लेखन.*

**श्री**शंकराचार्यांचे नाव मायावादाशी जितके निगडीत आहे तितकेच चिद्‌विलासवादाशीही निगडीत असल्याचे अनेक प्राचीन व अर्वाचीन विद्वानांना जाणवत नाही. आचार्यांची पाऊले पुसत जाणाऱ्या महाराष्ट्रातील वारकरी, रामदासी व दत्तसंप्रदायातील सर्व संतमहात्म्यांनी मात्र मायावाद व चिद्‌विलासवाद, अज्ञान व ज्ञान या दोन भूमिकांना अनुक्रमे धरून असल्याने त्यांच्यात विरोध नसून चिद्‌विलासवादाच्या ध्येयाच्या पूर्तीकरता मायावाद आवश्यक असल्याचे त्यांनी आपल्या सर्व वाङ्मयातून प्रतिपादन केले आहे.

भारतीय तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात वेदांत व शंकराचार्य हे जे समीकरण होऊन बसले त्याचे कारण श्रीशंकराचार्यांचे तत्त्वज्ञान अत्यंत बुद्धिवादी आहे हे होय. शंभर श्रुतींनी अग्नि शीतल आहे म्हणून सांगितले तरी आम्ही ते मानणार नाही. (नहि श्रुतिशतमपि वन्हिरुष्ण रिति वक्तुंप्रभवति) अशा तऱ्हेचे बुद्धिवाद मानणारे आचार्य केवळ बुद्धिवरच भर देतात असे नाही. त्यांनी बुद्धी, श्रुती व अनुभव या त्रयींची सांगड घालूनच आपल्या अद्वैत तत्त्वज्ञानाची उभारणी केलेली आहे. त्यामुळे या तीनपैकी केवळ एकावर भर देणाऱ्या रामानुजवादी तत्त्वज्ञान्यांच्या तत्त्वज्ञानात आलेला एकांगीपणा श्रीआचार्यांच्या तत्त्वज्ञानात आढळून येत नाही.

अद्वैत तत्त्वज्ञानात ज्ञानाचे वर्गीकरण करीत असताना परोक्ष आणि अपरोक्ष असे दोन भाग करण्यात आले आहेत. बुद्धीने निर्धारीत केलेले तत्त्वज्ञान परोक्ष असून तेच स्वानुभूतीत परिणत झाल्यानंतर अपरोक्ष मानण्यात येते, हा भारतीय तत्त्वज्ञानाचा एक महत्त्वाचा विशेष आहे. एखादे तत्त्वज्ञान बरोबर की चूक हे ठरवितांना ते या तत्त्वज्ञानाच्या कसोटीवर घासून पहाण्यात येते. प्रस्तुत विषयाच्या दृष्टीने बोलायचे तर अद्वैत तत्त्वज्ञान हे सप्रयोजन आहे. वस्तुतः प्रयोजन नसतांना ज्ञानाची प्रवृत्तीच होऊ शकत नाही अशी भारतीय तत्त्वज्ञानाची धारणा आहे. प्रयोजन असल्याशिवाय सामान्य माणूसदेखील ज्ञानाकरता प्रवृत्त होत नाही. (प्रयोजनमुनुद्दिश्य न मंदोऽपि प्रवर्तते ।) असे सर्व भारतीय तत्त्वज्ञानीयांचे म्हणणे आहे.

आत्यंतिक दुःखनिवृत्तिपूर्वक परमानंदप्राप्ति हे शांकर तत्त्वज्ञानाचे प्रयोजन आहे व यालाच त्यांनी मोक्ष हे नाव दिले आहे. हा मोक्ष अनित्य नसून नित्य आहे व म्हणूनच तो भावरूप आहे, असे आचार्य म्हणतात. आत्यंतिक दुःखनिवृत्ती हे प्रयोजनाचे पहिले अंग असून अखंड परमानंदप्राप्ति हे त्याचे दुसरे अंग आहे. पहिले अंग प्राप्त झाल्याशिवाय दुसरे अंग प्राप्त होऊ शकत नाही. सर्व मानवांची धडपड त्याच करता असल्यामुळे नित्य परमानंदप्राप्ती त्यांना करून देणे हेच आचार्यांच्या तत्त्वज्ञानाचे ध्येय आहे.

अखंड परमानंदप्राप्ती हे वेदांताने ठरविलेले प्रयोजन प्राप्त करून घेण्याकरिता वेदांत म्हणतो की पूर्णता ही उत्पन्न होत नाही व उत्पन्न होणारी पूर्णता ही रहात नाही. पूर्णता ही स्वयंसिद्ध अवस्था आहे. अपूर्ण ते नाशिवंत असते आणि व्यापक वस्तूच अविनाशी असते. (यदल्पम् तन्मर्त्यम् । यो वै भूमा तदमृतम्) वेदांताने ठरविलेले प्रयोजन प्राप्त करण्याची इच्छा करणाऱ्या जीवांनी आपल्या स्वरूपाचा विचार करावा. श्रीशंकराचार्यांचे शिष्य असलेल्या श्रीसुरेश्वराचार्यांनी संपूर्ण अद्वैत वेदांत केवळ अर्ध्या श्लोकांत सांगितला आहे. ब्रह्म हेच एकमेव सत्य असून त्या व्यतिरिक्त जगतादी सर्व मिथ्या आहे. जीव हा ब्रह्मापासून निराळा नसून तो ब्रह्मच आहे. (ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव ना परः ।) जगात जो भेद दिसतो त्यामुळेच अपूर्ण आहे हा त्याला अनुभव येतो. ही अपूर्णता किंवा भेद नाहीसा करून एक पूर्ण अविनाशी वस्तूच आहे हे सिद्ध करण्याकरता भेद खोटा किंवा मायाजन्य अशा मायावादाचा आश्रय केल्यावाचून बुद्धिवाद्याला गत्यंतर राहात नाही. त्यामुळेच मायावाद हा सिद्धांत नसून वेदांताचे परमानंद प्राप्ती प्रयोजन सिद्ध करणारी ती एक प्रक्रिया आहे हे लक्षात ठेवणे आवश्यक आहे. परब्रह्म, ज्ञातृस्वरूप चेतनस्वरूप जीव व ज्ञेयरूप जगत् यांचा विचार करीत असताना श्रीआचार्य म्हणतात की सुवर्णापासून जसे अलंकार व्हावे किंवा पाण्यावर लाटा उठाव्यांत त्याप्रमाणे केवळ नामरूपांच्या योगाने ब्रह्म आपलाच आनंद घेण्याकरता बहुरूप झाले आहे. (तदेतन्नामरूपव्याकरणं ब्रह्मणो बहुभवनम् । नान्यथा निरवयस्य ब्रह्मणो बहुत्वापत्तिरूपोपघतेऽल्पत्वंवा । तैत्तीरीयोपनिषद) सर्व नामरूपादिक सत् ब्रह्मरूप असल्यामुळे नामरूप कार्यादी पदार्थ सत्य आहेत. पण परब्रह्माहून त्यांना निराळे समजल्यास मात्र ते खोटे आहेत असे आम्ही म्हणतो (सर्वच नामरूपादी सदात्मनैव सत्यं विकारजातं स्वतस्त्वनृतमेव । छांदोग्य ६।२।२)

सर्व भूते ब्रह्मापासून झाली असल्यामुळे ती ब्रह्मस्वरूपच आहेत असे जाण. सर्व नामरूपे, सर्व कर्मे ब्रह्मस्वरूपच आहेत असे श्रुतींचे म्हणणे आहे. सुवर्णापासून झालेले अलंकार जसे नित्य सुवर्णरूपच असणार तसे ब्रह्मापासून झालेले जगत् नित्य ब्रह्मस्वरूपच आहे.

*ब्रह्मणः सर्वभूतानि जायन्ते परमात्मनः ।*
*तस्मादेतानि ब्रह्मैव भवन्तीत्यवधारयेत् ॥*
*ब्रह्मैव सर्व नामानि रूपाणि विविधानिच ।*
*कर्माण्यपि समग्राणि बिभर्तीति श्रुतिर्जगौ ॥*
*सुवर्णा ज्जायमानस्य सुवर्णत्वं च शाश्वतम्।*
*ब्रह्मणो जायमानस्य ब्रह्मत्वंच तथा भवेत् ॥*

(अपरोक्षानुभूती) या सर्व प्रमाण वचनांवरून वाचकांच्या लक्षात येईल की चिद्‌विलासवाद हाच वेदांताचा अंतिम सिद्धांत असून श्रीशंकराचार्यांनी त्याचेच प्रतिपादन करण्याकरिता आपल्या अद्वैत वेदांताची

उभारणी केली आहे. त्यामुळे आचार्यांचे अनुयायी असलेल्या महाराष्ट्रातील सर्व संप्रदायांच्या साक्षात्कारी श्रीज्ञानेश्वर महाराज, तुकाराम महाराज व एकनाथादी सर्व संतमहात्म्यांनी तो सिद्धांत स्वीकारला असून त्याचेच प्रतिपादन केले. काही विद्वान मंडळींनी श्रीशंकराचार्यांचा 'मायावाद' व श्रीज्ञानेश्वर महाराजांचा 'चिद्‌विलासवाद' ही दोन भिन्न प्रकारची तत्त्वज्ञाने आहेत असे प्रतिपादन करून त्यात फरक दाखवण्यासाठी श्रीगुलाबराव महाराजांचे काळात 'चित्रमयजगत्' च्या अंकांमधून लेखन केले व श्रीशंकराचार्य हे मायावादी होते म्हणून वाद निर्माण केला. त्या वेळी 'मुमुक्षु' मासिकातून त्याला स्पष्ट उत्तर देऊन दोघांचे एकच तत्त्वज्ञान असून मायावादानेच चिद्‌विलावाद कसा सिद्ध होतो ही सिद्धता मांडण्याची त्यांची फार इच्छा होती पण ती तशीच अपुरी राहिली. ती पुढे त्यांचे उत्तराधिकारी वेदांतकेसरी श्रीबाबाजी महाराज पंडित यांनी पूर्ण केली. या लेखातील विवेचन श्रीगुलाबराव महाराज व श्री. बाबाजी महाराज पंडित यांच्या विचारधारेला धरून आहे.

परब्रह्म अविनाशी चेतनवस्तु आहे. सच्चिदानंद स्वरूपाने आविष्कृत होणे हाच तिचा शक्तीस्वभाव आहे. चैतन्याचा आपलाच आनंद भोगण्याकरता स्फुरण पावण्याचा स्वभावधर्म आहे. (चैतन्येऽहि स्फुरणं स्वाभाविकम्) अविनाशी वस्तूचे धर्म अविनाशी म्हणजे नित्य असतात. अर्थातच अनित्य वस्तूचे धर्म अनित्य असतात हे ओघानेच आले. तर्कशास्त्राचा हा अबाधित नियम आहे. त्यामुळे कोणत्याही वस्तूची त्याची स्वभावशक्ती बदलत नाही. (नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः) प्रत्येक वस्तू धर्मरूपच आहे म्हणजे वस्तू व तिचे धर्म यांचे ऐक्य किंवा तादात्म्य आहे. स्वरूपभूत धर्म नाहीसे झाले की वस्तूच नष्ट झाली असे समजण्यात येते. गोडी जसा साखरेचा धर्म आहे तसे सत् चित् आनंद हे देखील परब्रह्माचे स्वरूपभूत धर्म आहेत. असे हे परब्रह्म जगद्‌रूप होताना आपल्या स्वरूपभूत शक्तीने सत्‌चित् व आनंद या धर्मांनीच आविर्भूत होणार असे असतांना त्याचा नामरूपांनी होणारा चिदानंदात्मक विलास हा आपल्या सर्व जीवांना ब्रह्माच्या स्वरूपभूत धर्माच्या अगदी विरोधी अशा असत् जडरूप व दुःखरूप जर भासत असेल तर जगत् ब्रह्मरूप नाही असेच मान्य केल्यासारखे होते. जगातील ज्ञेय वस्तू सावयव असल्याकारणाने विकारी असतात, हे बरोबरच आहे पण परब्रह्म अविकारी म्हणजे कधीही विकार न पावणारे व अद्वितीय असल्यामुळे त्याच्या ठिकाणी केव्हाही त्याच्या स्वरूपभूत अशा सच्चिदानंदादी धर्माचा बदल मानता येत नाही. म्हणूनच दुधापासून जसे दही होते तसे ब्रह्मापासून जगत् झाले असे म्हणण्यापेक्षा नामरूपांनीच ब्रह्म जगत् स्वरूप चुकीने म्हणजे भ्रमानेच भासते हे मानणेच जास्त संयुक्तीक ठरते व श्रीशंकराचार्यांनी त्यामुळे त्याचाच स्वीकार करून भ्रम, माया, अज्ञान इ. शब्दांचा प्रयोग करून मायावादाची मांडणी केली आहे.

नामरूपांच्या अनेकत्वामुळे जलतरंगाप्रमाणे अनेकरूप द्वैताची प्रतीती आपल्याला येते व ज्या सच्चिदानंदरूप परब्रह्माच्या अधिष्ठानावर हा ज्ञेयरूप देखावा असतो त्या परब्रह्माची विस्मृती होऊन जगद्रूप होणारी परब्रह्म वस्तू दिसत नाही. त्या वस्तूची ओळख त्याला रहात नाही व तिकडे त्याची दृष्टीही रहात नाही. परब्रह्मावर भासणाऱ्या नामरूपांकडेच त्यांची दृष्टी रहात असते व लक्ष नामरूपांकडेच खिळून राहिल्याने त्याला नामरूपांना आधार असलेल्या अधिष्ठानरूप परब्रह्माचा विसर पडतो. ह्याच्या उलट परब्रह्माकडे लक्ष देणाऱ्याला नामरूपांचा विसर पडत असल्यामुळे परब्रह्माच्या सच्चिदानंद रूपात्मक नामरूपांचा विलास भासतो व त्यालाच ज्ञानी म्हटले जाते. परब्रह्माच्या स्वरूपाची विस्मृती हेच अज्ञान किंवा अविद्या याचे स्वरूप होय. या अज्ञानामुळे अज्ञान्याला परब्रह्म वस्तूच नामरूपांनी प्रकट झाली असे न वाटता नामरूपांची एक जगत् म्हणून ब्रह्माहून स्वतंत्र अस्तित्वाची वस्तू तो समजतो. सच्चिदानंद परब्रह्म वस्तूहून नामरूपात्मक जगत् वस्तू निराळी असा समज झाला की, त्या जगत् वस्तूच्या ठिकाणी सच्चिदानंद जाऊन असत्, जड असे विरुद्ध धर्म भासायला लागतात.

श्री माऊलीने या संबंधातील केलेले विवेचन पहाण्यासारखे आहे. श्री माऊली म्हणते की पाण्याकडे दृष्टी नसली व तरंग हा पाण्याहून निराळा पदार्थ आहे, अशी दृष्टी असली तरच तरंगाच्या ठिकाणी उत्पत्ती व नाश दिसतील एऱ्हवी पाण्याकडे सतत दृष्टी असली व तरंगाचे स्वतंत्र अस्तित्व व वस्तुत्व आहे असे वाटले नाही तर तरंगाचे उत्पत्ती व नाश दिसणे शक्य नाही. म्हणजे तरंग हा पाणीच आहे, दुसरी वस्तू नव्हे असे जे समजतो त्याला पाण्याच्या ठिकाणी उत्पत्ती व नाश दिसत नाहीत. उत्पत्ति दिसण्याकरता उत्पन्न झालेली वस्तू पूर्वी नव्हती त्याच प्रमाणे नाश पावलेली वस्तू आता दिसत नाही असे वाटायला पाहिजे. उत्पत्ति व नाश वस्तूच्याच ठिकाणी दिसणार. तरंगदशेपूर्वी पाणी होते. पाणी उत्पन्न झाले. पूर्वी ते नव्हते असे काही वाटत नाही. तरंगदशा नाहीशी झाली तरी पाणी नाहीसे झाले असा आपला समज होत नाही. कारण ते तरंग दशेनंतरही राहिलेच आहे असे आपण पहात असतो. याप्रमाणे पाण्याच्या दृष्टीने उत्पत्ती व नाश नाहीतच आणि तरंगाच्या दृष्टीने विचार केल्यास तरंग ही पाण्याहून स्वतंत्र वस्तूच नव्हे, तेव्हा त्याच्या ठिकाणी उत्पत्ती नाश आहे असे म्हणताच यावयाचे नाही. (जैसे पवने तोय हालवले । आणि तरंगाकार जाहले । तरी कवण के जन्मले । म्हणो ये तेथ ॥१०६॥ तेचि वायूचे स्फुरण ठेले । आणि उदक सहज सपाट जाहले । तरी आत काय निमाले विचारी पां ॥१०७॥ ज्ञाने. अ. २) पण मग उत्पत्ति, नाश जे अविकारी ब्रह्माच्या ठिकाणी दिसतात त्यांची संगति कशी लावायची? त्यावर श्रीमाऊली उत्तर देते की (हे उपजे आणि नाशे । ते मायावशे दिसे । एऱ्हवी तत्त्वता वस्तु जे असे । ते अविनाशचि ॥१०५॥ ज्ञाने. अ.२) अज्ञानाने, भ्रांतीने किंवा मायेने म्हणा, अविचल व अविकारी अधिष्ठानरूप ब्रह्माच्या ठिकाणी अधिष्ठानाच्या विस्मृतीमुळे असे भासते असे म्हणणे भाग पडते. सारांश, हा मायाभ्रम ब्रह्माकडील दृष्टी सोडून नामरूपांकडे दृष्टी देणाऱ्यांना नामरूपानेच भासला हा नामरूपाचा देखावा विचार न करणाऱ्यांना भ्रम उत्पन्न करतो म्हणून नामरूपे हीच माया होय असे श्रीशंकराचार्य म्हणतात.

शांकर तत्त्वज्ञानाचा आधारभूत ग्रंथ सूतसंहिता हा आहे व त्यात चिन्मात्र स्वरूपाचा आश्रय करणारी माया जेव्हा शक्तीस्वरूपाने स्फुरण पावते तेव्हा तिच्यात स्वयंप्रकाश निर्विकल्प चैतन्यच भरून राहते असे म्हटले आहे. (चिन्मात्राश्रयमायायाः शक्त्याकारे द्विजोत्तमाः । अनुप्रविष्टा या संवित् निर्विकल्पा स्वयंप्रभा ॥)

या चैतन्यशक्ती स्फुरणालाच भ्रमाने जीव विपरीत धर्म भासवणारी माया म्हणतो. भ्रमाने भासणारा देखावा सत्य नसतो तर केवळ काल्पनिक असतो. खरे ज्ञान झाल्यावर तो भास रहात नाही. एवढेच नव्हे तर जेव्हा

तो भ्रमाचा काल्पनिक देखावा भासत असतो तेव्हाही तो जीवाला सत्य वाटत असला तरी नसतोच. नुसती त्याच्या आहेपणाची कल्पनाच जीव करतो. जे आदी अंती नसते ते दिसते तेव्हाही वस्तुतः ते नसतेच (आदावंतेच यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा । मांडुक्य). अशी क्रमाने भासणाऱ्या भासाची स्थिती रहात असल्यामुळे जड विनाशी जगत् हे पूर्वी नसते मग उत्पन्न होते व शेवटी नाहीसे होते म्हणून जेव्हा ते भासते तेव्हाही वस्तुतः ते नसतेच.

श्रीशंकराचार्यांच्या मतात दृश्य जगताच्या जडविनाशी देखाव्याला मायाभ्रम कारण मानला असून मायेला स्वतंत्र अस्तित्व व वस्तुत्व मानलेले नाही. ब्रह्म हीच एक अविनाशी वस्तू असून तीच तिन्ही काळी राहणारी असल्यामुळे तीच केवळ सत्य आहे. त्यामुळे तिच्या नाशाची कल्पना करता येत नाही. तिच्या व्यतिरिक्त बाकी सर्व काल्पनिक म्हणजे ज्यांच्या उत्पत्ति नाशाची कल्पना झाली असता त्यांचे अस्तित्व नाशिवंत भासते. उत्पत्ति नाश जाणणारा जो असतो त्याचे उत्पत्ति नाश मानता येत नाहीत. ज्ञानरूप आत्मा ज्ञाता म्हणजे जाणणारा आहे. तो अविनाशी आहे व माया व मायेचे कार्य जगत् हे सर्व काल्पनिक आहे. अज्ञानाने काल्पनिक वस्तू सत्य वाटते व ज्ञानाने तीच खोटी ठरते. कल्पना करणाऱ्याचे अस्तित्व कल्पना करण्यापूर्वीचे असते म्हणूनच तो कल्पना करू शकतो. आत्माच ब्रह्म आहे. 'आत्मा हि ब्रह्म' असे ब्रह्मसूत्रभाष्यांत श्रीशंकराचार्य म्हणतात. कल्पना करणारा जीव म्हटला जातो व कल्पना न करणारा आत्मा (ब्रह्म) म्हटला जातो. म्हणून मुळात ब्रह्म कल्पनारहित म्हणजे निर्विकल्प आहे व तेच अज्ञानाने कल्पना करणारे झाले की त्याला जीव ही संज्ञा प्राप्त होते.

अज्ञानी जीव ब्रह्मावर ब्रह्माच्या धर्मांच्या विरुद्ध धर्मांच्या भासणाऱ्या जगताला स्वतंत्र अस्तित्वाचे व स्वतंत्र वस्तुत्वाचे समजतो. ब्रह्माचे अस्तित्व पारमार्थिक तर तत्त्वतः या जगताचे अस्तित्व प्रातिभासिक म्हटले जाते. यालाच दुसरे नाव विवर्त असे आहे. 'विशेषेणवर्तते इति विवर्तः' ही विवर्त या शब्दाची व्युत्पत्ति आहे. यात किंचित विशेषपणा भासत असतो. श्रीमाऊलीने श्रीज्ञानेश्वरीच्या अकराव्या अध्यायात परब्रह्माचे अवतार असलेल्या साक्षात्कारी संतमहात्म्यांना चिदानंद समुद्राचे कल्लोळ असे म्हटले असून जगताला मृगजळाची उपमा दिली आहे. (हे जे अवतार सकळ । जया समुद्रीचे का कल्लोळ । विश्व हे मृगजळ । जया रश्मीस्तव दिसे ॥ ज्ञाने. अ. ११) हे दोन्ही दृष्टांत विवर्ताचेच असले तरी पहिल्यात अधिष्ठानरूप पाण्याचे ज्ञान कायम आहे, तर दुसऱ्यात सूर्याच्या किरणांच्या कंपनांचे हरिणांना ज्ञान नसल्यामुळे पाण्याचा भ्रम होऊन ते तिकडे धाव घेऊन शेवटी पाणी न मिळाल्यामुळे तहानेने मृत्यू पावतात. पहिल्यात अधिष्ठानाचे ज्ञान कायम राहून त्यामुळे चिदानंदाच्या समुद्रावर उठणाऱ्या लहरी त्या समुद्राचा विलास ठरतो. दुसऱ्यांत मात्र मृगांना अधिष्ठानरूप सूर्याच्या किरणांच्या कंपनाची विस्मृती रहात असल्यामुळे पाण्याचा होणारा भास हा भ्रमरूप ठरतो.

श्रीआचार्यांनी आपल्या ग्रंथांतून विवर्ताची जी उदाहरणे दिली आहेत त्यात रज्जूसर्प किंवा शुक्तीरजत व त्याबरोबरच सुवर्णालंकार किंवा जलतरंग असे दोन प्रकारचे दृष्टांत दिले आहेत. ह्या दोन प्रकारच्या दृष्टांतात अधिष्ठानाचे ज्ञान नसणे व अधिष्ठानाचे ज्ञान असणे हा भेद जर आपण लक्षात घेतला नाही तर आचार्यांच्या वेदांताविषयी गैरसमज निर्माण होण्याला अवसर मिळतो. श्रीगुलाबराव महाराजांनी अध्यस्त विवर्त म्हणजे अधिष्ठानाचे ज्ञान न रहाता जो जगत् भास दिसतो त्याच्या जोडीने अधिष्ठानाचे ज्ञान राहून जो विवर्त म्हणजे विशेष भासाची प्रतीती त्याला 'अनध्यस्तविवर्त' ही संज्ञा नव्याने वेदांतात वापरून फार मोठी मोलाची भर घातली आहे. त्यामुळे पुढे भक्तीपंथाची वाट मोकळी झाली.

परब्रह्माच्या चैतन्यशक्तीचे स्वतःच्या आनंदाकरता जे चैतन्यस्फुरण रहाते ते चैतन्यानंदाचेच राहणार हे उघड आहे. पुन्हा परब्रह्माशिवाय दुसरी वस्तूच नसल्यामुळे स्फुरणरूप भास हा चिदानंदाव्यतिरिक्त असू शकत नाही. असे तत्त्वतः असताना आपल्याला हेच चैतन्याचे स्फुरण अगदी विरोधी जडादी स्वरूपाचे भासते. श्रीमधुसूदनांनी थोडक्यात "चैतन्येहि जडत्वम् अध्यस्तम्' म्हणजे तो भ्रमरूप भास असल्याचे म्हटले आहे. भ्रमरूप भासाचे अस्तित्व किंवा नास्तित्व तत्त्वतः विचार करता केवळ अधिष्ठानरूपच असते. कारण ते पूर्णपणे काल्पनिक असते. श्रीमधुसूदनांनीही हीच गोष्ट सूत्ररूपाने सांगितली आहे. ब्रह्मावर जीवाने ब्रह्माच्या विस्मृतीमुळे जो जडत्वाचा आरोप केला आहे तो यथार्थ ज्ञानाने निवृत्त होऊन सुवर्णालंकाराप्रमाणे किंवा जलतरंगाप्रमाणे तो भास भासू लागतो. ही अज्ञानाची निवृत्ती, त्रैकालीक म्हणजे जेव्हा तो भास अज्ञानामुळे भासत होता तेव्हाही तो अस्तित्वात नव्हता व पलीकडेही कधीही राहणार नाही अशा तऱ्हेच्या ज्ञानात ती परिणत होते. नामरूपात्मक जडादी धर्मांचे जगत् ज्ञानोत्तर नामरूपात्मक चिदानंदरूप परब्रह्माच्या शक्तीचा विलास वाटून स्वतःलाही तो चिदानंदात्मकच (ब्रह्मरूप) समजतो.

परब्रह्माच्या नामरूपात्मक चिदानंदात्मक शक्तीच्या स्फुरणामुळे जो अनेकत्वाचा भास होतो त्याच्याचकडे लक्ष दिल्यामुळे अधिष्ठानरूप परब्रह्माच्या विस्मृतीला तो कारण होतो. ही चुकीची दृष्टी अधिष्ठानरूप परब्रह्माकडे वळवण्याकरता वेदांताने व्यतिरेक व अन्वय या दोन दृष्टींचा उल्लेख केला आहे. नामरूपांना अलग केल्यावर केवळ अस्तित्वाचा म्हणजे सत्तेचाच आपल्याला बोध होतो. हे अस्तित्व निर्धाराशिवाय कळू शकत नाही व निर्धार म्हणजेच ज्ञान. ज्ञानाला अस्तित्वाची (आधाराची) गरज आहे व अस्तित्व निर्धारावर अवलंबून आहे. म्हणून अस्तित्व व ज्ञान म्हणजे सत्ता व प्रकाश (ज्ञान) हे एकमेकांना सोडून राहू शकत नाहीत. हे दोघेही परम प्रेमाच्या गाठीने बांधले गेले आहेत व अशा प्रकारे तिघांच्या एकरूपतेलाच परब्रह्म म्हणण्यात येते. श्रीमाऊलीने 'सत्ताचि सुखप्रकाशु' म्हणूनच सांगितले आहे. आपल्या ठिकाणी 'मी' म्हणून होणाऱ्या चैतन्याचे स्फुरण आपलाच आनंद घेण्याकरताच खरे तर होत असते व शरीरासह शरीराबाहेर देखील नामरूपांनी त्या स्फुरणाचाच विलास असतो.

श्रीआचार्यांनी ज्ञानोत्तर होणारी ही (वृत्ती) दृष्टी ह्यालाच अन्वय हे नाव दिले आहे. नामरूपात्मक सर्वत्र परब्रह्माचा विलास म्हणजेच नामरूपाने सर्वत्र परब्रह्माचाच अन्वय होय. मातीचा घडा जसा मातीरूप, माती म्हणजे घडा व घडा म्हणजे माती. दोन नावे असली तरी वस्तू मात्र एकच. त्याचप्रमाणे आपला देहदेखील चैतन्याचेच स्फुरण आहे. जडत्वाची त्याच्या विषयीची कल्पना अज्ञानजन्य आहे. खरी स्थिती ही असल्यामुळे श्री आचार्य म्हणतात की जड व चैतन्य यांचा विवेक व्यर्थच लोक करीत असतात. (मृद्रूपोऽहि यथा कुंभो तद्वदेहोऽपि चिन्मयः । आत्मानात्म विवेकोऽयम् मुधैव क्रियते बुधैः।) तरंग, फेस, बुडबुडे हे सर्व जसे शुद्ध पाणीच असते दुसरे काहीही नाही त्याप्रमाणे आकाशापासून देहापर्यंत

जेवढा भौतिक कार्यरूप प्रपंच आपल्याला भासतो तो सर्व शुद्ध चैतन्याचाच विलास आहे. आत्यंतिक दुःखनिवृत्तीपूर्वक परमानंदप्राप्ती हे जे ध्येय अद्वैतवेदांताचे आहे, त्यापैकी व्यतिरेक ज्ञानाने पहिले अंग प्राप्त होते. मायावाद हे याचेच अंग आहे. वेदांताचे दुःख निवृत्ती म्हणजे परमानंद प्राप्ती मानली नाही. परमानंद प्राप्ती ही भावरूप स्थिती आहे. ही प्राप्ती म्हणूनच चिद्विलास दृष्टीने प्राप्त होते व यालाच अद्वैत वेदांत मोक्ष म्हणतो. मोक्षाच्या उभय अंगांपैकी चिद्विलास हेच प्रधान अंग असून हेच मोक्षाचे यथार्थ स्वरूप होय.

श्रीशंकराचार्यांचे तत्त्वज्ञान हे पूर्णाचे तत्त्वज्ञान आहे, अपूर्णाचे नव्हे आचार्य अद्वैत मानतात. याचाच अर्थ आचार्यांच्या तत्त्वज्ञानात फक्त एकालाच जागा आहे. एकद्वितीयांश किंवा एकचतुर्थांशाला नाही. आहे ते संपूर्ण अखंड चिद्रूप व परमानंदरूप असे एकमेव अद्वितीय असे आहे. मनुष्याने केवळ आपली विपरीत असलेली समजूत टाकून दिली की अखंडतेचा, परमानंदतेचा, चिद्रूपतेचाच प्रत्यय पुन्हा त्याला प्राप्त होईल. महाराष्ट्रातील तिन्ही संप्रदायातील संत महात्म्यांनी म्हणूनच 'त्यांची पाऊले पुसत' आत्मसाक्षात्काराचा मार्ग सुगम करून सांगितला आहे. पण सामान्य लोकांची साक्षात्काराची जी कल्पना आहे ती बरोबर नसल्याचे श्रीगुलाबराव महाराज दाखवतात. भगवंताचे दर्शन होणे याला साक्षात्कार म्हणत नाहीत तर भगवन्मय चित्त होणे त्याला साक्षात्कार म्हणतात. ''शुद्ध निष्काम भक्तेस्तु न फलं हरिदर्शनम् । फलं हरिमयं चित्तमिति स्वमतनिर्णयः ।।' ही भूमिका अन्वयाची किंवा चिद्विलासाची आहे.

**डॉ. वा. ना. पंडित**
बी ५/८ सुमन नगर, चेंबूर, मुंबई ४०००४९

# प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांचा समयोपदेश

*एम.ए.तत्त्वज्ञान. बी.टी. 'भागवतधर्माची तत्त्व-मीमांसा' या विषयावर नागपूर विद्यापीठाची पीएच.डी. श्री. दादासाहेब धनवटे नगर विद्यालय व कनिष्ठ महाविद्यालय नोकरी. १९९० मध्ये प्राचार्य म्हणून निवृत्त. भागवत धर्माची तत्त्व मीमांसा व अभिनव वैचारिक लेखमाला. पुस्तके प्रकाशित.*

**वि**दर्भातील अमरावती शहराजवळील माधान गावी इ.स. १८८१ मध्ये श्री गुलाबराव महाराजांचा जन्म झाला. तान्हेपणीच अंधत्व आले आणि माता-पिता बालपणीच निवर्तल्यामुळे योग्य असे सांभाळणारे कोणी नव्हते. या संबंधी आत्मचरित्रांत ते म्हणतात –

***'जनन ते माझे कुणबिया उदरी । परदेशी परी झाले माय ॥१॥***
***नाही प्यालो पुरे जननीचे दुध । पाजिले प्रसिद्ध अजापय ॥२॥***
***तान्हेपणी झाले आंधळे नयन । कष्टे जाणयेण करणे प्राप्त ॥३॥***
***तीन वरुषांत निवर्तली माता । नाही सांभाळीता योग्य कोणी ॥४॥***
***पिता तोही पुढे निवर्तला ताच । आहाच बाहाच नको आता ॥५॥***
***कोणी सांगितल्या बऱ्या गोष्टी चार । केले पाठांतर वाचबोनि ॥६॥***
***एक दोन गुरु करोनि सोडिले । पातके जोडीले नानापरी ॥७॥***
***पूर्वजन्मबुद्धि होती जे जे काही । निवडत तेही शुद्धाशुद्ध ॥८॥***
***ठेविला विश्वास अनुग्रही एका । ज्याचा दाता सखा आळंदीश ॥९॥***
***अपुलेचि नाम सांगितले ताते । आणिक मंत्राते उपेक्षुनि ॥१०॥***
***शुद्ध करोनिया आधी मनोभावे । केला समन्वयो भक्तिज्ञाना ॥११॥'***

(नवम यष्टि) (अभंग २०५९)

यावरून श्रीमहाराजांचे बालपण व पुढचा जीवनक्रम लक्षात येतो.

श्रीक्षेत्र आळंदीचे 'ज्ञानीयांचे राजे', श्री ज्ञानेश्वर महाराज यांचा अनुग्रह झाल्यामुळे, श्रीक्षेत्र आळंदी हे श्रीगुलाबराव महाराजांचे माहेर बनले. श्रीज्ञानेश्वरांना ते 'तात' म्हणत आणि स्वतःला 'ज्ञानेश्वर कन्या' म्हणून संबोधित. तेव्हा महाराष्ट्र आणि विदर्भ यांचे गुरुशिष्याचे नाते अतुट असल्याचे लक्षात येते. 'विदर्भ कन्या' जगन्माता रुक्मिणीप्रमाणे 'ज्ञानेश्वर कन्या' श्रीगुलाबराव महाराजांनी, भगवान श्रीकृष्णाला आपले सर्वस्व अर्पण करून 'माधुर्य दीक्षा' घेतली होती. याविषयी श्रीगुलाबराव महाराजांचे 'रुक्मिणी पत्रिके'वरील भक्तिभाष्य सर्व दृष्टीने प्रमाण आहे. (भगवद्‌भक्ती सौरभ. तृतीय पराग).

## मधुराऽ द्वैत संप्रदाय प्रवर्तक

श्रीगुलाबराव महाराज 'मधुराद्वैत' दर्शनाचे आचार्य असून, 'वेदांना प्रमाण मानून निघालेले सर्व संप्रदाय भगवंतापासूनच प्रगट झाले आहेत. त्या संप्रदायांचे आचार्य हे केवळ त्या संप्रदायांचे पुनरुज्जीवन करणारे आहेत. मधुराद्वैत संप्रदाय आदिनाथ शंकरापासून प्रगट झाला व संत ज्ञानेश्वरादी भागवत संतांनी सूत्ररूपाने त्या भक्तिमार्गाची चिकित्सा केली आहे आणि पुरस्कार केला आहे. परंतु भक्तिशास्त्राचे शास्त्रीय उपपादन कोणी केले नाही. म्हणूनच त्या सूत्रप्राय उपपादनावर श्रुती, युक्ती व अनुभव इत्यादी प्रमाणांच्या साह्याने भक्तिशास्त्राच्या उपपादनाची इमारत श्रीगुलाबराव महाराजांनी उभी केली आहे' असे श्रीमहाराजांचे पट्टशिष्य वेदान्त केसरी श्री बाबाजी महाराज पंडित म्हणतात. (विविध लेख संग्रह, भाग १.)

त्याप्रमाणे नाथ-संप्रदाय व वारकरी संप्रदाय या दोन्ही संप्रदायांशी 'मधुराद्वैत' संप्रदायाचा संबंध सिद्ध होतो. या संप्रदायाची उपासना सांगताना श्रीगुलाबराव महाराज म्हणतात -

***'श्रीमान् ज्ञानेश्वराचार्य उमा माता शिवः पिता ।***
***पतिः कृष्णो राधिकाद्या भगिन्यो गोपिका मम ॥'***

श्रीगुरु कसा असावा आणि शास्त्रप्रामाण्य कोणते ते सांगताना -

***'श्रोत्रियो ब्रह्मनिष्ठश्च महाभागवतो गुरुः ।***
***श्रुतिस्मृतिपुराणानि शास्त्रं स्वमत निर्णयः ॥' तसेच***
***'शांकर ज्ञानसंयुक्तं भगवद्‌भक्त्यलंकृतम् ।***
***यद्‌वाक्यं तत्प्रमाणं स्यादिति स्वमत निर्णयः ॥'***

असेही त्यांनी स्पष्ट केले आहे.

मधुराद्वैत दर्शनाची आवश्यकता प्रतिपादन करताना, 'शांकर वेदान्तात ज्ञान व भक्तीचा समन्वय केल्यामुळे या दर्शनाचा पृथक् निर्देश मी केला आहे. कणादांनी जसा गुरुत्वाचा नियम शोधून काढला, गुरुत्व शोधले नाही त्याप्रमाणे या सनातन मधुराद्वैत दर्शनाचा ध्वनी प्रभूने माझ्या मुख-मृदंगातून प्रगट केला आहे. जीवन्मुक्तीत भगवद्‌भक्ती पाहिजे एवढेच या दर्शनाचे म्हणणे आहे' असे श्री महाराज सांगतात. (योग प्रभाव भाग १ परिचय.) आद्यशंकराचार्यांच्या केवलाद्वैत तत्त्वज्ञानाची पूर्ण कल्पना देऊन ते तत्त्वज्ञान ज्ञानोत्तर भक्तीला विरोधी नसून, खरी भक्ती अद्वैत तत्त्वज्ञानाचा स्वीकार केल्याशिवाय संभवत नाही, हे त्यांनी आपल्या ग्रंथांतून स्पष्ट केले आहे.

## गीताशास्त्र वेदांहून थोर आहे !

कर्म, ज्ञान व भक्ती या तिन्ही मार्गांचे सामंजस्य घडवून भगवद्‌गीता ही भारतीयांची जीवनगाथा बनली आहे. वेद न मानणारेही गीतेला महत्त्व देताना आढळतात. भगवद्‌गीता स्वधर्माचा पुरस्कार करते व धर्मसंस्थापनेकरिताच भगवंताचा अवतार होत असतो असे निक्षून सांगते. (भ. गीता ४-८) भक्तिधर्माचे श्रेष्ठत्व गीतेत पदोपदी सांगितले असून इतर साधने असो वा नसो, केवळ भक्तीने मनुष्याचा उद्धार होतो, असे स्पष्ट म्हटले आहे. (भ. गीता १८-६६). एकनिष्ठ भगवद्‌भक्ताला 'युक्ततम' म्हणून गौरविले आहे. एकूण भक्तिधर्माला व्यापक स्वरूप दिले असून वैदिक संप्रदायांतून भगवद्‌गीतेचे प्रामाण्यही अबाधित ठरले आहे.

श्रीगुलाबराव महाराजांनी आपल्या अभंग वाणीने गीतास्तुती करतांना म्हटले आहे –

*'गीते ऐसे शास्त्र नाही त्रिभुवनी । थोर वेदाहूनि मज वाटे ॥*
*वेद तो केवळ स्वप्नीचा उच्छ्वास । जागृतीत त्यास मान नाही ॥*
*ब्रह्म जागृतीत स्वमुखे ही गीता । स्वये कृष्णे अर्था प्रतिपादिले ॥*
*म्हणोनियां वेद गीता बराबरी । करिती निर्धारी पामर ते ॥*
*कर्म उपासना ज्ञान हे वेदान्त । याहूनि तो अर्थ दुजा नाही ॥*
*गीतेमाजी भक्ति चवथी वेगळी । म्हणोनिया बळी गीता वाटे ॥*
*ज्ञानेश्वर प्रभु तियेचा दर्शक । जेथे निष्कलंक चित्तवृत्ति ॥'*

(अभंग २०५९)

यावरून श्रीमहाराजांनी भगवद्गीतेला जागृत श्रुती का म्हटले याचे रहस्य कळते. 'प्रत्यक्ष बोलिली देवे । म्हणूनि श्रीगुरु ज्ञानदेवे । गीता ही श्रुती स्वभावे । बोलिले आहे ॥' अशी साक्षही त्यांनी दिली आहे. ''की रसना शब्द उच्चारिजे । तेणे अर्थही रसनाचि जाणिजे । तैसा गीतावचनें ओळखीजे । गीताश्रय कृष्ण ।' अशी गीतावचनाने श्रीकृष्णाची पूर्ण ओळख (ज्ञान) होते, असे त्यांचे सांगणे आहे. (श्रीमद्भगवद् गीता संगति).

गीतातत्त्वाचे विवेचन करताना श्रीगुलाबराव महाराज म्हणतात, 'भगवद्भजन हा परमधर्म असून त्याने परमात्म प्रीती, चित्तशुद्धी आणि एकाग्रता सहज प्राप्त होते.'

## संतांनी त्रिविध भक्ती सांगितली

भक्तिविषयी पूर्ण कल्पना येण्याकरिता संतांनी भक्तीशास्त्राचे विशेष विवरण केले आहे. संतांच्या सहवासात आणि श्रीगुरु कृपेनेच 'प्रेमभक्ती' काय आहे याचा अनुभव येतो. ती भक्ती तीन प्रकारची आहे. श्रीगुलाबराव महाराज म्हणतात,

*'त्रिविध ती भक्ती बोलिली संतांनी ।*
*कर्म-मिश्र आणि शुद्धा दूजी ॥१॥*
*तिसरी ती भक्ती ज्ञानमिश्रा जाण ।*
*ज्ञानासह पूर्ण सत्ता तीची ॥२॥*
*सहजचि प्रभा तयात लहरी ।*
*उल्हासाची परी स्वाभाविक ॥३॥*
*तेवी आत्मप्रीती सहज उल्हासू ।*
*सगुण सौरसू भक्ती ते की ॥४॥*
*ज्ञानेश्वर प्रभू करुणे कळत ।*
*ज्ञाने ऊजळत चित्त जेव्हा ॥५॥'*

(निदिध्यासन प्रकाश समास ८ वा)

श्रीगुलाबराव महाराजांनी या तिन्ही प्रकारच्या भक्तीचे सांगोपांग विवेचन आपल्या ग्रंथांतून केले असल्यामुळे श्रोत्यांच्या अनेक प्रश्नांची उत्तरेही त्यात अनायासे सापडतात अशी वस्तुस्थिती आहे. भगवद्गीतेतही या सर्व भक्तिप्रकारांचा मागोवा घेतला आहे. निगमागमांचा यथार्थ बोध होऊन जरी मुक्तदशा प्राप्त झाली तरी 'दृष्ट सुखार्थ तरी हरिभक्ती । करूनि साधिजे जीवन मुक्ती ॥' असे श्रीमहाराजांचे वचन आहे. म्हणूनच ज्ञानमार्गातील अडचणी जाणून अनेक ज्ञान्यांच्या वचनांचा समन्वय साधून ते म्हणतात, 'दृष्ट दुःखनिवृत्ति ज्ञानानंतर अपेक्षित आहे. दृष्ट सुखप्राप्ति तर अपेक्षित नाही.... परंतु भगवद्भक्तीने विरक्ती, उपरती इत्यादी अभ्यास साधून दृष्ट दुःखनिवृत्ती आणि दृष्ट परमानंद प्राप्ती होते.'

यात भक्तांच्या प्रारब्धाचा भोगावाचून नाश होतो की काय? तर नाही, असेच श्री महाराजांचे उत्तर आहे. परंतु प्रारब्धाचा अभिभव (म्हणजे दुःख न भासणे) मात्र होतो, असे ते सांगतात. ही केवळ ज्ञानानंतर भक्ती करणाऱ्यांची गोष्ट झाली. परंतु जन्मीचे प्रथमपासूनच मुक्ती अवस्थेपर्यंत जे भक्त असतात, त्यांचे दुःखरूप प्रारब्धच नसते, असे श्री मधुसूदन सरस्वती म्हणतात. (गूढार्थ दीपिका) येथे दृष्ट परमानंद म्हणजे विषयसुख नव्हे. कारण विषयसुखाचे ठिकाणी जरी दृष्टता आहे तरी व्यभिचारित्वामुळे (अखंड नसल्यामुळे) परमानंदता नाही. सगुण सच्चिदानंद परमात्म्याच्या नित्यत्वामुळे भक्त्यानंदाच्या ठिकाणी अखंडता आहे. म्हणून दृष्टपरमानंदता आहे. अन्वयाने सगुणभक्ती आत्मप्रीतीचा उल्हास होय, हे श्री महाराजांनी वरील अभंगात सांगितले आहे. तसेच 'अव्यभिचारेण भक्तियोगेन' हे भगवंताचे वचनही प्रमाण आहे.

## भक्तीच फलरूपिणी आहे !

''दृष्टसुखं तु तारतम्येन भवति' या अद्वैतकौस्तुभ वचनाचा व इतर ग्रंथांचा विचार करून श्री महाराज म्हणतात, 'तो ज्ञानानंतर मनोनाशादि अभ्यासाच्या तारतम्यामुळे सांगितला आहे.' अद्वैत सिद्धी ग्रंथात श्री मधुसूदन सरस्वतींनी 'मुक्तौ तारतम्य-भंग' सांगितला. तो विदेह मुक्तीपर समजावा. त्यातील रहस्य असे 'ज्ञानानंतर मनोनाशादी अभ्यासाचे केवळ दृष्टदुःख निवृत्ती फल आहे तसे ते भगवद्भक्तीचे फल नाही. दृष्टदुःखनिवृत्ती व दृष्टपरमानंद प्राप्ती ही भक्तीचे स्वरूपच आहे. म्हणून भक्तीच फलरूपिणी आहे.' असे श्री महाराज म्हणतात. 'स्वयं फलरूपतेति ब्रह्मकुमारः' या भक्तिसूत्रांत श्री नारदांनी असेच सांगितले आहे. जीवन्मुक्तांचे ठिकाणी भक्ती राहते, असे सांगून मधुसूदन सरस्वतींनीही भक्तिफल पार्थक्याचा निषेधच केला आहे.

## मग भक्तीचे 'ज्ञानमिश्रा' हे विशेषण का?

वरील अभंगात 'ज्ञानमिश्रा भक्ती' प्रकारात 'ज्ञानमिश्रा' हे भक्तीचे विशेषण अद्वैतज्ञान आणि माहात्म्यज्ञान दाखविण्याकरता आहे. भक्तिसूत्रांत श्री नारदांनी 'तत्रापि न माहात्म्य ज्ञानविस्मृत्यपवादः' असे प्रतिपादन करून भक्तांना माहात्म्य ज्ञानाचा स्वीकार केला आहे. ज्ञानोत्तर भक्ती ही सगुण-साकार परमात्म्याचीच समजावी. कारण निराकार उपासना अत्यंत क्लेशदायक असल्याचे गीतावचन आहे. साकार-परमात्मा हा प्रतिबिंबाकृतिदायक नसून, बिंबरूप परमात्म्याचा कनकालंकारविवत् अनध्यस्त-विवर्त आहे, असे श्री महाराज सांगतात.

विवर्त वाद आद्य श्रीशंकराचार्यांनी भाष्यात वापरला आहे. श्रीज्ञानदेवादी संतांनीही विवर्ताचा उपयोग केला आहे. 'हे अवतार सकळ । जया समुद्रीचे कां कल्लोळ । आणि विश्व हे मृगजळ । जया रश्मीस्तव दिसे ॥' (ज्ञानेश्वरी अ.११).

## अनध्यस्त-विवर्त संकल्पना

सगुण-साकार भगवत्सस्वरूप भक्तीचे आलंबन आहे. हे सगुण-स्वरूप अवतारसमयी सर्वांना दृक्गोचर होते. हे लीलास्वरूप जीवाला त्याच्या अज्ञानामुळे मानवदेहधारी व जन्मास आले असेच वाटत असते. म्हणूनच अवतारासंबंधी नाना शंका उपस्थित केल्या जातात. श्रीगुलाबराव महाराजांनी अशा सर्व शंकांची उत्तरे आपल्या ग्रंथांतून दिली आहेत.

अद्वैत वेदान्तात जीव-जगत् हे 'त्रिगुणात्मक सगुण' मानले आहे व ते औपाधिक आहे. दुसरे सगुण 'सगुण ब्रह्म' म्हणजे ब्रह्माचा शक्तिसहित निर्देश होय. वस्तू आणि तिची शक्ती ही अत्यंत एकरूप असतात. परब्रह्माची शक्ती परब्रह्माप्रमाणे सच्चिदानंद स्वरूप आहे. ही शक्ती स्फुरण पावली की नामरूपाने प्रगट होते. (सूतसंहिता य. वै. १३-२). यालाच चिद्विलास म्हणतात. म्हणूनच जे काही सगुण-साकार प्रतीत होते ते निर्गुण-निराकारही असते. परंतु अविद्या उपाधीमुळे जीवाला तेच सगुण-साकार परब्रह्म 'त्रिगुणात्मक सगुण-साकार' भासत असते. श्रीगुलाबराव महाराज म्हणतात, 'सांख्यातील अर्धवट दोनपण । योगातील अर्धवट एकपण । साकार तितुके निराकार पूर्ण । हे वेदान्त गुह्य अनिर्वाच्य ।' (भगवद्भक्तिसौरभ) म्हणून आत्मज्ञानाने सर्वकाही निर्गुण-निराकार आहे असा जीवाला अनुभव आणून देणे हे वेदान्ताचे गुह्य होय. चैतन्यस्वरूप परब्रह्म स्फुरले की दोनपणाला येते. हा त्याचा स्वभाव आहे. 'एकाकी न रमते...' (बृह.उप. १-४-३) या श्रुतीने हे स्पष्ट केले आहे. हे दोनपण पूर्वीचा एकपणा व निराकारपणा न मोडता झाले असते. याचे कारण ती दोघे (ब्रह्म व त्याची शक्ती) परस्पराहून स्वतंत्र वस्तुरूप व स्वतंत्र सत्ता असलेली अशी निराळी होत नाही. या विषयी अमृतानुभवात, 'जे एकचि नव्हे एकसरे । दोघा दोनपण नाही पुरे । काय नेणो साकारे । स्वरूपें जिये ॥' (अमृ. १-४), असे अगम्य साकारपण श्री माऊलीने वर्णिले आहे. कार्यदशेतही परब्रह्माची पूर्णता नाहीशी होत नाही, असे श्रुतींनी सांगितले आहे. 'पुरुष एवेदं विश्वम्' (मु. उप. २-१-१०).

जीवाच्या अविद्येच्या अपेक्षेने परब्रह्माच्या शक्तीला विद्याशक्ती म्हणतात. 'संविदेव पराशक्तिः' (सूतसंहिता). त्या स्वाभाविक शक्तीने परमात्मा सगुण होतो. म्हणून या सगुणपणात निर्गुणाशी ऐक्यच असते. म्हणूनच जगत्कारण अवस्थेतही भगवान निरूपाधिकच राहतो. याचाच अर्थ परमात्मा सदासर्वदा पूर्णच राहतो. भगवान सृष्टीच्या उत्पत्तिकाळी विद्या व अविद्या या दोन्ही शक्तीशी क्रीडा करतो आणि या दोन्ही प्रकारच्या क्रीडांचे वर्णन वेदाने केले आहे, असे श्रीमद्भागवतात म्हटले आहे. (भाग पु. १०-८७-१४). ही भगवंताची क्रीडा, वास्तवी लीला म्हणजे सत्य लीला असून, या सच्चिदानंद सत्य लीलेच्या ठिकाणी अज्ञानी जीवाला अविद्येमुळे विपरीत (जड-विनाशी-सृष्टिरूप) अनुभव येतो. (स्कंद पुराण व विष्णु पुराण) या विपरीत अनुभवालाच व्यावहारिक लीला म्हणतात.

या लीलांना भगवद्गीतेत 'ऐश्वर्य योग' म्हटले आहे. (भ. गीता ११-८). या ऐश्वर्य योगाची सत्यता पटवून देण्यासाठी अद्वैत वेदान्तात विवर्तवादाचा चांगला उपयोग होतो. कारणाचा नाश न होता, कारणाहून भिन्न वस्तूने वेगळे न होता, कारणाचाच केवळ रूपांतराने प्रत्यय येणे यालाच विवर्त म्हणतात. विवर्ताचे दोन प्रकार होतात. भ्रमेकरून वस्तूचे अन्यथा ज्ञान होणे याला अध्यस्त-विवर्त म्हणतात आणि ज्ञानेकरून प्रीत्यनुसार वस्तूचे जे विशेष याथार्थ्य तो अनध्यस्त-विवर्त होय. रज्जूसर्प हे अध्यस्त-विवर्ताचे उदाहरण असून, कनकभूषण हे अनध्यस्त-विवर्ताचे उदाहरण आहे. मुळात परब्रह्माच्या नामरूपात्मक विस्तारालाच जगत् हे नाव असल्यामुळे, तसे सच्चिदानंदरूप जगत् हे परमात्म्याचे अनध्यस्त-विवर्त कार्य आहे. ते परब्रह्माशी अभिन्न असल्यामुळे सत्य म्हटले जाते. तसे सत्य कार्य आत्मज्ञानदृष्टीनेच अनुभवास येते. वेदान्तात सच्चिदानंदरूप कार्य ब्रह्माला 'अनध्यस्त-विवर्त' हे नामकरण नवीनच असून, श्रीगुलाबराव महाराजांनी ती संकल्पना उपयोगात आणली हे विशेष. सगुण-साकार परमात्माही नित्य व व्यापक आहे. परंतु योगमायेने (म्ह.त्रिगुणात्मक मायेने) आवृत्त झालेल्या जीवाला ते सच्चिदानंद स्वरूप प्रतीत होत नाही, असे भगवंताने 'नाहं प्रकाशः सर्वस्य योगमाया समावृत्तः ।' (भ. गीता ७-२५), सांगितले आहे.

## सगुण साकार स्वरूप निरूपाधिक कारण ब्रह्मच !

सगुण भगवद्भक्ती ही निर्गुण ब्रह्मप्राप्तीचे साधन आहे का? या प्रश्नाचे उत्तर नाही असे आहे. अलीकडे वारकरी संप्रदायांतून अशा प्रकारची चर्चा ऐकू येते आणि सगुण भक्तिकडे कनिष्ठ भावनेतून पाहिले जाते. भागवत धर्माला हे मुळीच मान्य नाही. श्रीगुलाबराव महाराजांनी ज्ञानोत्तर भक्तीची आवश्यकता प्रतिपादन केली असल्यामुळे त्यांना तर हे मान्य होणे शक्यच नाही. त्रिगुणरहित शुद्ध ब्रह्मालाच ईश्वरत्व असल्यामुळे ब्रह्मज्ञानानंतर ते स्वरूप निवृत्त तर होत नाहीच, पण तेच एकमेव सगुणस्वरूप पूर्ण व निरूपाधिक असे सर्वत्र व्यापक दिसते असा संतांचा अनुभव आहे. 'भरला घनदाट । हरि दिसे ॥' असे श्री माऊलीचे वचन आहे. परमप्रेम भक्ती हे अंतिम साध्य आहे. म्हणून सगुणब्रह्म हे कारण ब्रह्मच आहे आणि परमानंद प्राप्तीरूपाने नित्य आहे.

## अभक्त गुरुचा त्याग करावा का?

नामस्मरणादी भक्ती वेद प्रतिपादित असून आद्य श्रीशंकराचार्यांनी विष्णुसहस्र नाम भाष्यांत श्रुतिप्रामाण्य घेऊन भगवन्नामस्मरणाने ज्ञानप्राप्ती होते असे दर्शविले आहे. म्हणून व्यर्थ कर्मत्याग कोणी करू नये. परंतु परमेश्वरप्राप्तिकरिता कर्म त्याग दोषार्ह नाही, असे श्रीमहाराज म्हणतात. भक्तिधर्मात श्रीगुरु महिमा विशेष वर्णिला आहे. श्रीमद्भागवतात ऋषभदेवाने आपल्या मुलांना अहंकार बंधनातून सुटण्याकरिता पंचविस साधने सांगितली. त्यात 'हंसरूपी (परमेश्वर) गुरु जो मी (ऋषभदेव) त्या माझ्यावर भक्ती ठेवणे' हे प्रथम साधन सांगितले आहे. परंतु गुरुरूपाने ज्याची भक्ती करायची, 'तो आपल्या शिष्याला मृत्यूरूप संसारातून काढण्यास असमर्थ असेल, तर तो गुरुच नव्हे.' असेही सांगितले. (भागवत पुराण ५-५-१०, १८). श्रुतीने 'आचार्य देवो भव' असे सांगितले आहे. (तै. उप. शिक्षाध्याय).

श्रीगुलाबराव महाराज म्हणतात, 'भागवताचा आणि श्रुतीचा समन्वय साधला पाहिजे.' कर्मज्ञानाचे व्यावर्तन करून, भक्तिमार्गोपदेशाने संसारातून जो उद्धरण करीत नाही, तो गुरु आदी कोणीही आपला म्हणता येत नाही. म्हणून व्यर्थ कर्मत्याग कोणी करू नये. कलियुगात एक भक्तीच युगधर्म असल्यामुळे, केवळ नामस्मरणादी भक्तीने परमेश्वर प्राप्त होतो; म्हणून अभक्त अशा गुरूचा निषेध भागवतकारांनी दर्शविला आहे.' अवैष्णव गुरुचा त्याग करावा असा उल्लेख पद्मपुराणात आला आहे. श्री. वामन पंडितांनी 'नामसुधा' काव्यात भागवत वचनाचाच अनुवाद केला आहे.

*वे प्रीति कृष्णी गुरु तोचि साच ।*
*श्रुत्यर्थ इत्यर्थ असे असाच ॥*
*गुरुविणे न मिळे परमागति । गति शुकादिक गुरुसचि मागती ॥*
*परि गुरु करि अंतर राघवी । न गुरु तो ठक दांभिक लापवी ॥*

त्यावरून ज्ञानीभक्तच गुरु करावा असा भागवतकारांचा आशय लक्षात येतो.

## भागवतधर्म वर्णाश्रम विरोधी आहे का?

'संप्रदाय सुरतरू' या आपल्या सांप्रदायिक ग्रंथात श्रीगुलाबराव महाराजांनी धर्माचा सांगोपांग विचार मांडला आहे. त्यात भागवतधर्माची वैदिकता व सर्वश्रेष्ठता परमेश्वरप्राप्तीच्या दृष्टीने निर्दोष असल्याचे प्रतिपादन केले आहे.

वेदविहीत वर्णाश्रमधर्म भगवंताची आज्ञा म्हणून पाळला पाहिजे. त्यातही भगवन्निष्ठा व निष्कामभाव या दोन गोष्टी फार महत्त्वाच्या आहेत. भक्तांनी काम्यकर्मत्याग करून केवळ निवृत्त कर्मच करावे असा संकेत आहे. (भाग. ११-१०-४). जिज्ञासू भक्ताने यम व नियम यांचे पालन केले पाहिजे; पण त्यापेक्षा परब्रह्मरूपी श्रीगुरुची सेवा ही अत्यंत आवश्यक आहे. (भाग. ११-१०-०५). तात्पर्य हे आहे की भक्ताचे कर्म हे भगवत्प्राप्तीला सर्वस्वी अनुकूल असेच असावे.

## भक्तांना शास्त्रमर्यादा पाळण्याचे कारणच काय?

ज्ञानी पुरुषाला विधिनिषेधरूप शास्त्राचे बंधन नाही, हे खरे ! देहादिकांचा अभिमानच मनुष्याला यथेष्टाचरण करावयास लावतो. पूर्ण ज्ञान्याच्या ठिकाणी तर देहाभिमान मुळीच नसतो. म्हणून ज्ञान्याला त्याचे बंधन नसते. परंतु जोपर्यंत देहाभिमान आहे तोपर्यंत ते बंधन असते असेही स्पष्ट होते. हीच गोष्ट भक्तिमार्गातही लागू होते. मुमुक्षु अवस्थेत ज्ञानप्राप्तिकरिता ज्या सदाचरणाचा अभ्यास साधकाने केला होता, तेच आचरण अंगवळणी पडल्याने व अभिमानरहित असल्यामुळे, ज्ञानानंतरही व्यवहार काळी तो शास्त्रानुसारच वर्तन करतो. भक्तही परमप्रेमाच्या अभिमानाने फुगून जाऊन शास्त्रविरुद्ध वागू शकत नाही. 'भवतुनिश्चय दार्ढ्यात् उर्ध्व शास्त्ररक्षणम् ।' असे भक्तिसूत्रांत श्री नारदांनी सांगितले आहे.

दुसरे कारण असे की, धर्मशास्त्र हे भगवंताची आज्ञा असल्यामुळे, आज्ञा मोडणे हा प्रेमाचा स्वभाव नसल्यामुळे, भक्ताला भगवंताची आज्ञा उल्लंघन करण्यापुरते स्वातंत्र्यच नसते. म्हणूनच भगवंताने अर्जुनाला शास्त्रावरूनच कार्याकार्य ठरवावे असे सांगून, क्षत्रियाला विहित असा युद्धरूपी धर्म पाळण्याची आज्ञा केली. भक्त व्यवहार काळी शास्त्रमर्यादा पाळतो आणि तीच सेवा अंगवळणी पडून दृढ होते. प्रेमसंपन्न झाल्यावरही तेच आचरण स्वाभाविकपणे चालू राहते. त्यामुळे अनायासे लोकसंग्रहही साधला जातो. असे परमभक्त भक्तिधर्माची संस्थापना करीत असतात. श्रीज्ञानेश्वर माऊली म्हणते 'जे पुरुषार्थ सिद्धी चौथी । घेऊनि आपुलिया हाती । रिगाला भक्ती पंथी । जगा देत ।।' (ज्ञाने. १२-२१९).

भक्ताला संत व श्रीगुरु हे परमप्रिय असतात. श्रीगुरुसेवेला कधीही अंतर पडू न देणे शिष्याला परम हिताचे असते. श्रीगुरुकृपेनेच मनाचा निरोध व चित्ताची समता इत्यादी गुण अंगी बाणतात. पूर्ण ज्ञान झाल्यावर ज्ञान्याने बालकाप्रमाणे वागावे (म्हणजे मन, इंद्रिये, अहंकार, इत्यादी वृत्तीवर आरुढ न होणे) असे श्रुतीने सांगितले आहे. तसेच 'नाद्वैतं गुरुणासह' ही आचार्यादी सर्व संतांची शिकवण आहे. तेव्हा पूर्णज्ञानी किंवा परमभक्त श्रीगुरुच्या स्वाधीन असतो, मग यथेष्टाचरण तर दूरच राहिले !

**डॉ. पुरुषोत्तम दत्तात्रेय पंडित**
प्लॉट नं. ८-३, मालवीय नगर, खामला, नागपूर २५

# श्रीगुलाबराव महाराजांनी सांगितलेला एक बौद्ध* निबंध

*बी.ई.सिव्हील. श्रीगुलाबराव महाराजांच्या वाङ्मयाची आवड.*

सध्याच्या अस्थिर परिस्थितीमधे प.पू. श्रीगुलाबराव महाराजांचे धर्मविचार चिंतनीय आहेत. त्यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ 'कल्याणी'च्या विशेषांकाच्या निमित्ताने जिज्ञासू व शिक्षित समाजाला ते मार्गप्रदीप ठरतील. आपल्या प्रखर बुद्धीमत्तेने श्रीमहाराजांनी केलेले विश्लेषण या निबंधात मांडण्याचा मी प्रयत्न केलेला आहे.

नेहमीचा आम्हास पडणारा प्रश्न म्हणजे कोणती गोष्ट करणे योग्य आहे? निश्चित कल्याण कशाने होईल? आपल्या हिताचे काय? अशी शिष्य भावाने शरण होऊन केलेली प्रार्थना व त्याला श्रीमहाराजांनी वेगवेगळ्या प्रकारे नाना युक्त्या योजून दिलेली उत्तरे मार्मिक व सुलभ रीतीने सांगितलेली आहेत. लोकांशी व्यवहार्य व्यवहार कसा करावा? स्वतःशी प्रमाणशुद्ध वागण्यास लागणारे आचरण याचे तरी नावही ऐकू न आल्यासारखे करण्याने अंतःकरणाचे कोमेजणे ! अशा वेळी मनुष्य स्वभावाला भूषणावह गोष्ट कोणती? तर ती 'धर्म' ही होय. कारण याच्या योगे अंतःकरण विस्तृत होते. सर्व प्राण्यांमध्ये अंतःकरणाच्या प्रगल्भतेमुळेच मनुष्याची वरिष्ठता गणली गेली आहे. आता प्रगल्भता या शब्दाचा अर्थ मनुष्य आपला निर्धार, निश्चय अंमलांत आणून आपले अंतःकरण प्रगल्भ करावे म्हणजे कोणत्याही स्वभावाप्रमाणे स्वभाव करून घेणे किंवा स्वतंत्रही रहाता येणे असा आहे. हे अंतःकरण धर्मावाचून कोणत्याही साधनाने प्रगल्भ होणे शक्य नाही. कारण धर्म हा मनुष्याचे ठिकाणी नैसर्गिक वास करीत असतो. परंतु धर्म व अधर्म मनुष्यामध्ये दोन भिन्न दिसतात, ते का म्हणून? तर ते विचार व अविचार यांच्या योगाने भिन्न दिसतात.

याचे स्पष्टीकरण म्हणजे मनुष्याचे अंतःकरण जसे जसे शरीराचा अभिमान सोडून या दृश्य जड जगाच्या पाठीमागे काय आहे? किंवा मूळ कारण पहाण्याचा प्रयत्न करू लागते तेव्हा ते विचारात्मक बनते आणि ह्याच्या उलट ते शरीराला चिकटून दृश्य व जड जगात जसा जसा प्रवेश करते तसे तसे ते अविचारप्रधान बनते. ही गोष्ट कोणत्या नियमाने बरे आहे? तर सृष्टीतील अनेक प्रकारचे पदार्थ ज्या एका नियत्यात्मक नियमाने बद्ध आहेत, त्याच नियमाने प्रतिबद्ध आहे. परंतु येथे हा एक विशेष आहे की, दृश्य शास्त्रातील पदार्थ घटना पाहिलेल्या वस्तूविषयी खात्री दिल्याप्रमाणे सिद्ध करता येते आणि आमची वरील गोष्ट मात्र स्वतःच्या खात्रीप्रमाणे शाबीत करता येते. प्रत्येक प्राणी सुखाकरता धडपड करीत असतो. पण त्या सुखाचे स्वरूप म्हणजे काय हे स्पष्ट होत नाही.

## मनुष्याच्या सुखाचे स्वरूप

मनुष्य कितीही सुखी असला तरी केव्हा ना केव्हा तो दुःखित स्थितीत असतो त्या वेळी 'आज माझे मन स्थिर नाही' असे म्हणताना आपण पाहतो. ही गोष्ट अज्ञानी किंवा विद्वान सर्वांना सारखीच लागू पडते. ह्यावरून एक अनुमान निघते की मनाची बेचैन स्थिती म्हणजे दुःख तर शांत, स्थिर, समाधानाची स्थिती म्हणजे सुख "संतोषोत् जनयेत्प्राज्ञस्त देवेश्वर पूजनम्" इ. वचने श्रीमद् भागवतात प्रसिद्ध आहेत. तर हा संतोष म्हणजे काय? तर मनाची समाधान स्थिती. तर ही समाधान स्थित दृश्य जगातच आहे की त्याच्या पलीकडे आहे असा विचार होणे साहजिकच आहे. या अवलोकनात निश्चयाने कळून येते की चिरस्थायी समाधान असे या दृश्य जगात कोठेच दिसत नाही. उदा. एखाद्या मोठ्या राजाचे किंवा श्रीमंताचे वैभव जरी असले तरी ते अनेक दुःखी प्राण्यांच्या जीवावरच अवलंबून असते. पालखीतील महंतांचे सुख पालखी खांद्यावर वहाणाऱ्या सेवकांच्या दुःखावर भरलेले. शिवाय महंतांच्या मनात संशय रहाणार तो वेगळाच. एवं दृश्य जगात एकाचे सुखसमाधान हे दुसऱ्याच्या असमाधानावर बनलेले असते. हजारो जणांची कत्तल उडते तेव्हा विजयश्री एखाद्याच्या गळ्यात माळ घालते. शिवाय हेही जयश्रीचे समाधान क्षणिकच ! कारण ते समाधान वृद्धींगत करण्याची प्रत्येकाची तृष्णा व प्रयत्न. ही तृष्णा कोठे थांबतच नाही. त्यामुळे अनेक निष्पाप जीवांना इच्छा नसतानाही दुःख भोगावे लागते. आता हे असेच ईश्वरी संकल्पाने ठरलेले आहे असे जर कोणी म्हणेल तर ते स्वार्थी माणसाला बोलण्याला फार सोपे आहे पण कितीही वैभवाने जगातील पाशववृत्ती असलेला मनुष्य असला तरी एका अपरिहार्य गोष्टीमुळे तो उदासीन असतो आणि ती गोष्ट म्हणजे मृत्यू. या काळजीने शेवटी तो काळवंडतोच. अशा प्रकारे सुखचिरस्थायित्वाची इच्छा काही कमी होत नाही. कारण इच्छा काही दाबून किंवा टाळून कमी होत नाही. म्हणून कोणत्याही समंजस मनुष्याला समाधान चिरस्थायित्व हे ह्या दृश्य जगाच्या कारणामध्ये कोणत्या तत्त्वात असले पाहिजे याचा विचार होणे स्वाभाविकपणे वाटते. मग ते क्षणभर असो की जन्मभर असो. मनाच्या स्वभावानुसार ते ह्या तत्त्वाकडे अखंड प्रवाहित झाले म्हणजे अंतःकरणात दया वृद्धींगत होऊ लागते व हळूहळू शरीरसुद्धा त्याला नकोसे वाटते. तो ह्या सुख-दुःखाचे कारण शोधू लागतो. क्षणिक समाधान तर तृष्णेच्या वाढीमुळे जोर धरीत नाही तर प्रखर सूर्यासारखे चिरस्थायी समाधान कसे उदय पावणार? म्हणून तृष्णा आहे तोपर्यंत आपल्यासह सर्व जगाला या दुःख बेडीतून मुक्त होणे कठीण आहे, असा सिद्धांत निष्पन्न होतो व पूर्णता ही उत्पन्न होणारी नसून ती स्वयंसिद्ध अवस्था आहे या निर्णयाप्रत तो येतो व ती अवस्था या तृष्णेच्या शमनद्वारीच प्राप्त होते हा सिद्धांतही आयताच सापडतो. आता याची साधने जर आपले जवळच आहेत, तर दुसऱ्यावर त्याचा शब्द काय म्हणून?

कोणतीही वस्तू आपण मिळवीत नाही किंवा तिचा नाशही करीत नाही. ह्या पदार्थ विज्ञानातील तत्त्वाप्रमाणे इच्छा ही जगातील एक शक्ती

*(बुद्धीने निश्चित केलेला)

असल्यामुळे इतर वस्तूंप्रमाणे तीही जर अनादी राहील तर तीही ज्या माझ्यात आहे किंवा माझी आहे, त्या माझे नसणे कोणत्याच काळी नव्हते असे स्पष्ट व सप्रमाण विधान करण्याला मला कोणती अडचण आहे? मी असूनच जर मला अखंड समाधान मिळवणे आहे तर ज्या दृश्य जगाची उत्पत्ती नाश होताना प्रत्यक्ष दिसत असताना त्याच जगतात मी का अडकून कुजत पडावे? व त्यातून निःशेष बाहेर पडण्याचा हक्क मला पोहोचत नाही काय? आणि असा हक्क जर मला आहे तर त्या हक्काची अंमलबजावणी जर मी केली नाही तर मी आत्मघातकीच ठरेल! त्याप्रमाणे विचारी मनुष्याला निर्धार हा नेहमीचा रहाणार असेल तर कितीही व कसल्याही प्रतिबद्धत्वाने तो परतंत्र असला तरी त्याचे अंतःकरणात क्षणभर का होईना पण पलीकडील कारणाचा विचार हा डोकावणारच. म्हणून श्रीगुलाबराव महाराज म्हणतात इतर प्राण्यांपेक्षा मनुष्य प्राण्यात ही अंतःकरण प्रगल्भता धर्म प्राधान्येकरून नैसर्गिक वास करीत असते, असे म्हटले तर यात अनुचित काहीही नाही. धर्म ही सर्वांच्या आत असणारी मनोवृत्ती आहे. तिचे मूळ अंतःकरणाला अधिक चिकटलेले असले पाहिजे. इथे एक महत्त्वाची गोष्ट श्रीमहाराज बजावतात की धर्माचे ऐहीक प्रयोजन मनामध्ये धरून धार्मिक व सामाजिक प्रश्नांचा मेळ बसवण्याचा प्रयत्न कधी करू नये. कारण श्रीमहाराज धर्माची व्याख्या 'धर्म हा जगत्कारणाकडे घेऊन जाणारा' अशीच करतात.

वर केलेल्या विवेचनावरून अशी एक शंका येऊ शकते की हे तर अध्यात्मविद्या कशी संभवनीय आहे, याचेच वर्णन झाले इथे धर्माचा संबंध कसा पोहोचतो? पण त्या कल्पनेला उत्तर म्हणजे फलाचा विचार मनुष्याच्या मनात दृढ झाल्यावर साधनाविषयी विचार दृढ होणार नाही, असा कोण आहे? आणि या साधनविचारांतच सर्व धर्मांचे बीज आहे. ब्रह्माच्या अस्तित्वाचा विचार एकदा मनात येणे शक्य झाल्यावर त्याचे ज्ञान व आनंद या अंशांचे पूर्ण ज्ञान होण्याकरता साधन विचार अवश्य केला जातोच. श्रीगुलाबराव महाराजांनी धर्मावर बरेच लेखन केले आहे त्या सर्वांचा समावेश येथे करणे शक्य नाही पण ओघाने आले म्हणून थोडक्यात त्यांची महत्त्वाची अशी धर्मविषयक विचारसरणी येथे आपण पाहू.

## सर्वमान्य धर्म

साधारणपणे जगाकडे पाहिले तर प्रत्येक मनुष्याजवळ स्वतःला अनुकूल व प्रतिकूल निवडण्याची शक्ती असते व त्या दृष्टीने तो स्वतंत्र आहे. तर दुसऱ्या बाजूने तो समाजाच्या एक घटक असल्यामुळे तो सामाजिक बंधनाने समाजाशी बद्ध आहे. तो समाजातला घटक (म्हणजेच जगताचा घटक अवयव) रहातो. त्याला अनुकूल परिस्थिती राहील त्या वेळी त्याची आवड एखाद्या एकाच गोष्टीकडे लागून चित्त एकाग्र होऊन इतर गोष्टींकडे सहजच दुर्लक्ष होत जाते. अशा वेळी एखाद्याला त्याचे चित्र अतिशय सूक्ष्म दशेत गेल्यामुळे तो व्यावहारिक गोष्टींकडून अलौकीक अशा एकाच गोष्टीकडे जातो म्हणजेच वैषयिक दशेला सोडून त्यापेक्षा उंच उंच दशेप्रत जातो. वरवरच्या ज्ञानाने आपले समाधान होत नाही म्हणून आपण इंद्रिय ज्ञानाकडून अनुमान ज्ञान-अंतःस्फूर्तिचे ज्ञान अशा प्रकारे क्रमाने ज्ञानार्जनासाठी सूक्ष्माकडे जातो व व्यापक झालेल्या चित्तामुळे मूळातल्या अलौकिक अशा विचारांशी ऐक्य करतो. सर्व धर्मांमधील मूलभूत धर्मविचार त्या शिकवणी मधूनच आले असले पाहिजेत म्हणजे हे असे लोक एक प्रकारे जगत्कारणापासूनच असे विचार आणत असतात. (त्याच श्रुती व स्मृती होत) या ठिकाणी एक शंका – अशाश्वताकडून (जगताकडून) शाश्वत असे जगत्कारण कसे कळणार? उत्तर – शाश्वत मार्ग म्हणजेच वेद आणि ते शाश्वत जगत्कारणाकडून आलेले आहेत. ते स्वतःच्या शुद्ध स्वरूपाच्या नात्याने ओळखणे क्रमप्राप्त आहे. येथील फरक अभ्यासण्याजोगा आहे. इंग्रजी तत्त्वज्ञानाने विकारांचा बाध करून ती समाधान स्थिती ओळखून पहाण्याचा प्रयत्न केला गेला नाही. जडाला स्वतंत्र, निराळे पाहिल्यामुळे एकावर प्रेम व एकावर द्वेष राहिला व बुद्धीतील दोष तसाच राहिला. हेच केवळ दुःख कारण होय.

आता ह्या मूळ सूक्ष्म दशेत जाण्यासाठी काय मर्यादा आहेत, हे आपल्या आर्य धर्मात वेगवेगळ्या प्रक्रियांद्वारे सांगितले आहे. तसेच चित्तशुद्धीनंतर त्याच्या एकाग्रतेमुळे जगत्कारणाकडे जाताना परिस्थिती सुटत जाते हेही सिद्ध होते. अशा वेळी मनुष्य जातीचा कोणता धर्म होऊ शकेल हा जर विचार केला तर एका ठिकाणी आस्तिक व नास्तिक यांचे मतैक्य दिसते ते म्हणजे जगत्कारणावर प्रेम करून गुंग होऊन जाणे. हे इष्ट आहे म्हणजेच स्वतःलाही विसरून जाणे पण परत प्रश्न पडतो या प्रेमाचे परीमाण काय? आपल्या प्रिय वस्तूचा व आपला कधीच वियोग न होणे ही त्या प्रेमाची सीमा होय. म्हणजे आपण व जगत्कारण यामधे दोनपणा नसावा. या सीमेत जाण्यासाठी प्रेमाच्या तीन पायऱ्या श्रीमहाराज सांगतात. १) पूज्य बुद्धी, २) प्रिय वस्तूशी नाते जुळवणे, ३) ती वस्तू व आपण एक होणे. सुज्ञ वाचकांच्या हे सहज लक्षात येईल की आपल्यामध्ये व जगत्कारणामध्ये जे एक प्रकारचे दळणवळण सुरू होते हीच भक्ती होय.

१) पहिली पायरी सेवा किंवा दास्यभक्तीची आहे. हिच्यामध्ये पूज्यबुद्धीमुळे एकनिष्ठता सहजच रहाते.

२) दुसरी पायरी नाते जुळवणे म्हणजे लालन भक्तीची. हिच्यामध्ये प्रियवस्तू म्हणजे जगत्कारण आपला पिता किंवा माता असते. येथे जसा निर्भिडपणा येतो तसा धाकही रहातो. (आपल्या योग्य किंवा अयोग्य आचरणासंबंधात) वात्सल्य भक्तीही या दुसऱ्या पायरीतच मोडते.

३) तिसरी पायरी ऐक्याची. या पायरीत तर काहीच रहात नाही. या पायरीत जगत्कारणाशिवाय दुसऱ्या वस्तूशी मिळून जाता येत नाही. कारण दुसऱ्या सर्व वस्तू अपूर्ण आहेत असे वाटते. म्हणून त्यात मिळाल्यास भलत्याच ओघाला जाणे घडेल यासाठी आपल्या प्रेमातच ती वस्तू कायम राहील असा नियम हवा. या तीन पायऱ्यांनी सर्व जगाला ध्येयाप्रत पोहोचवण्यासाठी एक आर्यधर्मच समर्थ आहे.

आर्यधर्म अगदी स्वाभाविक आहे. जगाचे निरीक्षण केले असता निरनिराळ्या स्वभावाचे तसेच प्रवृत्तीचे लोक दिसतात. या भिन्न भिन्न स्वभावाला वळण देऊन एकाच मार्गाने ते वळवता येतील अशा प्रकारची शिकवण असलेला धर्म तो मनुष्य जातीचा असा धर्म होऊ शकेल. शिवाय उन्नतीचे नियम हे सर्वांना लागू पडणारे असतील तर तो धर्म आचरण्यासही सुलभ जाईल. ठळक रीतीने समाजामध्ये मनुष्यांचे स्वभावानुसार चार भाग होतात. म्हणजे चार प्रकारच्या प्रामुख्याने प्रवृत्ती आढळतात.

१) काही लोकांना सारखे काहीतरी काम करावेसे वाटते व त्यायोगे आपली उन्नती व्हावी असे वाटते. त्यांच्यासाठी कर्मयोग सांगितला. "योगः

कर्मसु कौशल्यम्' आपल्या कामात चांगली कुशलता मिळवणे. यामध्येही सामान्य धर्म म्हणजे नीती हवी व त्यामुळे नियमनही ओघाने आलेच.

२) दुसरे लोक म्हणजे ज्यांना प्रेमच करावेसे वाटते त्यांची ती प्रेममय वृत्ती जगत्कारणाचे ठिकाणी नेहमी असून त्याच्या प्रेमाने अंतःकरण भरू देणे याला भक्तीयोग म्हणतात. येथे सत्वगुण असल्यामुळे वैचित्र्य नाही.

३) कित्येकांना वाटते की आपल्यामधे ज्या काही गुप्तशक्ती आहेत त्या जाणून त्यांचा उपयोग व्हावा. या लोकांसाठी राजयोग सांगितला.

४) कित्येक विचारी लोकांना वाटते, मी कोण? कोठून आलो? जाणार कोठे? हे जगत् काय आहे? इ. विचारांचे उत्तर तत्त्वज्ञानात असले तरी परमेश्वराशी ऐक्य करताना जगाशी विरोध नको त्यांच्यासाठी ज्ञानयोग सांगितला. गीतेमध्ये एक महत्त्वाची गोष्ट सांगितली गेली. सर्व कर्मे निष्काम करावी असे सांगून ज्ञानमार्ग व धर्ममार्ग दोन्ही निराळे आहेत हे मत नाहीसे केले. धर्मात निष्काम वागल्यानेच ज्ञानात प्रगती होते, हे महत्त्वाचे सूत्र सांगितल्यामुळे सकाम कर्मशास्त्राला फाटा बसला, असे म्हटले तरी चालेल व त्यामुळे सांख्य, वेदांत, योग हे तिन्ही एकवटून गेले.

याप्रमाणे चारी प्रवृत्तीच्या लोकांना लागू पडणारी व मानवणारी तत्त्वे आपल्या आर्यधर्मात आहेत म्हणून तोच सर्व जगाचा धर्म होऊ शकतो. ज्याच्या योगाने मनुष्याचे गेलेले पद त्याला परत प्राप्त होऊ शकेल.

**श्री. सुधाकर शं. फणसळकर**
३१९ शनवार पेठ, पुणे ३०.



# जन्मा आले गुलाबराव

तेजे भरल्या दिशा दहाही मोद होतसे अपरंपार
जन्मा आले गुलाबराव हे करू या त्यांचा जयजयकार ।धृ.।।

भूषवीतसे ज्ञानरवी हा मोहोडांच्या थोर कुळा
धन्य जननि ती माय अलोका धन्य गोंदुजी जनक भला
पावन झाली लोणिटाकळी जन्मभूमि ! हा घे अवतार ।।१।।

चला उभारू गुढ्या तोरणे साखरपाने वाटू या
ध्वजा फडकवू हिमालयावर जगता साऱ्या सांगू या
भाग्य उजळले आर्य भूमिचे आला आला तारणहार ।।२।।

दूर पळाली धर्मग्लानी पहा संस्कृती कशि हसते
गीता नाचे, वेद हासती, डुलति पुराणे मज दिसते
आला म्हणती भाष्यकार हा यथार्थ अमुचा हा कळणार ।।३।।

देवदेवता ऋषी मुनिंना वार्ता कळली हो संतोष
सहर्ष वदती अता व्हायचा वैदीकांचा जय ! जयघोष !
आर्य म्हणति जे सत्य तेच की श्रेष्ठ जगी या ते ठरणार ।।४।।

आचार्यांना समाधान हो, मीरा तुलसी वदति जगा
पहा वाढतो नाममहीमा कसा जगी या तुम्हिच बघा
संतमंडळी प्रसन्न होउनि सर्वहि त्यांचे गुण गाणार ।।५।।

मायामय ना देह प्रभूचा सिद्ध जगी या हा करणार
ज्ञानोत्तरही भक्ति पाहिजे भक्तशिरोमणि हा वदणार
श्रीकृष्णाची पत्नी म्हणुनी मधुराभक्ती हा करणार ।।६।।

अपूर्व याची शक्तिमत्ता सर्वज्ञत्वही ते अपूर्व तसे
अपूर्व आहे सर्वच याचे जगास लाविल हाच पिसे
प्रज्ञाचक्षू असुनिहि कार्या कसेच केले जग म्हणणार ।।७।।

पंथोपंथी करुनि समन्वय बंधुभावना दृढ करणार
राष्ट्रभावना जागृत करुनी धर्मभावना जागविणार
चमत्कार हा मूर्तिमंत हो कोडे केवी उलगडणार? ।।८।।

ज्ञानेशाची कन्या गुणवति श्रीकृष्णाची प्रिय कांता
चला लववु या विनम्रभावे त्यांच्या चरणी हा माथा
प्रसन्न होउनि नेतिल तेही दुःखद या भवसिंधू पार ।।९।।

**श्री. बाबा महाजन**
आकोर

# ॥ प्रज्ञाचक्षू श्रीगुलाबराव महाराजांचा पत्रव्यवहार ॥

*एम.फिल. (मराठी) 'रत्नाकर मतकरींच्या एकांकिका' पीएच.डी. 'एकनाथपंचक' एस.एन.डी.टी. मुंबई मधून मराठी पत्रकारिता हा लघुकोर्स पूर्ण. कला व वाणिज्य महाविद्यालय दापोडी व केसरी संघवी कॉलेज पिंपरी येथे अभ्यागत व्याख्याता २०/२२ लेख व लघुकथा प्रकाशित. काही कथाबक्षीस पात्र.*

## ॥ आरंभिक ॥

***'विश्वाहूनि थोर व्हावे । किंवा जगा धाकुटे राहावे ।***
***नातरी दोन्ही त्यागोनि होआवे । ज्ञानेश्वर बाळ ॥२०॥***
***हे लिखित नाकळे जरी स्थिती । तरी स्मराव्या माझ्या पूर्वोक्ती ।***
***ज्ञानेश्वरी चर्चा भजन आरती । करीत असावे ॥२१॥'***

(वेद. श्रीनिवासशास्त्री हरिदासांना लिहिलेल्या पत्र : १ मधून)

आपल्या आप्तेष्टांचेही पत्रांद्वारा प्रबोधन करणारे प्रज्ञाचक्षू श्रीगुलाबराव महाराज, विदर्भदेशीचे एक अलौकिक विभूतीमत्त्व होते. श्रीकृष्णाचे ठायी माधुर्य भक्ती असल्याने 'श्रीकृष्ण पत्नी' या भावनेने ते वावरत. त्यासाठी त्यांनी कात्यायनी व्रत आचरिले, रासक्रीडेचा उत्सवही केला. स्वतःस ते 'ज्ञानेश्वरकन्या' म्हणवीत. ज्ञानेश्वर माऊलींच्या प्रत्यक्ष अनुग्रहाचा परिसस्पर्श लाभल्याने त्यांचे अवघे जीवन कृतार्थ होऊन गेले. ते सांगतात –

***'माझा सद्गुरु करुणाघन । आळंदीपती कल्याणनिधान ।***
***जेणे आपुलिये नामाचा मंत्र देऊनि । कृतार्थ केले मजलागी ॥***
***मज आडवे मांडीवरी घेऊनी । दिधला मंत्र पंचाक्षरी ॥'***

आळंदीचे 'कैवल्याचा पुतळा असणारे' ज्ञानेश्वर आणि माधानचे 'प्रज्ञाचक्षू श्रीगुलाबराव महाराज' ही संत मायलेकीची अद्‌भूत जोडी जगात अजरामर होऊन गेली.

## ॥ काल संदर्भ ॥

बालपणीच सर्वज्ञता लाभलेले गुलाबराव महाराज इ.स. १८८१ ते १९१५ या काळात वावरले. महाराजांच्या सुरुवातीच्या काळात भारतात इंग्रजी सत्ता स्थिरावली होती. लॉर्ड मेकॉलेने राजसत्तेच्या दृढीकरणासाठी दूरदृष्टीने सांस्कृतिक क्षेत्रातही बदल घडविले. पारंपारिक संस्कृत पाठशाळा बंद करून आधुनिक शिक्षणपद्धती अंमलात आणली. त्या ज्ञानाने येथील शास्त्री-पंडितांचा वर्गही दिपून गेला. पारंपारिक शास्त्रांवरील त्यांचा विश्वास डळमळू लागला. या शिक्षणाने शहरी लोकांना नोकरीच्या संधी उपलब्ध करून दिल्या. परिणामी त्यांची जीवन पद्धती बदलली. मूल्ये बदलली. ब्राह्मो समाज, आर्य समाज, सत्यशोधक चळवळ, थिऑसॉफीकल सोसायटीसारख्या संस्था जोमाने कार्यरत झाल्या. भारतीय तत्त्वज्ञानासंबंधी त्यांनी अनेक प्रश्न उपस्थित केले. आर्य संस्कृतीच्या मूल्यांवरच ह्या प्रश्नांचा भडिमार असल्याने सर्वांच्या मनात गोंधळ निर्माण झाला. याच काळात ख्रिस्ती मिशनऱ्यांनी अन्न व सेवाद्वारा येथील अशिक्षित, दीनदुबळे, आदिवासी इत्यादी तळागाळातील लोकांची धर्मपरिवर्तने घडवून आणली. प्राचीन संत-सत्पुरुषांच्या काव्य रचनांतील विचार दुर्लक्षिले जाऊ लागले. अशा कठीण परिस्थितीत संत गुलाबराव महाराजांनी वेदोपनिषदांची अभिमान बाळगीत येथे रुजू पाहात असलेल्या पाश्चात्य विचारसरणीचे आपल्या प्रवचनांद्वारे, ग्रंथांद्वारे खंडन करण्याचा प्रयत्न केला. त्यांनी आपली ग्रंथरचना वैदिक धर्मरक्षणासाठीच परिश्रमपूर्वक केली.

## ॥ ग्रंथसंपदा ॥

मधुराद्वैताचार्य श्रीगुलाबराव महाराजांनी घरात शिक्षणाचे संस्कार नसता, अंधत्वावर मात करून, वेद, स्मृती, पुराणे, अध्यात्म-नीती-विज्ञानाचे पाश्चात्य ज्ञान संपादून, तपःसाधना-अभ्यास-व्यासंगातून ग्रंथ रचना केली.त्यांची संख्या एकशे तेहेतीस असून त्यात २५०० अभंग, १२५० गीते, १००० श्लोक, २३,००० सुबोध ओव्या, त्या सर्वांमिळूनची पृष्ठ संख्या सुमारे सहा हजार इतकी आहे. संस्कृत, मराठी, हिंदी, व्रज भाषा, वऱ्हाडी अशा पंचभाषांतून ती झालेली आहे. त्यात सूत्रग्रंथ, आकर ग्रंथ, भाष्य ग्रंथ, शास्त्र ग्रंथ, भौतिकशास्त्र, छंद शास्त्र, प्रकरण ग्रंथ, गाथा, संगीत, आयुर्वेद, योग, सांख्य, व्याकरण, निबंध, आख्याने, चरित्र, आत्मचरित्र, लोकगीते, स्तोत्रे, पदे इत्यादी अनेकविध प्रकारात ही ग्रंथनिर्मिती झालेली आहे. या अफाट ग्रंथसंपदेविषयी साहित्यसम्राट श्री. न. चिं. केळकर म्हणतात 'प्रज्ञाचक्षू श्रीगुलाबराव महाराजांचे ग्रंथ म्हणजे ज्ञानकोशच !'

संत श्रीगुलाबराव महाराजांच्या ग्रंथसंपदेतील केवळ 'पत्रव्यवहार' आपण पाहणार आहोत. या पत्रव्यवहाराचे एकूण तीन खंड असून प्रथम खंडात योगसाधना, बुवाबाजीचा दंभस्फोट, धर्मसुधारक, पंचविध वेदांती आणि धर्म असा विषयानुसार पत्रांचा क्रम असून नव्या आवृत्तीत त्यात नवीन परिच्छेद करून त्यांना उपशीर्षकेही देण्यात आलेली आहेत. यात एकूण छप्पन्न पत्रे आहेत. द्वितीय खंडात समीक्षा, भौतिक शास्त्र, विज्ञान, स्वजाती बांधवांना विनंती, गैरसमजुतींचा प्रतिकार व इतर पत्रे असा क्रम असून त्यात एकूण पस्तीस पत्रे आहेत. आणि तृतीय खंडात मराठीतील आर्या, ओवी, अभंग, संस्कृत श्लोक आणि हिंदी दोहे अशी काव्यमय शैलीतील एकोणतीस पत्रे आहेत. त्यातच 'पत्नीप्रेमपराग' या काव्याचाही समावेश आहे. या लेखात मात्र प्रथम खंडातील पत्रांचाच विचार करण्यात आलेला आहे.

## ॥ प्रथम खंड ॥

प्रज्ञाचक्षू श्रीगुलाबराव महाराजांनी ही पत्रे आपले आप्तेष्ट, हितचिंतक, अनुयायी, जिज्ञासू तसेच अभ्यासक इत्यादींना लिहिलेली आहेत. मात्र त्यातील पहिलेच पत्र श्री तातांचे चरणी त्यांनी समर्पित केलेले आहे. दि. २३ एप्रिल १९१४ रोजी लिहिलेले हे पत्र 'मुमुक्षु' पत्रांत प्रसिद्ध झालेले आहे.

## ॥ योगाने गुरुपरिक्षा ॥

महाराजांनी 'गुरु परिक्षेसाठी' भगवान् पतंजलींनी सांगितलेला उपाय अंमलात आणावयास सांगितला आहे. 'मूर्धज्योतिषि' सिद्धदर्शनम् (पाद ३ : सूत्र ३२) यावरील भगवान व्यासांच्या भाष्याचा आशय ते स्पष्ट करतात. मस्तकात एक प्रकाशमय छिद्र असून तेथे संयम केला असता पृथ्वी, स्वर्ग व अंतरिक्ष यातील सिद्धांचे दर्शन होते. याचे वैशिष्ट्य म्हणजे... त्यातून जो आपला गुरु असतो तो आपल्या द्विदल चक्रावर दिसतो हीच महाराजांच्या मते सद्गुरु शोधण्याची उत्तम रीत. 'मूर्धासंयम' ही जशी सद्गुरुची कसोटी तशीच 'मूर्धापरिषेकादिक' शिष्य पारखण्याचीही कसोटी ते सांगतात. त्यांच्या मते येथे जे टिकतील तेच धर्माचे खरे आधारस्तंभ !

योगाविषयी श्री. बाबुराव तांबे यांना पाठविलेल्या पत्रात त्यांनी सर्व योग प्रक्रियेत राजयोग श्रेष्ठ असून त्यासाठी हठयोगाची आवश्यकता प्रतिपादिली. त्याचबरोबर अष्टांग योगाचीही प्रक्रिया देऊन अभ्यास व वैराग्याच्या समुच्चयाने निर्विकल्प समाधीत सिद्धावस्था प्राप्त होते असे समजावून दिले आहे. राजयोगासाठी गुरु प्रतीती, शास्त्र प्रतीती आणि आत्मानुभव या तिहींच्या साहाय्यानेच मनुष्याने चालावे असे सांगून मृत्यूचे भय न बाळगता त्याचा निःषेश त्यागच करावयास ते सांगतात. (पृ.७) याच पत्रात भक्ती व योगाचा तौलनिक विचार त्यांनी मांडला आहे, आणि 'योगासारिखे सोपे । काही आहे' असा ज्ञानेश्वरांच्या शब्दांचा दाखलाही दिला आहे. (पृ.९) योगाविषयी समाजात पसरलेले अज्ञान व विपर्यासाचा महाराजांनी कडक शब्दात निषेध केलेला आहे आणि त्या विषयीचे काही प्रश्न उपस्थित करून त्या प्रश्नांची उत्तरे शपथपूर्वक योग्यांना देता येतात हे देखील निश्चयपूर्वक सांगितले आहे.

श्री. रा. रा. विठ्ठल रामचंद्र यांनी 'मनाचा निरोध कसा करावा?' असा प्रश्न महाराजांना विचारला होता. त्यावर आपल्या उत्तरात त्यांनी मनोनिग्रहासाठी स्वप्रयत्नच आवश्यक असल्याचे ठासून सांगितले आहे. जेथे जेथे मन जाते तेथून तेथून त्याला बलाने ओढून आणून आत्म्यावर स्थापन करावे असे गीतेच्या सहाव्या अध्यायात भगवंतांनी सांगितले असल्याचा दाखला ते देतात ! 'यतो यतोनिम्चरती !' व त्याविषयीचा सिद्धान्तच महाराज सांगून जातात. ज्याच्याच्याने प्रयत्न होत नाहीत, जे केवळ परतंत्र आहे असे क्षिप्त व मूढ चित्त योगास अधिकारी नाही... तर, ज्याला थोडा तरी स्थिरतेचा अनुभव आहे, असे प्रयत्नवान विक्षिप्त चित्तच योगास अधिकारी आहे... हा योगभाष्याचा सिद्धान्त होय. आणि मनोनिरोधाचा प्रयत्नाने अभ्यास करणे, याचेच नाव राजयोग आहे असेही त्यांनी म्हटले आहे. (पृ. २१) मात्र प्राणसंयमन, संधिसाधन, पटलनिरास, त्रिपुटी परिहार आणि समाधी संजीवन इत्यादी गोष्टींकरताच फक्त योगात गुरुची अपेक्षा आहे, प्रयत्नाकरता नाही हेही त्यांनी स्पष्ट सांगितले आहे.

श्री. भट वकील यांना हरदा येथून ता. १४.१२.१९१३ रोजी पाठविलेल्या पत्रात महाराजांनी प्राणायाम-ध्यान-धारणा-जप-शब्दब्रह्म-मंत्रसामर्थ्य व अजपाजप इत्यादींविषयीच्या शंकांचे समाधान केले आहे. 'मुमुक्षुत' त्यांनी जाती जन्मसिद्ध असल्याच्या आशयाचे लेख लिहिले असल्याचे सांगून ज्याचा जो धर्म आहे तोच त्याला तारक आहे अशी स्वतःची समजूत असल्याचेही सांगतात. ब्राह्मणाला वेदद्वारा व शूद्राला पुराणाद्वारा मोक्षप्राप्ती परमेश्वराने सांगून ठेवली आहे, ती आज्ञा उल्लंघन करणे म्हणजे परमेश्वरावरून विश्वास काढून टाकल्यासारखेच असल्याचे त्यांनी म्हटले आहे. म्लेंच्छांना मात्र पुराणही ऐकण्याचा अधिकार नसल्याचे त्यांनी सांगितले आहे.

रा. रा. चिंतामणराव तांबे यांना हरदा येथून पाठविलेल्या ओवीबद्ध पत्रातून महाराजांनी वैराग्य व ईश्वर प्रणिधानाची प्रक्रिया कळविली तसेच काय करू नये या विषयीचा उपदेशही केलेला आहे. ते लिहितात –

*'सोडवील कोणी आपुली सुनीती । तयामागे चित्ती जाऊ नये ॥१।*
*बोलवील कोणी हृदयीचे गूज । तरी ते सहज बोलू नये ॥२॥*
*नाना सद्गुणांच्या आवडत्या नारी । विश्वास तयाप्रत ठेवूं नये ॥३॥*
*ज्ञानदेवाकडे फिरलिया अंगे । प्राप्तिविण मागे वळूं नये ॥४॥'*

वृद्धपण कोणालाच नको असते. पण ते यायचे तेव्हा येतेच आणि मग चिंता-काळज्या माणसाला घेरून राहतात. अशा वेळी महाराजांनी चिंतामणराव यांना 'विचाररूपी औषध' घेण्याचा सल्ला दिला आहे. ते लिहितात –

*'एकचि औषध सांगतो मी यासी । बोवळ्या बोलासी मान द्यावा ॥१॥*
*वाटो यावे जीवा वय झाले फार । कोणता विचार करू देवा ॥२॥*
*वाटो यावे जीवा आले वृद्धपण । केव्हा नारायण भेटेल तो ॥३॥*
*वाटो यावे जीवा चळे पुढे बुद्धी । संतकृपा कधी होय साच ॥४॥*
*वाटो यावे जीवा आत्म-अनुभव । केव्हा ज्ञानदेव दाखवील ॥५॥'*

या पत्रव्यवहारात महाराजांनी आपल्या अनुग्रहित गं.भा.ताई खोलकुटे यांना पाठविलेली अकरा पत्रे आहेत. त्यातून श्रीगुरुचे स्वरूप, समाधी प्रत्यय, ज्ञानोपदेश, अभयदान, मलदोष, विक्षेपदोष, आवरण दोष निवारण, ब्रह्मस्थ होण्याचा मार्ग, भक्तीचे चौदा प्रकार, गुरु उपासनेचे बारा प्रकार, योगमुद्रेची प्रक्रिया, सोऽहम्‌चा उपदेश इत्यादी विविध विषयांचे विवेचन महाराजांनी केलेले आहे. पत्रांची भाषा सोपी, सहज, साधी-सुधी असल्याने सर्वांनाच त्याद्वारे महाराज बोध करून जातात.

ताईनी त्यांना लिहिले होते की, 'अहिल्याबाईने मारिला पुत्र । तैसेचि मज करावे परत्र ।' त्याच्या उत्तरात महाराजांनी त्यांना ज्ञानोपदेश तर केलाच पण अभयदानही दिले. ते म्हणतात –

*'तू गेलीस नरकात । तरी मी होऊनि तव सुत ।*
*उद्धार करीन निश्चित । मग भय व्यर्थ कां जननी ॥४॥*
*तुज जरी प्राप्त झाला नरक । तरी मी सोडोनि मोक्षसुख ।*
*अवतरेन तेथे निःशंक । भय सर्वथा धरू नको ॥५॥*
*ब्रह्म स्वयं सर्वव्यापक । तेथे नाही स्वर्ग नरक ।*
*व्यर्थ मानुनी काल्पनिक । करिशी शोक कासया ॥६॥*
*कर्मे करावी चित्तशुद्धी । भक्तीने करावी स्थिरबुद्धी ।*
*ज्ञाने साधावी मोक्षसिद्धी । याचि देही स्वतंत्र ॥८॥*
*अंगी असावे वैराग्यबल । चित्ती प्रेमा असावा सोज्ज्वळ ।*
*आत्मानुभव परम निर्मळ । असावा केवळ स्वानंदे ॥९॥*

(पत्र क्र. ७, पृ. ७९)

महाराजांनी पुढे सांगून ठेवले आहे 'हे जननी, या ज्ञानाने आता तुला नवा जन्म घ्यावा लागणार नाही. आणि तुला भीतीच असेल तर, त्याही जन्मी पुत्ररूपाने येऊन मी तुझा उद्धार करीन. आणि तुझ्याबरोबर अनेक मुमुक्षुंचेही कल्याण करीन. तू सर्वथा भिऊ नकोस.' (ज्ञानोपदेश : पत्र क्र. ३, पृ. ७८)

## ॥अंतःसभेचे गुह्य ॥

रा. रा. श्रीकृष्णाजी श्रीनिवास हरिदास यांना लिहिलेल्या पत्रातून महाराजांनी शास्त्रे, गुरुकृपा, ईश्वरी कृपा व स्वप्रयत्न यांना परमेश्वर

प्राप्तीसाठी अत्यन्त महत्त्व असल्याचे सांगितले असून भूताकाश, चित्ताकाश आणि चिदाकाशाविषयीही वियेचन केले आहे. भूताकाशातून चित्ताकाशाकडे जाताना भौतिक, मानसिक, दैयिक व भक्ती हे चार अडथळे पार करावे लागतात. ह्यासाठी अनुक्रमे बौद्धांचा बाह्य शून्यवाद, गुरुसेवा (आगम शास्त्रे) ईश्वरासिद्धे; इत्यादी सांख्यसूत्रे व सर्व अद्वैत आहे तर भक्ती कशाला? त्यासाठी प्रस्थानत्रयी ! ह्याप्रमाणे चारही अडथळ्यांचे निवारण करण्यासाठी त्या त्या शास्त्रांचा उपयोग गुरुमुखाने करून घेण्यास ते सांगतात. आपल्या जातीत असा कोणी ब्रह्मवेत्ता न मिळाल्यास कोणत्याही जातीचा पुरुष स्वप्नात येऊन उपदेश करतो या विषयीचा श्रुति-संतांचा अभिप्राय महत्त्वाचा असल्याचे सांगून त्यासाठी योगवाशिष्ट्यातील वचने, ज्ञानेश्वर तसेच एकनाथांच्या ग्रंथांचा दाखला त्यांनी दिलेला आहे. अधिकारी पुरुषास लहान लहान सिद्धी भूताकाशातच प्राप्त होतात. त्यानंतर चित्ताकाशात गेल्यानंतर सहस्त्रावधी ब्रह्माण्ड निर्माण करण्याची शक्ती त्याला प्राप्त होते. आणि पुढे चिदाकाशात गेल्यानंतर निर्माण करणारा व निर्माण केलेली वस्तू ह्या दोन पृथक उरतच नाही. महाराजांनी स्वप्नात दिलेला गुरुपदेश सत्य असल्याचे शंकराचार्यांचे उदाहरण देऊन सांगितले असून तुकाराम महाराजांच्या 'मानियेला स्वप्नी गुरुचा उपदेश' या वचनाचा दाखलाही दिला आहे.

या पत्रातूनच भक्त, भालेराव, मुळे, हरिभाऊ व बापूजी असे पाचच जण महाराजांच्या अंतःसभेत असल्याचे समजते.

## ॥ ढोंगी साधू - बुवाबाजी - फसवणूक ॥

महाराजांनी रा. रा. मुळे मास्तरांना पाठविलेल्या पत्रांत बुवाबाजीचे स्वरूप, भोंदुगिरीचे चोवीस प्रकार, भोंदू आणि वेश्या, कुत्रा, गाढव, कावळा इत्यादींवर आपले विचार परखडपणे मांडले आहेत. तुकाराम महाराजांच्या याच प्रकारच्या वृत्तींवरील अभंगांची येथे आठवण यावी. या पत्रांतून महाराजांनी तत्कालीन धर्ममार्तंड, ते करीत असलेली सामान्यांची फसवणूक, ते करीत असलेली पापकृत्ये, त्यांची आपापसातील लबाडी, संपत्तीचा हव्यास, कामासक्ती, अनीतीचा व्यवहार अशा सर्व कुकर्माचा पाढाच वाचला आहे. ते लिहितात, 'आम्हाला ज्याच्यावर अनुग्रह करावासा वाटतो त्याच्यात आम्ही दोन सद्गुण घालून देत असतो एक म्हणजे मनुष्यास आईबापाच्या विरुद्ध वागणे व दुसरे बायकोस नवऱ्याचे विरुद्ध वागणे. जेथे नवरा आमच्या म्हणण्याप्रमाणे वागत नाही तेथे आम्ही त्याच्या बायकोला पतीसेवा सांगत असतो व ज्या घरात बायकोचे वर्चस्व असते त्या घरात तर आम्हीच नवरे होत असतो.' (पृ. १२०-१२१). 'ढोंग, बुवाबाजी आणि फसवणुकीवर महाराजांनी व्यक्त केलेले विचार आजच्या काळातील धर्ममार्तंडाबाबतही लागू पडणारे आहेत.' आमच्या धर्माची ग्लानी परकीय लोक मुळीच करीत नाहीत तर आम्ही स्वतःच ती करीत असतो आणि ते लोकांच्याही नजरेस येत नाही. तेव्हा आमचा उद्धार करण्याकरता तो परमेश्वर लवकर अवतार धरो अशी त्या प्रभूस अनेकवार प्रार्थना करून ज्ञानेश्वर महाराजांचे चरणी हा लेख समर्पण करतो ! अशा 'अर्थपूर्ण' शब्दात महाराजांनी लेखसमाप्ती केली आहे. यावरून महाराजांना असलेली सामाजिकतेची जाण लक्षात येते.

## ॥ महाराजांचे नीतीविषयक विचार ॥

श्री. विठ्ठलराव केंकरे यांना महाराजांनी ता. १७.५.१९१३ रोजी पाठविलेल्या पत्रात फसवणूक आणि नीतीविषयक विचार व्यक्त केले आहेत. 'संशयी विद्वानापेक्षा निष्ठावान भोळाच संसारसागर तरून जातो. संसारी लोकांपुढे धर्मस्थापकाचेही काही चालत नाही. (पृ.१३७) ऐहिक सुखाच्या अपेक्षेमुळे आजकाल कोणाचाही धर्मावर विश्वास नसतो असे महाराजांचे मत होते. आपली फसवणूक होऊ नये असे वाटत असल्यास विषयासक्ती सर्वथा सोडायला हवी असे ते सांगतात आणि आपल्या मतापुष्ट्यर्थ मार्कण्डेय पुराणातील मदालसेची कथाही ऐकवितात. तिने राज्यावर बसलेल्या आपल्या अलर्क नावाच्या पुत्राचे राज्य दुसऱ्याच्या हातून घेववून त्याला विरक्त केले होते.

याच पत्रात महाराजांनी पाश्चात्य नीतीशास्त्र व ईश्वरतत्त्वाविषयी आपले विचार व्यक्त केले आहेत. 'पाश्चात्य नीतीशास्त्र विचार केल्यास नीती कशाला म्हणावे हेच अद्याप ठरले नाही. परमेश्वर हा अतिशय नीतीचा पुतळा आहे, अशी पाश्चात्यांची समजूत आहे.' मात्र महाराजांच्या मते त्यांच्या शास्त्रांचे आलोचन केल्यास चारच कल्पना समोर येतात. ॲथॉरिटी, इन्स्यूशन, युटिलिटी व इव्होल्यूशन ! आणि यापैकी कोणतीही कल्पना घेऊन परमेश्वर नीतीचा पुतळा आहे हे महाराजांच्या मते सिद्ध करणे कठीण आहे. (पृ.१४०) त्यांच्या मते नीती केवळ साधकाकरिता असून तीही योगातील पहिले अंग आहे. सत्ताभेदास्तव परमेश्वराशी तिचा संबंध उपासकानुकूलच आहे व म्हणूनच श्रीकृष्णाच्या रासक्रीडेवर आम्ही अत्यंत पूज्य बुद्धी ठेवीत असतो. (पृ. १४१) त्यांच्या मते नीतीचा अभ्यास समुच्चयाने केलेलाच उपयोगी असतो.

## ॥ धर्माची लक्षणे ॥

श्रीनिवासशास्त्री हरदासांना दि. २८.३.१९१३ रोजी लिहिलेल्या पत्रातून महाराजांनी धर्मलक्षणे सांगितलेली आहेत. त्यांच्या मते वेदांताचा यथार्थ विचार करणारे अत्यंत थोडे लोक असतात आणि जे आहेत त्यामध्येही अनेक दोष आहेत. वेदांत हा शिष्यवर्गात मनोरंजनासाठी तर गुरु म्हणविणाऱ्यांत पोटाकरिता होतो. या दोघाही वर्गात वेदांताविषयीची खरी कळकळ नाही. (पृ.१५४) याच पत्रात महाराजांनी धर्माची लक्षणे दिलेली आहेत. वेदाच्या शब्दाने प्रेरणा करणे हे पहिले लक्षण, ज्यापासून अभ्युदय व मोक्ष होतो तो धर्म. धर्मद्वारा सुख मिळणे म्हणजे अभ्युदय. स्वर्गही मोक्षाच्या दृष्टीने अभ्युदयच आहे निःश्रेयस नाही. यात महत्त्वाचे म्हणजे कोणतेच काम होत नसेल तर मग निर्मत्सर बुद्धीने पूर्वीचेच काम करावे. त्यात यश येवो अथवा न येवो. पण रिकामे मात्र बसू नये असे ते म्हणतात. झोपेला समाधी म्हणून घोरत पडणाऱ्या वेदांन्त्यापेक्षा नास्तिकांचे खोटे बोलणे अधिक चांगले असे मी निक्षून सांगतो' असे त्यांनी म्हटले आहे. (पृ.१५४)

श्रीभैय्यासाहेब तांबे व बाबुराव तांबे यांना ता. १०-१-१९१२ रोजी लिहिलेल्या पत्रांतून त्यांनी वेदांत शिकविणे म्हणजे काय? वैयक्तिक दोषदृष्टी व सामाजिक दोषदृष्टी, तसेच ढोंगी साधू व साधु परीक्षेचे बारा प्रश्न लिहून कळविले आहेत. खरा गुरु मिळणे ईश्वरानुग्रहावाचून होत नाही. आईवडीलही प्रेमळ मिळण्यास पुत्राचे भाग्य हवे. सद्गुरु म्हणविणाऱ्यांनी योगाचे ज्ञान अनुभवाने करून दिले पाहिजे परंतु अनुभवाचे प्रश्न करण्याचीही शिष्याला अक्कल असायला हवी, असे त्यांचे स्पष्ट मत आहे. धर्मसुधारकांकडूनच धर्माला भीती असल्याचे महाराजांनी अनेक प्रश्न व त्यांच्या उत्तरातून सांगितले आहे. याच संदर्भात त्यांनी श्री. मुळे,

हरिदास, पाध्ये, खापरे वगैरेंना पत्र लिहून कळविले असून ढोंगी साधूंचे ढोंगही त्यांनी उघड केलेले आहे.

## ॥ वागण्याचे व कामाचे धोरण ॥

महाराजांनी येथे वर्णधर्म-जातीधर्मासंबंधात देशहितपटुंच्या झालेल्या चुका दर्शवून स्वतःचे मतही दिले आहे. परखडपणे ते लिहितात, 'विवेकानंदांनी जातीभेदाच्या मुळाशी ब्राह्मण आहेत - शंकराचार्यांनी आपल्या भट्टीतून हा जातीभेद नवीन उपस्थित केला आहे, असे परक्या लोकांना सांगणे म्हणजे हिंदुस्तानातील ब्राह्मणांविषयी गैरसमज करून देणेच होय.' (पृ.१९३) एकूणच सुधारकांविषयी त्यांनी आपले मत स्पष्टपणे मांडलेले असून त्याचा प्रतिकार कोणी केलेला दिसत नाही. त्यांनी 'सुरतरु' मध्ये याविषयी अधिक विचार मांडले असून ते मुळातूनच वाचावयास हवेत.

चमत्कारांविषयीही त्यांनी आपली मते व्यक्त केलेली असून ते चमत्कार तुच्छ मानीत नाहीत पण आमच्या गुरुतच चमत्कार आहेत, तुमच्या गुरुत नाहीत असे नुसत्या चमत्काराच्या दृष्टीने म्हणण्याचा कोणालाही अधिकार नसल्याचे ते सांगतात. (पृ. १९८)

## ॥ वेदांताचे शिक्षण ॥

श्रीनिवासशास्त्री हरदासांच्या लिहिलेल्या पत्रात महाराजांनी वेदांत शिक्षणावर काही विचार व्यक्तविले आहेत तेही मननीय आहेत. त्यांच्या मते शिक्षण म्हणजे संस्कार ! शिक्षण म्हणजे सुसंस्कारांच्या भांडाराचे ज्ञान ! संस्कार हा वस्तुज्ञानजन्य असतो. 'अपरिछिन्नांदानंद प्राप्ती' हे शिक्षणाचे फळ होय. यथार्थ वस्तूचे ज्ञान हेच 'अपरिछिन्नानंदाचे - त्याच्या प्राप्तीचे हेतुक असते. म्हणून तदीय संस्कार हे शिक्षण म्हणावे आणि फलप्राप्ती झाल्यानंतर शिक्षणाची आवश्यकता नाही.

## ॥ मनाचे विश्लेषण ॥

रा. रा. मुळे मास्तरांना लिहिलेल्या पत्रातून महाराजांनी मनाविषयी विवेचन केले आहे. सर्व संस्कृतीचे कारण एक चित्त असून त्याचा परिचय झाला नसता साधनांचे वैय्यर्थ, तृप्तीच्या तीन कक्षा व त्याची लक्षणे, लोकालोक, आत्मा, शरीरे, भूत, मोक्ष, पुनर्जन्म इत्यादी पदार्थांची प्रत्यक्ष अनुमान आणि शास्त्र या प्रमाणांनी योग्य ओळख झाली - म्हणजे हठ, लय, मंत्र, योग ह्यातून कोणत्याही साधनास लागावे आणि अखेरीस अखंड दुःखनिवृत्ती आणि परमानंदप्राप्ती हे फल प्राप्त होते. मात्र या मार्गाविषयी सांसारिकांची उदासीनता असल्याचेही ते सांगून जातात. रा. रा. केशवराव यांना पाठविलेल्या पत्रात (ता. २८-४-१९१३) त्यांनी अनेक धर्मांची उत्पत्ती व प्रकारांविषयीही लिहिले आहे. एच.के. वाळींबे यांना त्यांनी महाराजांना इंग्रजी भाषा वैकृत म्हणजे मंत्ररहित आहे म्हणजे काय? असा प्रश्न विचारल्यावर महाराजांनी उत्तर दिले की 'केवळ वेदान्ताचा अर्थ समजला म्हणजे ब्रह्मज्ञान झाले असा वैदिक सिद्धान्त नाही. कारण जगताच्या सुखदुःखाचे कारण ज्याप्रमाणे कर्म आहे त्याप्रमाणे आत्मज्ञानाच्या प्रतिबंधाचेही कारण दुःख आहे - दुरित आहे.' पुष्कळांना बोध झाला नाही अशा अर्थाच्या श्रृती आहेत. भगवंताचेही वचन आहे. श्रृत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्. काही पापे श्रवणकाळी ब्रह्म बोधाला प्रतिबंधक असतात तर काही मननाला प्रतिबंधक असतात तर काही निदिध्यासनकाली प्रतिबंधक असतात. त्यामुळेच वामदेव-भरतादिकांना देखील ब्रह्मज्ञान होण्याला काही जन्म लागले.' त्या विषयीची 'एकेन वामदेव, भरतेन, त्रिजन्मभिः ही स्मृति या विषयीची प्रमाण आहे.

महाराजांनी तहसीलदार तांबे यांना भूतयोनिविषयकही बरीच काही माहिती दिलेली आढळते.

एवंच, या द्वितीय खंडात श्रीगुलाबराव महाराजांनी आपले हितचिंतक, आप्तेष्ट, जिज्ञासू आणि अनुयायी यांना लिहिलेल्या पत्रांतून, वैदिक धर्म, योग, ज्ञान, भक्ती, प्राणायाम, ध्यान-धारणा-जपतप, बुवाबाजी, सुधारणावाद, शिक्षण, समाजशास्त्र, वर्णधर्म, हिंदु धर्म अन्य धर्मीयांशी केलेला असलेला त्याचा समन्वय, पाश्चात्य तत्त्वविचार इत्यादी सर्व विषयांचे विवेचन केलेले आहे. आपली मते त्यांनी परखडपणे मांडली आहेत. मुख्यतः वैदिक धर्म-आर्य धर्माचा विलक्षण अभिमान त्यांचे ठायी आहे. आणि जगात तोच एक विश्वधर्म म्हणून व्हावा यासाठीच ते प्रयत्नशील होते. सर्वार्थाने विपरीत परिस्थिती सभोवार असली तरी त्यांनी आपल्या प्रज्ञाचक्षूंद्वारा प्राप्त झालेल्या बुद्धी सामर्थ्याने जे धर्मविषयक प्रबोधन घडविले ते आश्चर्यचकित करून सोडणारे आहे. त्यांचे साहित्य सर्व विषयांना स्पर्श करणारे, विश्वैक्य साधणारे असल्यानेच मा. पंतप्रधान श्री. अटलबिहारी बाजपेयी यांनी त्यांच्या साहित्याविषयी काढलेले 'गागर में सागर भर दिया' हे उद्‌गार सार्थच आहेत.

**सौ. सुनीता तांबे**
२, आसावरी गणेशखिंड रोड, औंध, पुणे ७.

---

- **गीता धर्म जगाचे बायबल होणार असे मी भविष्य करतो.**

# श्री गुलाबराव महाराजप्रणीत योगदर्शन

*बी.ए. (तत्त्वज्ञान), एम.ए. (तत्त्वज्ञान) (समाजशास्त्र) पीएच्.डी. काम सुरू. रजिस्ट्रार बी.एम.सी.सी. कॉलेज. पुस्तके, लेखमाला प्रसिद्ध. गेली २८ वर्षे प्रवचन, कीर्तन व्याख्यान ज्ञानेश्वरी, भागवत, दासबोध, रामकृष्ण, विवेकानंद इ. गाढा अभ्यास. शंकराचार्यांकडून गौरव पुरस्कार. पुणे महानगरपालिका आदर्श शिक्षक व गौरव पदक. धर्मभूषण पदवी. श्रीमत् शंकराचार्य (पुरी) १९९६.*

**भा**रतात संतांची फार मोठी परंपरा आहे. या ठिकाणी अनेक थोर संत मंडळी होऊन गेली आहेत. या संत परंपरेतील, गुलाबराव महाराज हे एक 'प्रज्ञावंत संत' म्हणता येईल. पू. गुलाबराव महाराजांनी आपल्या अल्प आयुष्यात विपुल प्रमाणात वैभवसंपन्न विचारधन समाजाला प्रदान केले आहे. या ग्रंथ-संपदेत, वेद-वेदांत, सूत्रविचार, शास्त्रविचार, योग, सांख्य, संगीत, आयुर्वेद, गाथा, लोकगीते, मधुराभक्ती इ. गोष्टींना स्पर्श केला आहे. या सर्वातील तत्त्वचिंतन चिरंतन व सदैव प्रेरणा देणारे आहे. यात अनेक विचारांचा परामर्श घेताना, तौलनिक चिंतन, तर्कशुद्ध मांडणी आणि बुद्धिप्रामाण्य चिकित्सा समन्वयक पद्धतीने केलेली दिसून येते. पू. गुलाबराव महाराजांना 'प्रज्ञाचक्षू' प्राप्त झालेले संबोधिले जाते. परंतु याबाबत एक विचार असा की, बुद्धी, प्रज्ञा, ऋतंभरा प्रज्ञा व वैशारद्य प्रज्ञा असा बुद्धीचा विकासक्रम आहे. तेव्हा पू. गुलाबराव महाराज हे अंध असूनही ऋतंभरा प्रज्ञेच्या अवस्थेतील होते. जसजसा मनुष्याचा योगाभ्यास दृढ होत जातो, तसे बुद्धीचे एक एक पैलू दिसू लागतात. ज्ञानदेव म्हणतात –

***तिये सिद्ध प्रज्ञेचिनी लाभे ।***
***मनचि सारस्वते दुभे । मग सकल शास्त्रे ।***
***स्वयंभु निघती मुखी ॥***

ज्ञानदेव जो सिद्ध प्रज्ञेचा विषय मांडतात, तीच ही ऋतंभरा प्रज्ञा म्हणता येईल. तेव्हा पू. गुलाबराव महाराजांचे हे योगदर्शन विचार काय आहेत, हे आपण या लेखातून पाहणार आहोत.

## पातंजली योगदर्शन

महर्षि पतंजली हे शेष अनंताचे अवतार होते. त्यांनी 'पातंजल योगसूत्रे' म्हणून एकूण ४४ सूत्रात विचार मांडला आहे. या योगास 'अष्टांग योग' साधना म्हणतात. या ग्रंथात चार भाग (पाद) केले आहेत. योगाची, यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी अशी आठ अंगे आहेत. म्हणून ही 'अष्टांग योग'साधना आहे. या अनुष्ठानाने, चित्ताचे क्लेश, मनाची चंचलता, बुद्धीचा अविवेक नष्ट होतो. पहिली पाच अंगसाधना बाह्यांगी असून उरलेली तीन अंतरंगी आहेत.

वेदान्ताच्या साहाय्याने मनुष्यानी पूर्णत्व प्राप्त करून घेऊन आत्म्याची मुक्ती साधणे याचा उपाय म्हणजे 'योग' होय. यातील ध्यान, धारणा व समाधी अधिक सूक्ष्म अवस्था आहेत. या तीन अवस्थांना पू. गुलाबराव महाराजांनी मधुराभक्तीची जोड दिल्याने, वेगळा योगविचार मांडला आहे.

'योगप्रभाव' या ग्रंथात पतंजलीच्या सूत्रावर भाष्य करताना अत्यंत मार्मिक व प्रभावी भाषेत चिंतन मांडले आहे. तसेच योगरहस्यात, १२ प्रकरणांच्या साहाय्याने चिंतन मांडले आहे. अत्यंत सोप्या, रहस्यमय, तुलनात्मक पद्धतीने तसेच वार्तिकादिकांची पूर्वपरंपरा न सोडता विशेष अशा शैलीने पू. गुलाबराव महाराजांनी विचार मांडले आहेत.

## योगाचा अधिकारी

पू. गुलाबराव महाराज म्हणतात, 'जो कोणी योगाची इच्छा करेल, तो योगाचा अधिकारी आहे.' यासाठी ज्याला ब्रह्मपद प्राप्तीची इच्छा असेल त्याने अथक प्रयत्न करावेत. गुरुवचनावर अचल निष्ठा ठेवून, शास्त्रप्रचीती, गुरुप्रचीती व स्वप्रचीती याचा मेळ घालावा, विषयासक्ती सोडावी, मानसविषयांना जिंकावे, तारतम्यभावाने वागावे, विहित विषयांशी समत्व ठेवावे, मुख्यतः संसार क्लेश, अभ्यास व मृत्यूचे भय नष्ट होते, तोच खरा 'योगाचा अधिकारी' आहे.

## पू. गुलाबराव महाराजप्रणीत योग

पू. महाराज योग कशाला म्हणतात, ते आपण प्रथम पाहू या.

***ध्यानाने ब्रह्माकार चित्त होणे हा योग.***
***ज्ञानाने ब्रह्माकार चित्त होणे हा वेदान्त.***
***परम प्रेमाने अखंड ब्रह्माकार होणे ही भक्ती.***

असा विचार पू. गुलाबराव महाराज मांडत आहेत.

योगाचा मागोवा घेताना पू. गुलाबराव महाराजांनी योगातील अनेक नवीन प्रक्रियांची निर्मिती करून अंतिम रसस्वाद हा मधुरा रसाच्या अनुभूतीचा सांगितला आहे. योगशास्त्रांचे अंतिम ध्येय म्हणजे 'असंप्रज्ञात समाधी' साधणे आहे. आणि हाच खरा 'योगाचा प्रभाव' आहे.

पू. गुलाबराव महाराज अद्वैतास रसाद्वैत किंवा भागवताद्वैत म्हणत असत आणि त्या अद्वैताशी त्यांनी मधुराभक्ती किंवा गोपीभाव याची सांगड घातली आहे.

पू. गुलाबराव महाराज यांनी 'योगप्रभाव' या पुस्तकाच्या प्रारंभी नामस्मरणाने अष्टांग योगाची साधना पूर्ण होते, त्यातून निर्विकल्प समाधी साधली जाते, ते पुढीलप्रमाणे म्हणतात –

***योगाची अष्टांगे नामींच मिळती । नाम ते वेदान्ती मिश्रित की ॥१॥***
***नाम घेता वाचे इंद्रियविस्मृति । या नांव बोलती यम भक्त ॥२॥***
***नामामध्ये शुद्धी तोष आणि दया । हरिभक्तराया नियम हा ॥३॥***
***नाम घेता देह स्तब्धही होऊन । भक्तासी आसन हेचि नित्य ॥४॥***
***नाम घेता कंठ होतसे सदगद । श्वास तोहि बंद पडे तेव्हा ॥५॥***
***हेचिं हरिभक्तां प्राणसंयमन । कुंभकादि जाण एका काळी ॥६॥***
***नाम घेता वाचे मनासी आकळ । प्रत्याहार बळ हरिभक्ता ॥७॥***
***नाम घेता वाणी-मनाते एकाग्र । भक्तासी प्रकार धारणा हा ॥८॥***
***नामे श्रीहरीचा होय आविर्भाव । हरिभक्ता ठाव हेचि ध्यान ॥९॥***
***हरिसंगे पडे सकळ विसर । समाधि साचार संप्रज्ञात ॥१०॥***

*गुरुकृपे हरि सांगाते खेळणे । सर्वत्र पाहणे गुरुमाय ॥११॥*
*गुरु-हरिमाजी नाही काही भेद । स्वये झाला सिद्ध गुरुभक्ती ॥१२॥*
*शिष्य तोचि हरि, गुरु तोचि नंद । प्रेमात प्रसिद्ध गोपीरूप ॥१३॥*
*हाचि निर्विकल्प समाधीचा ठेवा । परी तीव्र व्हावा नामवेग ॥१४॥*
*नव्हे हे रूपक, नव्हे संन्निवेश । पाहता प्रत्यक्ष प्रतीती हे ॥१५॥*
*योगाचे हे गुरुच ज्ञानेश्वरराय । तेथे भक्तिमाय नेवो आम्हा ॥१६॥*

॥ज्ञानेश्वर कन्या श्रीगुलाबराव महाराज ॥
॥अभंग गाथा - ४६ ॥

पू. गुलाबराव महाराजांनी शंकराचार्यांचे तत्त्वचिंतन आणि संतांची पराभक्ती व योगाचे चिंतन यात एक सुंदर समन्वय साधलेला दिसतो.

## अष्टांग साधनेची पूर्वतयारी

पू. गुलाबराव महाराजांना अष्टांग साधनेची साधकांनी पूर्वतयारी करावी असे वाटते, हे सांगितले आहे. साधकांनी नीतिसंपन्न असावे. दास्यभाव व सेवावृत्ती असावी. बंधुप्रेम असावे. याने मनुष्याच्या जीवनातील मनोदोष, शरीरदोष, वाणीदोष, अहंता व ममतेसारखे विकार नष्ट होतात. यासाठी या वृत्तींचा अंगिकार करणे म्हणजे ही एक साधना आहे. मनुष्याच्या वासनाक्षय, मनोनाश झाल्याशिवाय समाधी अवस्था प्राप्त होत नाही. म्हणजेच योगसाधना सिद्ध होत नाही. यासाठी पू. गुलाबराव महाराज यांनी 'अमोघनिरूपण' केले असून साधकांनी प्रणवाचा अभ्यास प्रथम सूचित केला आहे. प्रणव याचा उच्चार कसा असावा आणि त्याबरोबर ब्रह्मानुभव कसा घ्यावा हे सांगितले आहे. प्रणवातून कर्म, भक्ती, योग व ज्ञान मार्ग निघालेले आहे, हे पू. गुलाबराव महाराज सांगतात. त्याबरोबर भाषा दोन प्रकारची सांगून नादरूप व ध्वनिरूपाचे विचार मांडले आहेत. जडपदार्थापासून निघालेला आवाज हा 'नाद रूप भाषा' आहे. प्राण्यापासून निघालेला 'आवाज' हा ध्वनिरूप भाषा समजली जाते. ध्वनीचे दोन प्रकार. एक स्वररूप व वर्णरूप. मनुष्येतर सर्व प्राण्यांचा ध्वनि 'स्वररूप' असतो व मनुष्याचा ध्वनि हा 'वर्णरूप' आहे. या वर्णाचे दोन भाग, स्वर व व्यंजने. जिव्हेच्या साहाय्याने मृदुकठीण ध्वनि येतो ती व्यंजने, तर जीभ आदि विशेष हलचाल न करता जो ध्वनि येतो तो 'स्वर'. या सर्वांचे मूलतत्त्व ओंकार आहे. त्यामुळे याचा अभ्यास योगशास्त्रात प्रथम सांगितला आहे.

असा अभ्यास जसा दृढ होतो तसे कुंडलिनी जगदंबा शक्तीची प्रचीती येते. कुंडलिनी ही योगाची शक्ती आहे. हीच चैतन्यशक्ती आहे. व्यष्टी जीवनात ही कुंडलिनी व ब्रह्मांड शक्तीत सहस्त्रधारा असते. या शक्तीचा उपयोग योगात होतो. खरं म्हणजे कुंडलिनी शक्ती योगानेही जागृत होते व योगही साधू शकतो.

## अष्टांग योगाबाबत

अष्टांग योगाचा विचार मांडताना पू. गुलाबराव महाराज सांगत असत.

**यम** : अहिंसा, सत्य, अस्तेय (अचौर्य), आर्जव, क्षमा, धृति, शौच, ब्रह्मचर्य, मिताहार, दीनजनांवर दया करणे, हे 'यम' सांगितले आहेत. 'थोडक्यात 'यम' हे इंद्रियशक्तीचा निरोध करीत असतात. यम हे निवृत्तिस्वरूप आहेत.

**नियम** : संतोष, तप, स्वाध्याय आणि ईश्वरप्रणिधान अथवा आत्मसमर्पण हे नियम आहेत. हे नियम प्रवृत्तीस्वरूप आहेत याने तामसशक्तीचा निरोध होतो.

**आसन** : शारीरिक व मानसिक स्थिरता लाभते. सुखदुःखादि द्वंद्वे दूर होतात. सर्व शारीरिक अवयवांना स्थैर्य लाभते.

**प्राणायाम** : पूरक, कुंभक व रेचक या प्राणायामाच्या क्रियेने श्वासावर नियमन होते. चित्त शुद्ध होऊन एकाग्रतेची पात्रता होते. मनाचे मालिन्य प्राणायामाने नष्ट होते. प्राणायामाने सर्व चलनशक्तीचा निरोध होतो व चित्ताची मूढावस्था संपते.

**धारणा** : मनाला विशिष्ट्य गोष्टींचा अनुभव घेण्यास प्राप्त करणे. तसेच, चित्त व मनाच्या सर्व वृत्ती ज्या एखाद्या गोष्टींवर खिळून राहते त्याला धारणा म्हणतात.

**ध्यान** : समाधि पूर्वीची अवस्था. मन, बुद्धि, चित्त, अंतःकरण व इंद्रियही एकाग्र होऊन अंतःशक्तीही उपास्य दैवतेचे आकार घेत प्रकट होऊ लागते त्याला 'ध्यान' म्हणतात. ध्यानामुळे व साधकाच्या निर्हेतुक प्रेमामुळे प्रभु हृदयात साकार होतात. रज, तम, गुण पळ काढतात व सात्त्विक ज्योत अखंड तेथे राहते. असे ईश्वराचे हृदयात प्रकटीकरण होताच साधक शुद्ध सात्त्विक बनतो. पू. गुलाबराव महाराजांचे मते ध्यान करताना सर्वच (अंग) बाबी आचरल्या पाहिजेत असे नसून ध्यानाला स्वतंत्र योगत्व आहे. पू. महाराजांनी 'ध्यानयोगदिवाकर' या प्रकरणात (६ वा अध्याय) पातंजली, भीष्माचार्य आणि भगवान श्रीकृष्ण यांच्या ध्यानविषयीच्या प्रक्रियांचा ऊहापोह केला आहे.

**समाधि** : पू. गुलाबराव महाराज यांनी प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि याला संचयन, प्रणयन, सवय किंवा शील, तादात्म्यता किंवा अनुभूती हे पर्यायी शब्द सांगितले असून याला पू. महाराज 'मानसिक प्रवाह' म्हणतात.

**संचयन** : म्हणजे मन अनेक ठिकाणी जे लागलेले असते त्याला एके ठिकाणी करणे म्हणजे संचयन.

**प्रणयन** : म्हणजे आपल्याला इष्ट असलेल्या पदार्थाकडे त्याला (मनाला) नेहमी पाठविणे.

**सवय किंवा शील** : म्हणजे पदार्थाकडे मन आपोआप जाणे किंवा तेथेच राहणे. शेवटी स्थिती तदाकार होणे म्हणजे आपणाला अनुभव मिळणे किंवा कार्य घडून येणे.

**तादात्मता वा अनुभूती** : हीच समाधी अवस्था आहे. जीव-शिव ऐक्याची ही अनुभूती येणे हीच तादात्मता आहे. हा अनुभव घ्यावयाचा असतो. ही केवळानंद अवस्था आहे.

योगशास्त्रानुसार समाधी म्हणजे ध्येय, ध्याता, एक होणे हा आहे. पू. गुलाबराव महाराजांचे मते, ध्यानामध्ये ध्येय, ध्याता व ध्यान असा

भेद भासत असून समाधीत फक्त ध्येयाचेच मात्र भान होते. परमेश्वराच्या मूर्तरूपावर ध्यान करीत असता आपलेपणा न भासून केवल परमेश्वराचे मूर्तरूपच भासणे ह्यालाही समाधिरूप ध्येय साक्षीचे असते. योगशास्त्राने समाधीचे दोन प्रकार - 'संप्रज्ञात' व 'असंप्रज्ञात' समाधी.

**संप्रज्ञात समाधी :** जेव्हा ध्याता व ध्येय एकरूप होतात, पण ऐक्याची जाणीव कायम असते. तिला 'सविकल्प किंवा सबीज किंवा संप्रज्ञात समाधी म्हणतात. याचे चार प्रकार.

**वितर्क संप्रज्ञात :** स्थूल पदार्थाशी एकरूपता पावणे. ही वितर्क संप्रज्ञात समाधि होय. (हा पदार्थ ईश्वर असो व दुसरा विषय असतो)

**विचार संप्रज्ञात :** सूक्ष्म वस्तूशी चित्त एक होणे. (उदा. फुलाच्या वासाशी एकरूप होणे वगैरे.)

**आनंद संप्रज्ञात :** मनातील रजो व तमो गुणाचे मालिन्य निःशेष संपून जाणे. केवळ सात्त्विक आनंदाशी एकरूप होणे.

**अस्मिता संप्रज्ञात :** ब्रह्मानंद प्राप्त झाल्यावरही मी ईश्वर आहे अशा अहंकाराशी (अहं ब्रम्हास्मि हा बोध) एक होणे पण त्यातही ऐक्याची जाणीव असते.

**असंप्रज्ञात समाधी :** या समाधी अवस्थेत ध्याता व ध्येय एकरूप तर होतातच पण एक झाले की आठवण राहत नाही. यात सहजब्रह्मरूपता असते. जाणिवरहित निर्विकल्प ब्रह्मस्थिती हीच असते. हीच निर्बीज समाधी होय. यावर पू. गुलाबराव महाराज म्हणतात :

| | | |
|---|---|---|
| अपर वैराग्याचे फळ | = | इंद्रियनिग्रह |
| अभ्यासाचे फळ | = | संप्रज्ञात समाधी |
| पर वैराग्याचे फळ | = | असंप्रज्ञात समाधी |

तसेच योगाचार्य धेरंडमुनी यांच्या मताप्रमाणे नुसत्या भक्तीनेही असंप्रज्ञात समाधी लागू शकते. तसेच असंप्रज्ञात समाधीच्या प्राप्तीने साधकाच्या प्रारब्धकर्माचा नाश होऊ शकतो.

या असंप्रज्ञात समाधीचे तीन प्रकार :

**१) आपोआप व्युत्थापन पावणारी समाधी :** साधकाच्या सर्व प्रकारच्या वासनाचा क्षय झाल्याबरोबर साधकाला समाधि लागू शकते. या अवस्थेत जग हे मिथ्यारूप भासू लागते.

**२) दुसऱ्याकडून व्युत्थान पावणारी :** समाधी अवस्थेत निमग्न असताना दुसऱ्याने त्याला जागृत करावे लागते अशी समाधी.

**३) व्युत्थानरहित असंप्रज्ञात समाधी :** अशी समाधी अवस्था म्हणजे ही कधीही खंडित होत नाही. ही समाधी अवस्था योगी अधिकाऱ्यांची असून व ज्ञानोत्तर पराभक्ती ज्यांची झाली आहे असे याचा लाभ घेतात.




याशिवाय पू. गुलाबराव महाराजांनी त्वंपदनिष्ठ व तत्पदनिष्ठ समाधी प्रकार सांगितले आहेत. प्रियलीला महोत्सव या ग्रंथात हे दोन समाधीप्रकार सांगितले आहेत. पू. महाराज म्हणतात –

*त्वंपदनिष्ठतया आत्मरूपे समाधिः ।*
*तत्पदनिष्ठतया प्रेममये भगवति समाधिः ।*

**त्वंपदनिष्ठ समाधी :** योगाभ्यासाने किंवा ज्ञानाभ्यासाने त्वंपदाच्या ठिकाणी म्हणजे अंतरात्म्याच्या ठिकाणी हृदयात आत्माअभिन्नत्व ही अवस्था लाभते, ती त्वंपदनिष्ठ समाधी होय. यात बाह्यनामरूपात्मक जगताचा व्यतिरेक करावा लागतो. परंतु या समाधीच्या व्युत्थापनात नामरूपाचा मिथ्याभास कायम राहतो.

**तत्पदनिष्ठ समाधी :** या अवस्थेत साधकाला आत्मा भिन्न अवस्थेची अनुभूती असते. येथे जगताचा नामरूपाचा भास न होता, सगुण साकार भगवद् विग्रह होते. हाच सगुण भगवंताचा व्यापक साक्षात्कार आहे. सर्व नामरूपे प्रेमस्वरूप भगवंताचीच अनुभूती देते. जेथे जेथे मन जाईल तेथे तेथे भगवंताची सुकुमार पाऊलेच अनुभवाला येतात. त्यामुळे अहंकाराचा पूर्ण विलय होतो.




**प्रियलीला महोत्सव यष्टी ३, अध्याय ६, पान ८४**

यात तत्त्वमसि महावाक्याची अनुभूती होत असते.

**एक रहस्यमय मार्ग :** पू. गुलाबराव महाराज म्हणतात, वैराग्याच्या व स्वतःच्या प्रयत्नाच्या बळावर जो योगाभ्यास करण्याची इच्छा करतो त्याने –

स्वयंप्रतीतिः स्वगुरुप्रतीतिः शास्त्रप्रतीतिः मनसश्च निरोधः ।
दिने दिने यस्य भवेत्स योगी सर्वेषु सुसंमतोऽभूत् ।।

१) शास्त्रप्रत्यय म्हणजे शास्त्राने सांगितलेला सामान्य मार्ग.

२) गुरुप्रत्यय म्हणजे शिष्याच्या अधिकारानुसार शास्त्रानुसार गुरुने दाखविलेला मार्ग.

३) आत्मप्रत्यय म्हणजे आपल्या स्वप्रयत्नानुसार आपल्याला आलेला चित्तरोधाचा अनुभव असतो.

४) स्वानुभवाचा पुनः गुरुशास्त्राशी पडलेला मेळ.

यासाठी शास्त्रप्रचीती, गुरुप्रचीती व आत्मप्रचीतीच्या साहाय्याने साधक योगमार्गाचा अवलंब करू शकतो.

योगमार्गाच्या अभ्यासासाठी विवेक, वैराग्य व अभ्यास यांची सांगड घातली तर योग हा सोपा असल्याची अनुभूती येते. तसेच, योगशास्त्रातील पुरुषबहुता, ईश्वरभिन्नता व प्रकृतिसत्यता हे तीन सिद्धांत सोडून दिले तर, या गोष्टींचा वेदातांशी समन्वय आहे. याचा मेळ पू. गुलाबराव महाराज यांनी असा घातला की, जीव अज्ञानी असेपर्यंत हे तिन्ही सिद्धांत खरे वाटतात आणि वेदांतांचे ज्ञान झाले की ते आपोआप सुटून जातात.

योगमार्ग व भक्ती या दोन मार्गाची पू. महाराजांनी सुंदर अशी तुलना केली असून योगाबद्दल कुठेही अनादर न बाळगता भक्ती ही श्रेष्ठ आहे, असे प्रतिपादिले आहे. यात एकच समर्पक युक्तिवाद मांडला की, योग जरी साधला तरी भक्तीभाव हा असावाच लागतो. त्याशिवाय योग पूर्ण होत नाही.

पू. गुलाबराव महाराज यांनी योगसाधनेची जोड भक्तिभावाशी करून भगवंताला इंद्रियासह सर्व समर्पण करून भक्त नित्यमुक्त राहू शकतो. प्रत्याभिज्ञा म्हणजे आनंदाचा अनुभव ! अशा समाधि अवस्थेची भक्त अखंड आनंदाची अनुभूती घेतात.

**प्रा. अजित कुलकर्णी**
३४६, शनिवार पेठ, श्री शामल-दत्त निवास,
नवीन मराठी शाळेसमोर, पुणे -३०.

---

- **सत्व गुणाची वृद्धी करणारा आणि रजोगुण तमोगुण नाहीसे करणारा हाच खरा धर्म.**

# "संत श्री गुलाबराव महाराजांचे भारतीय संगीताविषयी विचार"

*एम.बी.बी.एस., एम.डी. फार्माकालॉजी, बी.ए.(ॲडिशनल मराठी) संगती विशारद एक्स डीन. मेडिकल कॉलेज सोवनगी (वर्धा). सध्या प्रोफेसर ऑफ फार्माकालॉजी जे.एन.एम.सी. सोवनगी. भारतीय संगीत जवळ जवळ ४० वर्षे संगीत सभेत गायन.*

प्रज्ञाचक्षु समन्वय महर्षी श्री संत गुलाबराव महाराजांनी आपल्या ३४ वर्षाच्या कालखंडात भक्तिसाम्राज्य-वर्धिष्णु भूमिकेतून पूर्वसुरी साधुसंतांच्या ग्रंथांचा मागोवा घेत विविध विषयांवर ग्रंथ लेखन केले. त्यात योग, सांख्य, श्रुती, स्मृती, ग्रंथ ह्यावरही अत्यंत मार्मिक मूलग्राही विचार परखडपणे मांडलेले दिसतात. इंग्रजी साम्राज्याच्या मध्यकाळात अवतार घेतलेल्या ह्या आनंद विभूतीने पाश्चात्य साहित्य, पाश्चात्य विज्ञान दर्शनाचाही परामर्ष घेतला. तसेच आर्य धर्मग्रंथच कसे प्रमाणभूत आहेत, हे सिद्ध करण्याचे जणू वाणच घेऊन सनातन धर्माचे महत्त्व पटवून देण्याचा संकल्प सिद्ध केला. स्पेंन्सर, डार्वीन, पदार्थ विज्ञान, मानसशास्त्र ह्यावर त्यांनी लिखाण करून मोक्ष हे शेवटचे लक्ष्य आर्यशास्त्रातूनच कसे प्राप्त होते हे सप्रमाण पटविले.

संगीत हे भक्तिमार्गातील सहाय्यभूत अंग असल्याने त्यावरील आपले सिद्धांत विविध ग्रंथात मांडलेले आहेत. संप्रदाय सुरतरू, अभंग व पदांच्या गाथा आणि श्री गानसोपान ह्यात संगीत विषयक विचार मांडले आहेत. ह्या तीन ग्रंथांचा मागोवा घेत श्री गुलाबराव महाराजांचे संगीतावरील विचार मांडण्याचा प्रस्तुत लेखकाचा हा अल्पसा प्रयत्न आहे.

नवविधा भक्तीत कीर्तन हे महत्त्वाचे अंग आहे. त्यात संगीतकलेचे अनन्य साधारण महत्त्व असल्याने त्यांनी गानसोपान हा स्वतंत्र ग्रंथच लिहिण्यास घेतला. ग्रंथाच्या शीर्षकावरूनच पायरी पायरीने संगीताचा अभ्यास करण्यासाठी गानविद्येच्या विविध अंगांवर लिखाण करण्याची त्यांची मनीषा हे ग्रंथातील मधून मधून झळकणाऱ्या प्रतिज्ञांवरून कळून येईल. दुर्भाग्यवश ह्या ग्रंथाचे दोन विलास पूर्ण करून महाराज आपल्यातून लौकिकार्थाने निघून गेले. प्रस्तुत गानसोपान ग्रंथात संस्कृत कारिका, त्यावर त्यांनीच संस्कृत व मराठीत टीका करून आपली संगीतविषयक मते प्रदर्शित केली. ही मते गायनशास्त्रात मूलभूत सिद्धांतरूपाने आली असून ह्यासाठी त्यांना ज्ञानराज माऊलीचा आदेशसुद्धा झाल्याचे त्यांच्याच श्लोकात दिसते.

***बालानां सुख बोधाय गुरोऽअदिशनादपि ।***
***ज्ञाननाथं गुरुं नत्वा वक्ष्यतेऽत्र यथामति ॥***
***गानसोपान १:३४***

म्हणूनच हा ग्रंथ भक्तिशास्त्रातही महत्त्वाचा आहे ह्या विषयी दुमत होण्याचे कारण असू नये. ह्या ग्रंथात दोन विलास (अध्याय) असून पहिल्या विलासात २३६ ओव्या असून दुसऱ्या विलासात २९७ ओव्या आहेत. पहिल्या विलासाची मांडणी पारंपारिक गुरुस्वरूप मंगलाचरण, विषय निरूपण, फल निरूपण अशीच ठेवलेली दिसते. ह्या विलासाचे शीर्षकच "संगीत रंगोत्सवे गान प्रशंसा" लक्ष्य वेधून घेते. ह्यातील रंगोत्सवे हा जोडशब्द थेट नारदीय कीर्तन परंपरेतील पूर्वरंगाशी संबंध प्रस्थापित करतो. हे त्यांच्या संत परंपरेशी साजेसेच आहे.

## संगीताची व्याख्या

***गीतं वाद्यंच नृत्यंच त्रयं संगीतमेव वा ।***
***मार्गदेशी विभेदेन गीतं द्वेधा व्यवस्थितम् ॥***

गीत, वाद्य आणि नृत्य एकत्वाने संगीत म्हटले जाते. तसेच त्यातील प्रत्येक घटकालाही संगीतच म्हणतात. महाराजांनी ह्या घटकाला 'अवगीत' म्हणता येईल असे सुचविले आहे. संगीताचे मार्गी आणि देशी हे दोन प्रकार असून मार्गी संगीत देवदेवता, यक्ष, किन्नर ह्यात प्रचलित आहे. हा प्रकार अतिनियत व श्रुतिनिष्ठ असल्याकारणाने रंजकतेला गौणत्व देवून अदृष्टजनक (पुण्य प्राप्तिकारक) म्हणूनच पूर्वी गायला जायचा. ब्रह्मा, विष्णु, महेश, नारद, भरतादींनी गाइलेले हेच मार्गीसंगीत. वृंदावनातील महारासक्रीडेतील वेणुवादन मार्गीच होते. इतर वेळेस (गोचारण इत्यादी) भगवान कृष्ण देशी संगीताचा उपयोग करीत. मार्गी संगीतात अदृष्टजनकत्व हेच मुख्य अंग असून रंजकता गौण असते. हे अदृष्ट अपूर्व विधीने प्राप्त होत असल्याने ते अतिनियत चाकोरीबद्ध असावे. 'मंत्रवत् वेदवत् अलौकिक फलप्रदम्' अशी त्याची महती असून त्यामुळे दीप प्रज्वलन, मेघवर्षाव इत्यादी चमत्कार घडविण्याचे सामर्थ्य त्यात असायचे. ह्या उलट संगीताचा दुसरा प्रकार देशी संगीत म्हणून ओळखला जातो. हे केवळ रंजनप्रधान असून अदृष्ट प्राप्तीसाठी निरर्थक मानले आहे.

***अबलाबाल गोपालैः क्षितिपालैः निजेच्छया***
***गीयते याऽनुरागेण स्वदेशे देशीरुच्यते ॥***

अशी मतंग मुनींनी देशीची व्याख्याच केलेली आहे. अधुना देशी संगीतच उपलब्ध असून मार्गीसंगीत लुप्तप्राय झालेले आहे. मार्गी व देशी संगीताची तुलना तक्त्यात अशी करता येईल.

| मार्गी संगीत | देशी संगीत |
|---|---|
| १) देव, गंधर्व, यक्ष, किन्नर ह्या लोकात प्रचलित | १) अबला, बाल गोपाल क्षितीपाल यांनी गाईलेले व इहलोकात प्रचलित |
| २) अदृष्टजनक (पुण्य प्राप्ति) | २) अदृष्ट जनक नाही |
| ३) रंजकता गौण | ३) केवल रंजकता प्रधान |
| ४) श्रुति, स्वर, ग्राम, जाती ह्यांनी अति नियमबद्ध | ४) श्रुति स्वर, ग्राम जाती गायनाची नियमबद्धता नाही किंवा कमी |
| ५) अलौकिक परिणाम | ५) मानसैकाग्रयाने परिणाम पण अलौकिकत्व नाही. |
| ६) अतिनियत असल्याने प्रकार वैविध्य नाही | ६) देशकालपरत्वे स्वरूप परिवर्तन |

देशी रागगायन देशकालपरत्वे विविध स्वरूपाचे असते. केवळ रंजकप्रधान असल्याने हा बदल अपेक्षितच आहे. एकच राग निरनिराळ्या प्रदेशात वेगळ्या रीतीने गाइला वा वाजविला जातो. उदाहरणच द्यावयाचे झाल्यास

बंगाल राग पंचम वादी करून वाजविला जातो. ग्रंथात मात्र बंगाल रागाचा वादी स्वर मध्यम समजला जातो. वादी भेदे रागभेदः ह्या नियमानुसार अर्थात ह्या दोन्ही प्रकाराचे स्वरूप वेगळे वाटेल. अशा प्रकारे प्रत्यक्ष राग गायनात शास्त्र आणि रुढी ह्यात फरक पडून राग स्वरूप वेगळेच रूप धारण करते. अशा वेळी रागाचे शुद्ध स्वरूप लक्षण कसे करावे ह्याचा विचार महाराजांनी चर्चिला आहे. त्यांच्या मते शास्त्र (लक्षण) आणि रूढी (लक्ष्य) ह्यात तीव्र मतभेद असल्यास रुढीप्रमाणे राग नियम करावेत हा निर्णय पूर्वसुरी रत्नाकर, पुंडरीक, विठ्ठल, नि शंकदेव ह्यांनी दिल्याचा दाखला देवून महाराजही ह्यास सम्मती देतात. लक्ष्यसंगीत रंजकप्रधान असल्याने असे करणे यथार्थच ठरते. ह्या उलट एकच राग देशकालपरत्वे विविध स्वरूपात गाइला जातो. तेव्हा मात्र शास्त्र लक्षणाप्रमाणेच राग नियमावा असा निर्णय महाराज देतात. तात्पर्याने पहिल्या प्रकारात रूढीनुसार शास्त्र वाकवावे व दुसऱ्या प्रकारात शास्त्राप्रमाणे रुढी बदलावी असे लवचिक धोरण स्वीकारले आहे. ह्या नियमबद्धतेने अर्थातच अदृष्ट जनकत्व प्राप्त होत नाही. पुण्यप्राप्तीकरिता थोडीतरी अपूर्व विधीची जोड हवी.

मार्गी व देशी संगीताची अशा रीतीने प्राथमिक फोड करून महाराज आधुनिक देशी संगीताच्या स्वरूपाकडे वळतात. सध्या प्रचारात असलेल्या संगीत प्रकाराचे महाराजांनी तीन विभाग केले आहेत.

अ) ग्रंथगत : ग्रंथातील नियमानुसार गाइल्या जाणारे गीतप्रकार आरोह, अवरोह, वादी, संवादी स्वर, चलन थाट विचारात घेऊन गाइलेले शुद्ध राग स्वरूप त्यांना यात अभिप्रेत आहेत. अशा रागांना मूळपीठ ही संज्ञा देवून स्वनिर्मित अभंग व पदांच्या गाथेत शेकडो रचना केलेल्या आहेत.

ब) लक्ष्यग : वर्तमान काळात स्वतःच्या इच्छेने व आवडीनुसार गाइले जाणारे गायन प्रकार ह्यात अंतर्भूत आहेत. ह्या प्रकारांना ग्रंथगत रागांचे सर्व नियम लावणे अशक्य असते. लोकगीते, धून, स्त्रीगीते, जात्यावरील गाणे ह्या प्रकारात मोडतात. ह्या गीत प्रकारात पुष्कळशा चाली पारंपारिक असतात. ह्या प्रकारातही महाराजांनी पदरचना केलेल्या आहेत. ह्या पारंपारीक चालींना महाराज गौणपीठ ही संज्ञा देतात. एकच अभंग / पद मूळपीठ (शुद्ध राग) किंवा गौणपीठांतर्गत चालीनी गाण्यास महाराजांची सम्मती दिसते. ह्यामुळे संगीतातील पारंगत गायक आणि ज्याला संगीतशास्त्र नियमांची जाणही नाही अशा दोन्ही प्रकारच्या भाविकांची सोय केलेली आहे. उदा. : पदांची गाथा - पान ५, पद १६/२०.

पद : प्रभु नाम मधुर मज वाटे हो
मूळ पीठ - जोगी (या) ताल त्रिताल
गौणपीठ - घुंगरू बांधकर नाचुंगी

क) भावी संगीत : पुढील पिढीने प्रचारात आणावे व नवीन रागनिर्मिती करावी ह्या उद्देशाने श्रेष्ठ गायक स्वतःच्या कल्पनेने व काहीसे लोकरूढीनुसार लोकगीत प्रकार त्यातील स्वरचलन नियमबद्ध करून नवराग निर्मिती करू शकतात. पंडित कुमार गंधर्वांनी मेवाड राजस्थानातील लोकप्रसिद्ध रंजक गीत प्रकारांना शास्त्रीय नियमाची जोड देवून लगनगंधार, मालवती इत्यादी राग निर्मिती केल्या आणि त्या जनमान्यही झाल्या आहेत. हे रागप्रकार भावी संगीतात मोडले जातील. यमनकल्याण रागातील शुद्ध मध्यमाचा गंधार संपुटीत प्रयोगासारखा (गमग) कोमल निषाध शुद्ध दैवत संपुटीत करून (धनिध) नवीन राग निर्मिती करणे शक्य आहे, असेही महाराज सुचवितात. (प्रस्तुत लेखकाने ह्या सूचनेनुसार गुरु कल्याण ह्या नवीन रागाची रचनाही केलेली आहे).

## श्री गुलाबराव महाराजांची "कली मार्गी संगीताची संकल्पना"

मार्गी संगीत श्रुति ग्राम मूर्च्छना ह्याच्या प्रयोगाने अतिनियत असल्याने भरतादि मुनींच्या काळापर्यंतच प्रचारात होते व त्याचा गायकवर्ग सुद्धा देवगंधर्वापर्यंतच मर्यादित होता. मार्गी संगीताचे प्रयोजन अदृष्ट निर्मिती (पुण्यप्राप्ति) व त्या योगे इहलोक व परलोकात सद्‌गति प्राप्त करणे किंवा निष्काम भक्ति-कीर्तनाने मोक्ष साधणे असे द्विविध होय. या उलट देशीगायन केवळ रंजनात्मक असल्याने त्याचा संबंध केवळ ऐहिक जीवनाशी निगडीत असल्याने ते कमी प्रतीचे समजले जाते. सध्या केवळ देशी संगीतच उपलब्ध असल्याने त्यामार्गे पारलौकिक जीवनात व परमार्थात उत्कर्ष साधण्याच्या दृष्टीने काही उपाय आहे काय ह्या प्रश्नाकडे महाराज वळतात. देशी संगीत अतिनियत केल्याने अदृष्ट जनक मार्गीसंगीत होईल काय अशी उत्थाप्य शंका काढून त्यावर त्यांनी 'नाही.' असे उत्तर दिले आहे.

*न तथापि स्वरूपेण देशी मार्गीत्वमेति हि ।*
*न लावणी महाराष्ट्री क्वापि नारदगीर्भवेत् ॥ १:२० गान सोपान*

देशी संगीताला मार्गीवत् करण्याचा एकच उपाय ते सुचवितात.

*मार्गसंगीत अपूर्व विधिने । अदृष्ट प्रद होय वेदवचने ।*
*देशी संगीत नियम विधिने । साधुवचने पुण्यप्रद होय ॥*
*१:१०१ गान सोपान*

देशीसंगीत केवळ लोकरंजनासाठी असल्यामुळे केवळ स्वस्वरूपाने मार्गी होऊ शकत नाही. अदृष्ट जनक नियमांची बांधणी करण्यास आध्यात्मिक अधिकारच हवा. कोणताही मानवनिर्मित नियम स्वसामर्थ्याने अदृष्ट जनक होत नसतो. परंतु ह्याच देशी संगीतास संत महात्म्यांचा व भगवद् भक्तीचा स्पर्श असेल तर ते मार्गीसम होण्यास पात्र होईल. ह्याच संदर्भात त्यांनी मीरामल्हार, सूरमल्हार, रामदासी मल्हार ह्या रागांचे उदाहरण घेवून हे मिश्रदेशी राग असूनही –

*परी महापुरुषी गाईला म्हणोन ।*
*मार्गसम, भगवान तेणे तोषे ॥ गान सोपान १:११६*

असे मत प्रतिपादिले आहे. देशीसंगीतही संतमहात्म्यांच्या संस्काराने व भगवद् भक्तिसाठी योजिले असता मार्गीवत्/सामवत् होते हा अत्यंत महत्त्वाचा सिद्धांत महाराजांनी उद्‌धृत केला आहे. हीच त्यांची कली मार्ग संगीताची संकल्पना होय. ह्यातूनच देशी, उपशास्त्रीय (छायालग) गायनाला भक्तिसाम्राज्यात प्रतिष्ठा स्थापन केली आणि भक्तिप्रद अभंग, पदे, लोकगीते ह्यांचे महत्त्व सिद्ध केले. महाराजांनी रचलेले अभंग, पदे, लावण्या, स्त्रीगीते ह्यांच्या रचना त्या दृष्टीने योग्यच म्हणता येतील. एरव्ही भक्तिविरहित गायनाची ज्या तुकोबारायांनी निंदा केलेली आहे त्यांनीच टाळ, वीणा, मृदंगावर अभंग वाणीने विठ्ठलाची आळवणी केली. त्यातही हाच सिद्धांत अनुस्यूत दिसतो.

## श्रुति स्वर विवेचन

भारतीय संगीत शास्त्रात श्रुति, त्याच्या संख्या, स्वर ग्राम मूर्च्छना ह्या बद्दल निरनिराळी मते आहेत. त्यात एकश्रुतीवादापासून तो अनन्ताः वैश्रुतयः अशी लक्षणे सापडतात. त्याचप्रमाणे नाद, शब्द, वर्ण ह्यातही मतमतांतरे शास्त्रात आढळतात. ह्या सर्व मतांचा प्राचीन संगीत शास्त्र ग्रंथाचा मागोवा घेऊन त्यांनी आपली मते स्पष्ट केलेली आहेत. हा सर्वच भाग शास्त्रीय दृष्ट्या महत्त्वाचा असला तरी ह्या लेखात त्याचा उहापोह करणे विस्तार भयास्तव शक्य नाही. तरीही महाराजांनी जी मते ग्राह्य

ठरविलेली आहेत त्याचा थोडक्यात सारांश असा :

१) वर्णाः एव शब्दाः इति भगवान् उपवर्षाचा सिद्धांत ग्राह्य मानून महाराज वर्ण यावन्माया स्थायी मानतात.

२) सांख्य शास्त्रात शब्द हा जरी आकाशाचा गुण मानला गेला असला तरी तो सूक्ष्म तन्मात्रारूप असल्याने व्यक्त नसतो. तो अनाहतनाद स्वरूपात असतो.

३) नाद किंवा ध्वनी व्यक्त होताना त्याला वायु व अग्नि ह्या आणखी दोन महाभूतांची गरज असते. हाच आहत नाद होय.

४) दशअनाहत नाद यौगिक प्रक्रियेने ऐकू येतात. त्यातील सप्तमनाद (वेणुनाद) सोडून इतर नाद रंजक नाहीत. दहावा मेघनाद हा आत्मदर्शनकारण आहे.

५) श्रुति, स्वर हे आहत नादाचेच प्रकार आहेत.

६) श्रूयते इति श्रुतिः ही श्रुतीची निरुक्त व्याख्या असली तरी सर्वच नाद रंजक नसतात. म्हणूनच गीतस्वर स्वरूप योग्यतावच्छिन्न हे श्रुतिलक्षण त्यांनी सुचविले आहे. एका सप्तकात अशा बावीस श्रुति आहेत. काहींनी श्रुति सहासष्ट मानल्या आहेत. त्यांची व्यवस्था मंद्र, मध्य व तार सप्तकाच्या दृष्टीने होऊ शकते.

७) एका श्रुतीपासून एक स्वर असा एक श्रुतिवाद महाराजांना मान्य आहे. सध्या प्रचलित संगीतात तीव्र कोमल स्वर मिळून एका सप्तकात बारा स्वरांचा वापर होतो. त्यामुळे हिंदुस्थानातील संगीत पद्धतीत बारा श्रुतींचा वापर होतो. दाक्षिणात्य पद्धतीत कोमल, अति कोमल इत्यादीमुळे स्वर संख्या जास्त असते. त्यात इतर श्रुतींचा वापर होतो.

८) प्राचीन ग्रंथातून एक श्रुतिवाद, दोन श्रुती, तीन श्रुती, चतुःश्रुती यांचा उल्लेख आढळतो. त्यांची व्यवस्था शुद्ध श्रुती, आंतर श्रुती, तीन श्रुतिवाद सत्व, रज, तम गुणाच्या उपाधीने आणि चतुःश्रुतिवाद धातु दोषामुळे कफज, वातज, पित्तज आणि सन्निपातीक ह्याच्या उपाधीने होतात. अशी समनवयात्मक भूमिका त्यात घेतली आहे.

९) मंद्र, मध्य आणि तार सप्तक गाण्यासाठी क्रमशः दुप्पट व चौपट प्रयत्न लागतो.

## गायकासाठी काही उपयुक्त सूचना

वाद्यात आणि रुद्र वीणेवर अणुमंद्र आणि अति तार सप्तक मिळून ५ सप्तकात वादन शक्य असते. परंतु मानवी कंठातून मंद्र, मध्य आणि तार ध्वनीच निघू शकतात. त्यातही बहुतांश गायकांची मजल मंद्र पंचमापासून तार पंचमापर्यंतच असते. त्यातही मध्य सप्तकातच त्याची तयारी असते. तेव्हा मध्य सप्तक तरी सुरीला असावा. अतिमंद्र किंवा अती तार सप्तकातील गायकाची तयारी रियाज दाखवित असली तरी असले गायन रंजक न वाटता कर्कश वाटते.

गायकाची चित्तवृत्ती गायन प्रसंगी शांत, सत्वगुणी असावी. रजतमोगुणी वृत्ती असल्यास स्वरावर मन एकाग्र होत नाही. त्यामुळे गायन बेसूर होण्याचा संभव असतो. त्याचप्रमाणे अंतरा गाताना स्थायीचे स्वरूप दाखविण्यात अधिक शक्ती लागते. मांड खमाज इत्यादी क्षुद्र रागात विलंबित गायन कंटाळवाणे वाटते व त्यामुळे तमोगुण वाढतो. पुरुषांचे मंद्र आणि मध्य सप्तकातील गायन आणि स्त्रियांचे मध्य व तार सप्तकातील गायन नैसर्गिक कर्णमधुर वाटते. त्यामुळे पुरुषांनी तारसप्तकातील गायन आणि स्त्रियांनी मंद्र सप्तकातील शक्यतो कमी ठेवावे. अशा कितीतरी व्यावहारिक सूचना महाराजांनी केलेल्या आहेत.

## संगीत अनुबंध चतुष्ट्य

ध्वनिरूप नाद आणि वर्णांचा तसा संगीतात प्रत्यक्ष संबंध नाही. तसे जर नसते तर वाद्य संगीत श्रोत्यांना रंजक वाटलेच नसते. कारण वाद्य संगीतात (तसेच गेयरूप नोम् तोम्, तराणा) शब्दांचा प्रत्यक्ष संबंध येत नाही. परंतु गेय संगीतात वर्ण आणि स्वराचा प्रत्यक्ष संबंध येत असतो. गायनात काव्य, अर्थ, छंद, ताल आणि स्वर ह्यांचा प्रत्यक्ष संबंध येत असल्याने श्री गुलाबराव महाराजांनी संगीत अनुबंध चतुष्ट्याची संकल्पना मांडली आहे.

*वेदान्तोऽर्थः सर्वेषाम् काव्याद् रसभावना ।*
*छंदात्तु ताललालित्यं स्वराद् हृदय रंजनम् ॥*
*एतत् सर्व हि संगीते भक्ति सौख्य प्रदं भवेत् ।*
*राग ताल रसो मोक्ष इति तेषां प्रयोजनम् ॥*

जगातील सर्वच पदार्थ ब्रह्मरूपच आहेत. सर्वं खलु इदं ब्रह्म हाच वेदान्ताने अर्थ काढलेला निष्कर्ष असून काव्यामुळे रसनिर्मिती, स्वरामुळे हृदयरंजन आणि छंद शास्त्राप्रमाणे काललालित्य व त्यामुळे धारणारूप एकाग्रता ह्या सर्व गोष्टी संगीतात भक्तिसौख्य प्राप्त करून देतात. संगीतात ह्या सर्वांची एक तंत्री असल्याने भक्तिमार्गात संगीताचे अनन्य साधारण महत्त्व आहे. महाराजांनी आपल्या विविध ग्रंथात ह्या गोष्टींचा विस्तृत उहापोह केलेला आहे. गानसोपानात संगीत अनुबंध चतुष्ट्याचा मुद्दाम उल्लेख केलेला असून गायकाला ह्या चारही शास्त्रात गती असावी अशी गर्भित सूचनाही केलेली दिसते.

तसे पाहिल्यास नादोपासना निर्गुण व सगुण अशी द्विविध असून निर्गुण ब्रह्माची उपासना अनाहत नाद रूपाने किंवा निर्गुण तंत्री प्रणवोपासनेने शक्य आहे. तसेच सगुण ब्रह्मोपासना आपल्या आवडत्या भगवन्मूर्तीची उपासना ही आहत नादरूपाने कीर्तनातून, भजनातून होत असते. त्यासाठीच संगीतशास्त्राचा उपयोग केल्यास देशी संगीतातूनही समाधी अवस्था व भगवत्प्राप्ती शक्य आहे. महाराजांनी भगवद् संकीर्तनासाठी संगीतातील विविध प्रकार वापरलेले दिसून येतात. त्यांनी स्त्रीगीते, साकी, दिंडी, लावणी हे गीत प्रकार तर वापरलेच तसेच ठुमरी, बारामासी, होरी, चतरंगसारखे खास गायकी प्रकारसुद्धा भक्तिसंकीर्तनासाठी जागोजागी वापरलेले आहेत. त्यातील एक ठुमरी आणि एक चतरंग प्रस्तुत करून हा लेख प्रपंच सद्गुरु चरणी समर्पण करतो.

## ठुमरी नुमा रचना

*कदर हरि मोरी अंगि या घू लगी । नाहक लाज गयी ॥धृ.॥*
*मै तो सावले सोवली बमनी । न्हाने मगन भई ।१।*
*गाम होवेंगा शाम बंडोरा । जाती बहर भई ।२।*
*ज्ञानेश्वर प्रभू करुणाते भव । तोरके निकरि सही ।३।*
*(पदांची गाथा, नवम षष्टी पान ३५ पद क्रमांक १६१/७५८)*

## चतरंग धरतीची रचना

*नाधिन्नात्रक धिं धिं नाना । ऐकुनी नाचे मन्मथ नाना । धृ.।*
*सारेगमपधनी सप्त स्वरांचा । गाई आलाप वर वीरांचा ।१।*
*राग विवेके ताल ग्राम अति । गाता गोपी सर्व कामवती ।२।*
*ज्ञानेश्वर प्रभू करुणा बळते । पर्णुनी न्याया हरि प्रति बळते ।३।*

**डॉ. माधव द. खापरे**
श्रीनिवास कॉलनी, रामनगर, वर्धा.

# श्री गुलाबराव महाराजांचे आयुर्वेद विषयक विचार

*'आयुर्वेदाचार्य' अहमदनगर महाविद्यालय. पुण्यात आयुर्वेदाश्रम फार्मसी या स्वतःच्या संस्थेमध्ये आजन्म सेवा. नित्य ज्ञानेश्वरी व एकनाथी भागवत या ग्रंथांचे वाचन. आयुर्वेद सेवा करण्यात जीवन व्यतीत. श्रीगुलाबराव महाराजांचे प्रेमामुळे प्रस्तुत लेख १९८१ मध्ये लिहिला.*

परमपूज्य भगवान श्रीसंत ज्ञानेश्वर महाराज यांच्या श्रेष्ठ परंपरेतील प.पू.संतश्रेष्ठ गुलाबराव महाराज यांच्या प्राचीन शास्त्रीय वाङ्मयाचे अवलोकन केल्यास त्यांची अलौकिक बुद्धिमत्ता दिसून येते. ते अलिकडील ऋषिमुनीच आहेत असे त्यांच्या लिखाणावरून दिसून येते. त्यांचे सर्व वाङ्मय अध्यात्मपर अद्वैत वेदान्ताचे आहे. त्याचप्रमाणे इतर शास्त्रांचे ज्ञानही फार श्रेष्ठ दर्जाचे आहे. आयुर्वेदातील अनेक विषयावरील विस्तारपूर्वक विवरण फार सुबोध व सुंदर रीतीने केले आहे. त्यांनी लिहिलेल्या मानसायुर्वेद, वैद्यनंदिनी, वैद्य वृंदावन या ग्रंथातील आयुर्वेदातील काही सिद्धान्ताबद्दल त्यांचे मूळ लेखातील विचार खाली उद्धृत केले आहेत. ते सर्वांना मननीय ठरतील.

(१) आयुर्वेदाची उत्पत्ती
(२) आयुर्वेदीय औषधी चिकित्सा - परंपरा
(३) आप्तवाक्य प्रमाण
(४) व्याधींची मुख्य कारणे व प्रकार
(५) द्रव्यगुण सिद्धान्त
(६) चिकित्सेची ८ अंगे व त्यातील रसायन चिकित्सेचे महत्त्व (चिकित्सेचे वैशिष्ट्य)
(७) उपसंहार

## (१) आयुर्वेदाची उत्पत्ति व परंपरा

भगवंताने मरीच्यादि ऋषींना उत्पन्न करून कर्मकांडाचा बोध केला आणि सनत्कुमारादिकांना उत्पन्न करून ज्ञानकांडाचा बोध केला, असे श्री शंकराचार्यांनी गीताभाष्यात म्हटले आहे. मरीच्यादि ऋषींनी प्रवृत्ति लक्षण धर्माचा प्रसार केला व सनत्कुमारादिकांनी निवृत्ति धर्माचा प्रसार केला. तसाच एकच आयुर्वेद ब्रह्मदेवाने व श्री शंकराने निर्माण केला. पहिल्या भागात काष्ठौषधी विशेषज्ञान असून दुसऱ्या भागात पारा, गंधक, धातु इ. रसौषधी विशेषज्ञान आहे. याप्रमाणे दोन्ही कांडाच्या औषधींमध्ये भेद असला तरी सूत्र, शरीर व निदानासंबंधी त्यांचे मतैक्य आहे. सर्व लोक व्याधीपिडीत झाल्यामुळे भगवान श्री पितामह ब्रह्मदेव, त्यांची पीडा दूर करण्याकरता करुणार्द्र मनाने निदान, लक्षणे व चिकित्सा ज्यात आहे अशा त्रिकांड आयुर्वेदाला अथर्ववेदापासून निर्माण करते झाले. आयुर्वेद हे परोपकाराचे शास्त्र आहे.

रोगाच्या योगाने सर्व जीव पिडीत होतात व मोक्ष साधनाकडे लक्ष लागत नाही म्हणून आरोग्य पाहिजे. साधकाला औषधी घेऊन शरीर चांगले ठेवलेच पाहिजे. हे शरीर निरोगी ठेवून ब्रह्मज्ञान करून घ्यावे म्हणून चार वेदांप्रमाणे आयुर्वेदाची उत्पत्ति झाली. हा अथर्व वेदाचा उपवेद आहे.

## (२) आयुर्वेदाच्या दोन औषधी परंपरा

१) ब्रह्मदेवांनी - काष्ठौषधी विशेष - आयुर्वेद सांगितला.

२) श्री शंकरांनी - पारा, गंधक, धातु इ. रसौषधी विशेष आयुर्वेद सांगितला.

औषधाने जरी दोन विभाग असले तरी, सूत्र शरीर व निदानासंबंधी मतैक्य आहे. म्हणून त्यांचा समन्वय करून सर्व लोक पीडित झाल्यामुळे करुणार्द्र मनाने ब्रह्मदेवांनी ज्यांत हेतू, लक्षणे व औषधी ज्ञान आहे असा आयुर्वेद अथर्व वेदापासून निर्माण केला.

## ३) आप्त वचन प्रमाण

''आप्तस्तु यथार्थवक्ता'' असे शास्त्रवचन आहे. महाराजांचे आप्ताचे विवेचन खाली दिले आहे.

देहाहून पृथक् आत्मा ज्याने जाणला आहे त्याला दुसऱ्याने दिलेले सुख-दुःख परतून आपल्याला केव्हातरी त्याच्यापासून घ्यावे लागेल म्हणून 'इतःपर कोणास दुःख होणार नाही, असे आचरण करणे' या धर्मबुद्धीचा आश्रय अंतर्बाह्य सदाचरणमय होत्साता, परद्याप्रेरित, दिव्यदृष्टी असणारा, मग जगकल्याणमार्गानुसारी आप्त होतो. तो मग ऋषि असो, आर्य असो किंवा म्लेंच्छ असो. त्याचे वचन प्रमाण मानले आहे असे न्यायभाष्यकार म्हणतात.

या आप्तवचनापासून आगमाची उत्पत्ति आहे. आगमावाचून आपल्याला द्रव्यादिविज्ञान होत नाही. यद्यपि पाश्चात्य शास्त्राप्रमाणे प्रत्यक्ष प्रयोग करून आणि बहुरोगी निवृत्यनुभवाने अनुमानावरून औषधी विज्ञान होतसे वाटते, तथापि त्रैकालिक निर्धारित ज्ञान या दोहोंनाही होत नाही.

तात्पर्य : आप्तांना औषधींतील ''सत्व ऋतुंभरा प्रज्ञा'' दृष्ट असल्यामुळे त्यांनी प्रणिलेल्या आगमसाह्यानेच औषधींचे संयोग हितकारी होतात. असेच सुश्रुताचार्यांनी सांगितले आहे.

## आयुर्वेदातील आप्ताची व्याख्या

*१) ॥ रजस्तमोभ्यांनिर्मुक्ताः तपोज्ञानबलेन ये ॥ येषां त्रैकालममलं ज्ञानमव्याहतं सदा ॥*

*२) ॥ आप्ता शिष्टा विबुद्धास्ते तेषां वाक्यं असंशयम् ॥*

भगवान पतंजलींनी सांगितल्याप्रमाणे महात्म्यांच्या स्मरणाने, त्यांच्या चित्ताचे ठिकाणी आपल्या चित्ताचे आविष्करण होऊन, संयम बले करून, आपले चित्त तदाकार झाल्यावर, आपल्याला रसायन रुपता प्राप्त होईल. मग त्या महात्म्यांच्या स्मरण, करुणा बलाने आपल्या दर्शनाने औषधींचा प्रभाव प्रकट होईल. कारण प्रभावशील औषधींचे ज्ञान आगमांवाचून घडत

नाही म्हणूनच 'संज्ञा कर्तव्यसिद्धि शिष्टांना लिंग ।।' (वै.द. आन्हिक २-मू-१८) असे कणादाचार्यांनी म्हटले आहे. आईबापांनी दिल्यावाचून जसे मुलामुलींना नाव येत नाही त्याप्रमाणे कोणी केल्यावाचून 'संज्ञा' किंवा कर्म प्रवृत्त होत नाहीत. ज्या संज्ञाकर्मांचे कर्ते प्रत्यक्ष दिसतात त्याविषयी वाद नसतो. परंतु ज्या संज्ञा कर्मांचे कर्ते प्रत्यक्ष दिसत नाहीत त्यांच्या विषयी अनुमान करावे लागते. अनुमानाचा अर्थ सामान्य ज्ञान करून देण्याचे असल्यामुळे विशेष ज्ञान आगमांवाचून संभवत नाही.

आगम प्रामाण्य, प्रवर्तकांना आप्तत्वावर अवलंबून असून आप्तत्व सदाचरणावर व सदाचरण धर्मबुद्धिवर अवलंबून असून धर्मबुद्धी देहात्मभिन्न ज्ञानावर अवलंबून आहे.

### ४) व्याधींचे प्रकार व कारणे

शारीरिक, मानसिक, स्वाभाविक व आगंतुक या चार प्रकाराच्या व्याधींच्या योगाने आयुष्य क्षीण होत असते आणि या व्याधींची निवृत्ति केली असता आयुष्यवृद्धि होते. वातादि दोषापासून उत्पन्न होणाऱ्या व्याधींना 'शारीरिक' म्हणतात. रज व तम हे मनाचे दोष वाग्भटात सांगितले आहेत. त्यापासून उत्पन्न होणाऱ्या व्याधींना 'मानस' म्हणतात. क्षुधा, तृषा, निद्रादिकरून प्रतिदिनी होणाऱ्या व्याधींना 'स्वाभाविक' म्हणतात व अभिघातादिकांनी प्रथम रोग उत्पन्न होऊन ज्यात दोष मागाहून होतात ते 'आगंतुक' व्याधी होत. याप्रमाणे सुश्रुताचार्यांनी चार भेद केले आहेत खरे तथापि क्षुधा, तृषा, निद्रा यांना वात, पित्त, कफ कारण असल्यामुळे या स्वाभाविक व्याधींचा शारीरिक व्याधींतच समावेश होतो. परंतु प्राकृतिक दोषांतही हे स्वाभाविक व्याधी होत असल्यामुळे त्यांना दोषजत्व सुश्रुताचार्यांनी दिली नाही, तरी प्रकृतिदशेत 'मनो देहसमसात्म्य' राहत असल्यामुळे आणि चरकाचार्यांनी सांगितल्याप्रमाणे आत्मा निर्विकार असूनही बुद्धी उपहीत होत्साता, मनः सहाय्याने देहावर अभिमान स्थापन करून, तो भोक्ता होत असल्यामुळे शरीर, मानस, स्वाभाविक व्याधींना निज म्हणजे आपल्या हातानेच अंगावर ओढून घेतलेले म्हणणे बरे आणि आगंतुक असे यद्यपि निजांतच जातात. तथापि बालबोधार्थ पृथक् भेद केला असता निज व आगंतुक असे दोनच प्रकारचे व्याधी राहतात. निजामध्ये आध्यात्मिक व आगंतुकात आधिभौतिक दुःखाचा समावेश केला तरी एक प्रकारचा व्याधी शिल्लक राहतो तो आधिदैविक होय.

निजामध्ये प्रथम दोषांचा प्रादुर्भाव होऊन नंतर रोग होतात व आगंतुकामध्ये प्रथम रोगांचा प्रादुर्भाव होऊन नंतर दोष होतात.

तसे आधिदैविक नाहीत. तेव्हा त्याचे परिणाम निजासारखे व केव्हा त्याचे परिणाम आगंतुकासारखे आहेत.

आधिदैविक व्याधीही दैवकृत आणि भूतकृत असे दोन प्रकारचे आहेत. ह्या दोहोंमधील भेद असा आहे की जेव्हा रोगी स्ववश होऊन दैविक दुःख भोगतो तेव्हा ते पहिल्या प्रकारचे व जेव्हा तो परवश होऊन दुःख भोगतो तेव्हा दुसऱ्या प्रकारचे समजावे. भूताभिषंगाने तिन्ही दोषांचा कोप होतो असे माधव म्हणतात. तशी स्थिती दैवकृतीची नाही. म्हणजे हे व्याधी बहुतेक सान्निपातिकच असतात.

तथापि हे व्याधी दुष्कर्मावर अवलंबून असून ते दुष्कर्म घडण्याला पूर्वीचा प्रज्ञापराध कारण आहे. मनुष्य प्रथम आपल्या हाताने आपला नाश करून घेतो व नंतर देवादिक त्याचा नाश करतात असे वाग्भटाने म्हटले आहे. यद्यपि देव मनुष्यांवर क्षोभले असता दंडुका घेऊन मारीत नाहीत तर त्यांची बुद्धीच हरण करतात, असे महाभारतात विदुराचे वचन आहे.

कर्तृकालीन प्रज्ञापराध स्वतःचा असून भोगकाली दुःखात दुसरे न सुचणे हे कर्मानुसार देवाचे कारण समजावे. म्हणून सर्व व्याधी निजांतच येतात.

आणि निजव्याधी तर आत्म्याच्या विस्मृतीवर अवलंबून आहेत. एवढ्याकरिता आत्मविवेकानेच सर्व व्याधींची निवृत्ति होणे शक्य आहे. तथापि अग्नि जसा काष्टांच्या विरोधी असून काष्ठकार्य भस्म त्याच्या विरोधी नाही. तद्वत आत्मविवेकही अविद्येच्या विरोधी असून तत्कार्य जे निज व आगंतुक व्याधी त्याच्या विरोधी नाही. यद्यपि कारणनाशानंतर काही कालाने कार्य अवश्य नाश पावते तथापि पावत्काल ब्रह्माकार वृद्धि करणेकरिता दुःखाभिनव करणाऱ्या औषधी व कार्यरूप व्याधी विरोधी आहेत. त्या सर्व आरोग्य उपाय असल्यामुळे त्यांचे निरूपण ज्यात केले आहे त्यांना आयुर्वेद म्हणतात.

चरकात सांगितल्याप्रमाणे सर्व रोग अधर्मापासून होतात व प्रारब्ध भोगल्यावाचून क्षय पावत नाही असा श्रुतीचा सिद्धांत आहे. प्रारब्धयुक्त पुरुषावर आयुर्वेद उपकारक आहेच, तथापि साधक, जीवनमुक्त व सिद्ध यांनीही सुखाकरिता याला अनुसरावे.

मुख्य दोन प्रकारचे रोग आहेत – १) मूलभूत २) शाखादिभूत. त्यापैकी रागादि मानस रोग मूलभूत असून शारीरिक वातादि रोग शाखादिभूत आहेत. पहिल्याकरिता योग, वेदांत हे उपचार असून दुसऱ्याकरिता पूर्वी वर्णन केलेला दोन्ही प्रकारचा आयुर्वेद हा उपचार आहे. यद्यपि मुळचा क्षय असता शाखादिक शुष्क होतात. परंतु शाखादिकांच्या छेदाने मात्र मूळ शुष्क होत नाही. म्हणून आयुर्वेदियांनाच वेदांताची आवश्यकता असून वेदांतियांना आयुर्वेदाची आवश्यकता सिद्ध होत नाही. तथापि शारीरिक रोगाभाभिव होऊन साक्षात्कार वृत्तिसीलभ्याकरिता वेदांतियांनाही आयुर्वेदाची अपेक्षा आहे.

औषधींच्या विवेचनामध्ये त्याचे रस, गुण, वीर्य यांचे विवेचन विस्तृत केले आहे. परंतु आपल्याला या ठिकाणी विस्तारभयास्तव जास्त वर्णन करणे शक्य नाही.

*'पुष्णामि च औषधिः सर्वाः सोमोभूत्वा रसात्मकः'*

*(भ. गीता. अध्याय १३ श्लोक १५)*

या गीतावचनावरून चंद्रापासून औषधींना पोषक भाग मिळालेला आहे असे सिद्ध होते.

*।। पृथिव्या औषधयः औषधिभ्योऽन्नम् अन्नातत् पुरुषः पुरुषोऽन्नरसमयः ।। (तैत्तरीयोपनिषद)*

या तैत्तरीय उपनिषद वचनावरून पृथ्वीपासूनही औषधींचे पोषण होते, असे दृष्टोत्पत्तीस येते. अशा औषधींपासून अन्न, अन्नापासून पुरुष उत्पन्न होत असल्यामुळे हा पुरुष अन्नरसमय आहे. वरील वर्णनावरून कार्यापेक्षा कारणात अधिकतर गुण असतात या न्यायाने औषधीच अधिक सत्वसंपन्न सिद्ध होतात. म्हणूनच चिकित्सेमध्ये वनौषधींचा वापर जास्त प्रमाणात केलेला आहे.

अशा तऱ्हेने प.पू. महाराजांनी प्राचीन चरकादि संहितांपासून अलिकडील शार्ङधर, भावप्रकाश इ. ग्रंथांचे अवलोकन करून औषधींचे सविस्तर

वर्णन केले आहे. त्यापैकी काही थोडासा भाग खाली देत आहे. 'आवरणशयनयात्मक माया जरी द्रव्य नसली तरी अंतःकरणरूप विक्षेपलयात्मक माया बाह्यद्रव्यरूप होते' असे महाराजांनी म्हटले आहे. योगरूपी प्रयत्नानेही करता येणे शक्य आहे म्हणूनच समाधी व औषधे या दोहोनेही सिद्धी मिळतात असे योगसूत्रात, त्रिपुरारहस्य व श्रीमत भागवत इ. ग्रंथात सांगितले आहे.

जे द्रव्य सर्वात स्थूल ते पार्थिव व सूक्ष्म ते आकाशीय. मधले तीन प्रकारचे तेजस, आप्य व वायवीय समजावे. त्यापैकी आकाशीय सर्वात सूक्ष्म असून वायवीय हे त्याच्यापेक्षा थोडे घन, त्यापेक्षा तेजस घन, त्याच्यापेक्षा आप्य घन व सर्वात जास्त घन ते पार्थिव द्रव्य होय. असे एकमेकांपेक्षा घन आहेत. प्रथम 'विक्षेपाव्यतनावरणाच्छिन्न' चैतन्यच आकाश असून चेतन स्वातंत्र्यास्तव विक्षेप प्रवृत्ति, अहंता प्राधान्यवच्छिन्न अंतःकरणरूप होऊन 'इदंता प्राधान्यवच्छिन्न' वायुगतिरूप झाली व त्या वतीच्या परस्परांमध्ये जो कल्लोळ उत्पन्न झाला त्यापासून उष्णता निर्माण झाली त्याला 'तत्प्राधान्यावाच्छिन्न' चैतन्य प्रकाश म्हटले जाते. पुढे ती उष्णताच घन झाल्यावर 'परमाणु दृढ' होऊन द्रवरूप झाली. त्यापेक्षा घन झाल्यावर पृथ्वीरूप झाली. याप्रमाणे हा पंचमहाभूतांचा उत्पत्तिक्रम "तैत्तरीय उपनिषदांत" स्पष्ट सांगितला आहे. हे द्रव्याचे वर्णन महाराजांनी प्राचीन शास्त्रांनुसार केले आहे. आयुर्वेदाने मात्र पृथिव्यादी नव कारण द्रव्यांपासून चेतनाधिष्ठित 'पंचमहाभूत विकार समुदायात्मक द्रव्य' मानले आहे. तैत्तरीय उपनिषदोक्त पंचमहाभूतोत्पत्तिक्रम हा जसा परमेश्वराला कळतो तसा आपणाला कळत नाही. म्हणून कोणीही वैद्याने निरीश्वरवादी होऊन उपयोगी नाही. अशाच तऱ्हेची सचेतन पांचभौतिक द्रव्ये आयुर्वेदाने व्याधिनिवारणार्थ चिकित्सेमध्ये वापरली असून त्यांना प्राधान्य दिलेले आहे. अशा पांचभौतिक द्रव्यांवरच त्यांचे रस, गुण अधिष्ठित असतात.

पांचभौतिक द्रव्यातीत महाभूतांच्या परस्परमिश्रणाने मधुरादि-षड्रस व गुणादि विंशति गुण निर्माण झाले असून ते द्रव्यांच्या ठिकाणी अधिष्ठित आहेत. अशा रस, गुण युक्त द्रव्याने व्याधिनिवारणार्थ चिकित्सा केली जाते. आयुर्वेदाने त्या द्रव्यांचे शरीरावर होणारे कार्य हे त्यांचे रस, गुण वीर्य, विपाक व प्रभाव या पद्धतीने निश्चित केले आहे. वर्णन केलेल्या द्रव्यांपैकी, कारण द्रव्ये मानसिक सूक्ष्मरोग निवारण्यासाठी उपयोगी पडत असून, कार्यद्रव्ये स्थूल रोग निवारण्यास उपयोगी पडतात. कारण द्रव्ये मनोमात्र व कार्यद्रव्ये स्थूल आहेत. यद्यपि सर्वच द्रव्ये मनोमात्र आहेत. तथापि कारणद्रव्ये ही मानसगुणांचाच आश्रय करून राहतात व कार्यद्रव्ये ही स्थूल गुणांचाच आश्रय करून राहतात, असा त्या दोहोंत भेद समजावा.

'सत्वं रजस्तम इइत गुणाबुद्धेर्नचालनः' (भागवत) तात्पर्य अंतरीची बुद्धी व सूक्ष्म संस्कार तीव्र करीत, करीत एखादी गोष्ट जशी स्वप्नात दाखवून त्याचा मनावर परिणाम करविते, तद्वत बाहेरही तीव्र होऊन गुणांना एकत्र करून द्रव्यरूप होऊन पदार्थ दाखवते. बुद्धीवर होणारे गुणांचे संस्कार सूक्ष्म रूपाने होऊन त्या गुणांचे द्रव्य बनते.

१) सत्व : हलके, प्रकाशक आणि आनंददायक आहे.

२) रज : जड, भारी आहे.

३) तम : उपष्टंभक आणि चंचल आहे.

या तीन गुणांनी बनलेले मन गौण-प्रधान रूपाने पंचभूत रूपाने झाले आहे ज्यात सत्व अत्यंत प्रधान आहे. तो भाग अंतःकरण व तेच सत्व थोडे अस्पष्ट झाले म्हणजे सत्वाचा प्रकाशक धर्म व आनंदधर्म लोपवून टाकून सत्वाचा हलकेपणा कायम ठेवला. या स्थितीलाच आकाश किंवा पोकळी म्हणतात. पुनः सत्वाच्याही हलकेपणाला कमी करीत करीत रजोगुणाचा प्रादुर्भाव अधिक होतो. तेव्हा वायू उत्पन्न होतो. त्यात तमाचा थोडा भाग मिसळला की अग्नि व थोडा अधिक तमाचा भाग झाला म्हणजे जल आणि पुष्कळ तमाचा भाग झाला म्हणजे पृथ्वी. याप्रमाणे पंचभूते होत असून या गुणसंक्रमणानेच द्रव्यामध्ये भेद झाला आहे. ज्यात हलकेपणा जास्त आहे ते द्रव्य आकाश गुणाचे. याचप्रमाणे इतरही भूतात्मक द्रव्याचे पुढे समजून घ्यावे.

## (५) अन्य गुणविवेचन

द्रव्याचे ठिकाणी पहिला मुख्य रस हा एक गुण असून दुसरेही पुष्कळ लघु-गुरु इ. गुण असतात. परंतु रुचीच्या संबंधाने रसच मुख्य असल्यामुळे त्याचेच प्रथम वर्णन केले आहे. सांख्याचे मताने रस हे तन्मात्र आहेत. म्हणजे कार्यरूप द्रव्य आहे. न्यायाचे मताने रस हा गुण आहे. वेदांत - मताने रस हा द्रव्याचा गुण आहे. रसांच्या ठिकाणी गुण राहतात, असे सांख्याचे मत आहे. रसांच्या साहचर्याने गुण राहतात असेच वाग्भटाचार्यांनी म्हटले आहे.

## प्रभाव विवेचन –

जे कार्य द्रव्यादिकांनी होत नाही ते कार्य प्रभावाने होते असे डल्हणाचार्यांनी सुश्रुताच्या टीकेत सांगितले आहे.

मायारूप द्रव्य त्रिगुणात्मक आहे व प्रभाव हा ईश्वर संकल्परूप आहे. तो प्रभाव द्रव्यसत्व विशेषाने अधिक प्रगट होतो. म्हणून कार्य कारणाविषयी ईश्वर संकल्परूप प्रभाव, प्रधान असून तो प्रकट होण्याला आश्रयभूत द्रव्याची सार्थकता प्रधान आहे.

रस, वीर्य, विपाक इत्यादींची मते जी आहेत ती सर्व कार्य करण्याविषयी आहेत, त्यामुळे त्यांच्यात विरोध नाही.

द्रव्याचे लक्षण क्रिया गुणवत समवायिककरणम द्रव्यं अशी आहे. ज्याच्या आश्रयाने समवायिकारणाने क्रिया गुण राहतात ते द्रव्य अशी पांचभौतिक द्रव्ये (चेतनायुक्त द्रव्ये) आयुर्वेदाने चिकित्सेकरता वापरली आहेत. शरीर ही कारणद्रव्ये – पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, काल, दिशा, आत्मा,मन.

कार्यद्रव्ये – पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश.

मानवी शरीराला होणारे व्याधि परिहारासाठी चिकित्सा आठ अंगांनी – विभागांनी सांगितली आहे. त्याचे विवेचन पुढे दिले आहे.

(६) चिकित्सेची आठ अंगे व त्यातील रसायन चिकित्सेचे महत्त्व

१) काय चिकित्सा : ही चिकित्सा शरीरातील अग्निच्या आधाराने केली जाते.

२) बालरोग चिकित्सा : ही बालकांना होणाऱ्या विकारासाठी आहे. त्यांचे शरीर मृदू व कोमल धातु वर्धमान व कफदोषप्रधान असतात म्हणून तदनुसार केली जाते.

३) ग्रहचिकित्सा : सूक्ष्म अदृष्ट योनीतील पिशाच्च, गंधर्व, यक्ष, राक्षस इ. च्या संसर्गाने होणारे व्याधी व त्यावरील ही चिकित्सा होय. उदा. मानसिक उन्माद, अपस्मार वगैरे.

४) उर्ध्वांग चिकित्सा : मस्तकातील, ज्ञानेंद्रियासंबंधी विकारावरील ही चिकित्सा आहे. यालाच 'शालाक्यतंत्र' असेही म्हणतात.

५) शल्यचिकित्सा : शस्त्रक्रिया करून केली जाणारी चिकित्सा ती 'शल्यचिकित्सा' होय.

६) दंष्ट्रा चिकित्सा : निरनिराळी स्थावर, जंगम विषे इ. वरील चिकित्सेला 'दंष्ट्रा चिकित्सा' म्हणतात. यालाच 'अगद तंत्र' असेही म्हणतात.

७) रसायन चिकित्सा (जरा चिकित्सा) : दीर्घायुष्य, आरोग्य (व्याधिनाश करून) प्राप्त करून देणारी तसेच प्रज्ञा, स्मृति, धैर्य, वर्ण, स्वर प्राप्त करून देणारी ही चिकित्सा आहे.

८) वाजीकरण चिकित्सा (वृष चिकित्सा) : ही उत्तम गुणवान संतति निर्माण करण्यासाठी केली जाते.

अशा प्रकारे आठ अंगांनी निरनिराळे व्याधी दूर सारण्याकरिता व आरोग्य प्राप्त करण्यासाठी तसेच चारी पुरुषार्थ साधण्यासाठी आयुर्वेद शास्त्र निर्मिती आहे.

रसायन म्हणजे धातूंची शुद्धी करून त्यांना सम ठेवणे, यद्यपि रसायनाचे कार्य वाजीकरणाने होते व वाजीकरणाचे कार्य रसायनावर होते. असे चरकाचार्य म्हणतात. तथापि वाजीकरण शुक्रशुद्धीनिमित्त प्रधान असून रसायन सर्व धातू शुद्धिनिमित्त प्रधान आहे.

सर्वथा जरेचा नाश, नित्य तारुण्य, शंभर वर्षे किंवा अधिक आयुष्य वाढून ज्याच्या योगाने बल, धैर्य, बुद्धि प्राप्त होते व सर्व रोगांचा नाश होतो त्याला रसायन म्हणतात.

आयुर्वेद असे म्हणतो की, कितीही विषारी जंतू तुमच्याजवळ येऊ द्या पण तुम्ही खंबीर असला की, तुमच्यावर त्या विषारी वातावरणाचा मुळीच जोर चालणार नाही. आम्हाला खंबीर करण्याकरताच आयुर्वेदाने स्वतंत्र रसायन हे अंग प्रकट केले आहे. (मानसायुर्वेद – लेखांक : पाहिला)

## ७) उपसंहार

वर वर्णन केलेल्या त्यांच्या सिद्धांताच्या विवेचनावरून आयुर्वेदातील काही सिद्धांताचा उलगडा होणार आहे. तो वैद्य वर्गाला फार उपयुक्त आहे. इतक्या सोप्या भाषेत केलेले विवेचन आपल्यास क्वचितच पाहावयास सापडेल. आजकाल आयुर्वेदाचा व्यवहार पाश्चात्य वैद्यक शास्त्राच्या सहाय्याने बहुशः केला जात आहे. त्यामुळे प्राचीन आयुर्वेद शास्त्राची मूळ बैठक कालानुरोधाने विस्कळीत होऊ पाहत आहे असे त्यांच्या विवेचनावरून वाटते.

त्यांच्या शास्त्रीय सिद्धान्तावर लिहिण्याची माझी मुळीच पात्रता नाही. परंतु योगायोगाने त्यांचे दुर्मिळ ग्रंथ वाचावयास मिळाले ही त्यांचीच प्रेरणा असावी. त्या प्रेरणेने हे दोन वेडेवाकडे शब्द लिहिले. ते प. पू. महाराजांच्या चरणकमळी नम्र भावाने अर्पण करीत आहे.

कै. शंकर द. फणसळकर

---

- आपल्या आचरणामुळे इतरांना दुःख न होता सुखच होईल, अशी प्रवृत्ती ठेवून व्यवहार करणे, हे नीतीचे मूळ सूत्र आहे.

# प्रज्ञाचक्षूंचे विद्यार्थ्यासाठी विचारधन

*एम.ए. (मराठी) पीएच.डी. (मराठी संत वाङ्मय) 'वेदान्त केसरी श्री बाबाजी महाराजांची विचार संपदा' हे पुस्तक प्रसिद्ध. पीएच.डी. शोधप्रबंध. नेट व सेट परीक्षा एकाच वेळी उत्तीर्ण. अंशकालीन प्राध्यापक म्हणून बी.ए., एम.ए. वर्गांना अध्यापन प्रवचने, व्याख्याने, वृत्तपत्रे, मासिके यांतून संत वाङ्मयावर लेखन व कथा लेखन.*

श्रीगुलाबराव महाराजांना प्रज्ञाचक्षु, मधुराद्वैताचार्य, समन्वयमहर्षी अशा अनेक बिरुदावल्यांनी सन्मानित केले गेले आहे. तत्त्वज्ञान, काव्य, संगीत, इतिहास, आयुर्वेद, योग, भक्ती, भौतिक विज्ञान, मानसशास्त्र, नीतिशास्त्र अशा विविधांगी विषयांत मूलगामी व मौलिक योगदान करणारे म्हणून त्यांना गौरविले गेले आहे. असे विद्वत्‌जड विषय लीलया हाताळणाऱ्या व त्यांचा समन्वय करून दाखवणाऱ्या ह्या अलौकिक साधुपुरुषाला स्त्रिया, मुले, विद्यार्थी यांचा विचार करावासा वाटला असेल? केवळ ३४ वर्षांच्या अल्पायुष्यात विद्यार्थी मुलांनाही मार्गदर्शन करणाऱ्या लिखाणासाठी त्यांना वेळ मिळाला असेल? अनेक गहन विषयांसोबतच सुबोध, सोपे बालकांना समजेल असे लिखाण त्यांना करावेसे वाटले असेल? असे प्रश्न मनात निश्चितच येतात. १०० वर्षांपूर्वी बदलती परिस्थिती, बदलती शिक्षण पद्धती, बदलणारी विचारधारा असे सारे सारे ह्या द्रष्ट्या युगपुरुषाने पारखले व त्यावर अचूक उपाय सांगितला. तो होता, सुसंस्काराचा !

'शिक्षण = सुसंस्काराच्या भांडाराचे दान'

'प्रकृती म्हणजे निसर्ग, विकृती म्हणजे त्यात होणारा विकार किंवा बिघाड आणि संस्कृती म्हणजे प्रकृतीत विकार किंवा बिघाड होऊ नये, या उद्देशाने तिच्यावर करावयाचे सम्यक संस्कार होत.'

– भारतीय संस्कृती कोश – खंड १

'संस्कारपूर्ण व संस्कारमय जीवन जगण्याची देशकाल विशिष्ट रीत (जीवनपद्धती व जीवनमूल्ये) म्हणजे संस्कृती

डॉ. इरावती कर्वे (मराठी लोकांची संस्कृती)

वरील दोन्ही व्याख्यांमधून संस्कृती संस्कारांमुळे जोपासली जाते हे स्पष्ट होते. परंतु त्यातून संस्कार म्हणजे काय? ते कसे करावेत? याचे स्पष्टीकरण होत नाही. शिक्षणातून ते व्हावेत अशी अपेक्षा केली जाते. कारण सुशिक्षित मनुष्य सुसंस्कारित असतो असे मानले जाते. पण आजचे शिक्षण म्हणजे भाषा, गणित, विज्ञान इ.चे ज्ञान असते. त्यात संस्कारांचा मात्र अभाव असतो. शाळेत नैतिक शिक्षणाचा तास ठेवून ते साध्य होईल का? त्यामुळेच विद्यार्थ्यांसाठी श्रीगुलाबराव महाराजांनी महत्त्वाचे मानले ते शिक्षण = सुसंस्काराच्या भांडाराचे दान ! व्यक्तीची कुप्रवृत्ती, दुष्टप्रवृत्ती घालवून तिला सद्प्रवृत्त, सदाचारी, सद्वर्तनी करते असे शिक्षण ते संस्कारांमुळेच शक्य आहे. अशा जीवनासच सुसंस्कृत जीवन म्हणता येईल. मानवी जीवनाची पायाभरणी होते ती बाल्यावस्थेत व विद्यार्थी जीवनात. त्यामुळेच त्यांच्या मानसिक व बौद्धिक उन्नतीचा दर्शक जीवनक्रम व आदर्श वर्तन पद्धती दर्शवणारी, त्याला संस्कार व संस्कृतीचा खरा अर्थ सांगणारी विचारधारा श्रीगुलाबराव महाराजांनी आपल्या ग्रंथात समाविष्ट केलेली दिसते. प्रामुख्याने पुढील चार ग्रंथांचा या संदर्भात आपण विचार करणार आहोत.

१) बाराखडी (३२ वाक्ये)
२) बालबुद्धीविवर्धिनी (संवादात्मक)
३) चित्तोपदेश (१०६ श्लोक)
४) मोक्षपट (श्रौतक्रीडा विशेष - कैवल्यपट)

## १) बालकाचे साठी । पंते हाती धरिली पाटी

प्रज्ञाचक्षु श्रीगुलाबराव महाराजांनी केवळ ३२ वाक्यांमध्ये यमक व अनुप्रास साधून नादमधुर व ठसकेबाज अशा 'बाराखडीची' रचना केली. बालमनावर अक्षर ओळख व त्यासोबतच सुसंस्कार लाभावे, नीती व व्यवहाराचे मार्गदर्शन व्हावे एवढी मौलिकता, सुबोधता त्यात आहे हे विशेष. संत एकनाथांनी भारूडातून ज्याप्रमाणे वेगवेगळे विषय घेऊन आशय मात्र भक्तीचाच ठेवला त्याचप्रमाणे श्रीमहाराजांनी देखील आशय संस्कार असला तरी बाराखडीद्वारे तो अभिव्यक्त केला आहे.

अ आ आर्जवाला न सोडीजे ।
ख खा खोटे भाषण न करीजे ।
च चा चोरी चपाटी सोडून दिजे ।
थ था थापड कोणा न मारिजे ।
ब बा बोल गोड असू दिजे ।
भ भा भेदभाव टाकून दिले ।

अशी नितीविषयक शिकवणूक बाराखडीत आहे. त्याप्रमाणेच

छ छा छाया रस्त्यावरते कीजे । (निसर्गरक्षण)
म मा मायबाप की सेवा कीजे
व वा वडिलांना मान दीजे । (वर्तन विषयक)
र रा रामकृष्णाते गाईजे ।
न ना नारायणकी सेवा कीजे
ज्ञ ज्ञा ज्ञानेश्वर पद वंदीजे । (भक्तीविषयक)

अशा प्रकारे बालकांना बाराखडीतून त्यांनी आशयगर्भ शिकवणुकीचा ठेवा बहाल केला आहे. छान अविर्भाव करून मुले रंगून जावून ही केव्हाच पाठ करतात. त्यांना अर्थानुसार गोष्ट सांगण्यास उद्युक्त केले तर त्यांच्या बुद्धीला चालना मिळेल, हे निश्चित.

## २) बालबुद्धीविवर्धिनी : एक संवाद

'बालबुद्धीविवर्धिनी' हे एक पिता व कन्या यांच्यातील संवादात्मक प्रकरण आहे. यात श्रीगुलाबराव महाराजांनी घरगुती उदाहरणे देऊन पिता-पुत्रीच्या संवादाद्वारे बालिकेच्या संशयाचे निरसन करून तिला शास्त्रीय भाषेतील व्याख्यांशी परिचित करून दिले आहे.

माणसाच्या जीवनातील सुखाचे चार प्रकार म्हणजेच धर्म, अर्थ, काम

व मोक्ष होत. हे मिळवण्याचे साधन म्हणजे विश्वास आणि बुद्धी. त्यांची नीट व एकदम वाढ होण्यासाठी सहा प्रमाणे श्रीमहाराजांनी सांगितली आहेत. प्रत्यक्ष प्रमाण व अनुमान त्याप्रमाणे फक्त त्यात आली आहेत. सृष्टीचा कर्ता ईश्वर कसा? वेगवेगळी नावे असली तरीही देव एकच कसा? हे सर्व रोजच्या व्यवहारातील उदाहरणे देऊन युक्तीने व बुद्धीला पटेल अशा पद्धतीने मांडले आहे. मात्र हा ग्रंथ अपूर्ण राहिला आहे.

## ३) मनोबोध : चित्तोपदेश

समर्थ रामदास स्वामींच्या 'मनाच्या श्लोकां'सारखे या चित्तोपदेशाचे स्वरूप आहे. १०६ श्लोकांमधून विद्यार्थ्यांना उपयोगी ठरतील, त्यांना लौकिक जीवनात, व्यावहारिक आचरणात मार्गदर्शक होतील अशी अनेक वचने विखुरली आहेत. हा उपदेश देह व आत्मा यांना होऊ शकत नाही. त्यामुळे ह्या दोन्हींना साधणाऱ्या मनाला म्हणजेच चित्ताला श्री गुलाबराव महाराजांनी उपदेश केला आहे. 'कुबुद्धी'चा त्याग करून 'नीती पाळीत जावी. साऱ्या विश्वाला मित्र तर करावेच पण मनाच्या अंतरातही कुणी वैरी नसावे' अशी जीवनमूल्ये शिकविणारी वचने चित्तोपदेशात येतात. आईविषयीची कृतज्ञता बाळगण्यास, शुद्ध कर्मे करण्यास, इतरांचे दोष न पाहता स्वतःचे दोष पाहण्यास ते सांगतात. 'कामक्रोधांना ठाव' न देता जगात 'साम्यभाव' धरावा, 'दरिद्री धनीसारखे सर्व मानी' असा समाजाबद्दल समानतेचा भाव विद्यार्थ्यांना मोलाचा नाही काय?

माणसाची दैनंदिन दिनचर्या कशी असावी ते सकाळी उठण्याचे, प्रातःस्नानाचे, हरिचिंतनाने सर्व काही करण्याचे सांगतात. 'पराधीनता तेचि वाईट घाणी' असे सांगून त्यांनी आळशीपणा व त्यापासून होणारी अपरिमित हानी टाळण्यास सांगितले आहे. या शिवाय सद्गुरुभक्ती, विष्णू-शिव समान, भक्ती, ज्ञानोत्तर भक्ती असे विविध विषय आले आहेत.

श्रीगुलाबराव महाराजांनी चित्तोपदेशातून मानवी मनाच्या आंतरिक स्पंदनांचा सूक्ष्मपणे वेध घेतला आहे. सद्गुणांकडे वाटचाल करण्यास पारमार्थिक, लौकिक, व्यावहारिक जीवनास प्रकाशमान करण्यास हा छोटेखानी ग्रंथ समर्थ आहे.

## ४) कैवल्याचा अधिकारी (मोक्षाची सोडीबांधी करी)

श्रीतक्रीडा विशेष-कैवल्यपट, मोक्षपट यातून श्रीगुलाबराव महाराजांनी सापशिडीसारखा खेळ व त्याचे नियम स्पष्ट केले आहेत. यातून मनोरंजन, ज्ञानसाधना, मानवी जीवनाचे उद्दिष्टप्राप्तीप्रत वाटचाल असे सर्वच साधले आहे. कैवल्यप्राप्तीसाठी कोणते सोपान चढावे लागतात, त्यातील पायवाटा (शिड्या) कोणत्या व त्यातील आडवाटा (सर्प) कोणत्या हे त्या मोक्षपटातून खेळणाऱ्यांस कळते. ह्या खेळातून सोपी पायवाट दाखवून, बालपणीच असे संस्कार करून महाराज मार्ग प्रशस्त करतात.

ह्या मोक्षपटासोबत दोन अध्यायात त्याचे विवरण आहे. त्यात प्रथम श्री नारद व रुक्मिणीचा भाऊ रुक्मी यांच्या कथांद्वारे खेळाचे महत्त्व, खेळाचे नियम, खेळाची व्याख्या; भावना, अपवाद यांचे विवेचन आले आहे. हा खेळ खेळताना आपण खरोखरच 'मुक्तीकरता खटपट करीत आहोत' अशी भावना ठेवावी. त्यामुळे 'कैवल्यातील उत्तम भावना दृढ होऊन ती जन्मभर रहावी... (निदान) मरते वेळेस तरी ती भावना उत्पन्न व्हावी हाच आमचा खेळ काढण्याचा उद्देश आहे' असे श्रीमहाराज म्हणतात.

या खेळात एकूण २८५ स्थाने आहेत. महानरक, क्षुद्रनरक, वेहस्तलोक, शून्यलोक यांपासून मोक्ष, पशुपती लोक, जीवनमुक्ती, विदेहमुक्ती असे करता करता शेवटची 'निष्क्रियतावच्छिन्न अद्वैत ज्ञानात सहज भक्ती' ह्या अवस्थांपर्यंत माणसाच्या उन्नतीचा पट म्हणजे हा मोक्षपट होय.

*क्रोधाद्भवति सम्मोहः सम्मोहात्स्मृतिविभ्रमः।*
*स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥६३॥*
*(श्रीभगवद् गीता अ. २)*

क्रोध - संम्मोह - स्मृतीविभ्रम - बुद्धिनाश - मरण अशी सापाच्या तोंडाद्वारे माणसाची होणारी अवनती परंपरा मोक्षपटात दाखवली आहे. अशा प्रकारे या श्रीतक्रीडा विशेष, यात येणारे लोकालोकरूपी स्थाने वैदिक व पौराणिक धर्माच्यानुसार सांकेतिक आहे. त्यामुळे श्रीमहाराजांनी दिलेले हे नाव सार्थ ठरते.

कैवल्य साम्राज्य चक्रवर्ती ज्ञानेशांच्या नंदिनीने श्रीगुलाबराव महाराजांनी कैवल्याचा अधिकारी असावे यात नवल ते कसले? पण त्यांनी मोक्षाचे गाठोडे घेऊन (अधिकारानुसार) सर्वांसाठी मोक्षाची सोडी बांधी करणे आपल्यासाठी महत्त्वाचे नाही काय? शिशुंसाठी बाराखडी, बालांसाठी बालबुद्धिविवर्धिनी तर किशोरांसाठी चित्तोपदेश व मोक्षपट अशी विभागणी योग्य होईल का? श्री महाराजांचे सर्वच साहित्य प्रपंच व परमार्थ यात प्रगतीचे टप्पे गाठणाऱ्या सर्वांसाठीच ते पथदर्शक आहेत असे म्हणावे लागते, हेच खरे !

**डॉ. सौ. अंजली खरे**
अनंत भुवन टिकेकर रोड, धंतोली, नागपूर ४४००१२

# प्रज्ञाचक्षु श्री गुलाबराव महाराजांची अभंग रचना - हे देणे ईश्वराचे

बी.ए.बी.एड्, रा.भा. पंडित, हिंगणे महिलाश्रम, कॅम्प एज्युकेशन सोसा., काही काळ अध्यापन, राष्ट्रभाषा मध्ये १० वर्षे अध्यापन. अनेक मासिकांतून कथा, वैचारिक निबंध. वर्तमानपत्रीय लेखन, दैनिक प्रभात १९८९ ते १९९९. सोळा-सतरा संतचरित्रे, लेखमाला यशस्वी. ६०० च्या वर लेख संख्या. ब्रह्मचैतन्य, स्वरूपानंद, गुरुदेव रानडे या संतांवर कल्याणीमध्ये लेखन.

*श्री ज्ञानेश्वर कन्यका चारुभाषिणी ।*
*गोपाल श्याममूर्ति प्रेमपर्यंक शायिनी ।*
*मधुराद्वैतपीयूष संप्रदान यशस्विनी ।*
*शरण्या सर्वभूतानां जननी मे प्रसीदतु ।*

श्री गुलाबराव महाराजांचे एकनिष्ठ शिष्य तात्याजी यांनी वरील श्लोकांत त्यांचे जीवनकार्यच जणू मोजक्या शब्दांत वर्णन केलेले आहे.

तान्हे बाळ असतांना डोळे आल्याने केलेल्या चुकीच्या खेडेगावी उपचारामुळे त्यांचे डोळे गेले आणि गुलाबराव अंध झाले. परंतु भगवान श्रीकृष्णांचा कृपामय वरदहस्त या अलौकिक सत्पुरुषावर असल्याने त्यांचे प्रज्ञाचक्षु इतके प्रज्वलित तेजस्वी झाले की डोळस माणसालाही लाजवेल इतकी ग्रंथ संपदानिर्मिती ते करू शकले. कीर्तन, पुराणश्रवण, रामायण महाभारतादी ग्रंथांच्या वाचनाने अर्थातच दुसऱ्याच्या मदतीने त्यांची बुद्धी चौफेर विकसित झाली. योग, नीती, भक्ति आदि तत्त्वज्ञानपर ग्रंथ, वैद्यक, पाश्चात्य चिकित्सेचा सूक्ष्म अभ्यास करून त्यावर ग्रंथ, गानकलावर्णनपर ग्रंथ आदि अनेक शास्त्रांना स्पर्श करणाऱ्या सव्वाशेच्या वर ग्रंथ त्यांनी लिहिले. संस्कृत, मराठी व हिंदी या भाषांमधील त्यांचे ग्रंथ वैभव पाहिले की मन चकितच होते. त्यांचे अलौकिकत्व आपोआप सिद्ध होते.

या सर्वाहूनही त्यांच्या बुद्धीचे वैलक्षण्य म्हणजे त्यांनी केलेली विपुल अभंग रचना. काव्याचे दोन प्रकार – एक नित्य, दुसरा अनित्य. लय, ताल, गेयता, वाद्यवृंद आदीमुळे लोकप्रिय होणारी काही गीते असतात ती काही काळ ओठांवर नाचतात पण कालांतराने काळाच्या पडद्याआड विस्मृतीत जातात. या उलट अंतरंगातून उमटलेला भावनांचा उत्कट आविष्कार म्हणजे काव्य. असे काव्य मात्र काळाच्या कसोटीला उतरते. कितीही काळ उलटला तरी ते अभंगच रहाते. माझा मराठाची बोल कवतुके । अमृतातेही पैजा जिंके – अमृताचा सागर असलेली ज्ञानेश्वरी काळाच्या ओघात खरोखरीच अभंग राहिलेली. तुकोबाची अभंग गाथा, नाथभागवत नामदेव गाथा, ग्रंथराज दासबोध हे अमर अक्षर असे वाङ्मय आहे. याच प्रकारचे श्री गुलाबरावाचे अभंग वाङ्मय आहे. श्रीकृष्ण प्रीति, आदर्श ईश्वरभक्ती, नितान्त ईश्वरनिष्ठेची ग्वाही देणारी त्यांची अभंगरचना खरोखरीच अमोलिक आहे. मला तर वाटते भगवान श्रीकृष्ण स्वतः त्यांच्या अभंगरचनेला सतत प्रेरणा देत असावेत. त्यांच्या कानांत कुजबुजत असावेत 'अरे भक्तश्रेष्ठा तुला चर्मचक्षु नाहीत हे बाह्यतः दुर्दैव आहे. परंतु घाबरू नकोस, भिऊ नकोस मी तुझ्या पाठीशी आहे. नवनवोन्मेषशालिनी काव्य प्रतिभेचा परिसस्पर्श तुझ्या मनाला मी घडवीत आहे; त्यामुळे तुझ्या अंतरीचा ज्ञानदिवा कधीच मालविणार नाही. कधीच नाही. तो अंतरीचा ज्ञानदिवा सतत प्रकाशतच राहील आणि काव्याचा आनंद सर्वांना देईल. अरे कवी हा जन्मावा लागतो तो कधीच बनवला जात नाही तसा तू जातिवंत प्रतिभावंत आहेस. उठ आणि अभंग रचना करू लाग.' आणि अभंग गंगा वाहूच लागली.

एकदा एक श्रीमंत सावकार आपल्या मित्रांसमवेत आळंदीला निघाले. श्री महाराज स्वतःला ज्ञानेश्वर कन्यका म्हणवून घेत. लेकीला जशी माहेराची ओढ तशी त्यांना ज्ञानोबा माऊलींची तीव्र ओढ होती. श्री गुलाबराव महाराजही त्यांच्या सोबत होते. समाधीची पंचामृती पूजा सुरू झाली. सावकार माऊलींची समाधी धुवून स्वच्छ करू लागले. त्यांच्या हातातील सोन्याचे कडे समाधीवर घासू लागले. त्याचा खर खर आवाज श्री महाराजांच्या कानांनी अचूक टिपला आणि ते सावकाराला म्हणाले, 'अहो तेवढे सोन्याचे कडे काढून ठेवा. माझ्या माऊलीला त्रास होत असेल.'

इतकी अपरंपार विशुद्ध भक्ति, माऊलीवरील अपार प्रीति भावनांची तरलता, मनाची संवेदनशीलता ज्याच्या जवळ आहे तो कवी असावा यात नवल ते काय? कारण Poetry is the spontanous overflow of powerful feelings प्रबल भावनांचा उत्कट आविष्कार म्हणजेच काव्य ! त्यांची श्रीकृष्ण भक्ति इतकी विशुद्ध होती की त्या भावनांचे आविष्करण पहा –

*सोनियाचा दिन आजि उगवला ।*
*हृदयी देखिला मी यदुनाथ ।*
*ज्ञानध्यान सारे जाहले पांगळे ।*
*पाहता सोहळे डोळे भरी ।*
*नारीनर झाले नारायण रूप ।*
*आळंदीचा योगी सर्वाठायी ।*

विभक्त नव्हे तो भक्त. भक्त आणि भगवंत यांचा अभेद नव्हे त्यांचे अद्वैत त्यांनी किती सुंदर शब्दांत वर्णन केलेले आहे. ते म्हणतात, मला डोळे नाहीत. सगुण साजिरे रूप मी डोळ्यांनी पाहू शकत नाही. पण माझ्या अंतःकरणाच्या गाभाऱ्यात ती मूर्ती प्रकटली आहे. प्रज्ञारूपी चक्षुंनी पाहून मी तिचे वर्णन यथार्थ करू शकतो.

*मोतियांचा हार गळा*
*आणि वैजयंती माळा*
*हरि पहावया डोळा । कळवळा अंतरी*
*चला ग सख्यांनो आधी अलकावती*
*सद्गुरुंची मूर्ति डोळा पाहू ।*

कृष्णमय झालेल्या आंधळ्या गौळणींची अर्थात गुलाबराव महाराजांची लगबग त्यांच्या शब्दाशब्दांमधून वाचकांच्या मनःचक्षुंसमोर साकारते हे आहे त्यांचे कवित्व. हे शब्दसृष्टीचे ईश्वरच असतात. भगवान श्रीकृष्णांवर त्यांची अपार प्रीति होती. त्या भावनांचे शब्दरूप पहा :

*अगं सखे कधी पाहीन मी, पाहीन मी, पाहीन हरि डोळा । जयाला ध्यातो शिव भोळा अग सखे कुंजवनी खेळे । मुरली भर पूतनारी । पाहूनी त्यासी मोहिती पूत - नारी ।*

श्री गुलाबराव महाराजांना मधुराद्वैताचार्य अशी गौरवदायी पदवी मिळाली ती ते श्रीकृष्णाशी पूर्णाद्वैत पूर्ण एकरूप झाले. म्हणून श्रीकृष्ण हा त्यांचा पती आणि स्वतः त्यांची एकनिष्ठ पत्नी असे मनाने समजत आणि आपल्या पतीचे प्रियाराधन करण्यात ते गुंगून जात. दंग होत. स्त्री भावना याव्यात म्हणून भालावर कुंकुमतिलक लावीत, साडी नेसत हातात बांगड्या, पायात पैंजण घालत म्हणजे किती पराकोटीची मधुराभक्ती होती हे आपल्याला कळते. ईश्वराशी असणाऱ्या वियोगाच्या कल्पनेने कासावीस होत असत. आपल्या मनातील संताप काव्यात व्यक्त करताना म्हणतात – *कावेचा तुकडा तुझे हे वैकुंठ । ब्रम्हज्ञान स्पष्ट दिसताहे । हेचि त्वा देवूनी मज नागविले । येथे ते न चाले नारायणा । गुरुकृपे आम्ही तुजहुनी थोर । बांधू दृढ तर इवयात ज्ञानेश्वर आई बळल्या कृपाळ । तेंणे तू गोपाळ हाता आला ।* आपल्या श्रीकृष्णारूप पतीला रोखठोक सवाल करतात *अनंत जन्माने जाहले स्फुरण । नाही तुजवीण आराधले । कामे तुजसाठी निर्मिले मंचक । आलिंगन सुख लोभे तुझे*

याचाच अर्थ श्री महाराजांना परमेश्वराशी पूर्णाद्वैत साधायचे होते. *बोलबोलूनी मुनि गेले आता काय बोलू । पूर्ण सेजेवरी आम्ही रंगरंगूनी डोलू* - हीच भावना दुसऱ्या शब्दात पहा -- *चाफा फुली आला फुलून । तेजी दिशा गेल्या आटून कोण मी चाफा कोठे दोघे जण रे ।* भक्त भगवंताचे अद्वैत श्री गुलाबराव महाराज यांनी साक्षात् अनुभवलेले असलेच पाहिजे हे तो *बोलणे प्रचीतीचे अनुभूतीचे ।* याची साक्ष आपल्याला पटते. ज्ञानेश्वर माऊलीला सांगून मी तुज बांधून आणीन. ही प्रत्यक्ष धमकी परमेश्वराला ते देवू शकतात याचा अर्थ आदर्श भक्त आणि भाव भक्तीचा प्रचंड आत्मविश्वास !

श्रीकृष्ण दर्शनाची आतुरता, उत्सुकता, व्याकुळता त्यांच्या विरहपर काव्यात स्पष्टपणे प्रतीत होते.

*अंतरी वियोग बाहेरी दिसेना*

*उपाय सुचेना कोणताही*

*विरहा नळाने करपले अंग । मारी रति रंग शर सदा ।*

*बाहेरी निघाले अंतरीचे पाणी । रडोनी रडोनी साजणी गे । ज्ञानेश्वर कन्या मंदिरी मी एकटी । कृपा जगजेठी करा वेगे ।*

दुसऱ्या एका विरहपर काव्यात ते म्हणतात, *शोधू कोणे ठायी । गेले प्राणनाथ जाहले अनाथ साजणी मी । दीन मी दुर्बळ दासी नारायणा । दाखवा चरण दयासिंधो ।*

ज्ञानेश्वर कन्येचे प्राण यदुकुल मणीसाठी तडफडत होते. ते आर्ततेने म्हणतात.

*कोठवरी जीवा धीर देवू माये ।*

*अजूनही का न ये संदेशाही ।*

परमेश्वर विरहरूपी अग्नीने माझे सारे अंग करपून गेले आहे. मदन मला तर कामविव्हल करीत आहे. श्रीकृष्णाच्या ठायी असलेली अनन्यनिष्ठा अशी शब्दरूपाने साकार होत आहे. तुला जो भजणार नाही तो यमाचा पाहुणा असा इशाराही ते देतात.

श्रीगुलाबराव महाराज विचारी, आचार संपन्न, ब्रह्मज्ञानी माणसाने वागावे कसे हे सांगताना म्हणतात –

*अंतरी ब्रह्मसमाधान । बाहेरी दावावे न कळपेपण । शरीर करावे प्रारब्धाधीन हेच खूण सज्जनांची ।*

ब्रह्मज्ञानी असूनही ज्ञानोत्तर सगुणभक्तीत रममाण होणारा हा संतश्रेष्ठ आपल्या सोबत्यांना काय सांगतो ते पहा –

*चला चला यमुनातीरी । काला करितो मुरारी । अवघी विषयांची रुची मोडोनी । चिद् एकची । गोविंद गोपाळ । प्रेमानंदाचा कल्लोळ । ज्ञानेश्वर नाम व्रज झाले निष्काम ।*

ते कृष्णलीलांचे वर्णन तर फारच रम्य आणि भावमधुर करतात.

*हरि गोकुळी येता परमानंद । सर्व गोपींस कृष्ण रूपी छंद । काही सुचेना गृहकर्मबंधदेहगेह विसरूनी गाती मुकुंद ।*

आपल्या एका उपदेशपर अभंगात ते वर्णन करतात –

*उचित तांडिता । न ये हाता कदा चित । होती उपाय अपाय । आत्मरूप भासे काय । राममिषे काम भेटे । ज्ञानराये मायबापे न सांगता नोहे सोपे ।* यातून गुरुकृपेची महती आपोआपच सिद्ध होते. स्वामी स्वरूपानंद आपल्या अभंगात हेच सांगत आहेत. *गुरु कृपेवीण नाही आत्मज्ञान । वाऊगा तो शीण साधनांचा । गुरु माता पिता गुरुची देवता गुरुमुक्तिदाता ऐसे मानी ।* हेच श्री महाराजांनी आपल्या अभंगातून वारंवार पटवून दिलेले आहे. नुसत्या बाह्य कर्माचरणाला काहीच महत्त्व नाही असे त्यांचे म्हणणे आहे. किती साधे, सोपे शब्द, पण मोठा भाव व्यक्त करताना ते म्हणतात –

*नाही जव तळमळ । नेत्री न ये प्रेमजळ तवंतरी कंठी माळ । घालू नये सर्वथा रोमांचित नाही काया । आवडती धनजाया तंववरी ब्रह्ममाया बोलणे तो शीणची विषयाचे संगे वय दवडिली । नाही देखिली परिणती मोसमय मूर्ती मानूनी अप्सरा । कुंभी पाक खरा जोडियेला ।*

ते म्हणतात – जन हो तुम्हाला सद्गुरु महिमा काय सांगू? *कोटीजन्म पुण्ये भेटती सद्गुरु जेथे शार्ङ्गधरू नित्य नांदे । ज्ञानेश्वर करुण । जन नारायणा भेद नाही. जिवाशिवा ऐक्य झाले जग ब्रह्म दिसे । पशुपक्षी नानायोनी एकाकार भासे कृष्णमय वृत्ति झाली आता काय उणे* इतकी अभेद प्रतीती या महान् तत्त्वज्ञ, श्रेष्ठ कवि, थोर संत आणि आदर्श भक्ताला आलेली होती.

असा हा महान् साक्षात्कारी अनुभूति संपन्न अद्वैताचार्य, सगुणनिर्गुणाची योग्य सांगड घालणारा म्हणजेच समन्वय महर्षी ईश्वराने निर्माण केलेला अवर्णनीय असा लोकविलक्षण चमत्कार आहे असे म्हणावे लागेल. अवघे चौतीस वर्षाचे आयुष्य, त्यातूनही जन्मांध, दुसऱ्यांच्या मदतीने ग्रंथसंपदा निर्माण करणारा - हीनयातीत जन्माला येवूनही आपले अलौकिकत्व सिद्ध करणारा हा महापुरुष म्हणजे सृष्टी नियन्त्याने घडविलेला अभूतपूर्व चमत्कारच म्हणावा लागेल. त्यांचे अत्यन्त अल्पायुष्यात केलेले कार्य पाहिले की म्हणावेसे वाटते, त्यांच्या रूपाने धर्म संस्थापनार्थाय भगवान श्रीकृष्णच तर प्रकटले नाहीत ना?

सामान्य माणसाने आपली आध्यात्मिक उन्नती कशी करून घ्यावी हे सांगताना ते म्हणतात –

*पूजा ध्यान जप त्यासी नाही नाही । ठेवील जो माथा हरिपायी । संत सज्जनांची चित्तात आवडी विषयांची गोडी सांडूनिया । ज्ञानेश्वर प्रभु ब्रह्मांड सर्वदा । मग व्यर्थ चिंता का करावी.*

कर्मकांडापेक्षा मनाच्या शुद्धतेवर आणि सदाचरणावर ते अधिक भर देतात. *सदाचारेण सर्वेषाम् शुद्धं भवति मानसम् । निर्मलं च विशुद्धं च मानसं देवं मंदिरम्* हे त्यांचे सतत सांगणे असे. जनहो देहाच्या तिजोरीचे दार

खोला. अंतःकरणात तुम्हाला ईश्वरभक्तीचा ठेवा सापडेल. पण फक्त प्रभुचरणी अनन्यशरणागत होणे आवश्यक आहे.

एका स्वरचित अभंगात तर फारच सुंदर भावना व्यक्त केलेली आहे.

*कृष्णभेटीहूनी कृष्णाकार मन*
*होणे हे साधन श्रेष्ठ बटे*
*गांधारी नंदना झाली कृष्ण भेटी*
*परी नाही पोटी भक्ति भावसा*
*अर्जुनासाठी जाहला सारथी*
*राहिला तो किती रिपोनिया ।*

म्हणजेच माधुर्य भक्तीच्या माध्यमाने भगवान श्रीकृष्णाची आराधना करता करता सगुणभक्तीकडून निर्गुणाकडे ते किती हलुवारपणे भक्ताला वळवितात हे आपल्या लक्षात येते. हे कौशल्य साक्षात्कारी पुरुषालाच साधेल.

सामान्य प्रापंचिक भक्ताला कमी न लेखता योग्य काय, अयोग्य काय याचे अचूक मार्गदर्शन ते करतात. ***कोणा असो पूर्ण ज्ञान । कोणी करो धर्मदान । कोणा येवो योगध्यान मज अभिधान हरिचे पुरे*** — नामस्मरण भक्ती ही श्रेष्ठच आहे असे ते सांगतात. ***नको यज्ञयाग नको कर्मकांड । रामनाम घ्यावे मुखाने अखंड*** हेच त्यांचे सामान्यांना सांगणे आहे. त्यांच्या मनाची भक्तीची आर्तता आपल्याही मनाला स्पर्शून जाते.

***कोठवरी अंत पाहसी केशवा । पळ माझ्या जीवा धीर नाही । नयन आंधळे सापडेना वाट । हाताशी चोखट नाही कोणी ।*** ते सद्गुरु महिमा तर ठायी ठायी वर्णन करतात. तो अगाध, अपार आहे. ***जैसा वेद तैसा गुरु ऐसा श्रुतीचा निर्धारू वेद न । दावा सद्गुरु । गुरु दावी शार्ङ्गधरू*** हा ठाम विश्वास होता.

प्रयत्न न करता कल्पतरूचा शोध लागला तर मग व्यर्थ ठरणारे धातुशोध कशासाठी तसेच संतसंगाने भेटतो हरि मग शास्त्रांचे कामच काय?

*लाभता अमृत कासया औषध*
*तैसे ज्ञान शुद्ध गुरु मुखे*
*ज्ञानेश्वर प्रभु सर्वदा कृपाळु । बहु कळवळा जीवांचा त्या*

अशा रीतीने त्यांच्या लोकविलक्षण प्रीतिशक्तीतून विविध विषय स्पर्शी काव्यरूप गंगेचा उगम झाला. ते पाहिले की माझ्या डोळ्यांसमोर दृश्य साकारते, मोकळ्या जटा सोडलेला, कमरेवर हात ठेवून आकाशाकडे पाहणारा शिवशंकर ! इतक्या विपुल संख्येने असलेल्या काव्याचे जनक श्रीगुलाबराव महाराज - प्रज्ञाचक्षु असलेले म्हणजे साक्षात् चंद्रशेखर - त्रिशूलधारी शिवशंकरच असावेत.

कीर्तनकारांना उपयुक्त अशी चिंधी आख्यान, हरिहर आख्यान, संत सखूचे अशी काव्यरूप आख्यानेही लिहिली आहेत. त्यांच्या सर्व काव्यसंपदेचा आढावा घेणे म्हणजे गागरमे सागर भरण्यासारखे कठीण काम आहे. या थोर संतश्रेष्ठाला आपण सर्वचजण एकच कृपादान मागू या !

*तू मायबाप गुरू आप्त ।*
*बाह्यांतरी असती व्याप्त ।*
*करी मदीय सर्व पूर्णार्थ ।*
*वेदभाव समूळ मम भंगो । प्रभु आपल्या दर्शने ।*

श्रीकृष्णार्पणमस्तु

**सौ. विजया प्र. प्रभुणे**
श्रीमान सोसा., पुणे पीपल्स को ऑपरेटिव्ह बँकेसमोरील बोळात, त्रिमूर्ती बंगला, कर्वेनगर, पुणे ५२.

# ग्रंथ लेखन कसे करावे ? श्रीगुलाबराव महाराजांचा दृष्टिकोन

एम.ए., अमरावती विद्यापीठ मराठी प्रमुख जगदंबा कॉलेज अचलपूर प्राध्यापक

ग्रंथ लेखनासंबंधाने आज पर्यंत अनेकांनी अनेक प्रकारची मते व्यक्त केली आहेत. परंतु या मतामतांच्या गलबल्यात कुठेतरी एक मत असावे, कुठे तरी आपण विराम घ्यावा, असे प्रत्येकास वाटते. परंतु नेमके कुठे थांबावे व कोणते मत ग्राह्य धरावे? या ठिकाणी संभ्रम निर्माण होतो. याबाबत श्रीक्षेत्र माधान येथील प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांनी काही 'मते मांडली आहेत. त्याही मतांचा विचार करू गेल्यास कुठेतरी विराम जागा शोधावी आणि महाराजांच्या विचाराशी एकमत व्हावे असा अनुभव येतो.

सामान्यतः ग्रंथ कसे लिहावेत? या प्रश्नाचे अगदी विषयापुरतेच मर्यादित व समर्पक म्हणजे थोडक्यात पण महत्त्वाचे असे उत्तर कुठेच सापडत नाही. परंतु महाराजांच्या ग्रंथातून याबाबत सडेतोड विचार सापडतात. त्यांच्या ग्रंथात बिनचूक व स्पष्टपणे विचारांचा जणू भरणा आहे, असे वाटते. ते म्हणतात, पद्यग्रंथ जुन्या धर्म पद्धतीनुसार लिहावेत व गद्यग्रंथ वर्तमान परिस्थिती सुधारेल असे लिहावे. शिवाय त्यातही कालत्रयाबाधित काही असावेच. ग्रंथ लेखनासंबंधाने आपण जो जो विचार करू लागतो तो तो अनेक प्रश्न आपणास भेडसावतात व कुठेतरी आपण अडून बसतो. अशा वेळी मार्गदर्शकाची आवश्यकता असते. काही मार्गदर्शक तत्त्वांची मदत घ्यावीशी वाटते, या बाबत काही गृहीते असावी लागतात.

धार्मिक ग्रंथ लिहीत असताना गुरुसंप्रदाय ज्या भाषेचा असेल त्या भाषेत लिहावा. मात्र काव्य कोणत्याही भाषेत लिहावे आणि शास्त्रीय ग्रंथ आर्सवाकसंवलित असल्यास संस्कृत भाषेत लिहावेत व तसे नसल्यास ते देशी भाषेत लिहावेत असे महाराजांनी जणू आपल्या मार्गदर्शक तत्त्वात स्पष्टपणे नमूद करून ठेवले आहे. तसेच ग्रंथामधून इतर धर्माचा उल्लेख करावा की नाही याबाबत त्यांनी स्पष्टच म्हटले आहे की धर्मग्रंथात अशा तऱ्हेचा उल्लेख करू नये. अन्यथा ते लिखाण सतरा धर्मांचे कडबोळे होईल व नेमके कोणत्या धर्माबद्दल ग्रंथलेखन केले आहे, या बाबत संभ्रम निर्माण होण्याची शक्यता असते. परंतु नीतिग्रंथात व काव्य ग्रंथात इतर धर्माचा उल्लेख करण्यास त्यांची हरकत नाही. तसेच गद्यग्रंथाची भाषा कशी असावी हा विचार करीत असताना निर्णायक स्वरूपात असे म्हणावे लागेल की वर्तमानविषय असेल तर संपादिल्या नंतर ती परिभाषा होईल किंवा विशिष्ट संज्ञा होईल. ही सांशज्ञापिका - अशी असावी.

तसेच ग्रंथामधून त्रिकालाबाधित तत्त्व मान्य करावे व वर्तमानपुरते समजावे पण गौरूंड विभुषित इंग्रजी गद्यविषयीच हा नियम लागू आहे. ग्रंथातील सामान्य भाग संग्रहरूप असून विशेष भाग नवीन असावा व प्रमाण भाग संग्रहरूप असून युक्तीभाग नवीन असावा व याबाबत अनुभव असा आहे की सर्वथा संग्रह रूप ग्रंथास फारसा मान मिळत नाही व सर्वथा नवे तर वेड्यांच्या कोटीत जाते कारण त्यांचे बडबडणे अति नवे असते.

ग्रंथ लेखनाचा विचार होत असताना जे पारमार्थिक ग्रंथ असतात त्यातील ज्ञान पूर्ण असते असा अनुभव येतो. कारण एक तत्त्व व त्या तत्त्वापर्यंतचा प्रवास हा निश्चित स्वरूपाचा असतो. त्याचे मुक्कामाचे ठिकाण जणू ठरलेलेच असते. परंतु व्यावहारिक ग्रंथात मात्र तसे नसते. कारण व्यवहार नित्य बदलत असतो व व्यावहारिक ग्रंथात मुक्कामाचे निश्चित स्थान नसते म्हणून अशा ग्रंथातील ज्ञान सदैव अपूर्णच असते. पारमार्थिक ग्रंथात जरी प्रक्रियेची भर पडत असली तरी त्या सर्व प्रक्रिया एकाच सिद्धांताकडे धाव घेत असतात आणि त्याचबरोबर अतिशय महत्त्वाची गोष्ट म्हणजे अशा स्थितीत नवीन प्रक्रिया न सापडली तर पारमार्थिक व्यवहाराची प्रसिद्धी विवक्षित उपाधिविशिष्ट जीवावाचून इतराला भोगावी लागत नाही परंतु व्यावहारिक ज्ञानाचे तसे नसते. अपूर्ण राहणे हेच मुळी त्याचे भूषणच आहे. व्यावहारिक ग्रंथ पूर्ण लिहून ठेवणे म्हणजे पारमार्थिक दृष्टीने जगताला सत्यत्व देण्यासारखेच आहे.

ग्रंथ रचना कशी करावी याबाबत विचार व्यक्त करताना महाराज म्हणतात आपल्याला भौतिक शास्त्राविषयी संस्कृत ग्रंथ रचना करावयाची असल्यास ती भाषांतराच्या मुळाप्रमाणे असली पाहिजे. मुळाचे भाषांतर नको हे मार्गदर्शक सूत्र महाराजांनी आग्रहाने मांडले आहे. तसेच त्यांनी आणखी एक महत्त्वाचा भाग आवर्जून मांडला आहे तो म्हणजे ग्रंथ कसे नसावे? या बाबत ते म्हणतात काही ग्रंथकारांनी विचित्र प्रयत्न केले आहेत. त्यामुळे वैशेषिक व जडशास्त्र यांना कायमचे वैकल्पिकत्व आले आहे. या बाबत त्यांनी एक मजेशीर उदा. दिले आहे. न्यायावर 'न्यायप्रदीप' नावाचा एक ग्रंथ आला आहे. त्यात न्यायाचे तात्पुरते सर्व विषय आले असून ग्रंथकाराने पाश्चात्त्य समन्वयाची खटपट केली आहे. ती ग्रंथकाराच्या विद्वत्तेची दर्शक असली तरी महामुनी अक्षपाद व कणाद ह्यांच्या कीर्तीला उज्वल करणारी नाही. स्वतःचे नाव करून घेणे गौण कर्णाला देखील सुलभ आहे. तेवढ्याने तो स्वतः योग्यतेस चढला तरी कुळाचे नाव होत नसते. कुळाच्या नावाकरिता परंपरागत सचोटी दाखवावी लागते तेव्हाच ते कूळ पुढे हजारो पिढ्यांना सन्मार्ग दाखविणारे होते.

महाराज म्हणतात, हक्सले, टिंडाल, जेम्स वगैरे जडशास्त्राचे ग्रंथ पाठ करून एखादा संस्कृत ग्रंथ लिहिला तर लिहिणारा गुणग्राहक व अव्याहत श्रम करणारा आहे असे कोण म्हणणार नाही? पण अखेर ते ठरणार वैश्याचेच काम ! म्हणून ग्रंथ कसे असावेत हे सांगताना ते म्हणतात, भारतीय परंपरा उज्ज्वल राखण्याकरिता इंग्रजी ग्रंथाची केवळ भाषांतरे करू नयेत तर इंग्रजीचे मूळ ही संस्कृत रचना आहे, असे वाटणारी ग्रंथनिर्मिती झाली पाहिजे. या संबंधी त्यांनी जगदीशचंद्र बोस यांचे उदाहरण दिले आहे.

जगदीशचंद्र बोस यांनी आपल्या 'संवेदना' ग्रंथात 'एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति ।' ही श्रुति प्रमाण घेतली आहे. फिजिक्स, फिजियालॉजी व सायकॉलॉजी ही युरोपात तीन निरनिराळी शास्त्रे मानली जातात. त्याचा भेद बोसांनी नाहीसा करून तिन्ही शास्त्रे एका शक्तीची निरनिराळ्या विवक्षेने निरूपण करतात असे त्यात दाखविले आहे.

महाराजांच्या ग्रंथासंबंधी विचाराबाबत एक निश्चितपणे सांगता येईल की इतर ग्रंथकार एकच मुद्दा विस्तार करून मांडतात, तर त्यांच्या एकेका परिच्छेदात अनेक मुद्दे असतात म्हणूनच त्यांना ऋषी परंपरेतील शेवटचे ग्रंथकार म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. ग्रंथरचनेचे अनेक आदर्श महाराजांच्या ग्रंथातून जसे प्रात्यक्षिक असावे तसे सप्रमाण सिद्ध करता येते. काव्य असो की गद्य महाराजांच्या विवेचन पद्धतीची लकब सारखीच जाणवते व शास्त्रीय ग्रंथात तर पूर्वपक्ष व उत्तरपक्ष असतो. एकंदर विशिष्ट पायऱ्या चढून आदर्श ग्रंथ तयार होतो, असे त्यांच्या विवेचनावरून प्रत्ययास येते.

पूर्वपक्ष - मध्यस्त - शिष्य - उत्तरपक्ष - सिद्धांतपक्ष - अशा पायऱ्यांनुसार आदर्श ग्रंथाची निर्मिती होते. व्यावहारिक ग्रंथ व पारमार्थिक ग्रंथ यांची तुलना करताना पारमार्थिक ग्रंथाला महाराजांनी विशेष महत्त्व दिले आहे. ह्याचा अर्थ व्यावहारिक ग्रंथ कुचकामाचे आहेत असा होत नाही. पण तेवढ्यापुरतेच ग्रंथ हे निरभिमानपूर्वकच लिहिले गेले पाहिजेत असा अलिखित दंडक आहे. तरच ते लोकांना आवडतील व ग्रंथ आवडले तरच लोक हे ग्रंथ संग्रही ठेवतील. पण केवळ लोकांची आवड हा येथे मुख्य विषय नाही. सिद्धांत ग्रंथ लोकांना आवडण्यासारखे लिहिले तर विषयी लोकांच्या चावटीत भर टाकण्यासारखे होते म्हणून मुमुक्षुला आवडतील असे सिद्धांत ग्रंथ लिहावेत आणि मुमुक्षु म्हणजे खरोखरच विरक्त असून विकाराने तो परमार्थ मार्गात शिरला नसला पाहिजे अशाच पद्धतीने ग्रंथ रचना असावी.

ग्रंथ रचनेतील दोष - साधारणपणे ग्रंथरचना करताना १५ दोष सांगितलेले आहेत ते येणेप्रमाणे - ग्रंथ निर्मात्याने हे दोष टाळण्याचा प्रयत्न करावा. बोलण्याचे दोष हे सुलभेने जनकाला सांगितलेले आहेत.

१) पद्यातील प्रयोग गद्यात व गद्यातील प्रयोग पद्यात करणे हा दोष आहे.

२) नाकात बोलणे इत्यादी नाददोष आहे.

३) फार जलद व फार हळू बोलणे हा क्रमदोष आहे.

४) विभक्त्यादिकांचा अतिक्रमदोष आहे.

५) आकांक्षा, योग्यता व सन्निधी यांचा बरोबर उपयोग न करून दुरान्वय असणे ह्याला वाक्यदोष म्हणतात.

६) शब्दाचे दोन अर्थ असणे.

७) जो प्रसिद्ध अर्थ असेल त्याच्या ठिकाणी अभिप्राय न ठेवून अप्रसिद्ध अर्थाच्या ठिकाणी लक्ष ठेवणे ह्याला शक्तिदोष म्हणतात.

८) समान शिष्ट पदाचा उपयोग करणे सामर्थ्यदोष होय.

९) अनधिकाऱ्यालाही भाषण समजू देणे हा गुणदोष असून

१०) अधिकाऱ्याला भाषण समजू न देणे ह्याला प्रसाद दोष म्हणतात.

११) अतिशय मन आकर्षण करून अर्थाकडे लक्ष न जावू देणे हे माधुर्य व ओजाचे दोष होत.

१२) निर्विशेष भाषण करणे अर्थदोष आहे.

१३) अतिग्राम्य किंवा अति मोठे शब्द घालणे उपदेशदोष आहे.

१४) अति हळु किंवा अति जोराने बोलणे याला क्रियादोष असे म्हणतात व

१५) मनातील अर्थ योग्य रीतीने व्यक्त न करता येणे या दोषाला आकांक्षादोष असे म्हटले आहे. या शिवाय अलंकार शास्त्रात आणखी काही दोष सांगितले आहेत. परंतु वरील दोष हे ठळक दोष आहेत व ते आपण टाळलेच पाहिजेत तरच निर्भेळ ग्रंथ निर्मिती होऊ शकेल यात शंका नाही.

**प्रा. नारायण दि. दाभाडकर**
जगदंब महविद्यालय, अचलपूर (शहर) जि. अमरावती.

# धर्म आणि विज्ञान समन्वयाचा श्री. गुलाबराव महाराजांचा प्रयत्न

*बी.ए. सायकॉलॉजी. एम.ए.फिलॉसॉफी पीएच.डी. सायन्स व धर्म बॅचेलर ऑफ जर्नल्याझिम ॲन्ड कम्युनिकेशन १२ शोध निबंध प्रसिद्ध ६ पुस्तके प्रकाशित, प्रणव त्रैमासिक ६८-८२. संपादक ६६-८२ दत्ताबाळ मिशन डिव्हिझन ट्रस्टचे जनरल मॅनेजर, महाराष्ट्र तत्त्वज्ञानविषयक सेक्रेटरी. ३ वर्षे, ज्ञानदूत मासिक संपादक. पी.टी.आय. वार्ताहर कोल्हापूर. परदेश गमन युरोप-आफ्रीका-चायना, कैलास मानस सरोवर यात्रा २ वेळा. साप्ताहिक हिंसवाणी व दैनिक हिंसवाणी संपादक, मौनी विद्यापीठ कार्यकारी मंडळ सदस्य.*

तुम्ही परमार्थाविषयी आंधळे; मी जगाविषयी आंधळा. श्री ज्ञानेश्वर समाधीत डोळे लावून बसले आहेत. मला त्यांनीच माझी पात्रता नसताना शिकवले. कृपाकटाक्षाने निहाळले. अनंत कालात केव्हातरी आणि विपुल पृथ्वीवर कोठेतरी माझे विचार आवडतील, असा कोणीतरी भेटेलच. त्यांचेसाठीच हे शंभरावर ग्रंथ मी रचले आहेत. असे सूर्य प्रकाशाइतके स्वच्छ आत्मज्ञान संपन्न विचार वऱ्हाडातील संत गुलाबराव महाराज यांनी मांडले. १९८१ ला त्यांची जन्मशताब्दी होती. १८८१ ते १९१५ या केवळ ३४ वर्षांच्या काळात शंभराहून अधिक ग्रंथांची रचना करणारा हा ज्ञानी संत अंध होता.

"वसयेचिया गांवा न येता बालपणीच सर्वज्ञतावरि तयाते," असे संतश्रेष्ठ ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटले ते या वऱ्हाडातील थोर अंध संताविषयीच असावे, असे त्यांचे चरित्र व विचार अभ्यासतांना वाटते. ब्रिटिशांच्या गुलामगिरीतील तो काळ. अमरावती जिल्ह्यातील माधान हे खेडे. साक्षरतेचे प्रमाण अत्यल्प. त्या वेळी पाश्चात्य विज्ञानाचा बौद्धिक बडेजाव माजला होता. अशा वेळी त्यातील अपुरेपणा निदर्शनास आणून देण्याचे मोलाचे काम अनेक भारतीय तत्त्वचिंतकांनी केले. त्यात स्वामी विवेकानंद, रामतीर्थ, अरविंद यांचा उल्लेख करावा लागेल. त्याच मालिकेत गुलाबराव महाराजांचा उल्लेख करावा लागतो.

आपल्या लिखाणात गुलाबराव महाराजांनी जे विषय हाताळले आहेत त्याची व्याप्ती फार मोठी आहे. प्लेटो या ग्रीक तत्त्ववेत्यांच्या रिपब्लिकपासून ते डॉ. जगदीशचंद्र बोसांचे वनस्पतीवरील प्रयोगापर्यंत, डार्वीन, स्पेन्सर यांच्या मतांचा परामर्ष, थिऑसॉफी विवेकानंद यांच्या उल्लेखापासून ते ज्योतिष, आयुर्वेदापर्यंत विविध विषयांवर गुलाबराव महाराजांनी केलेले भाष्य तलस्पर्शी मानावे लागेल.

केवळ चौतीस वर्षांच्या आयुष्यात त्यांनी शंभराहून अधिक ग्रंथ निर्मिती केली. आपल्या अलौकिक बुद्धिमत्तेने सूक्ष्मातील सूक्ष्म सिद्धांत स्पष्ट केले. त्याच वेळी पाश्चात्य वैज्ञानिक व तत्त्ववेत्यांचा सडेतोड परामर्षही घेतला. डार्विनच्या उत्क्रांतीवादातील अपुरेपणा, स्पेन्सरच्या अज्ञेयवादातील त्रुटी, मानसशास्त्रातील प्रमेयांचे चुकीचे आधारित सिद्धांत (Hypothesis) अणूवाद, जडवाद या मतांचे सहज, सोपे खंडन. हे सारे ज्ञान भांडार थोडेथोडके नाही. ग्रंथरचना १२७, छापील पाने ६ हजार, २३ हजार ओवी, २ हजारांवर अभंग, तितकीच पदे, हजारांवर गीते, श्लोक या शिवाय आर्या, दोहे, चौणई, सवय्या, चर्णिका वगैरे बऱ्याच वृत्तांत रचना केली आहे. स्वतः नवीन केलेली मात्रावृत्ते १२२ आहेत. ती सर्व चाली, राग व तालयुक्त आहेत. ही वाङ्मय निर्मिती संस्कृत, मराठी, व्रजभाषा व वऱ्हाडी या चार भाषेत आलेली आहे. श्रीगुलाबराव महाराजांच्या ग्रंथांना सुक्ति रत्नावली हे नामाभिमान आहे. अंध असूनही ते सतत परिभ्रमण करीत. आळंदी, पुणे, मुंबई, वृंदावन, काशी, जगन्नाथपुरी, कलकत्ता या ठिकाणी ते जाऊन आले. त्यांच्या वाङ्मयाचा अभ्यास हा स्वतंत्र विषय आहे. त्यांच्या विज्ञानविषयक मतांचा विचार करणे तितकेच महत्त्वाचे वाटते.

निसर्गतःच असामान्य बुद्धिमत्तेचे वरदान श्रीगुलाबराव महाराजांना लाभले हे खरे असले तरी विज्ञानासारख्या विषयातही बाबा वाक्यं प्रमाणम् न मानणाऱ्या या अंध संताच्या स्वतंत्र प्रज्ञेची कल्पना धर्म तत्त्वज्ञानाच्या अभ्यासकाला नवी दृष्टी देणारी आहे.

## गणित विज्ञान

श्रीगुलाबराव महाराज म्हणतात, 'नव्या शिकलेल्या लोकांचे असे म्हणणे आहे की हिंदुस्थानामध्ये परार्धाच्यावर गणित करण्याची रीत नव्हती. पण हे म्हणणे अगदी चुकीचे आहे. परार्ध म्हटल्यानेच दुसऱ्या परसंख्येचे अनुमान होत आहे. पुराणात पर संख्या म्हणून सांगितलीही आहे. ती पुराणे वाचून पहावी. भागवताच्या दशम स्कंधात वासुदेव स्तुतीत 'नव्हे लोके द्विपरार्धावमाने' असे वचन आहे. याप्रमाणे परार्ध पराधीला परसंज्ञा म्हणता येते. येथपर्यंत संख्येला संज्ञित्व आहे. पुढे वौद्धार्थत्व आहे. एकपर, दशपर, परपर इत्यादिकाला आरंभ करून शेवटी तृतीय पर पर पर याला खर्व म्हणता येते.

## सदृश्य गणित

सदृश्य गणिताचे उदाहरण सांगताना श्रीगुलाबराव महाराजांनी भारतीयांच्या कालगणनेचा उल्लेख केला आहे. ते म्हणतात, 'सदृश्य गणिते म्हणजे एखाद्या गोष्टीवरून स्थितीचे अनुमान करणे, याला जड शास्त्रातील उदाहरण देतो व नंतर जुने उदाहरण देतो जसे ध्रुव किती दूर आहे? जर प्रकाश जितक्या वेगाने जातो तितक्या वेगाने तेथे जाण्याला ५० वर्षे लागतात इतका तो दूर आहे. म्हणजे आज जर तो तारा आपल्याला दिसत नाही तर आजपासून ५० वर्षांपूर्वी तो नाहीसा झाला असे समजावे कारण ५० वर्षे त्याच्या प्रकाशाला पृथ्वीवर येण्याला लागतात. कोणी म्हणेल, ध्रुवाच्या ताऱ्याविषयी ही गोष्ट नाही तर कदाचित मला आठवत नसेल पण तसा एक तारा मी English Astronomy त 'नाही' म्हणणाऱ्यांना दाखवून देतो. ते असो. अशा प्रकारची काल गणनेची पद्धत आपल्याकडेही आहे.

## भारतीय कालगणना

भारतीय कालगणना स्पष्ट करण्यासाठी श्रीगुलाबराव महाराजांनी महाभारत शांतीमोक्ष अ. २८१ चा संदर्भ दिला आहे.

*वाप्यं पुनर्योजनविस्तृतास्ताः कोशंच गंभीरतया गाठाः*
*आयामतः पंचशताश्च सर्वाः प्रत्येकशो योजनतः प्रवृद्धा ॥३१॥*
*वाप्या जल क्षिप्याति वालकोत्या त्वन्हासकृष्याण्यथन विंतीयम्*
*तासां भये विविध परं वितर्ग संहारमेकंच तथा प्रजानामं ॥३२॥*

(अर्थ : उत्पत्तिपासून लयापर्यंतच्या सृष्टीच्या कालाला कल्प म्हणतात. तो हजारो विहिरींच्या विस्तारावरून मोजतात. एक योजन खोल व ५०० योजन लांब अशी एक विहीर. अशा हजारो विहिरी कल्पून त्यातून दररोज एकच वेळ केसाच्या टोकाने घेता येईल इतके पाणी काढून त्या कोरड्या करण्याला क्रमाने जितका वेळ लागेल तितक्या दिवसांचा एक कल्प समजावा. अशा तऱ्हेची कालगणना जैन ग्रंथातही लिहिली आहे.)

## प्रकाश द्रव्य आहे का लहरी स्वरूप आहे?

आजच्या विधानातल्या या महत्त्वाच्या प्रश्नावर शंभर वर्षापूर्वी श्रीगुलाबराव महाराजांनी तलस्पर्शी चिंतन केले आहे, भाष्य केले आहे.

भौतिकशास्त्राने (Physics) उष्णता, प्रकाश व विद्युतशक्ती हे तीन वेगवेगळे मानले आहेत. भारतीयांनीही ते वेगवेगळे मानले आहेत. उष्ण स्पर्शग्राह्य, रूप चर्क्षुग्राह्य मानले आहे. रूप हा तेजाचा गुण आहे, असे नैयायिक व वेदांती मानतात व ते तन्मात्ररूप असल्यामुळे द्रव्य आहे. असा सांख्यांचा निष्कर्ष निघतो. तेव्हा सांख्यांच्या मताने रूपाला परमाणु आहेत. प्रकाश हा सर्व रूपांचा मिळून झालेला आहे, असे नवीन विज्ञानामध्ये म्हटले आहे.

न्याय मतात गुणांचा संयोग होत नाही. यामुळे प्रकाशही द्रव्यच अणुसंघटीत असलेच पाहिजे. प्रकाश शुक्ल असतो. या विषयी 'भास्कार शुक्ल तेजसि' हे वाक्य स्पष्टच आहे. आता प्रकाश त्या त्या आकाराचा होत असतो. या विषयी उपदेश साहस्त्रात असे वाक्य आहे की, 'व्यंजकोवा यथालोको व्यग्रस्याकारतामियात'. अर्थ - व्यंजक किंवा अलोक व्यंगाच्या आकाराचा होत असतो. नवीन विज्ञानात प्रकाशाच्या दोन कल्पना आहेत. एक प्रकाश द्रव्य आहे अशी व प्रकाश लहरी आहे अशी दुसरी. परंतु या दोन्ही कल्पनेस परमाणु कल्पनेने सोडलेले नाही. एकात स्थूल द्रव्याची कल्पना आहे व दुसरीत इथरच्या परमाणुची कल्पना आहे. इथरला परमाणु मानल्याशिवाय कंपनच होणार नाही.

इलेक्ट्रॉन थिअरी मांडणारे देखील म्हणतात, एक ॲटम पृथ्वीएवढा केल्यास एक इलेक्ट्रॉन रबराच्या गोळ्याएवढा होईल. तेव्हा ही इलेक्ट्रॉन थिअरी देखील सजातीय ॲटॉमिक थिअरी आहे, असे म्हणण्यास हरकत नाही. वेदांतांचा रुपासंबंधी गुणवाद व सांख्यांचा रूपद्रव्यवाद एकत्र केल्यास परमाणुंचे कंपन प्रकाश सिद्ध होईल. पण या विषयी ग्रंथच लिहिला पाहिजे, असे श्री. गुलाबराव महाराज म्हणतात.

## प्रकाश उलटण्याची कल्पना

श्री. गुलाबराव महाराजांनी प्रकाशाच्या परावर्तनाविषयी म्हटले आहे की, प्रकाश उलटण्याची कल्पना विष्णुपुराणात आहे.

*ये ये मरिचयोर्कस्य प्रयन्ति ब्रह्मणः सभा ।*
*ते ते निरस्तास्तदभासा प्रतीपमुपयाति वै ।*

भावार्थ – जी जी सूर्याची किरणे ब्रह्मसभेकडे जातात ती ती सभेच्या बलवत्प्रकाशाने कुंठीत झाल्यामुळे परतून येतात. यान्ति व प्रतीपमुपयन्ति या दोन पदांवरून प्रकाशाची गतीच किरण परावर्तन Reflection हे आपणाला ठाऊक होते हे सिद्ध होते. न्यायशास्त्रातही प्रभा फैलवण्याविषयी काही नियम आहेत. तमाला अवलोकाभाव न्यायाने स्पष्ट म्हटले आहे व विज्ञानानेही म्हटले आहे. विवरण प्रमेय संग्रहात व न्याय परिपकारादिकांत प्रकाशांची पदार्थावरून उलटण्याची क्रिया प्रतिबिंब प्रक्रियेत दिली आहे आणि काच प्रकाशाला रोध करीत नाही असेही स्पष्ट म्हटले आहे.

'काचादिव्यहितमणि प्रत्यक्ष भवति तस्य प्रकाशरोधकत्वां भावात' वेदांती वायुजन्य तेज आहे, असे म्हणतात. कारणगुण कार्याचे आरंभक होत असल्याने अर्थात प्रकाश उष्णता हे तेजाचे धर्म वायुस्थ वास्तविक कितीही गति वाढवली तरी चाक्षुष प्रकाशरूप परिणाम व त्याचा प्रत्यक्ष उष्णतारूप परिणाम कसा होतो, हे मात्र विज्ञानाला सांगता येत नाही. अन्वय व्यतिरेकाने म्हणता येत नाही. तैजस परमाणुच्या उपाधिमुळे म्हणून गतीचा परिणाम उष्णता व प्रकाश आहे, हे म्हणणे श्रद्धामात्र आहे. विशिष्ट संख्या व गतीने विशिष्ट प्रकाश उत्पन्न होतो असा हेतूही विज्ञानाला देता येत नाही. कारण प्रकाशात गति ही अनुगत रहाते म्हणून शिवाय गति प्रकाशाचा आरंभच आहे, परिणामी आहे का विवर्त आहे हे आधुनिक जडशास्त्रवाद्यांनी सांगितलेच पाहिजे.

विशिष्ट गति प्रकाशाची अभिव्यक्ती करणारी आहे, असे म्हटले म्हणजे झाले.

## सर्व रंग प्रकाशाचेच

विज्ञानामध्ये अशी एक कल्पना केली आहे की, सर्व रंग प्रकाशाचेच आहेत. वेदांतामध्येही अशी कल्पना आहे. जितके म्हणून रूपाचे प्रकार आहेत तेवढे सर्व तेजाचेच आहेत.

विज्ञानामध्ये आणखी एक कल्पना आहे की, प्रकाशाचे किरण पदार्थावर पडले म्हणजे काही किरणांचा त्यात लय होतो व विवक्षित किरण उलटून आपल्याकडे येतात. यावर श्री. गुलाबराव महाराज म्हणतात की, लय द्रव्याचा होतो गुणांचा होतो. द्रव्याचा पदार्थामध्ये लय मानल्यास जितके आपल्या डोक्यावर किरण येतात त्यापेक्षा अनंतपर अधिक द्रव्याचा एका पदार्थात लय झाला पाहिजे व त्यामुळे त्या पदार्थाचे वजन प्रकाशात वाढले पाहिजे व अंधारात कमी झाले पाहिजे. पण तसे का होत नाही. याला विज्ञानाकडे उत्तर नाही !

## परमाणुला वजन आहे?

'प्रत्येक परमाणूला विशिष्ट वजन आहे? हैड्रोजनच्या ॲटमपेक्षा ऑक्सिजनचा ॲटम १६ पट वजनदार आहे, हे सिद्ध होणार कसे? आणि असे झाले नाही तर पाणी म्हणजे $H_2O$ हा रसायनशास्त्राचा नियम कसा सिद्ध होणार? याचे विशेष खंडन न्यायाचे तऱ्हेने विज्ञानावर मी ग्रंथ लिहिल्यास करीन', अशी महाराजांची इच्छा होती.

प्रत्येक परमाणूला वजन आहे हे मानल्यास प्रकाश किरण लयाने पदार्थाचे वजन वाढलेच पाहिजे. आता काही द्रव्य परमाणूला स्वयमच वजन आहे व काही द्रव्य परमाणूला स्वयम वजन नाही हे जे वैशेषिकांचे मत त्याचाच अनुवाद यांनी केला म्हणावयाचा. तेव्हा या प्रमाणे प्रकाशाचा सिद्धांत आपल्या भारतीय पद्धतीने बरोबर सांगता येतो, असे ठाम मत श्री. गुलाबराव महाराजांनी व्यक्त केले आहे.

## धर्म-विज्ञान तुलनात्मक अभ्यास

श्री. गुलाबराव महाराजांनी विज्ञानाच्या विकासाबरोबर विज्ञानातील काही संज्ञा धार्मिक कल्पनांशी जोडण्याच्या एका उथळ प्रकाराची गंभीर दखल घेतली होती. त्याविषयी त्यांनी म्हटले आहे की, अलीकडे आपल्याकडे सायन्स आहे हे दाखवण्याची खोड पुष्कळांना लागली आहे आणि तिचा परिणामही विपरीत झाला आहे. लोक इथरला ब्रह्म समजतात, इलेक्ट्रॉन थिअरीला वेदांत म्हणतात, तर जगदीशचंद्रांच्या रिस्पॉन्स थिअरीला चैतन्य म्हणतात, ही मते दिशाभूल करणारी आहेत.

श्री. गुलाबराव महाराजांची विचारांची दिशा वेगळी आहे. त्यांच्या मते पाश्चात्य विज्ञान हे तंतोतंत संस्कृतचे भाषांतरच आहे हे सिद्ध मी करून दाखवेन पण त्यासाठी सर्व पंडितांनी मदत केली पाहिजे.

तर्कशास्त्राकडे न्यायाचा जोर वाढलाच आहे तो आता द्रव्यगुण निरीक्षणाकडे वाढवावा एवढेच माझे म्हणणे आहे. तंत्रशास्त्र, वैद्यक शास्त्रातील प्रयोग आणि न्याय शास्त्रातील द्रव्य गुणकर्माच्या उत्पत्ति, ज्योतिष पुराणातील गणित, महाभाष्य, कैय्यर यांतील शब्दोत्पत्ति म्हणजे ध्वनीशास्त्र होय. आणखीही उपदेश साहस्त्रीप्रमाणे इतर संस्कृत ग्रंथातील उत्पत्ति मिळून आर्यभूत शास्त्र रचल्यास व कथा सरित्सागरादिकातील व जैन-बुद्ध ग्रंथातील कलावचने त्यात मिसळल्यास पाश्चात्य विज्ञानाचेही मूळ म्हणजे हे शास्त्र होणार आहे असे मी निश्चयाने सांगतो.

रेडियम हे अद्भूत स्पर्शवत आवरज तेज आहे. अशा प्रकारचे तेज नवीन न्याय मतात सांगितले आहे. दुर्घट इत्यादी प्राचीन ग्रंथावरून स्पष्ट नवीन शब्द करावे, अशी आज्ञाही आहे. तेव्हा अर्धवट धार्मिक लोकांनी व नव्या बांड तरुणांनी वैज्ञानिक धर्माची अपेक्षा करण्यापेक्षा वैज्ञानिक वैशेषिक शास्त्राची अपेक्षा करावी, असे श्री. गुलाबराव महाराज म्हणतात.

त्यांच्या मते वैशेषिक शास्त्रात शब्द प्रमाण मानले असून प्रत्यक्ष व अनुमान असे दोनच प्रमाण मानले आहेत. या विषयी कणाद सूत्रावरील प्रशप्र पादभाष्य पहावे. त्या शास्त्राने फिजिक्स तयार करण्याला मोठी सवड दिली आहे. हा माझा लेख सध्या दिग्दर्शन मात्र आहे. या कामाकरिता नागपुरात किंवा कोठे एखादी संस्था स्थापन झाल्यास तिच्या सेवेची लहानशी जागा नियमाने पण प्रकृत्यनुसार पत्करीन अशी श्री. गुलाबराव महाराजांची इच्छा होती.

श्री. गुलाबराव महाराजांनी डॉ. जगदीशचंद्र बोस यांच्या Physilogical Response चा विचार केला होता. इंग्रजी ग्रंथांचा व वेदांताचा मेळ घालावा असे नूतन शिक्षित लोकांना वाटते. डॉ. बोस यांचे संशोधन वाचून अशा लोकांची मजल ऋषींनी शोधलेल्या ब्रह्माची यावरून कल्पना आली, असे म्हणण्या इतपत जाते. ही घाई चुकीची आहे, असे श्री. गुलाबराव महाराज सावध करतात. त्यांनी मन, स्वप्न, विचार, भावना, समूहमन, हिरण्यगर्भ, काल यावर केलेले निरूपण केवळ धर्मप्रवण संताने केलेले कीर्तन वाटत नाही तर आजच्या मानसशास्त्रातही त्याच्या मर्यादा दाखवेल असे आहे. त्यांच्या विवेचनात Human Personality या मायर्स कृत ग्रंथाचा उल्लेख, लंडनमधील तत्कालीन एका वृत्तपत्रातील उतारा सांगून पाश्चात्य देशांत मनोविकृती किती झपाट्याने वाढते, या विषयी खंत व्यक्त केली आहे. विमान विधेवरील त्यांचे सविस्तर भाष्य आहे.

## सारांश

पहिल्या महायुद्धादरम्यानचा हा काळ होता. विज्ञानशाखेच्या पदवीधरालाही ह्या वैज्ञानिक संकल्पनांचा अर्थ सहज आकलन होत नाही. त्या संकल्पना समजणे, त्यांच्या मर्यादा जाणणे हा आवाका केवळ शालेय शिक्षणातून प्राप्त होणाऱ्या बुद्धीच्या माध्यमातला वाटत नाही. बुद्धीपेक्षाही तरल नि सूक्ष्म ज्ञान प्रक्रिया श्री. गुलाबराव महाराजांतून कार्यरत होत असावी. उपजत प्रेरणामय ज्ञान, बुद्धीमय ज्ञान आणि अंतःस्फूर्त ज्ञान या सोपानातील शेवटची पायरी म्हणजे अंतःस्फूर्त ज्ञान म्हणजेच वेबस्टरच्या डिक्शनरीतील अर्थानुसार Sudden Apprehension of an Object without any reasoning process - कोणत्याही तर्कप्रणाली व्यतिरिक्त वस्तूचे साक्षात ज्ञान. धर्म आणि विज्ञानाचा त्यांनी केवळ समन्वयच साधला नाही तर भारतीय परंपरा ही तर्कशुद्ध बुद्धीवादी असून आजच्या विज्ञानाला ती मार्गदर्शक व दिशा देणारी आहे असे ठाम प्रतिपादन त्यांनी केले आहे. या दिशेने धर्म व विज्ञानातील तज्ज्ञांनी अभ्यास करण्याची गरज एकविसाव्या शतकातही तीव्रतेने जाणवते.


**डॉ. सुभाष के. देसाई,** एम.ए.पीएच.डी.
शिवाजी स्टेडियम, कोल्हापूर - ४१६ ०१२.
Email - subhashd@pn3.vsnl.net.in


## रास क्रीडा

गोड गोड बासरीचा, नाद ये कानी । सखे ग नाद ये कानी ।
आपण साऱ्या या जन्मीच्या जाऊ गवळणी ।।धृ.।।
देहाच्या या कुंजवनी, रास मांडियेला । हरीने रास मांडियेला ।
प्रभुने रास मांडियेला ।
अंतरीच्या श्रीरंगाने ताल धरियेला ।
काम, क्रोध, षड्रिपु हे दूर सारोनि । सखे ग दूर सारोनि ।।
एकमेकी दुजा भाव जाऊ विसरोनी ।।
अद्वैताचा फेर धरुनि द्वैताचा टाळ । घेऊ द्वैताची टाळ ।।
प्रेम भराने गीत गाऊनि आळवू गोपाळ ।।
झांजाच्या झंकाराने काया ही फुलली । सखे गं काया ही फुलली ।
चिन्मयरुपी ॐकाराने सृष्टी ही नटली ।।
रुणझुणु घुंगरांचा नाद मंजुळ । येतो नाद मंजुळ ।।
फेरामध्ये उभा राहे सदा घननीळ ।।
गोड गोड बासरीचा नाद ये कानी । सखे गं नाद ये कानी ।।
आपण साऱ्या या जन्मीच्या जाऊ गवळणी ।।

**श्रीमती इंदिरा जोगळेकर**

# समन्वय महर्षी प्रज्ञाचक्षु श्री गुलाबराव महाराज यांचे प्रेमविषयक चिंतन

*एम.ए. फिलॉसॉफी पीएच.डी. फिलॉसॉफी – वैदिक व्हॅल्यूस. बी.एन.एन., कॉलेजमध्ये फिलॉसॉफी डिपार्टमेंट प्रमुख. तत्त्वज्ञान व वेद यांवर लेख प्रकाशित. स्वाध्याय परीवाराशी संबंधित.*

तत्त्वज्ञ संत श्री गुलाबराव यांचे पूर्ण नाव : गुलाबराव गोंदूजी मोहोड. जन्मानंतर चौथ्या महिन्यात त्यांना देवी आल्या व नवव्या महिन्यात ते अंध झाले. चौथ्या वर्षी त्यांच्या मातोश्री अलोकाबाई स्वर्गवासी झाल्या. वडील माधान गावचे पाटील होते; पण आर्थिक दृष्ट्या घरात दारिद्र्यच होते. अवघ्या चौतिस वर्षांच्या आयुष्यात त्यांनी १३० पुस्तके लिहिली. मराठी मातृभाषेबरोबर हिंदी, इंग्रजी व संस्कृत या भाषाही त्यांना अवगत होत्या. महाराजांची प्रज्ञा आद्य शंकराचार्य व ज्ञानेश्वर महाराज यांची आठवण करून देते. न. चिं. केळकर म्हणत, 'महाराजांचे ग्रंथ म्हणजे एक मोठा ज्ञानकोशच.' श्री गुलाबरावांना ग्रंथांचे वेडच होते. त्यांनी अनेक ग्रंथ खरेदी केले व इतरांकडून वाचून घेतले. त्यांच्या लिखाणात अनेक मतांचे खंडन असले तरी समन्वयावर त्यांचा भर होता. म्हणूनच श्री. दत्तोपंत ठेंगडी म्हणतात, 'गुलाबराव महाराजांच्या विलक्षण समन्वय क्षमतेमुळे त्यांना समन्वय महर्षी ही उपाधी देणे उचित ठरेल.'

अद्वैत वेदान्ताच्या आधारे त्यांनी साधन भक्ती व ज्ञानोत्तर भक्ती सांगितलेली आहे. म्हणून त्यांना मधुराद्वैताचार्य असे म्हणतात. ईश्वर हा प्रियकर व भक्त हा प्रेयसी वा पत्नी हा नातेसंबंध सर्वश्रेष्ठ मानून त्यातून साधलेल्या ऐक्यात निखळ आनंद असतो. हीच माधुर्य भक्ती होय. हेच मधुराद्वैत होय. या संदर्भातील सर्वमान्य पौराणिक उदाहरण म्हणजे 'गोपी' होत. आद्य शंकराचार्यांनीसुद्धा श्रीकृष्णाष्टकात गोपींच्या भक्तीभावाचे वर्णन केलेले आहे. मथुरेस दहीदूध विकावयास गेलेल्या गोपी 'दही घ्या, दही...' असे न म्हणता 'गोविंददामोदरमाधवेति' असा नामघोष करीत फिरत. वल्लभाचार्यांनीही 'मधुराष्टकात' 'मधुराधिपतेरखिलं मधुरम्... श्रीकृष्णाचे सर्व काही मधुरच होय. अशा भक्तीत प्रियकराला (कृष्णाला) सुख देणे, हाच एकमेव हेतू असतो. 'वामा भूत्वा यजेत् परम्', असा मधुरा भक्तीचा दंडक आहे. चैतन्य महाप्रभु व श्री गुलाबराव महाराज हे अशा भक्तीची उत्कृष्ट उदाहरणे होत.

महाराज त्यांच्या जीवित कार्याविषयी एका पत्रात लिहितात, 'आर्यांचे म्हणणे योग्य आहे, असे सिद्ध करणे हेच माझे व माझ्या हितचिंतकांचे जीवनकार्य आहे.' म्हणूनच त्यांनी वैदिक संस्कृतीवरील आक्षेपांचा साधार व विद्वत्तापूर्ण प्रतिकार केला. जे जे पुरातन व वैदिक ते ते त्याज्य वा टाकाऊ अशी वृत्ती आंग्ल विधाविभूषितांमध्ये बळावत चालली होती. त्या दृष्टिकोनातून पाहिल्यास महाराजांचे कार्य विशेष उल्लेखनीय आहे. संतश्रेष्ठ तुकाराम महाराज सांगतात :

***आम्ही वैकुंठवासी । आलो याच कारणासाठीं ।***
***बोलिले जे ऋषी । साच भावें वर्ताया ॥***

गुलाबरावांचे प्रचंड कार्य पाहून त्यांच्याकडे याच भूमिकेतून पहावे लागेल. मूर्तीपूजा हा विषय तर टीकेच्या भडिमाराचा विषय झाला होता. सगुणोपासनेतील मूर्ती ही भासमान नसून अनध्यस्तविवर्तवादानुसार ती सत्य आहे, असा दार्शनिक विचार मांडला. त्यांचे चिंतन मौलिक असूनही ते म्हणतात, माझे लिखाण हे ज्ञानेश्वर माऊलीच्या लिखाणावरील भाष्य आहे. त्यांची ही बौद्धिक नम्रताही आजच्या विद्वानांना निश्चितच मार्गदर्शक आहे.

साधुत्व (Sainthood) ही जागतिक बाब आहे. अनेक देशांमध्ये संत होऊन गेले. परंतु तुलनात्मक दृष्ट्या भारतात व भारतीय संदर्भात महाराष्ट्रात मोठ्या प्रमाणावर संत होऊन गेले. संतांच्या ऐतिहासिक कार्याची साधार महती गाणारे आधुनिक काळातील चिंतक व इतिहासतज्ज्ञ म्हणजे न्या. म. गो. रानडे होत. संत हे ईश्वरभक्त असल्यामुळे विश्वभक्त वा विश्वमित्रही असतात. विल्यम जेम्स हा फलवादी अमेरिकन तत्त्वचिंतक व मानस शास्त्रज्ञ म्हणतो की खरा धर्म हा विश्वभक्ती (Cosmic Patriotism) शिकवितो. साधारणतः भक्त हे अधिक भावनाप्रधान असतात. भारतीय सांस्कृतिक परंपरेत श्रद्धेबरोबर बुद्धीला व भावनेबरोबर विवेकाला स्थान दिलेले आहे. बहुतेक भारतीय संतांनी आपली जीवन पद्धती व साधना यांना तात्त्विक बैठक देण्याचा प्रयत्न केलेला आहे. तसेच बहुतेक महाराष्ट्रीय संतांनी भक्तीला अद्वैत वेदान्ताचे अधिष्ठान दिलेले आहे.

श्री गुलाबरावांनीही मधुरा भक्तीच्या मुळाशी अद्वैत वेदान्ताची दार्शनिक भूमिका स्वीकारलेली आहे. प्रस्तुत निबंधात महाराजांच्या प्रेमविषय चिंतनाचे विवेचन करण्याचा प्रयत्न केलेला आहे.

'भक्ती' हा शब्द भज् या धातुपासून निर्माण झालेला आहे. 'भज् सेवायाम्' अर्थात् भज् म्हणजे सेवा करणे. भक्ती म्हणजे प्रेमपूर्वक सेवा. ईश्वर भक्ती म्हणजे ईश्वराविषयीचे प्रेम व ईश्वरसेवा. अर्थात् भक्ती ही प्रेमवृत्ती आहे. नारद लिहितात, 'सा तु प्रेमरूपा अमृतास्वरूपा च ।' ही प्रेमवृत्ती आनंददायी असते. मधुराभक्ती ही ईश्वर प्रेमाची पराकाष्ठा होय. मधुराद्वैताचार्यांनी 'प्रेम' या विषयाचे विवेचन करणे साहजिकच होय. 'अलौकिक व्याख्यानमाला' हा ग्रंथ महाराजांच्या उत्स्फूर्त नऊ व्याख्यानांचा संग्रह आहे. या पुस्तकात त्यांनी 'प्रेम' या विषयावर उद्बोधक व विस्तृत चर्चा केलेली आहे.

या व्याख्यानांची सुरुवात 'मनाच्या' विश्लेषणापासून केलेली आहे. हे विश्लेषण श्रुती, युक्ती व स्वानुभव यांच्या आधारे केलेले आहे. मानवी मन शुद्ध व अशुद्ध असे दोन प्रकारचे असते. अशुद्ध मन हे वासनात्मक वा वासनामय, विकारात्मक असते, देहासक्त असते. शुद्ध मन हे विचारात्मक अर्थात कामनारहित असते. कामनारहित मन हे शाश्वत सुखाचा शोध घेते. मनात प्रेमाचा अंश असतोच. शुद्ध मनात तो व्यापक व उदात्त स्वरूपाचा होतो. असे प्रेम सर्व विश्वावर सारखे होऊन राहू लागते. शाश्वत सुखाची ओढ व प्रेम यांचे उगमस्थान अधिष्ठानरूपी परमेश्वरच

होय. (God is pure love, universal love) या सिद्धांन्तानुसार 'विश्वप्रेम' या तिसऱ्या व्याख्यानात 'संपूर्ण विश्व हे प्रेमबद्ध आहे', असे महाराज सांगतात. हे मन जसजसे अधिकाधिक शुद्ध होत जाते तस तसे प्रेम उदात्त व उन्नत होत जाते. म्हणून महाराजांच्या मते प्रेमाच्या उत्तरोत्तर उन्नत दशा वा अवस्था अनुभवास येतात. अशा आठ प्रेमदशांचे निरूपण त्यांनी केलेले आहे.

१) नैसर्गिक प्रेम वा स्वाभाविक प्रेम (Natural love, self-love)

२) कौटुंबिक प्रेम (Family love)

३) सामाजिक प्रेम (Social love)

४) नैतिक प्रेम (Moral love)

५) राष्ट्रीय प्रेम (National love

६) धार्मिक प्रेम (Religious love)

७) दैविक प्रेम, गूढ प्रेम (Occult love)

८) आध्यात्मिक प्रेम (Philosophical love)

या आठ प्रेमावस्थांसाठी इंग्रजी शब्दप्रयोग त्यांनीच वापरले आहेत. श्री गुलाबराव महाराज म्हणतात, 'प्रेम हा आपला स्वभाव आहे. अर्थात् प्रेम स्वाभाविक आहे. द्वेष मात्र आगंतुक आहे. कोणी कुणाचा द्वेष करीत नाही. शरीराच्या अधीन झाल्यामुळे व विकारात्मक मनामुळे द्वेष उत्पन्न होतो. त्यातून माणूस कपटकारस्थाने करू लागतो. द्वेषाला कारण लागते. कुणी कुणाचा द्वेष करीत असेल तर त्याचे कारण विचारले जाते. उत्तरासाठी आग्रह धरला जातो. द्वेष करणाऱ्याला त्याचे कारण द्यावे लागते.

प्रेम जसे स्वाभाविक तशीच प्रत्येकाला स्वभावतः सुखाची इच्छा असते. ही इच्छा पूर्ण व्हावी असे प्रत्येकाला वाटत असते. ही इच्छा कशी निर्माण होते? दृश्य जगापासून व शरीरापासून अशी इच्छा निर्माण होत नाही. अशा इच्छेची अखेरची तृप्ती वा पूर्ती या भौतिक जगात होईल असे वाटत नाही. अर्थात अशा अमर सुखेच्छाचे अधिष्ठान शुद्ध-आनंदमय व प्रेममय सत्ता असली पाहिजे. म्हणूनच अद्वैत वेदान्तात जीवात्म्याच्या खऱ्या स्वरूपाविषयी सांगतात : चिदानंदरूपः शिवोऽहम् शिवोऽहम् । अंतिम व अधिष्ठानरूप आनंदमय व प्रेममय सत्तेच्या स्वरूपापर्यंत पोहोचण्यासाठी अर्थात त्या सत्तेचा अपरोक्ष अनुभव घेण्यासाठी 'प्रेमाचे' उत्तरोत्तर श्रेष्ठ आविष्कार (वा अवस्था) अनुभवले पाहिजेत. संकुचित व स्वार्थी प्रेम हळूहळू व्यापक व कामनारहित करता आले पाहिजे. तसे करता येते. म्हणून महाराजांनी प्रेमाच्या उत्तरोत्तर उन्नत दशा प्रतिपादिलेल्या आहेत.

नैसर्गिक प्रेमापासून (Natural Love) प्रत्येकाच्या जीवनात प्रेमाविष्कार सुरू होतो. प्रत्येकजण स्वतःवर प्रेम करतो. हे प्रेम देहापुरते असते व देहापुरतेच व्यक्त होते. (अलौकिक व्याख्याने पान ४४) एवढेच नव्हे तर जड समजल्या जाणाऱ्या वस्तुंमध्येसुद्धा संवेदना असून त्यांनाही आवडी-निवडी आहेत. अनुकूल वस्तू घेणे व प्रतिकूल वस्तू सोडणे अशी प्रकृती सर्वाठायी दिसून येते. बाबू जगदीशचंद्र बोस यांनी जड चेतन संवेदना (Response in living & non-living) या ग्रंथात तसे नमूद केले आहे. (तत्रैव पान ४५) अनुकूल परिस्थितीत एखादी गोष्ट वाढते व प्रतिकूल परिस्थितीत ती क्षय पावते. अर्थात् परिस्थितीच्या अनुकूलतेची व प्रतिकूलतेची संवेदना सर्वत्र दिसून येते. महाराज लिहितात, जड पदार्थातही प्रेम असते.... पण हे प्रेम अनुमेय असते. उपाधीद्वारा ते व्यक्त होते. जड पदार्थात अन्तःकरण सामान्य असल्यामुळे प्रेमही त्याच मानाने अभिव्यक्त होते. द्वेष म्हणून जो आम्ही म्हणतो तो देखील आपल्या प्रेमास दुसऱ्या पदार्थाचा अडथळा होऊ नये, इतक्याच पुरता असतो. म्हणजे द्वेष प्रेममूलकच आहे. (तत्रैव पान नं. ४७). हा एक प्रकारचा सर्वमानसवादच (panpsychism) आहे.

मी व माझे म्हणणारा माणूस त्याची देहबुद्धी प्रभावी असलेला मानव असतो. स्वप्रेमाहून श्रेष्ठ असे कुटुंब प्रेम (Family Love) होय. स्वतःचे आईवडील, बंधू, भगिनी, पत्नी, पुत्र इत्यादींविषयी माणसात प्रेम वाढू लागते. रक्ताचे नाते प्रबळ असते. त्यामुळे व आत्मीयजनांच्या उपयुक्ततेमुळे कुटुंबीजनांविषयी आत्मीयता व आपुलकी वाढते. परंतु उपयुक्ततेच्या तत्त्वामुळे (Principle of utility) हे प्रेमही स्वार्थयुक्त असते. परस्परांच्या सहकारामुळे हे प्रेम केवळ स्व-प्रेमापेक्षा श्रेष्ठ होय. बालकांना आईवडील व आप्तजनांची वा पालकांची आवश्यकता असते.

त्यांच्या आपुलकीमुळे व सहकार्यामुळे प्रत्येक माणूस लहानाचा मोठा होतो. आत्मीय साहचर्यामुळे त्याचा भाषिक विकास होतो. अशा कुटुंबांचा समाज बनतो. साहजिकच कौटुंबिक प्रेमाची परिणती सामाजिक प्रेमात (Social Love) होते. शेजाऱ्यांविषयी आत्मीयता वाढू लागते. समाजातील माणसे परस्परांच्या उपयोगी पडतात. इथेही उपयुक्ततेचा विचार प्रभावी होत जातो. खरे तर माणूस समाजशील प्राणी असल्यामुळे त्याला इतरांची गरज भासते. काही मूल्यांचे सामाजीकरण झालेले असते. ही मूल्ये समाजाकडून कुटुंब संस्थेद्वारा व्यक्तीस मिळतात. आपल्या समाजाविषयी आपुलकी वाटू लागते. मूल्ये आत्मसात करीत असताना अनेक प्रसंगांना तोंड द्यावे लागते. समाजात चांगली व वाईट, सदाचारी व दुराचारी अशी माणसे आढळतात. अशा वेळी गुणवंत, विवेकी व चारित्र्यसंपन्न व सदाचारी माणसांविषयी अधिक आकर्षण व अधिक आदर वाटू लागतो. दुष्ट प्रवृत्तींच्या माणसांविषयीचा आदर कमी होतो. हीच गुणपूजा होय. इथे नैतिक गुणवत्तेनुसार प्रेम व आदर करण्यावर भर असतो. या प्रेमास नैतिक प्रेम (Moral Love) म्हणतात. सज्जनांना साथ द्यावी, त्यांची बाजू घ्यावी, त्यांचे रक्षण करावे यासारखे विचार प्रबळ होतात. सर्व माणसे माणूस या नात्याने सारखी असली तरी त्यांच्यात चारित्र्य, गुणवत्ता व सद्‌वर्तन या संदर्भात फरक असतात. अर्थात् कर्तव्यनिष्ठा, त्याग, चारित्र्य, विचारनिष्ठा इत्यादींना अधिक महत्त्व दिले जाते. अशा निष्ठावान व शीलवान व्यक्तींविषयी अधिक प्रेमादर वाटू लागतो. प्लेटो हा प्रसिद्ध ग्रीक तत्त्वज्ञ म्हणतो : It is love of what is just whether it happens to be done by himself or another. (T of I, sacred space column, P. 10 dt. 9-7-2001)

असे असले तरी समाजशील माणसाला समाजनिष्ठ रहावेच लागते. सामाजिक मानदंडांची दखल घ्यावी लागते. आपला समाज, आपली भूमी, आपला समान इतिहास व ऐतिहासिक राष्ट्रपुरुष, आपले राष्ट्रीय मानबिंदू यांच्यामुळे राष्ट्रीय प्रेम वा राष्ट्रप्रेम (National Love) वाढीस लागते. हे प्रेम बहुधा सामाजिक प्रेमावर अवलंबून असते. विशिष्ट भूभागावरील विशिष्ट परंपरेने एखादा मानवसमूह बांधलेला असतो. आपल्यावर परकीय मानवसमूहाचे वा परदेशी लोकांचे राज्य का असावे? आपली भूमी वा राष्ट्र स्वतंत्र असावे. अशा प्रकारे राष्ट्रप्रेम व्यक्त होवू लागते. अर्थात् ही राष्ट्रनिष्ठा इतरांविषयीच्या द्वेषातून उत्पन्न होता कामा नये. राष्ट्रभक्तीच्या

(Patriotism) भावनेतून अनेक देशभक्तांनी देशासाठी प्रचंड त्याग केलेला आहे. त्यांच्याविषयी व त्यांच्या कार्याविषयी कृतज्ञतेतून आदर वाटला पाहिजे. त्यांच्याविषयीचे प्रेम व्यापक स्वरूपाचे असते. त्यामुळे राष्ट्रीय समस्यांना वा हितसंबंधांना प्राधान्य दिले जाते.

अर्थात् राष्ट्राचा विचार करीत असताना राष्ट्रोन्नतीचा, राष्ट्रीय ऐक्याचा विचार करावा लागतो. त्यासाठी शिस्त व कर्तव्यनिष्ठा हवी. कायद्याने माणसे सुधारत नाहीत. लौकिक कायदे शब्दांवर व बाह्य गोष्टींवर, दृश्य वर्तनावर भर देतात. असे कायदे आवश्यक असले तरी केवळ त्यांच्या आधारे समाजस्वास्थ्य व राष्ट्रोन्नती साधता येत नाही. आजकाल गर्भपात केले जातात. त्यात ऐंशी टक्क्यांच्या वर होणारी अपत्ये मुली असतात. गर्भपातविरोधी कायदा आहे, तरी हे घडत आहे. सध्याच्या शासनाने असे गर्भपात रोखण्यासाठी असलेला कायदा कमी पडतो, असे मान्य करून काही दिवसांपूर्वी विविध धर्मार्तंडांना वा धार्मिक नेत्यांना पाचारण केले होते. या संदर्भात धर्मातील पापपुण्याचा व त्यांच्या परिणामांविषयीचा धार्मिक विचार श्रेष्ठ ठरतो. ही व्यक्तीगत धार्मिक श्रद्धेची बाब आहे. धार्मिक प्रेम (Religious Love) असल्याशिवाय केवळ कायदे करून गर्भपातासारख्या गोष्टींना आळा घालता येणार नाही. धर्मानुसार पापाची दुःखात्मक फळे व पुण्याची सुखात्मक फळे कोणालाही टाळता येत नाहीत. अशा प्रकारच्या सिद्धान्तावर विश्वास असल्याशिवाय स्वतःहून माणसे खऱ्या नैतिक आचरणाला प्रवृत्त होत नाहीत. म्हणून महाराज म्हणतात : मानवाची वाटचाल धार्मिक प्रेमाकडे व्हायला हवी. प्रत्येक धर्मात दानधर्म शिकविलेला आहे. "धार्मिक प्रेम असेल तर इतरांच्या उन्नतीसाठी दानादि सत्कर्मे करण्याकडे प्रवृत्ती वाढते. बिघडलेल्या लोकांची उपेक्षा करण्यापेक्षा त्यांच्या उत्कर्षाचाही धार्मिक सज्जन विचार करू लागतात. हेच खरे धार्मिक प्रेम होय." (तत्रैव पान ५३).

एवढेच नव्हे तर धर्म हा जन्मजन्मांतराचा संबंध शिकवितो. यातून ऋणानुबंधाची कल्पना आली व हिंदू धर्मात श्राद्धाची कल्पना आली. या धर्म प्रेमातून धार्मिक गुरु-शिष्य प्रेम, धार्मिक पातिव्रत्य, धार्मिक मातृ-पितृ भक्ती वाढीस लागतात. म्हणूनच 'पितृकार्य' हे महत्त्वाचे मानले गेले. परंतु हे धर्मप्रेमातून व्हायला हवे. महाराज म्हणतात, धर्मप्रेम जसजसे दृढ होत जाते तसतसा माणूस दैविक प्रेमाकडे, गूढ प्रेमाकडे (Occult Love) (तत्रैव पान ५५) विकसित होत जातो. कोणाचिये सत्ते चाले हे शरीर? असे मूलभूत अस्तित्वलक्षी प्रश्न उद्‌भवतात. कोणत्या शक्तीमुळे सर्व इंद्रिये कार्यरत होतात? अशा प्रश्नांच्या चिंतनातून दैवी शक्तीविषयी प्रेम उत्पन्न होते. महाराज म्हणतात, एवढेच नव्हे तर देव, देवता व मनुष्य यांच्यात देवाण-घेवाण सुरू होते. (तत्रैव पान ५५). अदृश्य तत्त्वे व संबंध यांच्यावर श्रद्धा असल्याशिवाय धार्मिक व दैविक प्रेम विकसित होत नाही. म्हणूनच उपनिषदे सांगतात, श्रद्धया देयम्. महाराज म्हणतात, धार्मिक व दैविक प्रेमातून मरणाचे भय नाहीसे होते. (तत्रैव पान ५६). या गोष्टी सिद्ध करण्यासाठी श्री गुलाबरावांनी शास्त्रीय ग्रंथांबरोबर स्वप्नासारख्या अनुभवांचाही आधार घेतलेला आहे.

प्रेमवृत्ती अशीच विकसित होत जाते, व्यापक व दृढ होत जाते. हळूहळू अहंकार लोप पावू लागतो. प्रेम व प्रेमाला जाणणारा साक्षी एकच होतो. मी व तू हा भेद नाहीसा होतो. प्रेम करणारा प्रेममय होतो. त्याची कोणतीही अपेक्षा रहात नाही. कोणताही भेदभाव उरत नाही. अशा शुद्ध नि निर्हेतुक प्रेमास श्री गुलाबराव महाराज 'आध्यात्मिक प्रेम' (Philosophical Love) म्हणतात. फिलॉसॉफी या शब्दाचा व्युत्पत्त्यर्थ आहे Love of Wisdom (अंतिम सत्तेचे ज्ञान). It is prue love of ultimate Truth. आध्यात्मिक प्रेमाची प्राप्ती म्हणजेच प्रेमाचे शिखर होय. या स्थितीला वा अवस्थेला पोहोचलेला साधक अक्षय व शाश्वत सुख प्राप्त करतो. या साधनेच्या द्वारे साधकाबरोबर जगाचेही कल्याणच होते. ग्रीक तत्त्वचिंतनात व पुढील युरोपियन धर्मचिंतनात 'Agape' (प्रेम) अशी कल्पना आलेली आहे. अगेपूची व्याख्या फारच उद्‌बोधक आहे. Agape is sportaneous self - giving love expressed freely without calculation of cost or gain to the giver.

असे उत्तरोत्तर श्रेष्ठ प्रेम वा उदात्त प्रेमवृत्ती कशाच्या आधारे विकसित होऊ शकते? त्याचे दार्शनिक अधिष्ठान **चिदद्वैत** (Spiritual Non-dualism) होय. अंतिम सत्ता एक असून चिदानंद प्रेमस्वरूप आहे. भक्तीच्या माध्यमातून साधकाचा आध्यात्मिक प्रवास अखेर आनंद प्रेमस्वरूपी ईश्यरानुभूतीत होतो. महाराज म्हणतात, ह्यामुळे सर्व जगच त्याला (भक्ताला) प्रेममय वाटू लागते. हीच उत्तम भक्ती होय (तत्रैव पान नं. १०९) अधिष्ठानरूप परमेश्वर प्रेममय असल्यामुळे व 'शिवो भूत्वा शिवं यजेत्' या न्यायाने साधकाने वा भक्ताने प्रेमवृत्ती अधिकाधिक विकसित करून या प्रेमातून समर्पण व निष्कामतेतून कर्तव्य कर्म व लोकोपयोगी सत्कार्य करावयास हवे. त्यासाठी समजून-उमजून व प्रामाणिकपणे सगुणोपासनाही करावयास हवी. तसे केल्यास विश्व हे भगवंताची मूर्ती ठरते. भागवत सांगते, ***सर्व विष्णुमयं जगत् ।*** या विधानाची प्रचीती येऊ लागते. प्रेमातून विश्वाची सेवा घडू लागते. ही भक्ती आनंदरूप असते, भीतीही प्रलोभन व कामनारहित असते. शुद्ध प्रेम हेच तिची प्रेरणा असते. या भक्तीची परिणती मधुराद्वैत भक्तीत होते. म्हणूनच नारदमुनी भक्तिसूत्रात म्हणतात, ***सा तु प्रेमरूपा अमृतस्वरूपाच ।***

विवेकी माणूस नैसर्गिक स्वप्रेमातून सुरुवात करतो व विकसित प्रेमवृत्ती उत्तरोत्तर आत्मसात करतो. तसे न केल्यास अतिरेकी नैसर्गिक प्रेम नि कौटुंबिक प्रेम सामाजिक, राष्ट्रीय व नैतिक प्रेमाच्या आड येते. त्याचा आत्मविकास खुंटतो. विचारी माणूस उत्तरोत्तर श्रेष्ठ प्रेमवृत्ती संपादन करण्याचा प्रयत्न करतो. अंतिम सत्ता (ontological Truth) ब्रह्म (आत्मा, ईश्वर) सच्चिदानंद रूप असेल तर अंतिम प्राप्तव्य हे या सत्तेचा व सत्याचा साक्षात् अनुभव घेणे, हेच ठरते. अंतिम सत्ता हेच अंतिम (Absolute Value) जीवन मूल्य होय. What is truly and ultimately real is truly and absolutely good.

साधक जसजसा देहबुद्धी विसरून आत्मबुद्धीकडे आध्यात्मिक प्रवास करू लागतो, तसतसा तो मनाने उदार, व्यापक, उदात्त, निःस्वार्थी, संवेदनक्षम, भावनाशील, विकासशील व नैतिकदृष्ट्या सबळ बनत जातो अर्थात त्याचे नैतिक धैर्य वाढत जाते. निष्काम कर्म हे शुष्क कार्य न राहता त्यात भावभक्तीचा ओलावा येवू लागतो. परमेश्वर सर्वत्र व सर्वाठायी असल्यामुळे असा साधक वा भक्त निष्क्रिय राहू शकत नाही. श्री. गुलाबराव महाराज सांगतात, आपण सर्व एकाच ठिकाणचे आहोत व एकाच ठिकाणी जाणार; असे आपणास वाटले तर मग परस्परातील प्रेमाला पारावारच राहणार नाही. (तत्रैव पान ३३). त्याही पुढे जाऊन महाराज लिहितात, प्रेमवृद्धीसाठी अद्वैताची बैठक स्वीकारून मैत्री, करुणा,

मुदिता व उपेक्षा या भावना आत्मसात केल्या पाहिजेत. (तत्रैव पान ४०). प्रेमाने व वरील भावनाचतुष्टय प्राप्त केल्याने मन शुद्ध होत जाते.

सर्वाठायी असलेल्या परमेश्वराच्या जाणीवेतून भक्ताची मानवसेवा व भूतदया होत असल्यामुळे ती समाजसेवा (Social Work) न राहता ईश्वरसेवाच ठरते. अर्थात असा ईश्वरभक्त विश्वभक्त व मानवमित्र बनतो. त्याची प्रेमवृत्ती अधिकाधिक दृढ होत जाते. प्रेम निर्मळ, निरपेक्ष व व्यापक होत जाते. ***विश्वातील सर्व शरीरे ही ईश्वराची घरे*** (रामदास स्वामी) व ***जे जे भेटे भूत ते ते मानिजे*** भगवंत (ज्ञानेश्वर महाराज) अशा भक्तियोगाद्वारे भक्ताचे अन्तःकरण संपूर्णतः प्रेममय होते. या पुढील अवस्थेत काय होते? या विषयी महाराज श्री गुलाबराव लिहितात, सर्व जगच प्रेममय आहे, अशी अनुभूती भक्तास येते. 'स्वमत निर्णय' या एकशे बारा श्लोकी संस्कृत ग्रंथातील ८९ श्लोकात ते लिहितात :

***शुद्ध निष्काममक्तेसु न फलं हरिदर्शनम्***
***फलं हरिमयं चित्तं इति स्वमत निर्णयः ।***

प्रेमवृत्तीने चित्तच हरिमय होते व शेवटी सर्वच हरिमय व प्रेममय आहे, असे अनुभवास येते. अद्वैताच्या अर्थात चिद्‌द्वैताच्या दार्शनिक बैठकीवर महाराज ज्ञानोत्तर भक्तीचा विचार मांडतात व मधुरा भक्तीचे प्रतिपादन करतात. श्री. गुलाबराव महाराजांचे प्रेमविषयक चिंतन सर्वांनाच उद्‌बोधक ठरेल, असे आहे.

प्रस्तुत निबंध महाराष्ट्र तत्त्वज्ञान परिषदेच्या १८ व्या अधिवेशनात (नागपूर विद्यापीठात) सादर केलेला आहे.

**डॉ. साहेबराव गेणू निगळ**
तत्त्वज्ञान विद्यापीठ, ठाणे - ४००६०७.

# श्रीगुलाबरावमहाराजांचे काव्य - 'पत्नीप्रेमपराग'

*शिक्षण – काव्यतीर्थ एम.ए. (संस्कृत) पीएच.डी. नागपूर विद्यापीठातून प्राध्यापक म्हणून निवृत्त. नागपूर येथील 'प्रज्ञालोक' मासिकाचे अनेक वर्षे संपादक. 'शतपथ' या दुर्मिळ ग्रंथावर संशोधन व लेखन. विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक अंकामधून लेखन. गीता रहस्य संस्कृत भाषांतर, कण्व संहिता संशोधन व संपादन.*

## मनकर्णिके प्रिये ग. . . .

वऱ्हाडातील प्रसिद्ध संत विभूति श्रीगुलाबराव महाराज यांचे इहजीवन अवघे चौतीस वर्षांचे. जीवननिवृत्तीच्या सात-आठ वर्ष अगोदर त्यांच्या सहधर्मचारिणी सौ. मनकर्णिका आई निवर्तल्या. बाळपणी मातृवियोग, तारुण्यात पत्नीविरह व म्हातारपणी पुत्रनिधन हा व्यावहारिक दुःखाचा त्रिशूळच. परंतु या व्यावहारिक दृष्टीनेच केवळ श्रीमहाराजांच्या जीवनातील पत्नीवियोगाच्या या प्रसंगाकडे पाहता येत नाही. सौ. मनकर्णिका आईचे श्रीगुलाबरावमहाराजांच्या जीवनात केवळ पत्नी म्हणूनच नव्हे; तर परमार्थसाधनातील शिष्या म्हणून स्वतंत्र स्थान होते. अगदी वटमरणाच्या दिवशी आपण संसारसुखाऐवजी परमार्थसंपादनासाठीच दांपत्यजीवन जगू अशी प्रतिज्ञा श्रीमहाराजांनी त्यांच्याकडून घेवविली व ती त्यांनी घेतली होती. नर्मविनोदाच्या वेळेलाही दिलेला शब्द त्यांनी अखेरपर्यंत पाळावा यातच मनकर्णिकाआईचे लोकोत्तरत्व प्रत्ययाला येते. ही गोष्ट अर्थातच सोपी नव्हती. दांपत्यजीवन किंवा गृहजीवन म्हणजे उघड उघडच अर्थकामांना सांगाती घेऊन असणारा आश्रम. त्यापूर्वीचे किंवा नंतरचे मिळून सारे आश्रम केवळ धर्मसाधनेसाठी आहेत. हाच आश्रम त्याला अपवाद. ''धर्मेचार्थे च कामेच नातिचरामि' अशी देवब्राह्मणांच्या साक्षीने आणभाक घेतल्याशिवाय कन्यादानाचा विधि पूर्णच होत नाही. 'त्रिवर्ग इति तु स्थितिः' हे भगवान् मनुचे वचन याच आश्रमाला खरे खुरे लागू पडते. या त्रिवर्गातही धर्माला मागे टाकून अर्थकामच पुढारी होतात हा सर्वांचा अनुभव. अशा स्थितीत पंधरा-सोळा वर्षांची एक कोवळी पोर आपल्या अंध पतीजवळ त्यांचे अलौकिकत्व ओळखते नि घर-दार-माया-ममता या सर्वांचे निंबलोण ओवाळून पतीला शुश्रुसेवेचे अभिवचन देऊन 'गृहमार्जनी' होण्यात भूषण मानते ही गोष्ट लहान कशी? पत्नीचा हा शुद्धभाव आठवूनच तिच्या चिरनिवृत्तिप्रसंगी महाराजांचे करूणाकोमल मन जर विरहगीताचे सूर आळवू लागले तर त्यात नवल काय?

## लोकोत्तराणां चेतांसि

मृत्यूपूर्वी मनकर्णिका आई काही दिवस आजारी होत्या. त्यांच्या औषधपाण्याची व्यवस्था महाराजांनी आपले एक एकान्तशिष्य श्री. नानाजी कविमण्डन यांच्याकडे दिली. पत्नी जाणार हे महाराजांना कळून आले. म्हणूनच 'ही मेली तरी मी जबाबदार नाही' असे ते श्री. नानाजी कविमंडन यांच्याजवळ बोलले. पत्नी विषयीच्या या त्रयस्थ, तुटक नि तुसड्या उद्‌गारांचा आडोसा करून तिच्याविषयी कळवळणारे व तिच्या विरहाने कण्हणारे एक सहृदय कविमन लपले असावे याची बिचाऱ्या भोवतालच्या लोकांना काय कल्पना? सीता परित्याग करणाऱ्या रामाने अश्वमेध यज्ञ केला हे वासंती नावाच्या सीतेच्या मैत्रिणीला कळले. यज्ञ दोघांनी मिळून करावयाचा असतो हे तिला ठाऊक होते. श्रीरामाने दुसरे लग्न केले असावे असा तिने कयास बांधला. परंतु श्रीरामाने सीतेच्या सुवर्णमय प्रतिमेला बरोबर घेऊन – शेजारी ठेवून - यज्ञ पार पाडला. हे कळताच ती चकित झाली आणि भवभूतीच्या उत्तरराम चरितात म्हणाली –

*''लोकोत्तराणां चेतांसि*
*को हि विज्ञातुमर्हति''*

मोठ्यांच्या मनाचा ठाव कळणे हे खरोखरच कठीण. म्हणूनच, ''ती मेली तरी मी जबाबदार नाही'' असे चमत्कारिक उद्‌गार काढणारे हृदयच कंठ मोकळा करून

*'मनकर्णिके प्रिये ग, तुजलागि जीव फार तळमळतो'*

असे म्हणून विव्हळू लागले यात आश्चर्य मानता येत नाही.

## प्रेमाचे पूर्णाद्वैत पत्नीप्रेम

श्रीमहाराजांचे हे विरहगीत एकूण तेरा-चौदा आर्यांचे – म्हणजे, फार मोठे नव्हे. असली विरहगीते किंवा अधिक योग्य शब्द वापरावयाचा झाल्यास, विलापगीते एकूण जगाच्या वाङ्‌मयात कमीच आहेत. टेनिसन, कीट्स किंवा शेले यांची गाजलेली विलापकाव्ये मित्रप्रेमावर आधारली आहेत. मित्रप्रेम हे कितीही झाले तरी प्रेमाचे 'विशिष्टाद्वैतच'. 'अद्वैतं सुखदुःखयोः' अशा स्वरूपाच्या कान्तकान्तेच्या पूर्ण अद्वैत प्रेमाची त्याला कधी तरी सर येईल असे वाटत नाही. दोन मित्र केवळ व्यवहाराच्या पातळीवर बांधले असतात. वेदान्ताचा पारिभाषिक शब्द वापरावयाचा झाल्यास त्या प्रेमाला केवळ 'व्यावहारिक सत्ता' असते असे म्हणता येईल. पतिपत्नी प्रेमाला व्यावहारिक सत्तेबरोबर 'पारमार्थिक सत्ते'चीही जोड मिळालेली असते. व्यवहार परमार्थ अशा सर्वच बाबतीत आदर्श पतिपत्नीचा जीव एकमेकांत गुंतून पडलेला असतो. त्यामुळे या जोडीपैकी काळाने कोणाही एकाला ओढून नेले तरी दुसऱ्याची प्राणबंधने तटातट तुटू पाहतात. मरण एकाचे ओढवले तरी जीवन दुसऱ्याचे हरवले असते. काळाने एकाचा घात केला तरी पातक मात्र दोघांच्या हत्येचे त्याच्या माथी वसत असावे ! त्या दृष्टीने इन्दुमतीच्या आकस्मिक निधन प्रसंगीचे ''वपुषा करणोज्झितेन सा निपतन्ती पतिमप्यपातयत्'' हे कालिदासाचे उद्‌गार अकृत्रिम वाटतात. असली पत्नीविषयक विलाप गीते मराठीतही फारशी आढळत नाहीत. मराठीत श्री. लेंभे यांचे 'शोकावर्त', डॉ. कीर्तिकरांचे 'विधुलहरी'; पतिविलाप अशी काही मोजकी उदाहरणे सोडली तर पत्नीप्रेमाचे दर्शन घडविणारे विलापकाव्यच नाही असे म्हटले तरी चालेल. केवळ संख्येनेच नव्हेत तर ती गुणांनी देखील मोठी नाहीत. त्या मानाने हिंदीतील हरिवंशराय बच्चन यांच्या विलाप कविता सरस आहेत. हरिवंशराय बच्चन म्हणजे 'प्रसाद, निराला व पंत' ही हिंदीतील बृहत्‌त्रयी व अंचल, नरेंद्र व सुमन ही लघुत्रयी यांना सांधणारा दुवा. असल्या ख्यातनाम कवीच्या कृती ह्या

राहणारच. त्यातही 'श्यामारानी रोगकी शय्यापर' या कवितेपेक्षा 'मैं, तुम्हे पत्नी समझ पाया गया था, खेल की तुम थी सहेली' हे गीत मनाला अधिक हलविते. तरीही हे कवीचे खिन्न मनाचे उसासे आहेत. होरपळून निघत असलेल्या जीवाचा आक्रोश किंवा आक्रन्द त्यात नाही. तो संस्कृतात कालिदासाच्या अजविलापात आढळतो. कालिदासाची रघुवंशातील आठव्या सर्गातील अप्रतिम विलापवचने हृदयाचा अन्तस्तल खरोखरच ढवळून टाकतात. परंतु तिथे शोक करणारा अज आहे हे विसरता येत नाही. तो राजा असला तरी अगदी हळवा होता. आपल्या वडिलांना त्याने राजधानीजवळच एका आश्रमात ठेवून घेऊन तिथेच त्यांना यतिचर्या पाळावयास लावली. कुटुंबातील सारी मंडळी आपल्या दृष्टीपुढून कुठे हलू नयेत ही त्याची भावना. अगदी पित्याप्रमाणे तो होता – असे कालिदासाने वर्णन केले असले तरी रघुराजा तरी अजाइतका हळुवार मनाचा असेल असे वाटत नाही. ज्या बागेत इन्दुमतीचे निधन झाले तिथेच तो तिचे और्ध्वदेहिक होईपर्यंत थांबला. अत्यंत विरहदुःखाने व त्यामुळेच अनेक रोगांनी त्याचे शरीर पुढे जर्जर करून सोडले. शेवटी प्रायोवेशन करून त्याने आपली काया गंगासरयूच्या संगमात अर्पण करून इन्दुमतीच्या चिरमीलनासाठी नन्दनवनाची वाट धरली. प्रियतमेच्या आकस्मिक मृत्यूची कुऱ्हाड कोसळल्याने इतक्या कोमल मनाची काय दारूण अवस्था झाली असेल हे त्याचे त्यालाच माहीत. कवि कालिदासाला अजराजाचा त्या प्रसंगीचा मनोवेध फारच अचूक घेता आला हे मात्र निश्चित !

## श्रीगुलाबरावमहाराजांची भूमिका

श्रीगुलाबरावमहाराजांची भूमिका वेगळी. ती अजराजाइतकी शोकविवश कशी असू शकेल? "जन्मोजन्मि अंधचि करि मज तुटाया विषयधंदा."

*"और किसे नहि मानोगी ।*
*संत संगते राग रंग यह विषयसुख नहि जानूंगी ॥"*

असे श्रीहरीला विनवून संसाराच्या अंगणात संत मीराबाईप्रमाणे "बांध बांध घूंगरू मैं नाचूंगी" असे म्हणत - भक्तीच्या धुंदीत रात्रीचाही दिवस करीत श्रीगुलाबराव महाराज –

*"और दर्शन दीखत नहि कछु ।*
*श्यामहि श्याम दिसे ॥"*

अशी अनुभूतिसुधा पीत भजनसमाधीत मग्न असत. अशा संतपुरुषाने जनसाधारणाची भूमिका घेऊन आपल्या पत्नीसाठी कविमनाने चितारलेले प्रियपत्नीप्रेमपरागासारखे विलापकाव्य मराठी वाङ्मयात तरी दुसरे असेल असे वाटत नाही. म्हणूनच हे काव्य वाचीत असता मर्यादापुरुषोत्तम भगवान् श्रीरामाच्या सीताविरहगाथेची आठवण होते.

श्रीमहाराजांनाही ती तशीच होत असावी असे दिसते - कारण, या काव्यातच ते म्हणतात –

*"रामहि जानकि शोधी कोठुनि मग मी विरक्त तद्वास"*

## करुणाविलासाशी साम्य

काही ठिकाणी या काव्यात जगन्नाथपंडितांच्या करुणाविलास काव्याची अर्थच्छटा उमटलेली दिसते.

**करुणाविलास** — **पत्नीप्रेमपराग**

*१) सर्वेऽपि विस्मृतिपथं विषयाः प्रयाताः ।*
*विद्याऽपि खेदगलिता विमुखीबभूव ।*

*१) अवघे विषय विसरलो*
*विद्याही मिळविली स्मरे ना, गे ।*

*२) धृत्वा पदस्खलनभीतिवशात् करं मे ।*
*यारूढवत्यसि शिलाशकलं विवाहे ॥*
*सा मां विहाय कथमद्य विलासिनि द्याम् ।*
*आरोहसीति हृदयं शतधा प्रयाति ॥*

*२) लाजत मराळ होते तव गतिला*
*कुंभिनीवरी असता ।*
*एवढि सुकुमार कशी एकट*
*चढलीस पूर्णपद रस्ता ॥*

*३) स्वप्नान्तरेऽपि खलु भामिनि पत्युरन्यं ।*
*या दृष्टवत्यसि न कञ्चन साभिलाषम् ॥*
*सा सम्प्रति प्रचलितासि गुणैर्विहीनम् ।*
*प्राप्तुं कथं कथय हन्त परं पुमांसम् ॥*

*३) मजविण आन न जाणे*
*ऐसी तव बुद्धि फार सरला गे ।*
*अवचित परि मज कैसे*
*फसवुनि परपुरुष राम वरला गे ॥*

*४) केनाऽपि मे विलसितेन समुद्गतस्य ।*
*कोपस्य किं नु करभोरु वशंवदाऽभूः ॥*
*यन्मां विहाय सहसैव पतिव्रतापि ।*
*यातासि मुक्तिरमणीसदनं विदूरम् ॥*

*४) की मी अंब अजुनिहि तुज*
*सुंदरी करवि करविले काम ।*
*त्या कोपे रुसुनीया मज सोडुनि*
*सेविले परं धाम... ॥*

प्रसंग सारखा व पाहणारी दृष्टी सारखी असली की अशी वर्णनसाम्ये अनेक ठिकाणी निर्माण होतात. शेकडो योजने दूर असलेल्या देशातील भिन्नभाषी कवीच्या काव्यातही आल्हादकारक साम्य आढळते ते यामुळे. अर्थात ही उचलेगिरी नव्हे. त्यातही श्रीमहाराजांची दृष्टी बाळपणापासूनच कायमची मिटली होती हे ज्यांना ठाऊक आहे त्यांच्या मनात अनुकरणाची ही कल्पना येणार नाही. तसे या बाबतीत जगन्नाथ पंडितांचे काव्य अनुकरणार्हहि नव्हेच. 'करुणाविलास' हे त्या पद्यबंधाला नाव देण्यातच मुळी पंडितराजांनी आपली पांडित्यगर्वित भूमिका सोडली नाही. चिरनिवृत्त झालेल्या आपल्या काव्यनायिकेला तो 'मामकीन कवितेव मनोभिरामा' – (माझ्या कवितेसारखी मनोहर) असे संबोधितो. "हन्तैकस्थं क्वचिदपि न ते तन्वि सादृश्यमस्ति" असल्या विरहभावनासुलभ असलेल्या व्यतिरेकालंकाराने आपली शोकविधुरता व्यक्त करणारा कालिदासाचा यक्ष; किंवा "ननु शब्दपतिः क्षितेरहं त्वयि मे भावनिबन्धता रतिः" असे हृदयाला पीळ घालणारा शोकोद्गार काढणारा दीनलुलित मनाचा अज कोणीकडे आणि आपल्याच कवितेचा बडिवार गाणारे पंडितराज जगन्नाथ कुणीकडे !

*"तानन्तरेण रमणीरमणीयशीले ।*
*चेतोहरा सुकविता भविता कथं नः ॥"*

असे म्हणण्यात कामिनीपेक्षा आपल्या कवितेचीच कविराजांना काळजी अधिक लागलेली दिसून येते. या उलट, पत्नीपरागात आरंभापासून शेवटपर्यंत व्यथित मनाने दिलेले करुणरम्य आत्मनिवेदनच आढळून येईल.

## इथ काय; साम्य की वैषम्य?

वस्तुतः, पत्नीपरागातील या साम्यस्थळापेक्षा वैषम्यानेच त्याला अधिक चारुत्व आले आहे. 'अवघे विषय विसरलो... याच ओळीच्या पलीकडील 'परि योगि अनाहतसम मम हृदयी बोलणे तुझे जागे' ही उपमा इतरांना खचित स्फुरणारी नव्हे. ही उपमा पाहून श्रीमहाराज प्रियतमेच्या स्मृतिमय प्रतिमेशीच बोलत नसून हे निमित्त साधून साधकाशी तर बोलू इच्छित नाहीत ना असा संशय येतो. हा संशय बळावण्याचे दुसरेही एक स्थळ या आर्याविलापात आढळते – ते म्हणतात,

*"देवी देवी म्हणुनि वदावि वांछित तव होतो...*
*वैराग्यावाचुनि असाचि भव होतो"*

विलापाच्या काव्यात असा सावधानतेचा सूचक असणारा विसदृश उद्गार कोणतेही विलापवश मन काढील असे वाटत नाही. त्यामुळेच एकीकडे प्रियेच्या स्मृतिसमाधीवर आपली भावफुले वाहत असताही ते साधकांना विसरले नाहीत - विसरू शकत नाहीत असे दिसते. कविवर्य तांब्यांच्या बाबतीत "पत्नी, परमेश्वर आणि कला यांच्याशी तांबे एकाच वेळी शृंगाराच्या एकाच भाषेत बोलू लागतात" असे जो काहीजण अभिप्राय देतात त्याची इथे आठवण होते. तशीच काहीशी विलापकाव्यातच साधकाशी हितगुज करण्याची करामत या विलाप कवितेत आढळते.

साम्यापेक्षा वैषम्याने बहारदारपणा आल्याचे दुसरेही एक स्थळ इथे आहे. जगन्नाथपंडिताप्रमाणे श्रीमहाराजांनीही आपल्या पत्नीने 'परपुरुष वरला' असे म्हटले आहे.

*मजविण आन न जाणे ऐसी तव बुद्धि फार सरलागे ।*
*परपुरुष राम वरलागे ॥*

येथे जगन्नाथ 'गुणैर्विहीनं परं पुमांसम्' असे म्हणतात तर श्रीमहाराज 'परपुरुष राम' म्हणतात. परपुरुषाला 'गुणैर्विहीनम्' म्हणण्यात पंडितराजाला तत्त्वज्ञानविषयातील आपला 'निर्गुणपक्षपात' सुचविता आला परंतु औचित्य मात्र फार गमवावे लागले. गुणग्राहकतेच्या दृष्टीने शून्य असलेल्या काव्यनायिकेबद्दल हा सारा पंडितराजांचा शोक आहे, तर असाही विरस करणारा संशय वाचकाच्या मनात डोकावण्याची शक्यता "गुणैर्विहीनम्' पदाने निर्माण झाली. उलट परपुरुषाला राम म्हणण्यात श्रीमहाराजांची सगुणप्रीति इथे उठून दिसते हे तर खरेच; शिवाय आपली पत्नी रामरूप झाली असे सुचवून महाराजांना आपल्या पत्नीला तिच्या सफल व सुफल पातिव्रत्याबद्दल प्रशस्तिपत्रक बहाल करता आले हे वेगळे ! श्रीगुलाबराव महाराजांसारख्या पतीच्या हातून असा बहुमान मिळविणारी मनकर्णिका आई धन्यच म्हटली पाहिजे ! असा बहुमान पतीच्या हातून मनकर्णिका आईला मिळालेला पाहून भासाच्या स्वप्नवासवदत्तातील पुढील श्लोकार्ध आठवतो.

*धन्या सा स्त्री यां तथा वेत्ति भर्ता ।*
*भर्तृस्नेहात् साहि दग्धाप्यदग्धा ॥*

करुणाविलासातील परपुरुषाच्या कल्पनेबद्दल काहीजणांनी आपली अरुचि प्रगट केली आहे. परंतु ईश्वरविषयक वर्णनात 'परपुरुषाची' कल्पना श्रीएकनाथापासून कविवर्य तांब्यांपर्यंत सर्वांनी अगदी सर्रास उपयोगात आणली. सर्वांनी लडिवाळलेल्या या कल्पनेला नाक मुरडण्याचे काही कारण दिसत नाही. ती काही अगदीच अडगळीतील वस्तू नव्हे. तिच्यावर ओंगळ अर्थच्छटेची धूळ कुठून बसली असणार? तत्त्वज्ञ, संत, भक्ताचार्य यांच्या नित्य आवडीचा व वापराचा हा शब्द. तो उमेळा आहे ही शंकाच मनात का यावी? परंतु हा प्रश्नही योग्य नव्हे. ज्याच्या त्याच्या दृष्टीचा हा परिणाम म्हटला पाहिजे !

## संशयरत्नमालिका

या विलापिकेत पूर्वसूरींच्या कल्पनातील साम्य स्वतःच्या वेगळ्या आगळ्या विशेषासह जसे आले तशीच काही अगदीच घरेलू पण अव्याजमनोहर तर्कवितर्काची पखरण इथे आढळते. आपल्या मिटल्या दृष्टीमुळे अनेकांना आपल्याला शिणवावे लागते याचा महाराजांना अनेकदा खेद होई. स्वयंदासाः तपस्विनः अशांना दुसऱ्याकडून काम करून घेताना खेद होणारच म्हणूनच, त्यांच्या मनात शंका आली - आपण सर्व कामे तिच्याकडून करवून घेतली. त्याचा तर तिने राग धरला नाही ना? ते विचारतात -

*की मी अंब अशुनिया तुज तुंवरीकरवि करविले काम ।*
*त्या कोपे रुसुनीया... सेविले परंधाम ॥*

हळहळणाऱ्या मनात अशा अनेक कल्पनांचे काहूर जमा होणे स्वाभाविकच होते. मनकर्णिका आईचा आवाज महाराजांच्या सारखाच गोड. प्रभूची कवने सुरू झाली म्हणजे आईने त्यांना साथ द्यावी. आई दळावयास बसल्या म्हणजे क्वचित् महाराजही त्यांच्या कामाला हात लावीत आणि जात्याच्या घुमणाऱ्या नादासमवेत भगवंताची कवने गात रंगून जात. असा त्या दोघांचा अत्यंत खेळीमेळीचा व आनंदाचा व्यवहार असे. आज या बैठकीतून मनकर्णिकाबाई कायमच्या गेल्यामुळे ऐन भजन रंगात येताच वीणेची तार तुटावी तसा प्रकार झाला. म्हणूनच विरसलेल्या शून्य मनात अनेक शंकांची तर्कवितर्काची दाटी होऊ लागली. ते म्हणतात - मी तुला नावाने हाक मारीत असे. वडीलधाऱ्या माणसापुढे त्यामुळे तुला अवघडल्यासारखे होत असेल. म्हणून, का तू मनात राग धरलास, आणि 'परंधामाला' निघून गेलीस? आता मात्र असे पुनः होणार नाही. मजवरचा हा राग सोडून दे ! !

"पण माझ्याकडून घडलेला हा अपराध एवढा का मोठा आहे की तू मला चिरविरहाची शिक्षा द्यावी?"

व्यवहारात राग लोभ चालायचेच. त्यातही पतिपत्नीमधील राग-रोषांचा मिळून अर्थ प्रेमच होतो. जाणीव-नेणीवेत शुद्ध ज्ञानच दडले असते ! पतिपत्नीच्या शुद्ध व अविचल प्रेमपटावरच राग अनुवादाचे गडद रंग दिले जातात. म्हणूनच, श्रीमहाराज मनकर्णिका आईना विचारतात –

*अल्प अशा अपराधा प्राणसखे यावया महाशिक्षा ॥*
*तव कोमल हृदयाला कोणी दिधली नवीन गुरुदीक्षा ॥*

अल्प अशा अपराधासाठी परं धामाची वाटधरण बरी म्हणता येईल का असा महाराजांचा काकुळतीचा प्रश्न आहे? परंतु हे प्रश्न वा संदेश पत्नीकडे कोण पोचविणार? श्रीमहाराजांना यक्षाच्या त्या प्रसिद्ध 'मेघ'दूताची

आठवण झाली. तो निरोप पोचवील असे वाटले. परंतु अलकावतीला निरोप देऊन तो आता थकून गेला होता. महाराजांच्या विनंतीला काही त्याने प्रतिसाद दिला नाही.

*'यक्ष निरोपी श्रमला घन, कायी दूत, घे न मम नमना' ॥*

निरोप तर पाठवायलाच हवाच होता. श्रीमहाराजांनी आपल्या मनाकडे ते काम दिले. खरोखरच मन का असा संदेश पोचवू शकेल? पण, मेघ तरी यक्षाचा संदेश खरोखरीच का पोचविणार होता? असल्या तत्त्वान्वेषी प्रश्नांचे उत्तर काय देणार?

*को जड को चेतन न कुछ जानत बिरहीजन ॥*

मरण खोटे; जीवनच खरे

मनासोबत महाराजांनी मनकर्णिका आईना निरोप दिला तो असा –

*"पुढिले जन्मि घालि मज माळ"*

*"हृदयातुनि सांडिजे न मम आस"*

असा निरोप दहाव्या श्लोकात दिलाच होता. परंतु तसा संदेशात अस्पष्ट अर्थ काय कामाचा? म्हणूनच उघड-उघड "पुढिले जन्मि तरि घाली मज माळ" अशी गळ महाराजांनी स्पष्टच पुनः बाराव्या श्लोकांत घातली आहे. महाराज पुनर्जन्मवादी; तेव्हा पुढल्या जन्मी त्याच हातांनी आपल्या गळ्यात माळ पडावी, ही कल्पना त्यांच्या मनात यावी हे स्वाभाविकच; परंतु पुनर्जन्म न मानणाऱ्या देशातही विरही जीव मीलनाच्या कल्पनेचा विंझणवारा घेऊनच आपल्या विरहाने शिणलेल्या मनाला का रिझवितात ते कळत नाही. वियोग हा व्यवहारात जरी अपरिहार्य असला तरी कल्पनेच्या राज्यात मीलनाच्या विचाराने त्याचा प्रतिकार करावा असे जगभरच्या दुःखी जीवांना का वाटावे हा खरोखरच यक्षप्रश्न आहे. मीलनाची ही कल्पना म्हणजे केवळ दुःखवेड्या मनाने हताशपणे केलेला दुःखाचा निरर्थक भाबडा प्रतिकार एवढाच अर्थ करून का थांबून जायचे? मीलनाच्या या कल्पनेला सर्वत्र विलापकाव्यात जो 'विश्वाधार' मिळतो त्याचा उलगडा वरील सोप्या खुलाशाने होण्याजोगा वाटत नाही.

असे तर नसेल की,

*संयोगाः विप्रयोगान्ताः मरणान्तंच जीवितम् ।*

*किंवा*

*मरणं प्रकृतिः शरीरिणां विकृतिर्जीवितमुच्यते बुधैः"*

हा जरी व्यवहाराचा न्याय असला तरी परमार्थात तो खोटा आहे हा कानमंत्र त्यांना कुणीतरी देत असावे? परमार्थाच्या दृष्टीने जगातील सारे पदार्थ 'एकार्थक' आहेत आणि तो एक अर्थ मरण, वियोग, विनाश असल्या अभावात्मक शब्दांनी नीट धरला जात नसून जीवित, मीलन, लाभ अशा भावनात्मक शब्दांनीच अधिक हाती येतो हा वेदांतातील गुह्यार्थ त्या बिचाऱ्यांना विरहसमाधीत स्फुरत तर नसावा? एरव्ही, सारे विरही जीव मीलनाची प्रत्यक्ष शक्यता सुतराम् संभवनीय नसता मीलनाच्या कल्पनेशिवाय का राहत नाहीत हे कळत नाही. व्यवहारात संयोगाचा अंत वियोगाने होत असेल परंतु तत्त्वतः विरहाचा अंतच संयोगाने होत असतो. मरण जीवनाच्या शेवटी येत नसून दोन जीवनाच्या चिमटीत सापडल्याने तेच वस्तुतः गुदमरून गेले असते. त्यामुळे जीवित हेच खरे; मरण हेच खोटे ! मरण ही व्यावहारिक वास्तवता असेल; परंतु जीवित हीच पारमार्थिक वास्तवता असावी. मरण, विरह, वियोग ही कवड्यांची नाणी हलक्या फुलक्या व्यवहारासाठीच चालू शकत असतील. परमार्थाच्या देवघेवीत जीवित, मीलन, लाभ ही असली शुद्ध नाणीच चालत असावी ह्या गोष्टीचा अंतःप्रत्ययच विरहाने तापलेले हे शुद्ध जीव बोलून तर दाखवीत नसावेत?

**भावस्पर्शी शेवट**

हा पुनर्मीलनाचा संदेश दिल्यानंतर या विलापकाव्याच्या शेवटी मनकर्णिका आईला श्रीमहाराजांची आणखी एक समजावणी आहे. ते म्हणतात, विलासललिते, पुनः माझा अंगीकार करण्यात तुझा मोठा लाभ आहे. सौरभ मिळेल तुजला !! तुला सुगंध मिळणार आहे !! गुलाबाचे फूल. त्याला काटे असणारच. त्याला कंटाळून कसे चालेल? आपल्या हृदयोद्यानात "संकटकहि गुलाबफुल पाळी." गुलाबाचे फूल काटे बोचत असले तरी तू ते उमलू दे. आपले जीवन त्याला घाल. जीवनाचा ओघ "गुलाबाकडे वळवायचे थांबवून त्याच्या पाकळ्या गळल्यावर कुठला सौरभ आणि कुठला पराग !!"

असा अत्यंत आर्तसंदेश देऊन श्रीमहाराजांनी या काव्याचा शेवट केला आहे. या काव्यात अलंकारांची गुंफण, पदांची उत्कृष्ट ठेवण जरी विशेषशी नसली तरी पत्नीविषयक प्रेमपरागाचा सुगंध मात्र आरंभापासून इथे दरवळतो. 'मनकर्णिके' ही काव्याच्या आरंभी पत्नीला दिलेली करुण हाक जितकी मनाला जाऊन भिडते तितकेच "जीवन सुकवूनि न पाकळ्या गाळी' हे काव्याचे अखेरचे आर्ततेतून बुडून निघालेले शब्द मनाचा अधिक ठाव घेतात. काव्याचे हे असे आदि अंत पाहून प्रसिद्ध इंग्लिश कवि लांग फेलोच्या पुढील वचनाची आठवण होते.

Great is the art of beginning but
greater is the art of ending.

**गुणाकर वा. पिंपळापुरे**

---

# 'गुलाब पुष्प'

उघड्या डोळ्यांपेक्षा मिटल्या डोळ्यांनाच कधी कधी अधिक दिसते ।
सूर्यचंद्रादिंच्या प्रकाशाच्या मदतीची त्यांना अपेक्षा नसते ॥

आत्मप्रकाशाची उधळण त्यांच्या मिटल्या डोळ्यांसमोर सदैव असते ।
सर्वव्यापी तेजापुढे दिवस वा रात्रीची त्यांना किंचितही पर्वा नसते ॥

परमात्म्याच्या अनुसंधानांत ते बघतात "त्याने" मांडलेला हा विश्वाचा खेळ।
निरपेक्ष अखंड कर्माच्या पूजेने ते साधून घेतात अद्वैताशी मेळ ॥

उन्मनीला ओलांडून त्यांची बंद दृष्टि दिव्य होत असते ।
अर्जुनासारखे विश्वरूपदर्शन त्यांना रोजच होत असते ॥

अनंताचे कोडे त्या मिटल्या डोळ्यांना उलगडलेले असते ।
असेही एखादे 'गुलाब' पुष्प अध्यात्माच्या मार्गात फुललेले असते ॥

**सौ. प्रभा कारंदीकर**
पुणे ९

# श्रीगुलाबराव महाराजांचे हिंदी काव्य

एम.कॉम., पीएच.डी. (उर्दु) अकाऊंट्स ऑफिसर सिडको आकाशवाणी, दूरदर्शन व वर्तमानपत्रे संत वाङ्मयावर भाषणे व लेखन.

संतांच्या काव्य रचनेत व इतर कवींच्या काव्यरचनेत मूलभूत फरक असतो तो म्हणजे साधारण कवी आपल्या विचाराच्या अभिव्यक्तीसाठी काव्य हे माध्यम स्विकारतो तर संत जगत्कल्याणासाठी काव्यांगाचा वापर करतात. कवीला आपले अनुभव सांगायचे असतात, तर संतांना अनुभूतीचे सूत्र प्रस्तुत करावयाचे असते. आधुनिक बुद्धिवादी वर्ग याच तफावतीचा सांगोपांग विचार न करता, सन्तकाव्य म्हणजे आध्यात्मविचाराचे काव्य मानून त्यांस साहित्यात स्थान देण्यास नकार देतो. जेथे ज्ञानेश्वर-तुकारामांची ही स्थिती आहे तेथे विदर्भात जन्मलेल्या प्रसिध्दिपराङ्मुख गुलाबराव महाराजांच्या काव्याची काय कथा?

श्री गुलाबराव महाराजांचे आयुष्य अवघे चौतीस वर्षाचे. त्या अल्प कालावधीत त्यांनी विविध भाषांत, विविध विषयांवर ६००० पानांची गद्य रचना केली. मराठा-कुणबी समाजात जन्मलेल्या एका जन्मांध तरुणाने कुठलेही शालेय शिक्षण ग्रहण न करिता, सांख्य, योग, वेदांत, न्यायादिषड्‌दर्शन, आयुर्वेद, संगीत अशा विविध विषयांवर सूत्रपर, भाष्यपर लिहावे हा या शतकातील बौध्दिक चमत्कार मानावयास हवा. पण 'महाराज' हे बिरुद मागे लागल्यावर आमचा बुद्धिजीवी वर्ग त्या व्यक्तीच्या कृती व कलाकृतीकडे कुत्सितपणाने बघण्यास प्रारंभ करतो. हीच प्रवृत्ती त्यांना संतसाहित्याचा व्याकरणीय वा आलंकारिक दृष्टिकोनातूनही अभ्यास करण्यास परावृत्त करते. मराठी समीक्षकांच्या या भूमिकेमुळेच, मुळातच प्रसिद्धीकडे पाठ फिरवणाऱ्या गुलाबराव महाराजांच्या काव्यसंपदेची सामान्य वाचकांना तोंडओळख देखील झाली नाही, हे मराठी भाषेचे व महाराष्ट्रीय जनतेचे दुर्दैवच म्हणावे लागेल.

श्री गुलाबराव महाराजांनी २५०० अभंग, २५०० संगीतपद, १२५० गीतांची रचना केली आहे. ती मराठी, वऱ्हाडी, संस्कृत, हिन्दी व व्रजभाषेतही असून त्यातील कित्येक छंद-वृत्तांची त्यांनी स्वतंत्र निर्मिती केली आहे. संगीत पदांना त्यांनी स्वतः रागात व तालात बांधून चाली लावल्या आहेत. मराठी छंदांचा हिन्दीत व हिन्दी छंदांचा मराठीत त्यांनी वापर केला. तत्कालीन साहित्याचे संदर्भ लक्षात घेता, काव्यप्रांतात असे विविध प्रयोग करणारे कदाचित् ते एकमेवच ठरतील !

## नंदलालकी मैं हू राधा

श्री गुलाबराव महाराजांनी आपल्या वाङ्मयातून मधुराद्वैत दर्शनाचा प्रसार केला. श्री शंकराचार्य व ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानात फरक नसून ते एकच आहे, असे ते मानीत व हाच विचार त्यांनी आचार्या एवढ्या तर्कनिष्ठ भाषेत प्रस्थानत्रयींच्या आधारे स्पष्ट केले आहे. मधुराद्वैत संप्रदाय हा वारकरी नाथसंप्रदायाची शाखा असून महाराजांचे सांप्रदायिक नाव 'पांडुरंगनाथ' होते. स्वतःला ते ज्ञानेश्वर कन्या संबोधित व कृष्णप्रिया पंचलतिका मानीत. याच भूमिकेतून त्यांनी मधुराभक्तीची वेल भाविकांच्या मनात लावली. महाराजांनी हिन्दी व व्रजभाषेत ४०६ पदांची पद्य रचना केली. यांत चौपाई, दोहे, साकी, कबितवृत, तुकबंदी इत्यादींचा समावेश आहे. मंगलाचरण, सद्‌गुरुस्तवन, संतस्तवन, करुणा, विरहिणी, उपासना, भक्ती, वेदांत, कृष्णलीला, पत्र असे विविध विषय यांत आलेले आहेत.

## संतचरणपे नित लोटत है गंगा

तुलसीदासांनी 'रामचरित्र मानस' या ग्रंथात गुरुमहिमा, संतमहिमा अगाध आहे, असे वारंवार प्रतिपादन केले आहे. 'बिनु सतसंग विवेक न होई' असे सांगून सत्संग हे आनंदाचे मूळ आहे, साधना हे फूल आहे पण सत्संग हे फळ आहे. दुष्ट माणसे ही त्यांच्या संगतीत सुधारतात पण संत दुर्जनांच्या संगतीत राहूनही आपल्या गुणांचा प्रकाश देत राहतात. म्हणूनच 'संत हंस गुन गहहिं परि हरि बारि बिकार' (संतरूपी हंस दोषरूपी जल सोडून गुणरूपी दुधाचे प्राशन करतात), म्हणून गुलाबराव महाराज म्हणतात,

*गंगा बाहर पाप मिटावत नहिं शोधत अंतरंगा,*
*पाप अरु पाप प्रवृत्तीको हरत साधुजन चंगा ।*
*यहिके खातर संत चरण पे नित लोटत है गंगा ॥*

एवढेच नव्हे तर 'जैसे सज्जन पाप मिटावत वैसे न तारत गंगा । (सज्जन ज्याप्रमाणे पापांचा नाश करू शकतात त्याचप्रमाणे गंगाही तारू शकणार नाही), म्हणून ते म्हणतात 'हम संत दास के दास ।' (आम्ही संतांच्या दासांचे दास आहोत) आणि तो भगवान् ! 'हरि नित निज भक्तन् के संग ।'. (हरि नेहमी भक्तांजवळ असतो); म्हणून महाराज मनाला उपदेश करतात, 'मानस संतनके पग लाग ।'

## ज्ञानदेव दीनानाथ मेरे सिरताज है

'मायामोहाच्या अंधःकाराचा नाश करणारे सूर्यकिरण' म्हणून तुलसीदासांनी सद्‌गुरुचे वर्णन केले आहे, तर

*सदगुरुकी महिमा अनंत, अनंत किया उपकार ।*
*लोचन अनंत उघडिया अनंत दिखावणहार ।*

अशा शब्दांत सद्‌गुरुमहिमा कबीर सांगतात; आणि गुलाबराव महाराज आपले सद्‌गुरु ज्ञानेश्वर महाराज यांचे वर्णन करताना म्हणतात –

मेरे गुरुके पदमचरणकी मोर हि सीस सवारी है ।
जिनकी कृपाते कृष्णसंग मैं खेलत नहिं हारी है ।

सद्‌गुरुचे स्तवन करताना महाराजांच्या भावना व भाषा उचंबळून येते. काही ठिकाणी मुलगी आईकडे तक्रार करते तो सूर आहे, तर काही प्रसंगात रुसाव-फुगाव, कुठे कुठे विनवणी आहे. 'अंगिकारो अब ज्ञानदेव गुरु । बाला लाडकी तुम्हारी है ।' हे त्याचे उदाहरण.

सद्गुरु कृपाकटाक्षाने हा भवसागर, मुमुक्षु सहज तरून जातो आणि महाराजांसारख्या थोर पुरुषांचे सद्गुरु तर ज्ञानराज महाराजच आहेत. 'ज्ञानेश्वर गुरुनाथ हमारे' असे ज्ञानराज –

*सोहि गणेश बिघ्नके हर्ता । तिनपर सीस उवारे ।*

*सोहि शारदा मति के दायक । बैठ बाणि हमारे ।*

खरेच वाणीमध्ये प्रत्यक्ष शारदेचा वास असल्यानंतर महावाक्यही त्यांच्यापुढे नतमस्तक होणार नाहीत काय? म्हणूनच महाराज म्हणतात –

*ईश्वर गुरुसो अधिक नहीं ।*

*जुग जुग कह मै अवतार धरुं । सो अब दिखत नहीं ।*

*जुग जुग सद्गुरु शिष्य सुकारण । प्रगटत सहज मही ।*

प्रत्येक युगात मी अवतार घेईन असे आश्वासन देऊन कृष्णाने कलियुगात शब्द पाळला नाही; पण सद्गुरु शिष्याकरता वेळोवेळी प्रगटतात हे मात्र खरे. याचमुळे ईश्वराला सद्गुरुपेक्षा गौणत्व दिले.

## मोरी प्रभुपग लागी प्रीत

महाराजांची मधुराभक्ती ही गोपिकांनी कृष्णाची केलेली भक्ती होय. (म्हणूनच ते कृष्णप्राप्तीसाठी गोपिकांनी केलेले कात्यायनीव्रत पंचलतिका होऊन करीत). यालाच दुसरे नाव 'कांताभक्ती' हे आहे. तसेच'परमविरहाभक्ती' ही आहे. समीक्षकांनी मगधकोकील विद्यापती व मधुरकोमलकांत पदावलीकर जयदेव यांच्या काव्याला उत्तानशृंगार म्हणून दूषणे दिली आहेत, पण गुलाबराव महाराजांनी त्यांच्या या काव्याचा ज्ञानोत्तरभक्तीपर अर्थ लावून या आक्षेपांना निरुत्तर केले आहे; असे असले तरी महाराजांच्या काव्यात कुठेही अश्लील वा उत्तान शृंगाराची चाहूलही आढळत नाही.

महाराज म्हणतात –

*मोहे गोपीयन की आस ।*

*गोपी करुणा नारायणको देशुं अपने पास*

पण पुढे–

*गोपि अरु हरि भेदरूप नहिं । ब्रम्हरंगमय राम ।*

यात कुठेही अश्लीलतेला वाव नाही. हिन्दी काव्यात महाराजांनी आपले गोपीरूप पूर्णतया ओतले आहे. त्यांच्या मराठी काव्यात ते कुठे कुठे कबीर, रामदास, तुकारामांसारखे सडेतोड खडेबोल बोलतात, मग त्यात नकळत वऱ्हाडी शिव्याही येतात. तर काही अभंग व पदांत ते ज्ञानेश्वर-एकनाथांप्रमाणे विरहिणी, गौळणीही गातात, तरीही त्यांचे मराठी अभंग व पदे इतर सर्व संतांपेक्षाही जास्त कठीण वाटतात. कारण त्यातील उपमा, रूपक आदी अलंकार 'अद्वैतसिद्धी', 'खंण्डणखंडखाद्य' आदि ग्रंथांतील तत्त्वज्ञानाप्रमाणे जटिल स्वरूपाचे आहेत. एवढेच नव्हे तर त्यांनी लिहिलेली लोकगीतांच्या चालीवरील स्त्रीगीते समजण्यास 'भामती' 'चित्सुखी' यांसारख्या विद्वत्‌जड ग्रंथांचे अध्ययनही अपुरे पडते. पूर्ण षड्दर्शनाची बैठक असलेला माणूसच ती समजू शकतो.

## में तो नहीं रही मेरी

'जिस मुरलीधर कान सुनत ही बांवरी भई व्रजबाला' त्या मुरलीबद्दल सूरदासानी मात्र तक्रार आहे की 'अधररस मुरली लूटन लागी' 'कीन्हो सौति बजाई' त्याबद्दल महाराज म्हणतात–

*प्रभु ! तोरे मुरली की गत न्यारी*

*चुंबन छिन हम लेति तुम्हारे*

*ये सबती रही मुंहजारी*

अन् मग ही गोपिका कृष्णाची मुरलीच लपवते अन् कृष्ण म्हणतो–

*किने मोरी मुरली चुराई*

*नहि थी सोने की, नहि थी रुपेकी*

*केवल प्रेम का लायी*

यावर ती गोपिका एका अटीवर कृष्णाला मुरली देण्याचे आश्वासन देते–

*देउंगी मैं लाला मुरली तुम्हारी ।*

*और सबन की प्रीत छोडके*

*हम पर राखो भारी*

अथवा हमारो हरन करो मन

*जैसि राधिका प्यारी*

तर दुसरी विनविते–

*प्रिय नंदलाल वेणु बजाओ ।*

कृष्णपत्नी हीच त्यांची भूमिका असल्यामुळे श्रीकृष्णलीला वर्णन करताना त्यांच्या पदांना कमालीचा गोडवा आला. उपमा, रूपक, संकेत यांना बहर आला. केवळ धृपदाची झलक बघून वाचकांना त्यातील गेयता, मधुरता जाणवते. कळत न कळत विरहिणींमध्ये मीरेची आर्तता, करुणा आठवते, रास, रंगपंचमी, भूपाळी, पाळणे इ. वाचताना सूरदासांचा सूर गवसतो. पुढील करुणापर पदे पहा–

१ सुनिये मेरी पुकार माधव....
२ चंदा सुंदर तरुके उपर मोहर मुगुटपे छाता....
३ आओ आओ प्रिय नाथ मिलुंगीआज अकेली रात...
सास मेरी गौंव गई है । नही पति देवर साथ....
४ प्रिय नंदलाला वेणु बजाओ...
५ तुम बिन कौन मुझे सांवरिया
६ माई मोहे लागी हरिकी आँस...
७ सुरत तिहारी बलमा नयना लागि रे...
मास, बरस, जुंग, तुम्हारे कारन ।
दिन रजनी मैं जागी रे ।
८ हरि बिन मोहे और न कोई...
९ शाम सुरत तेहारी भर गई नयन सारी...
१० प्यारे मेरे नाहिं मिले सब रात...

## जागो लाला भोर भई

भूपाळी हा काव्यप्रकार जुना असला, तरी सगळ्याच कवींना भूपाळी वा पाळणा रचण्यात यश आले असे मात्र नाही. 'घनःश्याम सुंदरा', 'उठी गोपाळजी' या जुन्या भूपाळ्या आजही लोकप्रिय आहेत. कारण त्यातील शब्दरचना व नादमयता ही एक प्रकारचे पहाटेचे वातावरण निर्माण करते. एवढेच नव्हे, तर प्रातः रागांनाही त्या रचना चपखल बसतात. हीच गोष्ट गुलाबराव महाराजांच्या 'जागो ब्रजराज कुँवर भोर भई लाला' या प्रभातीची आहे. सूरदासांच्या 'जागिए ब्रजराज कुंवर कमल कुसुम खिले' या कोमलकान्त पदावलीची कोमलता महाराजांनी यात आणली आहे. पण पुढील ओळी मात्र वेगळ्या आहेत –

*जमुना जल चली आप । हिच सुमिरत शाम शाम ।*
*सुखर मुनी नाम । पानि तुलसीमाला ।*

किंवा–

*'जागिये पिय नंदकुँवर जवित मे तमारी'*

तसेच–

*'उठो ना प्यारे भँवर भई है शाम'*

या प्रभाती भैरव रागातील 'जगिये रघुनाथ' या जुन्या प्रभातीच्या चालीवर गाताना फारच मोहक वाटतात. त्यातील शब्द व कल्पना साध्या पण सहज आहेत. त्या अशा –

*जागो लाला भँवर भई*
*उठि ग्वालन सीस घगरिया धरी ।*
*पनघट सब ही गयी ।*

हीच गोष्ट त्यांनी लिहिलेल्या पाळण्यालाही लागू पडेल. पुढील लोरी अर्थात अंगाई पहा–

*जागो ना प्यारे लाल, निंद लेवो नंदलाल...*
*रात भई प्रभु दोन पहर अब, कल खेलने को काल...*

## मोह बिहरकी लागी चोट

ज्ञानेश्वरांपासून एकनाथांपर्यंत ज्या विरहिणी लिहिल्या गेल्या आहेत, त्यात स्त्रीमनाच्या कोमल भावनांचे धागे इतक्या हळुवारपणे उकलले आहेत की वाचणाऱ्याला त्या विरहिणी एखाद्या हळव्या मनाच्या नारीनेच लिहिल्या असाव्या असे वाटावे. हाच हळवेपणा गुलाबराव महाराजांनी आपल्या मराठी व हिन्दी काव्यांत किती सहजपणे आणला आहे, हे पुढील काही ओवींतून आपल्या ध्यानात येईल.

१ कब कहो आवेंगे सखि शाम
घरद्वार सब छोड दिया मैं भई हूँ उनकि गुलाम
२ अब मत देखो अंत प्रभुजी...
३ हरिकी हृदयमें याद आयी है...
४ मोहे विरह की लागी चोट...
५ कौन गली सखि शाम...
६ सखि मोरे हिय मे लागी कटारी...
गोरे गोरे बदन सुरजपे छायी बदरिया कारी...
७ मैं तो घरमें रही अकेली ओरन की नहिं आस
कब आवेंगे बोल सखिरी लाल हमारे पास

ही पदे मुळातून संपूर्ण वाचल्यावरच त्यांतील आर्तता अधिक जाणवते. प्रत्येक पद वेगवेगळ्या संदर्भात असून विरहिणीच्या विविध अवस्थांचे त्यांतून आकलन होते. व्याकूळ, अधीर, हूरहूर, चुटपुट, आशा, निराशा अशा अनेक छटा त्यांतून व्यक्त झालेल्या दिसतात.

## कमलिनी लजाय रही

आद्य शंकराचार्यांनी स्तोत्र वाङ्मयाची निर्मिती करून जशी समग्र देवतांची स्तुती केली आहे, त्याप्रमाणेच महाराजांनी स्तुतीसंग्रहात शिव, गीता, ज्ञानेश्वर आदींची स्तुती व समकालीन संत मंडळींची 'सद्वैजयंती' या ग्रंथात अत्यंत आदरपूर्वक स्तुती केली आहे. उदाहरण म्हणून तातस्तुति (ज्ञानेश्वरांना ते पिता मानत) बघा –

*कमलिनी लजाय रही, कनकश्री रही*
*रसा हरखाय रही रसीली मिलाई है*
*पानीके प्रवलकी अरु मानिने के लाल की*
*अरु कामिनी के गाल की सब सोभा भी भुलाई है*
*क्या राधिका तिलक झ्याकी?*
*नाहि नाहि सुनरि सखी*
*मेरे ज्ञानराजूं के पाय की ललाई है*

आचार्य विनयमोहर शर्मा या हिन्दी समीक्षकाने महाराजांच्या हिन्दी काव्यावर काही आक्षेप घेतले आहेत. त्यात मुख्यत्वे त्यांच्या हिन्दीवर आहेत. पण आचार्यांनी हिन्दी साहित्याचा सर्वांगीण अभ्यास केला असता तर असा आक्षेप त्यांनी घेतला नसता. तुलसीदासांची अवधी, सूरदासांची व्रज आणि विद्यापतींची मगधी भाषा याही आजच्या हिन्दीचे अशुद्ध स्वरूप होत. त्या त्या प्रांताच्या भाषांच्या संमिश्रणाने या भाषा तयार झाल्या आहेत. त्याचप्रमाणे गुलाबराव महाराजांच्या भाषेला वैदर्भीय हिन्दी म्हणावे हवे तर, राजस्थानी मिश्रित हिन्दी मीराबाईची होती, ती मग आचार्य शर्मांना कशी चालते?

दुसरा आक्षेप आहे महाराजांनी काही पदे हिन्दी-मराठी संमिश्रण लिहिली आहेत त्यासंबंधीचा. यात वावगे काय आहे? हिन्दी-उर्दूचे विद्वान अमीर खुसरो यांची एक फारसी हिन्दी गजल बघा –

*जिहाले मिस्कीं मकुन तगाफुल दुराय नैना बनाय बतियाँ ।*

तसेच अकबराचे महामंत्री अब्दुर्रहमान खानेखाना हे पण फार मोठे विद्वान होते, त्यांच्या संस्कृत-हिन्दी गजलचा नमुना पहा–

*दृष्ट्वा तत्र विचित्रतौं तरुलतौं, मे था गया बागमें ।*
*काचितत्र कुरंगशावनयना, गुल तोडती थी खडी ॥*

यावरून शर्माजींचा हा दुसरा आक्षेपही निरर्थक ठरतो. संतश्रेष्ठ नामदेवांशिवाय इतर कोणत्याही मराठी संतांनी महाराजांएवढे हिन्दी काव्य केले नसेल असे वाटते. गुलाबराव महाराजांच्या हिन्दी काव्यात श्रीकृष्णलीलापर वा प्रयणलीलापर काव्य अधिक आहे. वेदांत, भक्ती, उपदेशपर काव्य तुलनेने कमी असल्यामुळे इतर हिन्दी संतकाव्याशी आपले तत्त्वज्ञान मराठी काव्यांतून समर्थपणे मांडले आहे. हिन्दी काव्य हे मराठी काव्यासह ओघाओघाने आले आहे. तरीही ते ४०६ पदे एवढे आहे. (त्याचे १०० पानांचे पुस्तकही प्रकाशित झाले आहे). गुलाबराव महाराजांच्या काव्याचे अंतरंग कळण्यास त्यांचे वेदांतिक विचारही मूळातून अभ्यासणे आवश्यक आहे. कारण त्यांचे काव्य व दर्शन यांच्यात फरक यत्किंचितही नाही.

**डॉ. राम पंडित**
१४/४५९ नेहरू नगर, अलकनंदा सोसायटी,
कुर्ला (पूर्व) मुंबई ४०००२४.

- *प्रयत्नाचा विश्वास धरावा पण मनाचा विश्वास न करावा.*
- *कीर्तीमागे लागू नये, पण वृथा अपकीर्ती सहन करू नये.*
- *प्रेमामुळे मित्र दुसऱ्या जन्मातही उपयोगी पडतो; पण नातलग तर इहलोकातच धोका देणारे निघू शकतात.*
- *विचार न करता प्रसंगी चांगले.*

# आर्यांचे वसतिस्थान

*सिव्हील इंजिनियर, आय.आय.टी.पवई, सिव्हील डिपार्टमेंट प्रमुख पदावरून निवृत्त.*

## १) प्रास्ताविक

आर्य हा एक वंश असून त्याची एक शाखा बाहेरून भारतात आली व येथील मूळ रहिवाशांना पराभूत करून त्यांनी भारतात वर्चस्व स्थापन केले अशी एक सर्वसाधारण समजूत शिक्षणात अंतर्भूत आहे. कोणत्याही लिखाणात ही बाब गृहीत धरूनच मांडणी केलेली दिसते. आर्यांचे मूळ स्थान कोणते या बाबतीत मतभेद आहेत. परंतु ते भारताबाहेरून आले असे निश्चयपूर्वक समजले जाते. याविरुद्ध अनेक संशोधकांनी आर्य हे मूळ भारतातीलच असून येथून ते बाहेर गेले अशी मांडणी केली आहे. तरी अजून याला सर्वमान्यता प्राप्त झालेली दिसत नाही. या दोन्ही पक्षांहून निराळा असा विचार मागील शतकातील प्रज्ञाचक्षू संत श्रीगुलाबराव महाराज यांनी मांडला. त्यांच्या मताप्रमाणे सर्वत्र पूर्वी आर्य संस्कृतीच होती. भारताबाहेरील प्रदेशांत अनेक कारणांमुळे आर्य संस्कृतीचा ऱ्हास होऊन इतर संस्कृती प्रस्थापित झाल्या व आज फक्त भारतातच आर्यसंस्कृतीचे अस्तित्व दिसते. तसेच 'आर्य हा शब्द वंशवाचक नसून श्रेष्ठ गुणांनी संपन्न' असा त्याचा अर्थ असल्याचे स्पष्ट केले. परंतु या मताची फारशी प्रसिद्धी झालेली नाही. म्हणून या लेखात या विषयाची मांडणी करीत आहे.

## २) युरोपियन विचारसरणी

इ. स. १७७६ मध्ये विलियम जोन्स यांनी एकभाषा सिद्धांत मांडला. त्यानुसार इंडोयुरोपियन भाषांचा समूह एकाच मूळ भाषेतून निर्माण झाला आहे, असे भाषाशास्त्रावरून दाखविले. याच सिद्धांताची परिणती म्हणून हे सर्व भिन्न भाषी समूह एकत्र वसति करून असले पाहिजेत असा उपसिद्धांत प्रा. मॅक्समूलर यांनी प्रतिपादन केला. त्यांनी हे मूळ स्थान पामीर पठारावर असल्याचे सांगून तेथून ते भारत, इराण व युरोपमध्ये गेल्याचे सांगितले. इतर अनेक संशोधकांनी ऑस्ट्रेलिया, जर्मनी, रशिया, इराण, कॅस्पियन समुद्र, उत्तर ध्रुव, तिबेट इत्यादी ठिकाणी आर्यांचे मूळ वसतिस्थान दाखविण्याचे प्रयत्न केले आहेत.

## ३) लोकमान्य टिळकांचे मत

लोकमान्य टिळकांनी Arctic Home in the Vedas हा ग्रंथ लिहून आर्यांचे मूळ वसतिस्थान उत्तरध्रुवीय प्रदेशात असल्याचे मत मांडले. यात मुख्यतः ऋग्वेदातील काही ऋचांचा व सूत्रांचा अर्थ ध्रुवीय प्रदेशातील खगोलीय दृष्यांनी जास्त चांगला कळू शकतो - उदा. ६ महिन्यांचा दिवस व ६ महिन्यांची रात्र, याचा व इतर अनुषंगिक पुराव्यांचा आधार घेतला. त्याचप्रमाणे पारशी धर्मग्रंथ व इतर साधनांचा उपयोग करून घेतला. परंतु असे करताना वैदिक सूत्रांचा सरळ अर्थ सोडून त्यांना रूपक मानले. ध्रुवीय सिद्धांत मान्य करून इतर काही संशोधकांनी नंतर उत्तर ध्रुवच पूर्वी कधी काळी भारतातच - ओरिसापासून काश्मीरपर्यंत असल्याचा दावा केला.

## ४) डॉ. संपूर्णानंद आदींचे मत

डॉ. संपूर्णानंद यांनी 'आर्यो का आदि देश' या ग्रंथात लोकमान्य टिळकांच्या मताची सविस्तर समीक्षा करून वैदिक सूत्रांचा अर्थ करताना ध्रुवीय प्रदेशातील खगोलीय स्थितीचा आधार घेण्याची आवश्यकता नसल्याचे दाखवून दिले. त्यांच्या मते आर्यांचे मूळ वसतिस्थान सप्तसिंधू या प्रदेशात आहे व येथून ते इतरत्र गेले व आपल्या भ्रमंतीमध्ये त्यांच्यापैकी कोणी ध्रुवीय प्रदेशात गेल्यामुळे तेथील वर्णन येणे शक्य आहे, असे प्रतिपादन केले. यामध्ये भारताची आजची भौगोलिक स्थिती व ऋग्वेदकालीन स्थिती यांत बराच फरक असून वेदांची भौगोलिक स्थिति डॉ. अविनाशचंद्र दास यांनी दाखविल्याप्रमाणे असल्याचे मान्य केले आहे. त्यानुसार सप्तसिंधु प्रदेशाच्या उत्तरेस हिमालय पर्वत व त्यापलीकडे समुद्र असून त्याच्या पश्चिमेस व दक्षिणेसही समुद्र होता जिथे आज राजस्थान आहे. पूर्वेसही समुद्र असून तो आपल्या उत्तरप्रदेश, बिहारला व्यापून आसामपर्यंत पसरलेला होता. यावरून सप्तसिंधू प्रदेश आजच्या पंजाब, काश्मीर या भागात होता. त्या प्रदेशाचा नकाशाही डॉ. संपूर्णानंद यांनी दिला आहे.

## ५) काळाचा संदर्भ

पृथ्वीवरची आजची भौगोलिक रचना पूर्वीपेक्षा अत्यंत भिन्न असल्याचे भूगर्भशास्त्रीय पुराव्यांवरून निदर्शनास आले आहे. दक्षिण भारताचा भाग पूर्वी गोंडवाना या महाद्वीपाचा भाग होता व तो आजदेखील उत्तरेस सरकत आहे असे दिसते. पूर्वी ॲटलांटिक नावाचे महाद्वीप अस्तित्वात होते व नंतर ते नष्ट झाले. आजच्या हिमालयाच्या स्थानी पूर्वी समुद्र होता. बऱ्याच नद्यांचे प्रवाह बदलले गेले आहेत इत्यादी मते हेच दाखवितात. परंतु हे सर्व बदल घडून येण्यास हजारो-लाखो-वर्षांचा काळ लागत असतो हेही मान्य केले जाते. म्हणून आजच्या पेक्षा अत्यंत भिन्न, भौगोलिक रचनेचा उल्लेख असल्यास तितका काळ लोटला असला पाहिजे असे मानता येते. आजच्या मान्यतेप्रमाणे देखील ऋग्वेद सर्वात प्राचीन ग्रंथ आहे. त्याचा रचनाकाळ निश्चित करण्याचा अनेकांनी प्रयत्न केला आहे.

पाश्चात्य विद्वान साधारणतः ४,००० वर्षांपूर्वी ऋग्वेदाची रचना झाली असे मानतात. लोकमान्य टिळकांनी काही सूत्रांवरून ते अदमासे १०,००० वर्षांपूर्वी झाले असले पाहिजेत असे दाखविले. काही लोकांनी हा काळ १७ ते १८ हजार वर्षे मागे नेला आहे. श्री दीनानाथ शास्त्री

चुलैट यांच्या वेदकाल निर्णय या ग्रंथानुसार वेदांचा काल तीन लाख वर्षापूर्वीचा आहे. यावरून एवढे दिसून येते की वेद अत्यंत प्राचीन असल्याचे सर्वमान्य असले तरी त्याच्या रचनाकालाबद्दल एकवाक्यता नाही. हा काल काही हजार वर्षापासून काही लाख वर्षापर्यंत दाखविलेला दिसतो.

भारतीय परंपरेप्रमाणे महाभारताचा काल साधारण ५००० वर्षापूर्वीचा आहे. त्यानंतर कलियुगाला सुरुवात झाली. त्याकाळची भौगोलिक स्थिति साधारणतः आजच्याप्रमाणे होती असे दिसून येते. याच काळात श्री व्यास महर्षींनी वेदांचे वर्गीकरण केले, त्याप्रमाणे पुराणांचीही रचना केली. म्हणजे पूर्वी अस्तित्वात असलेले ग्रंथ पुढील काळाकरिता वर्गीकरण करून प्रचलित व्यवस्था करून दिली.

'वेद' याचा अर्थच 'ज्ञान' असून 'वेद अनंत बोलिला' असे तुकाराम महाराजांचे वचन आहे. म्हणजे ज्ञानाला अंत नाही अर्थात मर्यादा नाही. कोणताही नवीन शोध लागला म्हणजे पूर्वी ते ज्ञान नव्हते आता निर्माण झाले असे नसून ते आता समजले येवढेच ! उदाहरणार्थ - गुरुत्वाकर्षणाचा नियम न्यूटनने शोधला असे मानले जाते. पण याचा अर्थ त्यापूर्वी गुरुत्वाकर्षण अस्तित्वात नव्हते असा होत नाही, त्याचप्रमाणे वेदातील अमुक ऋचा अमुक ऋषींनी रचली याचाही अर्थ 'त्यांच्या काळी ती प्रकट झाली' असाच होतो. श्रुति = ऐकणे या शब्दाच्या अर्थावरूनही हीच गोष्ट स्पष्ट होते. भारतीय परंपरेप्रमाणे आर्यांचे सर्व धर्मग्रंथ मनुष्यप्रणीत नसून ईश्वरप्रणीत आहेत व ते परमात्म्याने सृष्टीच्या आरंभीच सांगून ठेवले आहेत.

सृष्टिप्रपंचाचे वर्णन करणे हा श्रुतींचा मुख्य उद्देश नाही. त्यामुळे त्यातील वर्णनावरून भौगोलिक स्थितीचे अनुमान करणे व मूळ वसतिस्थानाचा निर्णय करणे हे मुळात अयोग्य आहे.

वेदकर्ता परमेश्वर सर्वज्ञ असल्यामुळे त्याच्यापासून निर्माण झालेल्या वेदांत ध्रुवीय स्थितीचे किंवा आणखी कोठले वर्णन असल्यास त्यात नवल ते काय? कोणताही सिद्धांत मांडण्याकरिता प्रमाण देण्याची आवश्यकता असते. साधारणपणे प्रत्यक्ष व अनुमान हीच दोनच प्रमाणे आज महत्त्वाची मानली जातात. परंतु तिसरे शब्द प्रमाण मानणे आवश्यकच असते. साधी गोष्ट म्हणजे पोटी जन्माला आलेल्या मुलाला आपल्या आईचे वय काय, हे प्रत्यक्ष प्रमाणाने कसे कळणार? त्याला आईचा शब्दच प्रमाण मानला पाहिजे. त्याचप्रमाणे सृष्टीत उत्पन्न झालेल्या कोणालाही सृष्टिचे कारण स्वबुद्धीने ज्ञात होऊ शकत नाही. म्हणूनच परमेश्वराने स्वतः श्रुतींच्या रूपाने ज्ञान उपलब्ध करून दिले. हे शब्दप्रमाणच. त्या शब्दावरच अविश्वास दाखवावयाचा?

हा नियम प्रस्तुत लेखाच्या संदर्भात महत्त्वाचा असल्यामुळे येथे त्याची थोडक्यात चर्चा केली.

## ६) आर्य शब्दाचा अर्थ

आर्य ग्रंथातून आर्य व अनार्य हे शब्द उजेड व अंधार याप्रमाणे विरुद्धार्थी आलेले आहेत. 'आर्य' हा शब्द ऋ या धातूपासून झाला असून त्याचा अर्थ श्रेष्ठ, पूज्य असा आहे.

*कर्तव्यमाचरन् कार्यमकर्तव्यमनाचरन । तिष्ठति प्रकृताचारे स वै आर्य इति स्मृतः ॥*

याचे विस्तृत विवेचन श्री बाबाजी महाराज पंडित यांनी आपल्या 'आर्य धर्मोपपत्ति' या ग्रंथात केले आहे. त्याचा थोडक्यात आशय असा आहे की श्रीमद्‌भगवद्‌गीतेत सांगितलेल्या पैकी दैवी संपत्तीचा धारक आर्य व त्या उलट आसुरी संपत्तीचा साठा म्हणजे अनार्य ! आर्यांना अनार्य ठरविणे व आपण स्वतः अनार्य असून आर्य म्हणविणे हेच अनार्यांचे मुख्य लक्षण होय.

## ७) दास दस्यु आदि शब्दांचा अर्थ

ऋग्वेदातील उल्लेखावरून दस्यु (दास) व आर्य यांच्यात दृश्य भेद नाही, तर दस्यु हे अकर्मा व अन्यव्रत आहेत. म्हणजे ते आर्यांप्रमाणे यज्ञयागादि करीत नाहीत हाच मुख्य भेद.

*न विशेषोऽस्ति वर्णानां सर्व ब्राह्ममिदं जगत् । कामभोगप्रियातीक्ष्णाः क्रोधनाः प्रियसाहसाः ।*
*त्यक्तस्वधर्माः रक्तांगाः ते द्विजा क्षत्रतां गताः ॥*
*गोभ्यो वृत्तिं समास्थाय पीताः कृष्युपजीविनः । स्वधर्मान्नानुतिष्ठन्ति ते द्विजा वैश्यतां गताः ॥*
*हिंसा-अनृतप्रियाः लुब्धाः सर्वकर्मोपजीविनः । कृष्णाः शौचपरिभ्रष्टाः ते द्विजाः शूद्रतां गताः ॥*
*महाभारत शांतिपर्व*

*आदि कृतयुगामध्ये एकच हंस वर्ण होता व नंतर मनुष्याच्या स्वभावानुसार* - गुणकर्मानुसार - इतर वर्ण झाले.

*शनकैस्तु क्रियालोपात् इमा क्षत्रियजातयः । वृषलत्वं गता लोके ब्राह्मणादर्शनेन च ॥*
*पौण्ड्रकाश्चौण्ड्र-द्रविड-कांबोजाः यवनाः शकाः । पारदाः पल्लवाश्चीनाः किराताः दरदाः खशाः ॥*
*मुखबाहुरूपज्जातानां या लोके जातयो बहिः । म्लेच्छवाचश्चार्यवाचः सर्वे ते दस्यवः स्मृतः ॥ मनुस्मृति*

अर्थात कर्मलोपामुळे तसेच ब्राह्मणाच्या अ-दर्शनाने (म्हणजे मार्गदर्शन करणारे न मिळाल्यामुळे) संस्कार न राहिल्यामुळे क्षत्रिय आदि जातींना वृषलत्व प्राप्त झाले. पौण्ड्र, यवन, शक, चीन इत्यादी जाती संस्कार लोपामुळे दस्यु म्हटल्या गेल्या. मग त्यांची भाषा आर्य असो वा म्लेच्छ (अशुद्ध) असो, ब्राह्मणांचे अदर्शन त्यांचा संपर्क तुटल्याचे दर्शविते.

द्विजांचा उपनयनसंस्कार विशिष्ट वयापर्यन्त न झाल्यास त्यांना व्रात्य म्हटले जाते.

*शतपथ ब्राह्मणः ते असुरा आत्त वचसो हे अलवो हे अलव इति वदन्तः पराबभूवुः । तस्मान्न ब्राह्मणो म्लेच्छेत् । असुर्यावि एषां वाक् ।*

असूर लोक 'हे अलवः हे अलवः' असे म्हणत हरले. म्हणून ब्राह्मणांनी म्लेच्छता करू नये म्हणजे चुकीचे अशुद्ध उच्चार करू नयेत. असुरांची वाणी अशुद्ध होती. त्यांना 'हे अरयः' (हे शत्रुंनो) असे म्हणावयास हवे होते. याचा अर्थ असा की ज्यांचे उच्चार (वाणी) शुद्ध नाही ते असुर. संस्कृतला देववाणी म्हणतात हे येथे लक्षात घेतले पाहिजे (देव = सुर). महाभारतात लाक्षागृह प्रसंगी विदुराने धर्मराजाला म्लेच्छ भाषेत संदेश पाठविला असा उल्लेख आहे. ही भाषा सामान्य जनांना अवगत नसल्यामुळे तो संदेश आपोआपच गुप्त राहिला.

या सर्व विवेचनाचा सारांश असा की मूळ आर्य एकच (वर्णाचे)

असून **"संस्कारलोप व अशुद्ध उच्चार"** या मुख्य कारणांनी ते इतर जाति व वर्णाचे झाले.

श्री गुलाबराव महाराजांनी सत्त्व रज तम या त्रिगुणांच्या कमी अधिक असण्यामुळे मानवांचे वर्गीकरण कसे झाले आहे ते सांगितले आहे –

१) ज्यांना काहीच करावेसे वाटत नाही. तम + रज = शूद्र.
२) ज्यांच्या क्रिया केवळ स्वार्थाकरिता. रज + तम = वैश्य.
३) आपला तसाच दुसऱ्याचा फायदा कसा होईल ते पाहणारे. सत्त्व + रज = क्षत्रिय
४) दुसऱ्याचा फायदा कसा होईल ते पाहणारे - सत्त्वगुणी - ब्राह्मण

अशा प्रकारे उत्तरोत्तर संगति लावून दाखविली व सर्वांनी सत्त्वगुण वाढविण्याचा प्रयत्न करावा, असे सांगितले.

***सत्त्ववृद्धिर्भवियेन अन्य गुणद्वयघातिनी । सहि धर्मो न चान्यः स्यादिति स्वात्मनिर्णयः ॥***

अशी धर्माची सोपी व्याख्या केली आहे.

## ८) भाषा व शब्दसाम्य

डॉ. संपूर्णानंदादी लोकांनी निरनिराळ्या भाषांतील शब्दांचे साम्य दाखविले आहे. उदाहरणार्थ :

| संस्कृत | इराणी | इंग्रजी | पौराणिक | युरोपियन |
|---|---|---|---|---|
| पितृ | पिदर | फादर | हर्यश्च | अरुअश |
| गो | गाव | काऊ | मुद्गल | मद्गल |
| पद | पा | फूट | परसंनदि | विअयनदि |

तसेच जर्मन व शर्मण्य भाषांत देखील अनेक शब्द संस्कृताशी जुळते असल्याचे दिसून येते. परंतु जरा बारकाईने पाहिल्यास इतर भाषांमधली शब्द संस्कृतची अपभ्रंश रूपे असल्याचे सहजच लक्षात येईल. एका गोष्टीकडे विशेष कोणी लक्ष दिलेले दिसत नाही - ती म्हणजे त्यांचे व्याकरण. जर्मन व रशियन या दोन्ही भाषांची रचना व व्याकरण बऱ्याच अंशी संस्कृताशी जुळणारी आहे. शब्दसाम्यापेक्षा ही गोष्ट जास्त महत्त्वाची आहे.

संगणकाचा वापर वाढल्यानंतर अनेक विद्वानांच्या ध्यानात ही गोष्ट आली आहे की संस्कृत भाषा जास्त तर्कनिष्ठ/लॉजिकल असल्यामुळे संगणकीय कामाकरिता इतर कोणत्याही भाषेपेक्षा जास्त योग्य आहे. याचाच अर्थ इतर तत्सम भाषा त्या प्रमाणात विकृत (अपभ्रंश) असल्या पाहिजेत.

हे विवेचन वरील परिच्छेदातील **"संस्कारलोप व अशुद्ध उच्चार यांनी जातिक वर्णभेद झाले"** या सिद्धान्ताला पूरकच आहे.

## ९) श्रीगुलाबराव महाराजांचे प्रतिपादन

वरीलप्रमाणे ५ ते ८ या परिच्छेदात जे विचार मांडले आहेत ते श्रीगुलाबराव महाराजांनी प्रतिपादन केलेल्या सिद्धांताला धरूनच असून त्याची पुष्टी करणारे आहेत. श्रीमहाराजांच्या म्हणण्याप्रमाणे आर्य हा एक वंश असून तो पूर्वी एके ठिकाणी रहात होता व तेथून ठिकाठिकाणी पसरला व त्यांच्या शाखा भिन्न भिन्न प्रदेशी स्थायिक झाल्या हा सर्व आधुनिक विचारसरणीचा प्रचार योग्य नाही. त्याने अनेक गोष्टींची संगति लागू शकत नाही व केवळ प्रचारकी थाट दिसून येतो. एवढेच नव्हे तर 'आपले तेच खरे' असा दर्पही आढळतो कारण त्यात दुसरा विचार त्याज्य मानण्याची प्रवृत्ति दिसते.

श्री गुलाबराव महाराजांनी ठासून सांगितलेला सिद्धांत असा की, सर्व सृष्टीमध्ये आरंभ काळी एकच हंस-वर्ण असून त्यापासून क्रमाने संस्कारलोप व भाषेतील उच्चारांची अशुद्धी इत्यादी कारणामुळे अनेक भेद निर्माण झाले व ते ते समूह राहत असलेल्या प्रदेशातच त्यांची वसति प्रामुख्याने आजही आढळते. कोणी कोठे गेले नाही वा आले नाहीत. कमीतकमी आर्यांना तरी ही गोष्ट लागू पडते.

"पूर्वी सर्व सृष्टीमध्ये आर्य संस्कृतीच होती. ते भारतात बाहेरून आले असे नाही. किंवा येथून बाहेर गेले असेही नाही." मात्र आज घटकेला आर्य संस्कृतीचे अस्तित्व केवळ भारतातच दृष्टीस पडते. ही विचारसरणी आर्य परंपरेला धरूनच आहे.

**प्रा. रा. गो. लिमये (निवृत्त)**
सिव्हिल इंजिनियर, इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी (आय.आय.टी.)
पवई, मुंबई - ४०००७६.

# अध्यात्म गुलाब

मनोहारी संगम हा विद्वत्ता अन साधुत्वाचा ।
काय वर्णू महिमा श्री गुलाबराव महाराजांचा ॥धृपद॥
कन्या ज्ञानेशांची अन भार्या श्रीकृष्णाची ।
रोवी मेढ अवनी मधुरा द्वैत संप्रदायाची ।
अंध जरी लौकीकी तरी ज्ञानसविता साचा ।
अलौकीक चमत्कार हा ईश्वरलिलेचा ॥१॥ धृ
शुद्ध भक्त प्रेम अन सुखानुभूती दाता ।
पाश्च्यात्य तत्त्वज्ञानाची करी सिद्ध विफलता ।
निवारी अंधःकार बुवाबाजी चमत्कारांचा ।
पसरवी सौरभ जगती भक्ती ज्ञान गुलाबाचा ॥२॥ धृ
सर्वगामी अलौकीक दीव्य प्रज्ञावंत ।
विविध विषयांवर तुम्ही ग्रंथ लिहिलेत ।
पंच भाषात केला आविष्कार वाङ्मयाचा ।
शब्दातीत महिमा या प्रतिमासागराचा ॥३॥ धृ
अणुवाद खंडनाचे तुमचे, तात्विक विवेचन ।
अनुपमेय प्रज्ञेने केलेत, नवे योगदान ।
आत्मसाक्षात्कारी रूप अन अर्णव ज्ञानाचा ।
सर्वज्ञानी सर्वसाक्षी हा मेरू वैराग्याचा ॥४॥ धृ
जीवन अल्पायुषी तरी कार्य वैचारिक उदंड ।
अद्वितीय प्रतिभेचा तुम्ही ईशमानदंड ।
सुगंध दरवळे सदा तुमच्या भक्ती योगत्वाचा ।
स्विकारी प्रेमभावे हार हा वसंत काव्यसुमनाचा ॥५॥ धृ

**वसंत गोडबोले**
१२४, शनिवार पेठ (नेने घाट), पुणे ३०.

# विदर्भ ज्ञानेश्वर - ज्ञानचक्षु गुलाबराव महाराज

*एम.ए.बी.एड., संगीत विशारद भारत गायन समाज. ५-६ पुस्तके प्रकाशित. शिक्षणामध्ये मागे रहाण्याऱ्या विद्यार्थ्यांसाठी व प्रौढ विद्यार्थी शिक्षणासाठी २० वर्षे विनावेतन कार्य. मोठ मोठ्या व्यक्तींपुढे स्वागत गीत गायन.*

**म**हाराष्ट्राला थोर संतांची फार मोठी परंपरा आहे. श्रीज्ञानेश्वर, एकनाथ, नामदेव, तुकाराम याच संतश्रेष्ठांच्या मालिकेत श्री गुलाबराव महाराज. ते स्वतःला ज्ञानेश्वरांची कन्या मानत.

१८८१ ते १९१५ असे फक्त चौतीस वर्षांचे अल्पायुष्य त्यांना लाभले. या अल्प आयुष्यात त्यांनी १३१ ग्रंथ रचले. या ग्रंथांमध्ये सर्व ज्ञानशाखांचे लेखन आहे. ते विस्तृत व सर्वगामी आहे.

श्री गुलाबराव महाराज अंध होते. दृष्टीसुख नसूनही अतींद्रिय ज्ञानाने ते अनेक गोष्टी पाहू शकत होते. हे वऱ्हाडमधील 'माधान' या गावचे. ते लहानपणी अत्यंत तेजस्वी दिसत असत. रंग सावळा पण डोळे टपोरे आणि पाणीदार होते. साजिरी गोजिरी अशी मूर्ती होती. म्हणून त्यांना सर्वजण 'सुंदर नारायण' असे म्हणत. ते ९ महिन्यांचे असताना त्यांचे डोळे आले. ते बरे व्हावेत म्हणून कोणीतरी औषध म्हणून झाडपाल्याचा रस घातला, परंतु डोळे बरे न होता उलट त्यांना दृष्टी गमवावी लागली.

त्यांचे चर्मचक्षू जरी नाहीसे झाले तरी प्रज्ञाचक्षू खूपच सामर्थ्यवान होते. त्याचा प्रत्यय इतरांना त्यांच्या लहानपणीच येऊ लागला. वयाच्या चौथ्या वर्षीच मातृछत्र हरपले. पण आईची आई सावित्री आजी हिने त्यांचा सांभाळ केला. लहानपणीच त्यांना परमेश्वरी रूपाचे दर्शन होई. मग ते त्याला घास भरवायला जात असत. परंतु इतर लोकांना मात्र गुलाब भ्रमिष्ट आहे, तो आपल्याच तंद्रीत असतो असे वाटत असे. त्यांची अतींद्रिय जाणीव अतिशय तीव्र होती म्हणून त्यांना डोळस माणसाप्रमाणे सारे दिसत असे. घरात सर्वत्र हिंडत असत. पाणी भरायलाही विहिरीवर जात, तेथे प्रत्येक बाईच्या हातातील बांगड्या व पायातील जोडव्यांच्या आवाजावरून त्यांची नावेही सांगत असत.

वयाच्या दहा वर्षांपर्यंत ते आजीकडे राहिले. तेथे नियमाने कीर्तन प्रवचनाला जात असत. देवापुढे तासनूतास बसत असत. गावच्या लक्ष्मणभट जोशी यांचेकडून त्यांनी अनेक स्तोत्रे व श्लोक शिकून पाठ केले. त्यांना पुराण आणि कुराणाचीही आवड होती.

त्यांच्या वडिलांनी पुनर्विवाह करून परत महाराजांना माधानला बोलावून घेतले. आता त्यांच्या चुलतीने त्यांचा सांभाळ केला. श्री गुलाबराव महाराज ज्ञानसाधनेला व्याकुळ झाले होते. ते लोकांकडून धार्मिक पोथ्या, पुस्तके, बायबल, कुराण, उपनिषदे, झेंदवस्ता हे धर्मग्रंथ वाचून घेत असत, ते श्रद्धापूर्वक ऐकत. तसेच रोज रात्री तासनतास समाधीचा अभ्यास करून समाधी लावून बसत.

श्री गुलाबराव महाराज अकरा वर्षांचे झाल्यावर त्यांना रामराव देशपांडे ह्या शिक्षकांकडून शिक्षण देण्यात आले. ते शब्दरूपावली, लघुव्याकरण, उपनिषदे शिकवत. गुलाब महाराजांना एकपाठी सामर्थ्य व असामान्य ग्रहणशक्ती होती.

कारंजकरबुवा नावाच्या महानुभाव संताकडून 'नवे प्रकरण' हा धर्मग्रंथ वाचून शिकून घेतला. त्यातील श्लोकांचे वेगवेगळे अर्थ सांगितले. गुलाबरावांनी सामवेदाचे स्वरदार खणखणीत गायन गाऊन दाखविले.

याच काळात त्यांनी अनेक पुस्तके जमा केली. एका लाकडी पेटीत ती व्यवस्थित ठेवून अनेक ठिकाणी तत्त्वचर्चा करण्याकरिता ती डोक्यावर घेऊन प्रवास करत. वयाच्या १५ व्या वर्षी त्यांनी महानुभाव पंथाच्या तत्त्वज्ञानाचे खंडन केले. उपनिषदातील तात्त्विक विचारांवर कविता लिहिल्या. 'ब्रह्म सत्य व जगन्मिथ्या' या तत्त्वावर एक निबंध लिहिला. वऱ्हाडी बोलीत गाणी लिहिली. अनेक विरहिणीही त्यांनी रचल्या. याच वेळी त्यांना अद्वैत तत्त्वज्ञानाचा अनुभव आला. अखेर पूर्वीच्या रामराव गुरुंनीच त्यांना त्यांच्या घरी आणले. येथे त्यांनी अनेक रचलेली पदे, त्यांचे अर्थ, अध्यात्मक्षेत्रातील महान तत्त्वे सोप्या भाषेत सांगण्याचे कार्य सुरू केले. त्यांच्या वयाच्या १६ व्या वर्षीच काही शिष्यांनी त्यांचेकडून गुरुमंत्र घेतला.

गुलाबराव महाराजांचा विवाह मनकर्णिका नावाच्या मुलीशी झाला; परंतु लग्नानंतर संपूर्ण आयुष्य परमार्थात व्यतीत करायचे अशी प्रतिज्ञा तिनेही घेतली.

आषाढ शुद्ध दशमी सन १९०१ रोजी गुलाब महाराजांनी 'सोपानसिद्धी' हा ग्रंथ परमार्थाच्या साधकांसाठी रचला. यात सद्गुरु व शिष्य यांची प्रश्नोत्तरे आहेत. योगाच्या १६ प्रक्रियेतून परमानंद मिळविता येतो.

महाराजांनी 'नित्यतीर्थ' हे काव्य रचले. यात 'साधकाला सद्गुरुंच्या कृपेने ब्रह्मनिष्ठ होता येईल, परमेश्वरावर मनापासून प्रेम केले तर कोणालाही शुद्ध ब्रह्माशी एकरूप होता येते' असे सांगितले. त्यानंतर १९०७ साली महाराजांनी 'मधुराद्वैत वाङ्मय' निर्माण करून त्याचा प्रसार केला. 'भक्तिपद तीर्थामृत' या ग्रंथाची निर्मिती झाली. यानंतर महाराजांचे सारे ग्रंथ मालारूपाने प्रसिद्ध केले. त्याला 'मुक्तिरत्नावली' हे नाव दिले. त्यांच्या ग्रंथांमध्ये १३१ लहानमोठ्या ग्रंथांचा समावेश आहे.

'मनीषापंचक' या स्तोत्राचा मराठी पद्यानुवाद त्यांनी लिहून पूर्ण केला. तसेच 'अंतर्विज्ञान संहिता' नावाची मोलाची रचना याच काळात केली.

महाराजांनी हिंदी, संस्कृत, वऱ्हाडी आणि व्रज भाषांमध्ये खूप लिखाण केले आहे. महाराजांची निवडक 'उपदेशामृत पत्रे' भाग १ व २ अशी प्रसिद्ध झालेली आहेत. यामध्ये भक्तांना कळवळीने व सोप्या शब्दात भक्तीचा उपदेश आहे.

अकोला येथे महाराज श्री धामापूरकर यांचेकडे राहात असत. त्यांना महाराज म्हणाले, ज्ञानेश्वर मला सतत दिसतात. जागृतीत, स्वप्नात व सुषुप्तीत ज्ञानेश्वरांना मी सतत स्पष्टपणे पहात असतो. धामापूरकरांनी त्यांना 'श्रीज्ञानेश्वरांचे चित्र उपलब्ध नाही, आपण जर त्यांचे चित्र आपल्याला ते जसे दिसतात तसे काढून घेतलेत तर जगावर फार उपकार होतील',

असे म्हटले. महाराजांनी चित्र काढून घेण्याचे कबूल केले तेव्हा चित्रकाराला बोलावून घेतले व त्यांनी चित्र कसे काढावयाचे ते अगदी बारकाव्यांसहित सांगितले. चित्र काढून झाल्यावर श्री महाराजांनी ते मान्य केले. हेच चित्र आता अधिकृत मानले जाते.

महाराजांनी 'शांतीसुधाकर' या ग्रंथाची तसेच 'प्रिय पाहुणेर' या ग्रंथाची रचना केली. भगवंताच्या ठिकाणी प्रेम उद्‌भवले म्हणजे काम, क्रोध शत्रूंची भीती रहात नाही. महाराजांनी लहान मुलांसाठी बाराखडी रचली आहे. महाराजांनी 'साधुबोध' हा ग्रंथ लिहिला.

पत्नीसमवेत आळंदीला आले. ज्ञानदेव समाधीपाशी ३ दिवस महाराज बसून राहिले. अन्नपाणी वर्ज्य केले व काकुलतीने त्यांच्या दर्शनासाठी प्रार्थना करू लागले. तीन दिवसांनंतर ज्ञानेश्वर महाराज त्यांना प्रसन्न झाले, अशी कथा आहे.

नंतर कुऱ्हा मुक्कामी श्रीकृष्णजन्माष्टमीचे उत्सवप्रसंगी महाराजांनी महावाक्योपदेश दिला. त्यानंतर वृंदावनादी तीर्थक्षेत्रांच्या यात्रा केल्या.

इ. स. १९०२ मध्ये महाराजांनी कात्यायनी व्रताला प्रारंभ केला. या व्रतात श्रीकृष्णास पती व स्वतःला गोपी कल्पून माधुर्य भक्तीद्वारे श्रीकृष्णाची भक्ती करावयाची असते. गोपींप्रमाणे निर्मळ व निर्हेतुक भक्ती करा असे ते सांगतात. श्रीकृष्णाची पूजा व ज्ञानेश्वरीपारायण करून व्रताला सुरुवात केली. कात्यायनी व्रताच्या समाप्तीच्या दिवशी महाराजांच्या आदेशानुसार पुराणोक्त होम करण्यात आला. आजही हे व्रत या संप्रदायातील लोक भक्तिभावाने करतात.

महाराजांनी 'प्रीतिनिर्तन' हे काव्य रचले आहे. यात लालनभक्ती, वात्सल्यभक्ती व माधुर्यभक्ती असे भक्तीचे तीन प्रकार सांगितले. लालनभक्तीत परमेश्वराला माता व स्वतःला लेकरू मानून भक्ती करावी, वात्सल्य भक्तीत परमेश्वराला मूल समजावे व स्वतःला माता-पिता समजावे. माधुर्यभक्तीत देवाला प्रियकर मानून स्वतःला प्रेयसी मानून भक्ती करावी.

महाराजांना मुलगा झाला. परंतु महाराजांचे मन माया मोहापासून अलिप्तच राहिले. महाराजांनी चांदीच्या पादुकांचा जोड आळंदी देवस्थानला अर्पण केला. भजन कीर्तन निरूपण असे कार्यक्रम होऊ लागले. यामुळे भक्तिमार्गाला मोठी चालना मिळाली.

महाराजांनी सांगितलेल्या ठिकाणी ग्रंथपालाला पोथी सापडली. चर्मचक्षू नसले तरी महाराजांना दिव्यचक्षू होते याची प्रचिती अनेक वेळा आली.

महाराजांनी 'स्त्रीगीत संग्रह' हे पुस्तक लिहिले. यात १०९२ ओव्या आहेत. सद्‌गुरु भक्ती साधनदशेपासून सिद्धदशेपर्यंत वाढते, ती फलद्रूप कशी होते अशी गीते आहेत. प्रापंचिक विषयापासून सोडवून गुरुप्रेम, हरिहरोपासना, अद्वैतज्ञान व पराभक्ती अशी स्त्रियांची पारमार्थिक उन्नती करण्याचा त्यांचा प्रयत्न होता.

महाराजांनी तुंबडीवाल्याच्या भाषेत वेदांताची तत्त्वे घातली. या संग्रहाला 'सुमृद्‌गंधछंद' असे नाव दिले. निष्काम कर्म, उपासना, ज्ञान, वैराग्य, भक्ती यावर खेडवळ व ग्रामीण भाषेत लिहिले.

त्या काळी निरनिराळ्या धर्मात दुरावा होता. जातीजातीत द्वेष भावना होती. महाराजांनी त्यातील वैमनस्य मिटवून सामंजस्य निर्माण करण्याचा प्रयत्न केला. एखाद्या तत्त्वावर दृढ श्रद्धा ठेवली पाहिजे, ते तत्त्व समजून घेण्यासाठी बुद्धीचा वापर करा, असे सांगितले.

गुलाबराव महाराजांचा योगविषयक निवडक लिखाणांचा संग्रह 'योगरहस्य' नावाने आहे. यात वेद, उपनिषदे, स्मृती पुराणे वरवरचा विरोध कसा चुकीचा आहे हे दाखविले आहे.

आयुष्याच्या शेवटच्या काळात महाराजांनी आयुर्वेद व ॲलोपॅथीचा तुलनात्मक अभ्यास करून पाच ग्रंथ रचले. मानसायुर्वेद, भीषगिन्द्रशचीप्रभा, वैद्यनंदिनी, वैद्यवृंदावन, भिषकपाटवीपत्ति हे ग्रंथ लिहिले.

महाराजांनी शास्त्रोक्त संगीताचा अभ्यास केला. पं. भातखंडे यांना काही पत्रे लिहून प्रश्न विचारले. त्यांनी उत्तरे पाठविली आणि हा पत्रव्यवहार 'सूक्तीरत्नावली' व 'विश्वब्धशारदा' खंड दोन यात प्रसिद्ध आहे.

'गानसोपान' या ग्रंथाची निर्मिती केली. श्रुती व स्वरांचे विवेचन करताना नादोपासना सांगितली. निर्गुण ब्रह्माची प्राप्ती कशी करावी व सगुण परमेश्वराची प्राप्ती संगीतातून कशी करता येईल याचे उपाय या ग्रंथात आहेत.

महाराजांना अनेक संस्थानिकांची बोलावणी येत असत परंतु त्यांना उपाधी वाढवायची नव्हती. त्यांनी आपल्या प्रकृतीची पर्वा न करता ज्ञानप्रसाराचे कार्य चालूच ठेवले.

१९१५ साली फेब्रुवारी महिन्यात महाशिवरात्रीच्या उत्सवात पूजा करीत असताना हातातील शिवलिंग भंगले, तेव्हा आता जायचे दिवस आले असे समजले. पुण्याच्या महर्षी अण्णासाहेब पटवर्धन या नामांकित वैद्यांकडून महाराजांना औषधे दिली गेली. त्यांच्या प्रकृतीत सुधारणा होत नव्हती. अखेर भाद्रपद शुद्ध द्वादशी २२ सप्टेंबर १९१५ ला महाराजांचे निर्वाण झाले.

**सौ. सीना गरसोळे**
१०/४ लक्ष्मीनारायण नगर, पुणे ४.

# श्री गुलाबराव महाराज - साहित्यसृष्टी आणि साहित्यदृष्टी

*एम.ए., एल.एल.बी., पीएच.डी. मराठीचे अध्यापक एस.एन.डी.टी. विमेन्स कॉलेज, पुणे (१९५४ ते १९८५) कॉलेजचे प्राचार्य व मराठी विभाग प्रमुख म्हणून १९८५ सेवानिवृत्त. 'संत साहित्य विषयक' १५ स्वतंत्र व २० संपादित पुस्तके प्रकाशित. विद्यापीठ पातळीवर उत्कृष्ट शिक्षक म्हणून म.न.पा. आणि महाराष्ट्र शासन पुरस्कार १९७९. विद्यापीठ अनुदान आयोग नियुक्त राष्ट्रीय व्याख्याता. महिला विद्यापीठ नियुक्त 'इमेरिटस प्रोफेसर' महाराष्ट्र साहित्य परिषद. माजी उपाध्यक्ष.*

**पूर्व** दिशेच्या क्षितिजावर सूर्य उगवण्याच्या आधीच अरुणोदयाचा प्रकाश दिसू लागतो. सूर्याचे बिंब वर येण्याआधीच तांबडे फुटते. योगभ्रष्ट साधकाच्या बाबतीतही असेच काही घडते. तो योगी बालवयात असला तरी त्याच्या ठिकाणी आत्मज्ञानाचा उदय होतो. पूर्वजन्मातले ज्ञान त्याला शोधत येते, केव्हा तर त्याच्या बाळपणीच. ते ज्ञान, तो मोठा होण्याची वाट पाहात बसत नाही. बालपणातच त्याला सर्व ज्ञान प्राप्त झालेले असते. त्याचे मन सर्व विद्यांनी संपन्न असते. त्याच्या मुखातून सगळी शास्त्रे आपोआप प्रगट होतात.

सिद्ध योग्याचे श्रीज्ञानदेवांनी केलेले हे वर्णन संत गुलाबराव महाराज यांना तंतोतंत लागू पडते. अमरावती जिल्ह्यातील 'लोणी-टाकळी' या गावी इ.स. १८८१ मध्ये त्यांचा जन्म झाला. १९१५ मध्ये पुणे शहरात त्यांचे निधन झाले. अवघे चौतीस वर्षांचे अल्प आयुष्य त्यांना लाभले. ते नऊ महिन्यांचे असतानाच त्यांची दृष्टी गेली. चर्मचक्षू गेले खरे; पण त्यांना प्रज्ञाचक्षूंची देवदत्त देणगी मिळाली होती.

## साहित्यनिर्मितीची पार्श्वभूमी

१८९० मध्ये महाराज अमरावती जिल्ह्यातल्या एलिचपूर तालुक्यातील 'माधान' या गावी राहायला गेले. तिथे त्यांना ग्रंथ श्रवणाची आवड उत्पन्न झाली. लक्ष्मणभट जोशी, पांडुरंगपंत पांडे, केशवराव पांडे अशा काही मित्रांकडून ते सतत कोणता ना कोणतातरी ग्रंथ वाचून घेत असत. मराठी, संस्कृत, हिंदी, इंग्रजी या भाषांतील पंडितांचे ग्रंथ महाराजांनी ऐकले. एकदा ऐकले की, ते त्यांना पाठ होत असत. प्रसिद्ध गायक नामदेवबुवा यांच्याजवळ महाराज रोज दोन तास गाणे शिकत असत. अमरावतीच्या मुक्कामात ते दररोज सायंकाळी दादासाहेब खापर्डे यांच्याकडे जात असत. तिथे विद्वान मंडळींचा सहवास त्यांना लाभत असे. एकदा 'हरदा' या गावी गोंदवलेकर महाराज त्यांना भेटले. त्यांच्याबरोबर गुलाबरावांनी अनेक विषयांवर चर्चा केली.

गुलाबराव महाराजांची स्मृती तल्लख होती. भवानी शंकर नियोगी यांचे भाषण त्यांनी एकदा ऐकले. ते समग्र भाषण महाराजांनी शब्दशः म्हणून दाखविले. 'तिये सिद्ध प्रज्ञेचेनि लाभें । मनचि सारस्वतें दुभें ।।' ही ज्ञानेश्वरीत सांगितलेली सिद्धी महाराजांना लाभली होती.

## महाराजांची साहित्यसृष्टी

गुलाबराव महाराजांनी विविध भाषांतून, विविध विषयांवर, सहा हजार पानांची, गद्य व पद्य रचना केली आहे. त्यांचे सव्वाशेहून अधिक, लहानमोठे ग्रंथ आहेत. एका जन्मांध तरुणाने, कुठलेही शालेय शिक्षण न घेता, एवढी अफाट ग्रंथरचना करावी, हा मोठाच चमत्कार होय. अडीच हजार अभंग, अडीच हजार संगीत पदे व सव्वाहजार गीते त्यांनी रचली आहेत. ही रचना संस्कृत, मराठी, हिंदी व ब्रज या भाषांतून आहे. पदांना त्यांनी स्वतः रागात व तालात बांधून चाली लावल्या आहेत.

निबंध, लोकगीतं, पत्र, नाटक, चरित्र, अभंग अशा अनेकविध वाङ्मय प्रकारांतून त्यांनी लेखन केले आहे. चौपाई, दोहा, साकी, ओवी अशा वृत्तांतून मंगलाचरण, गुरुस्तवन, संतमहिमा, विराणी, उपासना, भक्ती, वेदान्त, कृष्णलीला असे अनेक विषय आपल्या पदांतून त्यांनी मांडले आहेत.

'जीवींचा जिव्हाळा' या काव्यात महाराजांनी ज्ञानदेवांविषयीचा आपला आदरभाव पुढीलप्रमाणे व्यक्त केला आहे.

*''मायबाप माझा इंद्रायणी तीरीं ।*
*कोमल अंतरीं पूर्ण प्रेम ॥*
*माहेरी जावया अत्यंत आवडी ।*
*गुरुकुळीं गोडी ऐसी लागे ॥*
*तेंचि सर्वकाळ व्हावी वृद्धिंगत ।*
*हेंचि मी मागत जन्मोजन्मीं ॥*
*ज्ञानेश्वर प्रभू जीवींचा जिव्हाळा ।*
*निजापत्य - लळा पुरविला ॥''*

महाराजांच्या विपुल साहित्य-सृष्टीचे विहंगदर्शन घ्यायचे आहे. ते स्वतः अंध होते. 'आंधळ्याची काठी' या अर्थाने आपल्या ग्रंथसंग्रहाच्या प्रत्येक खंडाला त्यांनी 'यष्टी' हे नाव दिले आहे. ग्रंथमालेला 'सूक्तिरत्नावली' असे त्यांनी म्हटले आहे. त्यांच्या ग्रंथांची विभागणी स्थूलपणे अठरा प्रकारांमध्ये करता येते. ती अशी :

| | | |
|---|---|---|
| **१) सूत्रग्रंथ** | : | ईश्वरदर्शन - समसूत्री, काव्यसूत्रसंहिता, एकादशी - निर्णय, इत्यादी. |
| **२) आकर ग्रंथ** | : | संप्रदाय - सुरतरु : भाग एक व दोन, इत्यादी. |
| **३) भाष्य ग्रंथ** | : | ब्रह्मसूत्रव्याख्या, मनोहारिणी, गीता प्रवचने, बालवासिष्ठ इत्यादी. |
| **४) शास्त्रग्रंथ** | : | सुरवरसुधा, आगमदीपिका, शांतिसुधाकर, तत्त्वबोध, इत्यादी. |
| **५) भक्तिग्रंथ** | : | नित्यतीर्थ, भक्तितत्त्व विवेक, गोविंदानंदसुधा, प्रीतिनर्तन, इत्यादी. |
| **६) योग ग्रंथ** | : | ध्यानयोगदिवाकर, सोपानसिद्धी, हिरण्ययोग, ज्ञानेश्वरीनिरूपण, इत्यादी. |
| **७) सांख्य ग्रंथ** | : | सांख्यसुरेंद्र, सांख्य सार, सांख्य तत्त्व, इत्यादी. |

| | | |
|---|---|---|
| **८) संगीत ग्रंथ** | : | छंदप्रदीप आणि गानसोपान. |
| **९) आयुर्वेद ग्रंथ** | : | मानस - आयुर्वेद, वैद्य-वृंदावन, इत्यादी. |
| **१०) प्रकरण ग्रंथ** | : | स्वमत निर्णय, चित्तोपदेश, प्रमाद कल्लोळ, इत्यादी. |
| **११) गाथा ग्रंथ** | : | अभंगांची गाथा आणि पदांची गाथा. |
| **१२) निबंधग्रंथ** | : | अलौकिक प्रवास, अमोघ निरूपण, सिद्धसार, गुरुचरण कौमुदी, इत्यादी. |
| **१३) संवाद ग्रंथ** | : | साधुबोध, स्वर्णकण, मणिमंजुषा, वृत्ति क्षीरसागर, इत्यादी. |
| **१४) पत्रे** | : | अकरा पत्रे, वीस पत्रे, अडतीस पत्रे इत्यादी. |
| **१५) लोकगीते** | : | स्त्रीगीत संग्रह, तुंबडी, रुक्मिणी स्वयंवर, इत्यादी. |
| **१६) स्तोत्रे** | : | कृष्णपंचपदी, गुरुपंचपदी, इत्यादी. |
| **१७) आख्याने** | : | सूचना प्रकरण, अभंगात्मक आख्याने, पदात्मक आख्याने, आत्मचरित्र इत्यादी. |
| **१८) संकीर्ण रचना** | : | सुखपर्व (नाटक), पत्नी प्रेमपराग (चरित्र), मोक्षपट (क्रीडा), शिक्षण - रत्नाकर, इत्यादी. |

गुलाबराव महाराजांच्या व्यासंगाविषयी ह. भ. प. पांगारकर म्हणतात, ''महाराजांची विद्वत्ता व साधुत्व दोन्ही अपूर्व आहेत. वेद, पुराणे, मराठी - हिंदी - संस्कृत वाङ्मय, अरबी भाषेतील वाङ्मय, महंमदी धर्म, खिस्ती धर्म, विविध पंथ, पाश्चात्त्य तत्त्वज्ञान, योगशास्त्रमीमांसा इत्यादी विषयांचे प्रतिपादन ते सोदाहरण व सुलभ रीतीने करतात. कर्म, ज्ञान व उपासना या तिहींचा त्यांच्या ठिकाणी उत्कृष्ट मिलाफ झालेला आहे. त्यांची वाणी मधुर, स्पष्ट व खणखणीत आहे. ज्ञान, भक्ती आणि आचार त्यांच्या ठायी एकवटले आहेत.''

## महाराजांची साहित्यदृष्टी

'काव्यसूत्रसंहिता' हा एकशेब्याण्णव सूत्रांचा शास्त्रीय ग्रंथ महाराजांनी रचला आहे. त्यात त्यांनी काव्यशास्त्र आणि भक्तिशास्त्र यांतील अनुबंध स्पष्ट केला आहे. विषयानंदापासून ब्रह्मानंदापर्यंत, सामान्य कवीपासून साक्षात्कारी कवीपर्यंत आणि जड स्वभावदर्शनापासून भक्तिज्ञानापर्यंत सर्व पायऱ्या त्यांनी क्रमशः मांडल्या आहेत; आणि शेवटी भक्तिरूपी महारसाची सिद्धी केली आहे. महाराज जसे संतकवी होते, तसेच ते काव्यशास्त्रज्ञही होते. संत भूमिका आणि कविभूमिका यांचा सुरेख मेळ त्यांनी घातला आहे.

'काव्यसूत्रसंहिता' हा महाराजांचा पाच अध्यायांचा सूत्रग्रंथ आहे. काव्यसामग्री, कविलक्षण तसेच स्फूर्ति प्रयोजन व लक्षणपाद असे विभाग या ग्रंथात केलेले आहेत.

'भक्तितत्त्वविवेक' हा महाराजांचा प्रकरण ग्रंथ आहे. त्यात भक्ती आणि काव्य यांचे तुलनात्मक विवेचन त्यांनी केले आहे. सूत्रांचा अर्थ समजून घेताना या विवेचनाचा उपयोग होतो.

साधुबोध, संप्रदाय-सुरतरू, अभंगगाथा व छंदप्रदीप या आपल्या ग्रंथांतून महाराजांनी काव्यविषयक स्फुट विचार मांडले आहेत.

महाराजांच्या वरील ग्रंथांच्या आधारे त्यांच्या साहित्यदृष्टीचे विशेष संक्षेपाने सांगता येतील. ते असे :

सृष्टी नामरूपात्मक आहे. तिच्या अंतर्गत असलेल्या ईश्वराच्या स्वरूपाचा अनुभव जे आणून देते, तेच खरे काव्य होय. काव्याच्या आस्वादाने लाभणाऱ्या आनंदाचे दोन प्रकार आहेत. बाह्य विषयापासून जो आनंद होतो, तो भोगरूप होय; आणि साक्षीपासून होणारा आनंद स्वयंरूप होय. शांत आणि भक्ती हे रस स्वयंरूप आनंदाचे प्रकार आहेत.

काव्यच्या वाचनाने रसिकाच्या मनात केवळ विकारच निर्माण झाले, तर त्याला लौकिक सृष्टीप्रमाणे सुखाचा व दुःखाचा भोग प्राप्त होतो. काव्यातील आशयाशी मन एकाग्र होण्यासाठी विकाराची गरज आहे. तसेच त्यापासून दुःख न होण्यासाठी विचाराची आवश्यकता आहे. काव्याचा आस्वाद घेण्यापूर्वी, 'मी काव्य वाचणार आहे', अशी जाणीव असते. पुढे काव्याचा आस्वाद घेताना ती जाणीव गौण होते. मनात विकार उत्पन्न होतात. मन काव्याशी एकरूप होते. या एकाग्रतेमुळे आनंद होतो. काव्यातील दुःखद प्रसंगाच्या वर्णनापासूनही दुःख न होता आनंदच होतो.

भक्तिरसाच्या स्थायी भावात बाह्य विषयांचा संस्कार नसतो, तर भगवंताच्या सगुण रूपाचा संस्कार असतो. ते रूप आपलेच आत्मस्वरूप आहे अशी ऐक्यज्ञानाची जाणीव असते.

भक्तिरस हे काव्याचे ध्येय असावे. रसिकाला काव्यसृष्टीत आनंद मिळतो; पण भक्ताला मात्र सर्व सृष्टी म्हणजे चिद्‌विलास आहे या जाणिवेने अलौकीक समाधान लाभते.

कवींचे तीन प्रकार आहेत. उच्छिष्ट कवी दुसऱ्याच्या कल्पना चोरून रचना करतो. भोक्ता कवी विषय भोगातील आनंदाचा आस्वाद घेऊन काव्यनिर्मिती करतो. साक्षी कवी स्वयंरूप आनंदाचा आविष्कार आपल्या काव्यात करतो, तो भक्तकवी होय.

स्फूर्तीचे तीन प्रकार आहेत. नैसर्गिकी स्फूर्ती विषयभोगांच्या स्पर्शाने उत्पन्न होते; आणि ती वासनावृद्धी करते. वैचारिकी स्फूर्ती कवीच्या अंतःकरणाचे दर्शन घडविते; आणि नीतिलाभ करून देते. स्वयंस्फूर्ती ब्रह्मानंदाचा आविष्कार करते; आणि भक्तिज्ञानाची प्राप्ती करून देते.

## समारोप

गुलाबराव महाराजांची साहित्यसृष्टी आणि त्यांची साहित्यदृष्टी या दोन्ही एकरूप व एकरस आहेत. समन्वय-विचार हे त्यांच्या साहित्याचे वैभव आहे. महाराज स्वतःला 'ज्ञानेश्वर कन्या' म्हणत असत. 'नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानेश्वरी । एकतरी ओवी अनुभवावी ।।' हे सांगणे महाराजांनी प्रत्यक्ष आचरणात आणले होते. ज्ञानेश्वरीचे केवळ पारायण न करता, तिच्यातील तत्त्वचिंतन आणि काव्यलावण्य महाराजांच्या लेखणीतून आणि वाणीतून प्रगट होत असे.

डॉ. कृष्ण माधव घटाटे यांना दिलेल्या एका मुलाखतीत पूजनीय गोळवलकर गुरुजी यांनी महाराजांच्या कार्याचे मार्मिक समालोचन केले आहे. गुरुजी म्हणाले, 'गुलाबराव महाराजांनी आपली मते समतोलपणे आणि तौलनिक रीतीने मांडली. भारतीय समाजात जातींचा 'भेद' नसून, ती 'व्यवस्था' आहे, असे त्यांनी प्रतिपादन केले. महाराजांचे समन्वयविषयक विवेचन म्हणजे भारतातील सामाजिक बंधुभावाला त्यांनी दिलेले तात्त्विक अधिष्ठान आहे. विविध धर्मांतील प्रमुख तत्त्वे आपल्या वैदिक आर्य संस्कृतीत सापडतात, याचे त्यांनी विवेचन केले. महाराजांनी दाखविलेल्या या दिशेने प्रबोधन झाले, तर भारतीय समाज एक होईलच; पण त्याबरोबर जगातील सर्व धर्मांचे समाज परस्पर-सामंजस्याने नांदू शकतील.'

— गुलाबराव महाराज यांच्या साहित्यसृष्टीचे सामर्थ्य आणि सौंदर्य केवढे असाधारण आहे, याची पूजनीय गुरुजींनी केलेली ही मलावण केवढी संस्मरणीय आहे !

**डॉ. हे. वि. इनामदार**

'संतोष' भारती निवास कॉलनी, ६०/१५, एरंडवणे, पुणे ४११ ००४.

# 'वारकरी पंथ हाच विश्वधर्म होणार' - संत श्रीगुलाबराव महाराज

एम.ए. संस्कृत.

अवघाची संसार सुखाचा करून तिन्ही लोकांमध्ये आनंद भरणारा अर्थात सामान्य जिवाला लौकिक जीवनाच्या सुखासोबतच आत्मोन्नतीची वाट मोकळी करून देऊन मानवाचा पूर्णतः कल्याण करणारा एक समर्थ विचार म्हणजे भागवत धर्म विचार होय. मानवातील सात्विकता अन् सद्भावना सतत वृद्धींगत करण्याचे अपूर्व कार्य हा धर्मविचार गेल्या अनेक शतकांपासून करीत आहे.

वेदोत्तर काळात विशिष्ट वर्गामध्ये बंदीस्त झालेल्या धर्माच्या गुह्य ज्ञानाचे महाद्वार सामान्य माणसासाठी मुक्त करून देऊन स्त्रीशुद्रादिकांनाही मुक्तीचा अधिकार देणारा एकमेव धर्मसंप्रदाय म्हणजे वारकरी संप्रदाय, हे भागवत धर्माचेच रूप होय.

गेल्या सात शतकांपासून महाराष्ट्राचे लोकजीवन प्रभावीत करणारा हा वारकरी 'पंथ' म्हणून सिमित न राहता जीवनप्रणाली बनून या समाजमनात रुजला आहे. या वारकरी संप्रदायाने, पर्यायाने महाराष्ट्रातील संतांनी ज्ञान अन् भक्तिच्या समन्वयाने हे समाजमन संस्कारित करून व सामाजिक विषमतेला मूठमाती देऊन सामान्यांनाही आपला वाटणाऱ्या भागवत धर्माची इमारत समतेच्या तत्त्वावर उभारली.

***'ज्ञानदेवे रचिला पाया, उभारिले देवालया ।***
***नामा तयाचा किंकर, तेने केला हा विस्तार ।***
***जनार्दन एकनाथ स्तंभ दिला भागवत ।***
***तुका झालासे कळस, भजन करा सावकाश ॥***

या वारकरी संप्रदायाने कोणताही उच्च-नीच, श्रेष्ठ-कनिष्ठ, भेद न ठेवता, कर्मकांडाचे स्तोम न माजविता समाजातील प्रत्येक घटकाला भक्तीचा सुकर मार्ग मोकळा करून दिला.

***या भागवत धर्माची नवल रीती ।***
***नीच तेची उच्चाधिकारी होती ।***
***म्हणोनि मी पुनः सर्वाप्रार्थी । निर्भय निश्चिती येथची यावे ॥ गु.म.***

म्हणूनच विश्वात्मक मागणे मागणारे ज्ञानोबाराय माऊली झाले. म्हणूनच मराठी माणसाचे हृदयसम्राट असणाऱ्या या संताचे वाङ्मय उभा महाराष्ट्र शतकानुशतके वाचतोय. ज्ञानोबा - तुकाराम हा जीवनमंत्र असणाऱ्या मराठी मनाचा सर्व संत प्राण आहेत.

या संतांनी समृद्ध केलेला हा वारकरी संप्रदाय विचार सकल मानवजातीस मार्गदर्शक होण्याच्या योग्यतेचा असतानाही विशिष्ट भौगोलिक प्रदेशात मर्यादित राहिला ही अत्यंत खेदाची बाब आहे.

महाराष्ट्राला ललामभूत ठरलेल्या या वारकरी संप्रदायाला विश्वधर्म या अत्युच्च पदावर स्थापित करून त्याला व्यापक बनविण्याचे महत्त्वपूर्ण कार्य केले, ज्ञानेशकन्या संत श्री गुलाबराव महाराजांनी.

धर्मसमन्वयमहर्षि, मधुराद्वैताचार्य, प्रज्ञाचक्षु, ज्ञानेशकन्या संतश्री गुलाबराव महाराज म्हणजे इंटरनेटच्या या आधुनिक युगातील बुद्धिवाद्यांसाठी एक प्रचंड आव्हान व अनाकलनीय चमत्कार.

सामाजिक व आर्थिक दृष्ट्या सामान्य कुटुंबात जन्म, शैशवात आलेले अंधत्व, लौकिक शिक्षणाचा अभाव, ३४ वर्षाचे अल्पायुष्य या सर्वथा प्रतिकूल परिस्थितीत या सत्पुरुषाने केलेले प्रचंड कार्य स्तिमित करणारे आहे. मराठी, हिंदी, ब्रज, संस्कृत, वऱ्हाडी या पंचभाषेतून भक्ती, वेदांत, सांख्य, न्याय, नीतिशास्त्र, योग, आयुर्वेद, संगीत ते परमाणु विज्ञानापर्यंत अनेक विषयांवर १३३ ग्रंथांची निर्मिती करून प्रत्येक शास्त्रात भर टाकणाऱ्या या प्रज्ञाचक्षुने पाश्चात्य विचारधारा व आधुनिक वैज्ञानिक प्रगती यांचेही सूक्ष्म अध्ययन व निर्भय समीक्षण केले आहे. स्वतःला कृष्णपत्नी व ज्ञानेश्वर कन्या मानणाऱ्या श्री महाराजांना १९०१ साली ज्ञानेश्वर माऊलींचा साक्षात अनुग्रह झाला. त्याचे वर्णन करताना ते म्हणतात,

***'माझा सद्गुरु करुणाघन । आळंदीपती कल्याणनिधान ॥***
***जेणे आपुलिया नामाचा मंत्र देऊन । कृतार्थ केले मजलागी ॥'***

२००१ हे अनुग्रह शताब्दि वर्ष होते. श्रद्धेय आचार्य किशोरजी व्यास यांच्या मार्गदर्शनाखाली आळंदीला मे महिन्यात अनुग्रह शताब्दि महोत्सव संपन्न झाला. देवर्षि नारदांच्या आज्ञेवरून मधुराद्वैत संप्रदाय स्थापन करणाऱ्या या योगिशिरोमणिने विश्वातील यच्चयावत धर्मसंप्रदायामधील विद्वेष टाळून त्यांचा सुंदर समन्वय कसा करता येतो हे सप्रमाण दाखवून सर्वधर्मसंप्रदायामध्ये सद्भावना व शांती निर्माण करू शकणारा समर्थ असा धर्मसमन्वयविचार जगाला दिला.

***'हा धर्मसमन्वय कर्ता विरळा संत***
***तत्त्वज्ञ थोर हा असीम प्रज्ञावंत'***

श्री महाराजांनी त्यांच्या अनेक ग्रंथातून सांगितले की, त्यांनी स्थापन केलेला मधुराद्वैत संप्रदाय म्हणजे वारकरी पंथाचीच एक शाखा होय. निजधामास परत न जाता भगवान श्रीकृष्ण भीमातीरावर येऊन उभे राहिलेत. तेच वारकऱ्यांचे आराध्य दैवत. सावळे परब्रह्म विठ्ठल होय – हे वारकरी पंथाचं मत त्यांनी संप्रदायकुसुममधुमध्ये मांडलं.

***न स्वधाम्नि गतः कृष्णो भीमातीरे समागतः***
***एतावदेवं संग्राह्यं वैठ्ठलात कुसुमान्मम ॥***

तर भाविकांना वेड लावणारी पंढरी अन् आळंदी त्यांच्या सहा प्रिय तीर्थामधील तीर्थ असं ते स्वमतनिर्णयमध्ये म्हणतात.

***आळंदी हिमवान काशी, प्रयागो व्रजमंडलम्***
***पंढरी चेति तीर्थानां षट्कमिष्टं स्वनिर्णयः***

या धर्मसमन्वयमहर्षिने वारकरी संप्रदायाबद्दल मांडलेला विचार अत्यंत महत्त्वाचा आहे. या संप्रदायाचे श्रेष्ठत्व मागील कित्येक वर्षामध्ये अनेक

विद्वानांनी, संतपुरुषांनी प्रतिपादित केले. परंतु संत श्री गुलाबराव महाराजांनी त्याच्या श्रेष्ठत्वाची केलेली कारणमीमांसा, प्रतिपादित केलेली वैशिष्ट्ये व येणाऱ्या काळात या संप्रदायाबद्दल केलेली भविष्यवाणी मात्र एकमेवाद्वितीय आहे. वारकरी पंथाबद्दल श्री महाराजांचे विचार त्यांच्याच शब्दात. 'मी कोणत्याही पंथाचा अभिमानी नाही. तथापि शहाणा असा वारकरी पंथ मला मान्य आहे. इतका सुंदर पंथ मागे झाला नाही व पुढे होणार नाही. हा पंथ इतक्या शहाणपणाने स्थापिला गेला आहे की, त्याला पंथ न म्हणता धर्मच नाव शोभते. यातील वैशिष्ट्ये सांगताना श्री महाराज म्हणतात, आक्षेपार्ह अशी गुरुशिष्य पद्धती यात नाही, तर ती शुद्ध आहे. निरनिराळ्या देवतेचे उपासक या पंथात होऊन गेले आहेत. नरहरी सोनार महाशैव, जनार्दन, एकनाथ दत्तभक्त, भानुदास सूर्योपासक, तात - (ज्ञानेश्वर) तुकारामादि वैष्णव हे सर्व पंथाचे अध्वर्यु झाले आहेत. शिवाय नाथादि ब्राह्मण तुकारामादि कुणबी, शेख महम्मदादि मुसलमान, रोहिदासादि चांभार, चोखामेळादि महार आणि कान्होपात्रादि वेश्यासुद्धा या पंथाच्या अनुयायी झाल्या आहेत.'

'मुक्ताबाईसारख्या ब्रह्मचारिणी आचार्या व जनाबाईसारख्या दासी या पंथात समत्वाला आल्या आहेत. नामदेवांची लालनभक्ती, विश्वंभरादिकांचे वात्सल्य आणि मुक्तकेशी आदि बायांचे माधुर्य या पंथात एकवटलेले आहेत. जितके म्हणून हिंदुस्थानात सत्पुरुष होऊन गेले त्या सर्वांचा या पंढरीशी परिचय झाला आहे. द्वैत, विशिष्टाद्वैत व अद्वैत सर्व काही या पंथात संपादिले आहे. शिवाय कबीर, नानक पंथाप्रमाणे कर्म सोडायला लावून हा पंथ कोणाची मने दुखविणारा नाही. त्यामुळे हा पंथ खास विश्वधर्म होणार. आता या पंथात काही लोक आग्रही आहेत मी नाही म्हणत नाही. तथापि इतर पंथाच्या आचार्यातही आग्रह बरघर पाहणारास दिसत होता. तो या पंथाच्या स्थापकात दिसत नाही. पुनः या पंथाने एखादी गादी स्थापन करून पैसे उपटण्याची व्यवस्था केली नसल्यामुळे व वैदिक चिन्हांचा त्याग न करता पौराणिक चिन्हांनीच हा पंथ अलंकृत असल्यामुळे मी विठ्ठल उपासक जरी आपल्याला म्हणवून घेत नाही तरी पण कायावाचामनेकरून या पंथाच्या ठिकाणी माझा अत्यंत आदर आहे. धर्मभेदांचा नाश करून सद्‌गती देणारा हाच एक पंथ होईल असे मी म्हणतो.'

या प्रकारे वारकरी पंथ विश्वधर्म होणार हे सांगून विश्वधर्म होण्याची त्याची पात्रताही तर्कसंगतरित्या सिद्ध केली. मधुराद्वैताचार्य ज्ञानेशकन्या संत श्री गुलाबराव महाराजांनी वारकरी संप्रदायाला एक नवीन आयाम देऊन तो विचार वैश्विक बनविला. या भागवत धर्माच्या विचार व आचाराला एक भक्कम तात्त्विक अधिष्ठान देऊन हा सनातन धर्मविचार आधुनिक साधकांना बुद्धिनिकषांवर घासून युक्तीने पटवून देण्यात यशस्वी ठरलेली ही ज्ञानेशकन्या म्हणूनच भागवत धर्म इमारतीच्या कळसावर धर्मध्वजा म्हणून शोभायमान झाली आहे.

येणाऱ्या शतकात जगद्‌गुरुत्वाचा सन्मान पावणाऱ्या या युगाचार्याच्या अलौकिक वाङ्मय - तत्त्वज्ञानाचा अभ्यास करणाऱ्याला कोणत्याही तथाकथित सांप्रदायिकपणाच्या संकुचिततेचा अडसर निर्माण होऊ नये म्हणून हा लेखनप्रपंच.

**कु. नयना पंडितराव मोहोड**
भक्तिधाम परिसर, चांदूर बाजार, ता. चांदूर बाजार, जि. अमरावती.

# पाश्चात्य तत्त्वज्ञानाची मीमांसा

*एम.ए. (मराठी) एम.एड., पीएच.डी प्रबंध पूर्ण - मराठी-हिन्दी भारुड काव्य - एक अभ्यास ३० वर्षे कर्मवीर भाऊसाहेब हिरे हायस्कूल उपमुख्याध्यापिका म्हणून निवृत्त. नंतर नामदेव अध्यासन ३ वर्षे संशोधन सहाय्यक. संत साहित्यावर निरनिराळ्या मासिकांतून लेख. समर्थ व्यासपीठ उपाध्यक्ष.*

## प्रास्ताविक

संत परंपरेच्या दृष्टीने पाहिले तर महाराष्ट्राला संतभूमी म्हटल्यास वावगे ठरणार नाही. आजही ही संतपरंपरा सुरूच आहे ! आपण स्वतः आपल्याला घडविले; तर इतर जग आपले अनुकरण करील. तलवारीच्या जोरावर आपल्या पूर्वजांनी आपला संदेश कधीच बाहेर पोहोचविलेला नाही. संतांनी आपल्या आचरणांनी, आपल्या विचारांनी तो सर्व जगात पोहोचविला. ब्रिटिश राजवटीच्या पूर्वीपासून ख्रिस्ती लोकांनी स्वतःचा धर्म आणि राज्य स्थापण्यासाठी निरनिराळ्या योजना आखल्या. हिंदु मनावरची धर्मसत्ता उखडून टाकली; तर आपल्याला निरंकुशपणे राज्य करता येईल आणि ख्रिस्ती धर्माचा प्रसारही करता येईल. म्हणून इंग्रजांनी शिक्षणाला महत्त्व दिले. शिक्षणाची नवी नीती अवलंबिली. जुन्या पाठशाळांची अनुदाने बंद केली. इंग्रजी शिक्षण घेणाऱ्यांना उच्च नोकऱ्या आणि मानाच्या पदव्या दिल्या. आपोआपच बुद्धिमान वर्ग इंग्रजी शिक्षणाकडे आकर्षित झाला. हळूहळू संस्कृत शिक्षणाचे महत्त्व कमी झाले. ब्रिटिशांच्या काळात संस्कृत विषय कॉलेजपर्यंत आवश्यक होता. त्यामुळे ब्रिटिशांची गुणग्राहकता कशी श्रेष्ठ आहे हेच भारतीयांच्या मनावर प्रतिबिंबित होत असे. भारतीय लोकांनी आपल्या तर्कनिष्ठ न्यायपद्धतीचा अभ्यास करणे सोडून देऊन ब्रिटिश सत्तेचे व युरोपिअन बुद्धीचे गोडवे गाणे सुरू केले. त्यांच्या आचार-विचार-रहाणी यांची मोहिनी भारतीयांवर पकड घेऊ लागली. त्या काळी खरे तर भारतीय लोक शरीराने कणखर, दीर्घायुषी होते. सामान्य लोकांत सत्यप्रियता, परोपकार बुद्धी, दया, श्रद्धा, शांतता, प्रेम इत्यादी अनेक गुण होते. परंतु इंग्रजांच्या शिकवणुकीने त्यांचे खालच्या पातळीवरचे विचार अंधश्रद्धेने आपण जसेच्या तसे स्विकारले आणि त्यांची देशभक्ती, शिस्त, कष्टाळूपणा आणि भौतिक शास्त्रातील प्रगतीमात्र घेतली नाही.

आपल्या आयुष्यात असे काही महत्त्वाचे क्षण येतात की त्यामुळे आपल्याला धन्य धन्य वाटू लागते. ते क्षण संतांचे चरित्र वाचण्याने, ऐकण्याने किंवा काही प्रसंग अनुभवण्याने येतात. संतांचे चरित्र मग ते कोणत्याही संतांचे असू दे, ते वाचल्यावर आपलीही श्रद्धा दृढ होते. कळत नकळत थोडे दिवस तरी आपल्या मनावरील ती मोहिनी उतरत नाही. सद्वर्तन करण्याकडे आपले लक्ष जाते. मन चैतन्यमय होते. उत्साहित होते. श्रीगुलाबराव महाराजांचे चरित्र वाचल्यावर अशीच अवस्था झाली.

## श्रीमहाराजांच्या काळची परिस्थिती

श्रीमहाराजांच्या काळात इंग्रजी सत्ता दृढमूल झाली होती. इंग्रजांचे आक्रमण राजकीयच होते. पण सत्ता बळकट करण्यासाठी सांस्कृतिक आक्रमणाचीही गरज त्यांना वाटली. लॉर्ड मेकॉलेने प्रथम जुन्या पारंपारिक संस्कृत पाठशाळा बंद करविल्या आणि इंग्रजी शाळा-कॉलेजांतून आधुनिक शिक्षण पद्धती सुरू केली. त्यामुळे हिंदू समाज पाश्चात्यांची भौतिक शास्त्रातील प्रगती पाहून त्यांच्या शिक्षण पद्धतीकडे आकर्षित झाला. इंग्रजी आक्रमण हे फक्त बाह्यच नव्हते; तर भारतीयांच्या अंतःकरणातही त्याने प्रवेश केला होता. पूर्वी धर्म आणि भारतीय शास्त्रांविषयी असलेला आदर संस्कृत शिक्षणाच्या नवीन पद्धतीने नाहीसा करून टाकला. गोडीगुलाबीने सेवेच्या निमित्ताने ख्रिस्ती मिशनऱ्यांनी अशिक्षितात आणि गिरीजनात ख्रिस्ती धर्माचा प्रसार केला. शहरातील सुशिक्षितांची इंग्रजी शिक्षणामुळे, संस्कारांमुळे जीवनमूल्येच बदलली. आपला धर्म आणि पुरातन शास्त्रे टाकावू आहेत असे त्यांना वाटू लागले.

## श्रीमहाराजांची समन्वयकाची भूमिका

श्रीमहाराजांची भूमिका 'संप्रदायसुरतरू' 'सुखवरसुधा, स्वमतव्यांश सिद्धान्ततुषार' 'पत्रव्यवहार' आणि 'अभंग' यातून मांडलेली आहे. संप्रदाय निर्मितीचे कारण सांगून समन्वय विचारांची पद्धती सांगितली आहे. सर्वच लोकांना त्यांच्या त्यांच्या धर्मप्रवृत्तींची योग्य दिशा दाखवून दिली आहे. महाराजांनी जैन, महानुभाव वगैरे सर्व संप्रदायांचे प्रसंगोपात्त आपल्या प्रखर युक्तीवादाने खंडन केले आहे. परंतु त्यांच्या आवश्यकतेसंबंधीही त्यांचा निश्चय कायम आहे. इतर वैदिक लोकांनी स्वधर्म सोडून, त्या पंथाकडे जाऊ नये एवढ्याचसाठी त्यांनी त्यातील तत्त्वांचे खंडन केले आहे. त्या त्या संप्रदायाच्या अनुयायांनी आपली श्रद्धा गमावू नये असे महाराजांना वाटत असे. महाराजांनी वेदान्तानुसार अनेक ठिकाणी निरनिराळ्या भारतीय शास्त्रांचे खंडन केले आहे. पण त्या शास्त्राविषयीची पूज्यबुद्धी मात्र कायम आहे.

'धर्म' हा व्यापक असतो. पंथ किंवा संप्रदाय हा त्या व्यापक धर्माच्या एका अंशावर स्थिर असतो. हिंदु धर्मात कर्ममार्ग, उपासना मार्ग, योगमार्ग, ज्ञानमार्ग, भक्तीमार्ग वगैरे निरनिराळे मार्ग आहेत. हे सर्व मार्ग भिन्न भिन्न असले तरी ते मूळ वैदिक धर्मातील कोणत्याही तत्त्वांना धरून आहेत. महानुभाव पंथ आचार मानत नाहीत, पण कृष्णोपासना करतात. शिखांनी ओंकारावरच आपली भिस्त ठेवली आहे. अहिंसा तत्त्वावर जैन संप्रदाय अधिष्ठित आहे. सत्य, अहिंसेवर बौद्ध धर्म अवलंबून आहे. या प्रमाणे सर्व संप्रदाय वैदिक धर्माच्या एका अंगावर स्थित आहेत. म्हणून त्यांच्यातील विरोध वरवरचा आहे. परस्परांच्या आचार धर्मात भिन्नता आहे. तत्त्वज्ञानातही भेद वाटतो; म्हणून शंकराचार्यांनी अद्वैत तत्त्वज्ञान दृष्टीने सर्वांचे खंडन केले आहे. वैदिक धर्म आणि अवैदिक धर्म व त्यांचे संप्रदाय असे दोन विभाग पडतात. पण त्यांचा सूक्ष्म विचार केला असता त्यामध्ये फारसा विरोध दिसून येत नाही. ज्याप्रमाणे खालच्या पायरीचा

वरच्या पायरीशी विरोध नसतो, तर खालची पायरी वरचीला पूरकच असते. त्याप्रमाणे सर्व धर्माचा किंवा संप्रदायांचा परस्पर खरा विरोध राहूच शकत नाही, असा निष्कर्ष काढता येतो. या निष्कर्षावर पोहोचण्याचे कारण महाराजांची समन्वय पद्धती ही होय ! महाराजांनी समन्वयाचे उत्तम, मध्यम, अधम व अधमाधम असे मुख्य भेद करून त्याचे एकूण नऊ प्रकार केले आहेत. त्यापैकी कोणत्याही पाच प्रकारांतून समन्वय केल्यानंतर उगीच संशय घेऊ नये अशी त्यांनी विनंती केली आहे. सर्व संप्रदायांचे अधिकरण एक ब्रह्मच आहे. त्यांच्या वृती वेगवेगळ्या आहेत. समुद्र एकच असून त्याच्या लाटा भिन्न भिन्न असतात. पण कोणत्याही लाटेत बुडी मारली तर स्नान एकाच समुद्रात होते. तसे कोणत्याही संप्रदायाचा आधार घेतला तरी शेवटी ब्रह्मप्राप्तीच होते. महाराजांच्या म्हणण्याप्रमाणे समन्वय हा स्वधर्माच्याच तत्त्वांनी करावयाचा असतो आणि समन्वय केल्यानंतर, प्रत्येकजण आपापल्या स्वधर्माचे पालन करण्यास स्वतंत्र राहतो. त्याला स्वधर्मात उणेपणा दिसत नाही किंवा दुसरीकडून तत्त्वे घेण्याचीही आवश्यकता वाटत नाही. श्रीमहाराजांनी श्रुति, स्मृति, रामायण, महाभारत इत्यादी इतिहास आणि पुराणे यांचा उत्तम रीतीने समन्वय केला आहे. संतांची वचने, स्वानुभव आणि युक्तिवाद यांच्या सहाय्याने आपला समन्वय विचार मांडला आहे. 'सुरूवरसुधेत' महाराज म्हणतात, 'ज्ञानेश्वर माऊलीने अनुग्रह दिल्याप्रमाणे अनुभव घेऊन उगीच धर्माधर्मामध्ये द्वेष वाढू नये म्हणून शांकरमताचे (अद्वैत) ज्ञान व इतर मताच्या भावना यांची योजना मात्र मी केली आहे.' कोणत्या आचार्यापासून कोणती भावना घेतली आहे, ते 'संप्रदाय कुसुममधु' नावाच्या ग्रंथात सविस्तर लिहिले आहे. एके ठिकाणी महाराज म्हणतात, 'पुराणे वेदतुल्य असून ईश्वरप्रणीत आहेत. म्हणून वेदांचा जसा कशाने बाध होत नाही, तसा पुराणांचाही बाध कशाने होत नाही. म्हणजे पुराणांचा व वेदांचा विरोध आहे, असे वाटल्यास समन्वयच केला पाहिजे किंवा समजत नाही म्हणून सोडून दिले पाहिजे, हा आमच्यात विशेष आहे.' असा हा समन्वयाचा महाराजांचा आग्रह आजच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. प्रत्येक हिंदु धर्माच्या हितकर्त्याने समन्वयांचे हे मूलभूत सूत्र हृदयात कोरून ठेवण्याजोगे आहे. त्याशिवाय इतर संप्रदायाविषयी किंवा विचारसरणी विषयी पूज्य बुद्धी कायम राहू शकत नाही आणि भारतीय एकताही टिकू शकत नाही.' (द्वादशयष्टि-पत्रे... श्रीगुलाबराव महाराज विरचित मधुर प्रकाशन, बडकस चौक महाल, नागपूर - तृतीय आवृत्ती १९७४).

## पाश्चात्य आणि भारतीय नीतीशास्त्रांची तुलना

पाश्चात्यांच्या नीतीशास्त्राच्या कल्पना, भारतीय नीतीशास्त्रांच्या कल्पनांशी जुळत नाहीत. भौतिक विषयसुखप्राप्ती आणि पारलौकिक सुखप्राप्ती या दोहोंना पूरक होईल अशीच नीती भारतीयांनी स्विकारली. त्यामुळे धर्म व नीती परस्पर सलोख्याने मनुष्याच्या सर्वांगीण विकासात सहभागी होतात. त्यांना एकमेकांपासून भिन्न करून त्यांचा स्वतंत्र विचार होऊ शकत नाही, असे महाराजांचे स्पष्ट प्रतिपादन आहे. नीतीशास्त्राचा विचार करताना पाश्चात्यांच्या आधिभौतिक नीती तत्त्वांचे समूळ खंडन केले असून ॲथॉरिटी, इन्ट्यूशन व युटिलिटी यांचा पारमार्थिक दृष्टिकोनातून विचार केल्यास तो भारतीय नीतीशी जुळतो असे दाखवून दिले आहे. शिक्षणासंबंधीही मूलभूत विचार मांडले आहेत. सुधारणेचा विचार करत असताना आधुनिक सुधारणेतील दोषांवर नेमके बोट ठेवले आहे. सुधारणेने नीतीपेक्षा अनीती वाढते हे सप्रमाण दाखवून दिले आहे. चांगले असलेले कोणतेही तत्त्व, विचार, कायम ठेवून नवीन सुधारणा कशा करावयाच्या या संबंधी महाराजांनी नवीन दृष्टी दिली आहे. त्याचप्रमाणे एका मताचा उपयोग कोठे करावा, बहुमतांप्रमाणे कोठे चालावे या संबंधीचेही विवेचन लोकशाहीच्या काळात मार्गदर्शक आहे. पाश्चात्य भोगवादाची उन्नती पाहून दिपून जाणाऱ्या आधुनिक समाजाला आर्यांच्या सात्त्विक तेजाची ओळख परखड शब्दात करून दिलेली आहे.

## पाश्चात्य प्रमेयांचा परामर्श

पाश्चात्य ख्रिस्ती मिशनऱ्यांनी आपल्या संस्कृतीचे मूळ पाहून त्यावरच प्रहार केले आहेत. महाराजांच्या काळी भारतीय मनाची वैचारिक बैठक अगदी खिळखिळी होऊन गेली होती. पाश्चात्यांच्या विचारांनुसार मॉडर्न सोसायटीत कामगंडाला स्वाभाविक भूक समजून त्यानुसार स्वैर वागणे हीच उच्चभ्रू लोकांची नीती समजली जाते. या प्रमाणे स्वैराचार आणि सर्व बंधनातून मुक्त होण्याची चळवळ मानवाला जंगली श्वापदांच्या पंक्तीत पुनः नेऊन बसविणार असल्याचे दिसून येते. महाराजांच्या मते आर्यांचा उत्क्रांतिवाद प्रायत्निक आहे. पाश्चात्यांप्रमाणे स्वाभाविक नाही. प्रयत्न केला तर नराचा नारायण होईल आणि वासनेप्रमाणे वहात गेला तर नराचा नरपशू होईल. महाराजांच्या समयोपदेश, अलौकिक व्याख्यानमाला व पत्रे या ग्रंथांतून हा विचार विस्ताराने मांडला आहे. त्यांनी डार्विन, स्पेन्सर वगैरेंच्या मतातील विचारांचा उथळपणा युक्तीवादाच्या सहाय्याने आणि परखड रीतीने दाखवून दिला आहे.

## डार्विनचा उत्क्रान्तिवाद

डार्विनने 'ओरिजीन ऑफ स्पेसीज' या ग्रंथात इ.स. १८५८ मध्ये 'उत्क्रान्तिवाद' मांडला. त्यात 'स्ट्रगल फॉर एक्झिस्टन्स' आणि 'सर्व्हायवल ऑफ दी फिटेस्ट' या महत्त्वाच्या सूत्रांभोवती सर्व तत्त्वज्ञान गुंफले आहे. डार्विनच्या मताप्रमाणे जिवंत वस्तूंची प्रजोत्पादन शक्ती ही उत्क्रान्तीस पुढे पुढे नेणारी असून त्यातील बदलशक्ती भिन्न भिन्न तऱ्हेचे प्राणी व वनस्पती उत्पन्न करून त्या शक्तीस खाद्य पुरवित असते. परंतु उत्क्रान्तीची दिशा ठरविण्याचे महत्त्वाचे काम मात्र स्वाभाविक संवरणच (नॅचरल सिलेक्शन) करीत असते. या डार्विनच्या उत्क्रान्तिवादावर महाराजांनी न्यायशास्त्रानुसार अनेक तर्क उपस्थित केले आहेत. आपल्या भारतीय विचारांप्रमाणे सृष्टीचा क्रम 'चक्रनेमिक्रम' असतो. केवळ उत्क्रान्ती किंवा केवळ अपक्रान्ती मानता येत नाही. प्रत्येक जीव उत्क्रान्त होऊ शकतो आणि अपक्रान्तही होऊ शकतो. पण जीवाने कसून प्रयत्न केला, तर मात्र त्याची केवळ उत्क्रान्तीच होऊन तो नराचा नारायण होतो. हे निव्वळ प्रयत्नवादी तत्त्व डार्विनच्या स्वाभाविक नैसर्गिक उत्क्रांतिवादापेक्षा कितीतरी पटीने उच्च दर्जाचे आहे. जगाच्या मूळ कारणाची मीमांसा करताना उत्क्रान्तीचे सामर्थ्य कारणांमध्ये स्वाभाविकच आहे असे म्हटले, तर जगातील पूर्वीच्या, आजच्या आणि पुढे होणाऱ्या सर्वच गोष्टी 'बीजरूपाने' कारणात अनादी असल्याच पाहिजेत. कारण कोणत्याही पदार्थाचा आत्यंतिक नाश होत नाही किंवा नवीन अशी गोष्ट उत्पन्न होत नाही, फक्त बदल होत असतो असे महाराजांचे म्हणणे आहे.

सर्वच गोष्टी जगाच्या कारणात बीजरूपाने किंवा शक्ती रूपाने अनादी असल्या तर सर्वांचीच सारखी उत्क्रान्ती व्हावयास पाहिजे. ती

तशी होताना दिसत नाही. उलट प्राचीन हाडांचे सापळे सापडतात. ते आत्ताच्या मानवाच्या शरीरापेक्षा कितीतरी मोठे असलेले आढळतात. मग शरीराच्या बाबतीत उत्क्रान्ती न म्हणता अपक्रान्तीच म्हणावी लागेल.

डार्विनच्या मते माणसाची स्तुतिप्रियता हा गुण हळूहळू नाहीसा होऊन बुद्धीची वाढ होईल. यावर महाराजांचे असे मत आहे की स्तुतिप्रियत्व व कर्तव्य बुद्धी हे एकाच मनाचे गुण आहेत, मग एकाचा ऱ्हास आणि एकाची उत्क्रांती कशी होईल? डार्विनच्या उत्क्रान्ती तत्त्वातील कारणाची उत्क्रान्ती न होता केवळ त्यातील शक्तीची उत्क्रान्ती होते, असे मानावे तर महाराज म्हणतात, 'ती शक्ती कारणात तरी कोठून आली?' 'उत्क्रान्ति' सतत होत राहणार, कधीच संपणार नाही असे मानले; तर उत्क्रान्तीला शेवटची अवस्थाच नाही. महाराजांच्या मते कोणतीही अवस्था तिची पहिलीच आहे, मग कोणत्याच वस्तूत अपक्रांती होता कामा नये !' डार्विनच्या उत्क्रांति वादातील गुरुत्वाकर्षण शक्तीची 'उत्क्रान्ति' होते का?' किंवा सर्व सृष्टीची उत्क्रान्ति ज्या आकाशात व काळात होते त्यांची उत्क्रान्ती होते का?' या प्रश्नांना उत्तरे नाहीत.

जीवपेशीसंबंधी उत्क्रान्तीची मीमांसा करताना जीवपेशीतील ज्ञानाची उत्क्रान्ती होते का शरीराची? असा प्रश्न पडतो. शरीराची उत्क्रान्ती म्हटले तर हळूहळू शरीर अपक्रान्त झाले पाहिजे. माशाचा माकड झाला तर मासा नष्ट व्हावयास हवा. माकडाचा माणूस झाला तर माकड नष्ट व्हावयास पाहिजे ! पण तसे सृष्टीत दिसत नाही.

ज्ञानाची उत्क्रान्ती होते असे मानले तर मासा, माणूस यांची ज्ञानशक्ती सारखीच आहे. दोघांनाही स्वतःचे विषय सारखेच समजतात. माशापेक्षा माणसाचे ज्ञान श्रेष्ठ आहे असेही म्हणता येत नाही; कारण त्यांचे सुखाचे विषयच वेगळे आहेत. उदा. मासा शेवाळे खातो, तर माणूस तूप वगैरे खातो. एकमेकांचे विषय एकमेकांना नको असतात.

उत्क्रांतिवादी म्हणतात, या जगापासून आपल्या इच्छा उत्पन्न झाल्या आहेत, म्हणून या जगातच त्या पूर्ण झाल्या पाहिजेत ! यावर महाराज म्हणतात, 'हे विधान वेडगळपणाचे आणि बालिशपणाचे आहे. वानरापासून मनुष्याची उत्पत्ती झाली याचा अर्थ वानराच्या इच्छा मनुष्य शरीरात पूर्ण होणे अशक्य आहे. आजकालच्या अतिसुधारलेल्या पाश्चात्य राष्ट्रात न्यूडक्लबस्, निसर्गाप्रमाणे राहणे स्वाभाविक चिकित्सा, निसर्गोपचार वगैरेंची फॅडस् निघत आहेत. सर्व विपुलता असून शेवटी ते मानवाला नकोसे होते. ही उत्क्रान्ति म्हणायची की अपक्रान्ती? यावर महाराज म्हणतात, 'पाश्चात्य राष्ट्रांमध्ये माकडांचे मानव झाले असतील; तर आता हिप्पी हीच त्यांची 'उत्क्रान्ति' म्हणावी लागेल ! 'बुद्धिची उत्क्रान्ती होणे' हीच खरी उत्क्रान्ती म्हटले; तर अमेरिका, रशिया सारख्या देशांनी अणुशक्तीचा शोध लावला, विषारी वायूंचा वापर केला. आधुनिक तंत्रे वापरून मानवांचा नाश केला ! अशा प्रकारे ही राक्षसी प्रवृत्ती वाढणे म्हणजे उत्क्रान्ति म्हणायची का? महाराजांनी यावर मत मांडले आहे की, 'भारतीय संस्कृतीत न्याय, दया, करुणा, परोपकार, दुसऱ्यासाठी सर्वस्वाचा त्याग करणे वगैरे सद्गुण मानले आहेत. रामाने रावणाला जिंकले पण बिभिषणाला राज्य दिले. वालीचे राज्य सुग्रीवाला दिले. कृष्णाने सुद्धा जरासंध, नरकासूर, कंस यांना मारून त्यांचे राज्य बळकावले नाही. ही भारतीय परंपरा आहे. नीतीमत्ता वाढणे, आध्यात्मिक प्रगती होणे ही उत्क्रान्ती म्हटली, तर ही पूर्वी अधिक होती. आज अधोगती दिसते. माणसांमध्ये परस्पर सहकार्याची भावना वाढणे, द्वेष कमी होणे, विकार नाहीसे होणे, विचारांनी विकारांवर ताबा मिळविणे ही खरी उत्क्रान्ति ! ती निसर्गतः होत नसून प्रयत्नाने होत असते. प्रायत्निक उत्क्रान्ति हीच भारतीय तत्त्वज्ञानाचा विशेष आहे.

उत्क्रान्तीचा पहिला दुवा असलेला हा ज्ञानरूप की जडरूप याचा महाराजांनी असा विचार केला आहे की, 'चेतन अणु हाच उत्क्रान्तीचा पहिला दुवा मानला, तर प्रत्येक अणु स्वतंत्र राहील. ते परस्पर भिन्न असल्यामुळे उत्क्रांतीच्या दिशा भिन्नच राहतील ! अणु जड मानावे लागतात आणि ती शक्ती चेतन आणि त्या जड अणुंहून भिन्न मानावी लागते. म्हणजेच ईश्वर शक्ती मानावी लागते. ज्ञान पूर्ण आहे, तर ज्ञानाची आणखी उत्क्रान्ती काय होणार? या प्रश्नाचे उत्तर देताना पूर्ण ज्ञान संपन्न असे जे चेतन तत्त्व ते म्हणजेच, ईश्वर ! जड अणूच्या ज्ञानात व अज्ञानात कार्यकारण वगैरे प्रकारची कोणतीच शृंखला नसल्यामुळे जडापासून ज्ञान कसे 'उत्क्रान्त' झाले या प्रश्नाचे उत्तरच मिळत नाही. अनेक तर्कशास्त्रीय प्रश्न उपस्थित होऊन अनवस्था प्रसंग येतो असे महाराजांनी शास्त्रीय कारण देऊन खंडन केले आहे.

## स्पेन्सरचे मत

स्पेन्सरचे दहा ग्रंथ उपलब्ध आहेत. त्यातील प्रथम ग्रंथ 'आदितत्त्व' हा आहे. त्याचे दोन भाग आहेत. पहिल्या भागाचे नाव अज्ञेय मीमांसा आणि दुसऱ्याचे नाव ज्ञेय मीमांसा ! ज्ञेयमीमांसेमध्ये उत्क्रान्ती तत्त्वाचेच अनुकरण केले आहे. शिवाय असे सांगितले आहे की, देहापुरतेच ज्ञान असल्याने आपले भागत नाही. आणखीही काही गोष्टींचे ज्ञान पाहिजे. अज्ञेयमीमांसेमध्ये धर्म आणि शास्त्रांचे एकीकरण सांगितले आहे. महाराजांचे असे मत आहे की, स्पेन्सर हा नास्तिक मतापेक्षा अस्तिक मताकडे झुकला आहे; पण याने जगताचे कारण धर्म, जीव, मन वगैरे गोष्टींना आणि धर्माचे आधारतत्त्व या सर्वांना अज्ञेय म्हटले आहे. यावर महाराजांनी अनेक आक्षेप घेऊन त्याचे मत खोडून काढले. ते म्हणतात, 'ज्ञेय मीमांसा व अज्ञेय मीमांसा या दोन ग्रंथांच्या नावातच अंतर्गत विरोध दिसून येतो. स्पेन्सरने द्रव्य आणि शक्ती हे दोन भिन्न मानले आहेत. त्या आधाराने नास्तिक मताचे खंडन केले आहे. महाराजांनी सर वुईल्यमच्या अनुयायांच्या संयोगशक्तीमताच्या द्वारा स्पेन्सरच्या मताचे खंडन केले आहे. आणि नास्तिक मत स्पेन्सरकडून बरोबर झाले नाही हे दाखवून दिले आहे. ती संयोग शक्ती परमाणुंचीच मानली, तर ते परमाणु स्वयंभू ठरून नास्तिक मताकडे ती कशी येते हे स्पष्ट केले आहे. महाराजांनी स्पेन्सर मतांवर अनेक प्रश्न विचारून सूत्ररूपानेही त्याचे खंडन केले आहे. ते म्हणतात, 'ज्ञानशक्ती व्यष्टिरूप असल्यामुळे समष्टिरूप ज्ञानाचे तिजकडून आकलन होत नाही, असे म्हटल्याने ती काय अज्ञेय ठरते?' ही ज्ञानशक्ती स्वयंभूच मानली पाहिजे. घुबडाचे डोळे सूक्ष्मरूपाने अंड्यात असतात, त्याप्रमाणे ज्ञानशक्ती ही सूक्ष्मरूपाने आपल्यात आहेच. निद्रेत जसे 'ज्ञान आहे' हे कळत नाही, पण उठल्यावर निद्रेची स्मृती होते. त्याप्रमाणे 'ज्ञानशक्ती' ही स्वयंभू आहे, ती फक्त व्यक्त आणि अव्यक्त होत असते. जगक्रिया करणारी समष्टीतील स्वयंभू महाशक्ती एका सर्वव्यापी सदधिष्ठानावर आश्रित आहे हेही बिनतोड युक्तीने सिद्ध केलेले आहे.

स्पेन्सरचे मत खंडन करताना स्पेन्सरने जी नवीन उपपत्ती काढली की, 'काही कल्लोळ मिळून नाद उत्पन्न होतो, तसे ज्ञानाचे अणु मिळून उष्णता, ज्ञान वगैरे परिणाम होतात.' या उपपत्तीमध्ये ज्ञान म्हणजे दृश्य वस्तू आहे

की शक्ती असा प्रश्न पडतो. यावर महाराजांनी बरीच चर्चा करून वेदान्ताशी जुळणारा जड व चैतन्याचा सांधा जुळू शकत नाही हा भारतीय सिद्धान्त तसाच कायम राहतो हे सविस्तर दाखवून दिले आहे. 'जडांपासून जीवोत्पत्ती' मांडलेल्या मताचे खंडनही महाराजांनी केले आहे. नसलेला पदार्थ कधीही उत्पन्न होत नाही हा आर्यांचा सत्कार्यवादच पटतो. जगताचे कारण समर्थ की असमर्थ, सान्त की अनंत? याला उत्तर देताना 'जगताचे कारण जड असले तर ते अनंत म्हणजे पूर्ण आहे की सान्त म्हणजे अपूर्ण आहे? या पैकी कोणतेही कारण मानले तरी उत्क्रान्ति संभवत नाही. पशूपासून मनुष्य उत्क्रान्त झाला ही कल्पनाच चुकीची आहे ! असे महाराजांचे म्हणणे आहे. पुनर्जन्माचा गमनागमन सिद्धान्तच सर्व दृष्टीने योग्य आणि सत्य वाटतो. पशू व मानवात आहार, निद्रा, भय, मैथुन या चार गोष्टी सारख्याच आहेत, पण मनुष्यात धर्म हाच विशेष अधिक आहे. तो धर्म स्वतःहून प्रयत्न केल्याशिवाय साध्य होत नाही. खरी उत्क्रान्ती धर्माचरणानेच साध्य होते. असा हा भारतीय उत्क्रान्तवाद प्रयत्नसाध्य आहे. पाश्चात्यांप्रमाणे स्वाभाविक नाही. उत्क्रान्ती सान्त की अनन्त? उत्क्रान्ती व पुनर्जन्मातील भेद, थिऑसॉफीचा उत्क्रान्तिवाद, उत्क्रान्तिवाद व परिणामवाद, अज्ञेयवाद आणि उत्क्रान्तिवाद इत्यादी विषयांवर महाराजांनी परखड मते मांडली आहेत. महाराजांचे म्हणणे, 'मला उत्क्रान्तीही मान्य आहे व अपक्रान्तीही मान्य आहे. उत्क्रान्तीला मान्यता देऊन अपक्रान्तीला संमती न देणे, हे बुद्धीच्या दृष्टीने सभ्यपणाचे नाही. या दोन्हींचा अंतर्भाव आमच्या गमनागमन सिद्धान्तात झाला आहे !' महाराजांना स्वाभाविक उत्क्रान्तिवाद मान्य नसून, प्रायत्निक उत्क्रान्तिवाद मान्य आहे. म्हणजे प्रयत्नाने जीवाचा ईश्वर होऊ शकतो' असे महाराज म्हणतात.

## समारोप

महाराजांनी सूत्ररूपाने डार्विन व स्पेन्सरच्या मतसमीक्षा केलेल्या आहेत. श्री. जठारांच्या पत्रात महाराज शेवटी म्हणतात, 'जगत्क्रिया करणारी महाशक्ती कोणत्यातरी एका सर्वव्यापी सदधिष्ठानावर आश्रित आहे हे निर्विवाद सिद्ध होते. आता पुष्कळ प्रमाणे देत बसत नाही. विचारवंताने विचार करून आणखी उपपत्ती जुळवून घ्याव्यात.' या प्रमाणे महाराजांनी पाश्चात्यांच्या मतांचे भारतीय दृष्टिकोनातून कसे मूल्यमापन करावे, यासंबंधी आदर्श उदाहरण घालून दिले आहे. भारतीय न्यायशास्त्राच्या परिष्कार पद्धतीचा अभ्यास करून विचार करण्याची सवय लावली की कोणतेही नवीन मत तर्कनिकषांवर घासून तावूनसुलाखून पाहिल्याशिवाय चैनच पडत नाही आणि शेवटी न्यायशास्त्राच्या अग्निपरीक्षेतून जे बाहेर पडते तेच खरे सुवर्ण ठरते. असे असल्यामुळे संस्कृत भाषेतील प्राचीन आर्यशास्त्रांचा अभ्यासच सत्याच्या जवळ जाण्यासाठी महत्त्वाचा आहे. असे महाराजांच्या पाश्चात्य विचारवंतांच्या प्रमेयांवर काढलेल्या आक्षेपाने व केलेल्या खंडनाने सहजसिद्ध होते.

संदर्भ ग्रंथ : १. श्रीगुलाबराव महाराजांची विचारसंपदा, लेखक : डॉ. कृष्ण माधव घटाटे

२. द्वादशयष्टि - पत्रे - श्रीगुलाबराव महाराज विरचित.

**सौ. सुमती देशपांडे**
३६/४, संकल्प बंगला, पांडुरंग कॉलनी, एरंडवणा, पुणे ४११०३८.

# श्री गुलाबराव महाराजांचा 'सेव्य' विचार

*एम.ए. (तत्त्वज्ञान), सिडको नवी मुंबई मधून फायनॅनशियल ॲडव्हायझर ॲंड चीफ अकाऊंटस् ऑफिसर म्हणून १९९१ मध्ये निवृत्त. तत्त्वज्ञान व ज्योतिष या विषयांवर लेखन, प्रवचन व व्याख्याने. श्रीगुलाबराव महाराज यांचे उत्तराधिकारी श्री. बाबाजी महाराज पंडित यांचा अनुग्रह.*

श्रीज्ञानेश्वर माऊली समर्थ

श्रीमद् परमसद्गुरु पांडुरंगनाथाय नमः

श्रीमद् सद्गुरु स्कंददासनाथाय नमः

गीता, उपनिषदे आणि ब्रह्मसूत्रे ही वेदांताची प्रस्थानत्रयी. सर्व आचार्यांनी या प्रस्थानत्रयीवर आपापली भाष्ये लिहूनच वेदांतातील आपापल्या शाखा-उपशाखांची घडण - सांप्रदायिक बैठक निर्माण केली आहे.

हरिपाठ, भगवती ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव ही भगवान विष्णु अवतार ज्ञानेश्वर माऊलींनी-त्यांच्या अक्षरवाङ्मय श्रुतींची - किंबहुना वारकरी संप्रदायाच्या तात्त्विक अधिष्ठानतेची - मूलभूत प्रस्थानत्रयीच होय. या तिन्ही वाङ्मय श्रुतीवर वारकरी संप्रदायातील अध्वर्यू संतांची टीकाटिप्पणी वा भाष्ये आहेत. वऱ्हाडातील सुप्रसिद्ध प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांचे उत्तराधिकारी श्री. बाबाजी महाराज पंडित यांची या तिन्ही ग्रंथांवर भाष्यात्मक भावार्थ भाष्यात्मक-ग्रंथसंपदा आहे. बाबाजी महाराजांच्या या व इतर ग्रंथसंपदेतून आपणास श्री गुलाबराव महाराजांच्या विचारधनाचे आकलन करण्यास आणि गुलाबराव महाराजांची जी विपुल ग्रंथसंपदा तात्त्विक परिभाषेतून, पूर्वपक्ष-उत्तरपक्ष अशा गद्य वा पद्य परिपाठांतून झालेली आहे ती आकलन करण्यास चांगलीच मदत होते.

वाडवडिलादी कुलपरंपरेतून लाभतो धनाचा वारसा. सांप्रदायिक कुलपरंपरेतून लाभतो तो वारसा विचारधनाचा. सद्गुरु परंपरा म्हणून ज्यांचा ज्ञानेश्वर माऊलींशी नातेसंबंध जुळतो अथवा त्यांचे सद्गुरुत्वच ज्यांना लाभते (ज्ञानेश्वर माऊली हे गुलाबराव महाराजांचे सद्गुरु आणि त्यांचा त्याशिवाय पिता कन्या असा नातेसंबंध. ते माऊलींना तात म्हणत आणि स्वतःस ज्ञानेश्वरकन्या म्हणत) त्यांच्याकडे सद्गुरु विचारधनाचा वारसा अर्थातच माहिम्याने येतो. म्हणूनच गुलाबराव महाराज 'माझेनि मुखे वदती तात' असे सार्थपणे म्हणत.

गुलाबराव महाराजांना साक्षात् ज्ञानेश्वर माऊलींचा अनुग्रह आणि अनुग्रहाचा मंत्रही होता साक्षात् सद्गुरुंच्या चतुराक्षरी नामाचाच. पारमार्थिक सद्गुरुपरंपरेत कोणीही सद्गुरु आपल्या शिष्यास आपल्याच नामाचा मंत्र देत नाहीत. तसा दंडक तर नाहीच, पण प्रथा पण नाही. परंतु अपवाद तेव्हा होतो जेव्हा शिष्य सद्गुरुसारखाच ऐक्यानुभवपूर्वक अद्वैतसिद्ध नुसताच असतो असे नव्हे तर त्याशिवाय ज्ञानोत्तर वृत्तिस्फुरणव्यवहार कालींसुद्धा सर्व स्तरावर पूर्णतया स्फूर्तिस्फुरण मीलनच त्यांचे झालेले असते. सद्गुरुनामाचा मंत्र अशांनाच, जन्मसिद्ध अवतारांनाच सद्गुरुंनीच केलेल्या दुसऱ्या रूपालाच - परमसुभाग्यवशात् लाभतो. असा गुर्वानुग्रह गुलाबराव महाराजांना लाभलेला. 'केश केश म्हणावे ज्ञानेश्वर' अशा अवस्थेमुळेच प्रादूर्भूत झालेला. 'ये हृदयींचे ते हृदयी घातले' असा माऊलींचा कृष्णार्जुनाबाबतीतला अनुभव इथे सार्थतेने साकारला. त्या अमृतक्षणाचे वर्णन महाराजांनी अनेक ठिकाणी केले आहे. ते म्हणतात,

***'माझा सद्गुरु करुणाघन । आळंदीपति कल्याण निधान ।***

***जेणे आपुलिया नामाचा मंत्र देऊन । कृतार्थ केले मजलागी ॥***

***मज आडवे मांडीवरी घेऊन । दिधला मंत्र चतुराक्षरी***

आणि हा लाभ त्यांना स्वप्नांत नव्हे (जरी असाही लाभ सुसंपन्न असतो तरी) तर साक्षात झालेला. होताक्षणी चारी वाणींवर अखंडपणे संचार करणारा.

वयाच्या अवघ्या सातव्या-आठव्या महिन्यात काहीतरी निमित्त होऊन लौकिक दृष्टी जाऊन अंधत्व प्राप्त झालेले. अवघ्या चौतीस वर्षांच्या आयुर्मर्यादेचा लाभ जीवनास घडलेला. शालेय शिक्षणाचा म्हणावा तर गंधही नाही. ना 'माऊलीं'प्रमाणे वडिलांकडून मिळालेला ज्ञानाचा प्रचंड वारसा. ना माऊलींप्रमाणे सप्तसप्त जन्म उन्मनी अवस्थेची अनुभूती असणाऱ्या साक्षात् शिवशंकरावतार श्री निवृत्तीनाथांसारख्या सिद्धयोग पारंगत सद्गुरुंचे सततचे प्रात्यक्षिकी, अगदी वळचणीचे पाणी म्हणे तो, लाभलेले साहसचर्य. माता-पित्यांचे छत्र तर लहानपणीच हरपलेले. एवं पूर्वपीठिकेचा संपूर्ण अभाव. एवढेच नव्हे तर अंधत्वामुळे शैशवातच घरीदारी पदोपदी उपेक्ष्यत्व मात्र वाट्यास आलेले. लौकिक जीवन हे असे.

परंतु भगवान श्री ज्ञानेश्वर माऊलींनी आपल्या मांडीवर घेऊन स्वनामाचा मंत्र देताच परिसस्पर्श न्यायाने महाराष्ट्र सारस्वती - इये मऱ्हाठियेच्या नगरी - साहित्य सोनियाची लेणी साकारली - अवघ्या - संपूर्ण - अनुभूतींनी इथें शब्द रूप धारण केले. लहानमोठे शतकोत्तर ग्रंथ 'मी हळूहळू सांगतो तुम्ही लिहून घ्या' या न्यायाने साकारले. समाधी अवस्थेत वा द्रुतलयीत सांगितलेल्या कित्येक श्रुतींना, तेवढ्या जलदतेने लिहून न घेता आल्याने, मराठी माणूस इथे खरोखरी या वाग्यज्ञाच्या प्रसादाला मुकला की.

जरी लौकिक अंधता तरी 'बाळपणीच सर्वज्ञता वरी तयाते' अशी प्रज्ञाचक्षुत्वाची सारस्वती पूर्णता. गुलाबराव महाराजांचे 'चोखटे मानस'. म्हणूनच ज्ञानेश्वर माऊली तिथे 'क्षेत्रसंन्यासी' होऊन राहिले. ज्ञानोत्तर भक्तीने गुलाबराव महाराजांचे मानस अत्यंत चोखटे. परमशुद्ध, उपाधिरहित एकपणा न सोडताच दोनपण लेऊन क्रीडा करणारे. अशा या अवतारी महासिद्धपुरुषाचे ठायी ज्ञानेश्वर माऊली क्षेत्रसंन्यासी होऊन राहिलेले. क्षेत्रसंन्यासी म्हणजे आमरण क्षेत्र सोडून न जाणारे. सत्यसंकल्पी संन्यासी. माऊली असे गुलाबराव महाराजांचे रूपाने म्हणूनच वावरणारे एक चालते-बोलते रूप. केशवराव देशमुखांची जोग महाराजांचा दाखला देणारी ओवी आहे.

***'जोग महाराज वर्णन करिती । खात्री झाली ऐसे म्हणती । प्रत्यक्ष ज्ञानेश्वरमूर्ति । प्रगटली म्हणती जगात ।'***

काहींनी, आता, ज्ञानेश्वर माऊलींनी निवृत्तिनाथांसह आम्हास साक्षात्कार देऊन प्रत्यक्ष भेटून आमच्या ज्ञानेश्वरीत काही न्यून राहिलेय, आमचं सांगायचं काही राहून गेलंय म्हणून आम्ही मदत करतो, तू त्या न्यून दूर करणाऱ्या ओव्या लिही म्हणून ज्ञानेश्वरांच्या ओवीबरोबर आपल्या ओव्याही घालून (ठळकपणे) ज्ञानेश्वरी अर्थ स्पष्ट केलाय. बिचारे एकनाथ. त्यांचा ज्ञानेश्वरीनंतरचा शेवट आठवावा. त्यांना माऊलींनी हे कार्य सांगितले नाही. त्यांच्या परंपरेतील कुणाला हे न्यून ध्यानी नाही आलं. असो. माऊलींनी सांगितली भावार्थदीपिका. निवृत्तिनाथांना न्यून जाणवले नाही. जाणवते ते तर पसायदनाला हात उभारून आशिर्वाद देते ना.

गुलाबराव महाराजांच्या साहित्य लेखातले एक लेणं म्हणजे त्यांचा 'प्रेमनिकुंज ग्रंथ'. भगवद् पूज्यपाद शंकराचार्यांनंतर शांकरतत्त्वज्ञानाच्या भामती प्रस्थान आणि विवरण प्रस्थान अशा दोन शाखा झाल्या. भामती प्रस्थानाने व्यतिरेक प्राधान्य अनुसरून भक्तीला ज्ञानाचे साधन मानले. तर विवरण प्रस्थानाने भक्तिची ज्ञानोत्तर आवश्यकता प्रतिपादली. मधुसुदन सरस्वतींनी तर भक्तीला पंचमपुरुषार्थ म्हणून गौरविले. थोडाफार मतमतांतराचा गलबला झाला. वेदांत शुष्क झाला. तेव्हा भगवान श्रीकृष्णच ज्ञानेश्वर माऊली म्हणून आले. आणि त्यांनी शुष्क झालेला वेदांत मधुर केला. या माऊलींच्या कार्याला अनुलक्षून गुलाबराव महाराज प्रेमनिकुंजात म्हणतात.

***येणे ज्ञानोत्तर भक्ति । वाखविली मधुराद्वैती । हा उपकार जाहला वेदांती । अभूतपूर्व ॥***

भगवंताचे सगुणसाकार स्वरूप परब्रह्माप्रमाणेच ओतप्रोत (Through & Through) सच्चिदानंद स्वरूप आहे. या सगुणसाकार स्वरूप धारणतेमुळे अद्वैतात उणेपणा येत नाही. भगवंताचा लीलाविग्रह स्वरूप देह असून त्यात पाचभौतिकतेची लेशमात्रही मिसळ नाही. भगवद्देह मायाकार्य नव्हे. जीवन्मुक्त अवस्थेत ज्ञानोत्तर भक्ति, स्वभावतः तर खरीच, पण तत्त्वतःसुद्धा होते. एवढेच नव्हे तर ही सगुणसाकार भगवंताची ज्ञानोत्तर भक्ति अनिवार्य आवश्यक असून ही तशी केल्यासच परमानंद अखंड राहून, ना ज्ञानाची ना भोक्तृत्वाची जाणीव उठण्यास अवसर मिळतो. आणि अकृत्रिम सहजावस्था ('माझिये सहजस्थिति भक्ति नाम.' ज्ञाने. माऊली) याचि देहा याचि डोळा रहाते. मग व्युत्थानात व्यवहार होवो वा न होवो. निर्विकल्पता अखंड राहून जीवन्मुक्तीच विदेहमुक्ति होऊन जाते. अशी ही ज्ञानेत्तर भक्ति.

याचा सांगोपांग उहापोह आम्ही 'बापरखुमोदेविवरु' मासिकातून एका दीर्घ लेखमालेच्याद्वारा करीत आहोत. इच्छुकांनी त्याचा लाभ घ्यावा.

या प्रेमनिकुंज ग्रंथातून जो ज्ञानोत्तर प्रेमभक्तीचा लाहो गुलाबराव महाराजांनी मांडला आहे, त्यातील दुसऱ्या प्रकरणात सेव्य विचार पूर्वपक्ष उत्तरपक्षपूर्वक व अनेक युक्तींच्या द्वारा महाराजांनी मांडला आहे. त्याचे अंशतः ग्रहण करण्यासाठी या लेखाचे प्रयोजन.

ज्या स्वरूपाची ज्ञानोत्तर भक्ति करायची ते श्रीकृष्णस्वरूप हे महाराजांचे सेव्य. त्याचा विचार तो सेव्यविचार.

कदाचित् असे वाटण्याचा संभव आहे की हा ग्रंथ केवळ ज्ञानीयांसाठीच असावा. महाराज तसे मानीत नाहीत. ते म्हणतात.

***'श्रीकृष्ण कथेची आवडी चिती । असलिया अधिकारता पूर्ती । मग मुक्त मुमुक्षुबद्धाप्रति । श्रवणार्थी ना न म्हणे ॥१-१०***

भागवताच्या दशमस्कंधाच्या पहिल्या अध्यायातील चतुर्थ श्लोकाचा भावार्थ असा आहे.

निर्वासन लोकांकडून गायिला गेलेल्या, भवरोगाचे औषध असलेल्या, कान व मन यांना गोड वाटणाऱ्या अशा उज्वल कीर्ति भगवंताच्या गुणापासून - गुणानुवादापासून कोण बरे निवृत्त होईल? तसा निवृत्त होणारा आत्मघातीच म्हटला पाहिजे.

मूळ संस्कृत शब्द आहेत १) निवृत्तवर्ष म्हणजे निर्वासन अर्थात् मुक्त. २) भवौषधात् हे पद मुमुक्षूंना भगवद्‌गुणानुवाद हाच एक उपाय आहे असे सुचविते. ३) श्रोत्रमनोभिरामात् हे पद विषयी लोकांना देखील गोड वाटणारा हा श्रेष्ठ विषय आहे असे दर्शविते. एवंच मुक्त मुमुक्षु विषयी या तिन्ही तऱ्हेच्या लोकांमध्ये कोणालाही गुणगानाच्या संबंधात कंटाळा येणार नाही असा श्रीधरी टीकेचा आशय आहे.

भागवताच्या दशम स्कंधाच्या १४ व्या अध्यायातील ५ व्या श्लोकाचा भावार्थ आहे -

हे सर्व व्यापक परमेश्वरा ! पूर्वी योगी असून देखील अनेकांनी सर्व व्यवहार तुला समर्पण करून या सर्वकर्मसमर्पणरूप भक्तीने - कथानुवाद भक्तीने - आत्मज्ञान प्राप्त करून घेतल्यानंतरच्या भक्तीने परमश्रेष्ठ गतीचा लाभ, सर्वसुखलाभ करून घेतला. भक्तीने ज्ञान आणि तदनंतरच्या भक्तीने सर्वसुखलाभ असा भाव.

गुलाबराव महाराज म्हणतात, अनधिकारी सांगण्यासाठी

***'परी आवडी पाहिजे मोठी । आवडी नसता पोटी । तरी सर्वगुणसंपन्नही शेवटी । अनधिकारी तो । १-२०.***

***म्हणून***

***'ब्राह्मणापासून म्लेच्छान्त । अधिकारी सर्व मनुष्यजात । गुण ऐकता प्रेमजळे भरत । नेत्र जयाचे । १-२२'.***

***'कृष्णप्रेमा ज्याचे चित्ती । तो साधुमूर्ति अधिकारी ।'***

सर्व सौंदर्याची खाणी तो शारंगपाणी. त्याला पाहून बद्धाची दृष्टी हारपते. विषयदोषांनी पोळले. निर्गुणाच्या पाठी धावून काही आकळले नाही, असे मुमुक्षु सगुण श्रीहरीचरणी विसावतात. व्यतिरेकाने मायाद्वेष येतो. आणि एक प्रकारे द्वैत गळ्यात पडते. म्हणून मुक्तही साकार जगन्निवासाला अन्वयाने भजतात. म्हणून

***'बद्ध मुमुक्षुमुक्ता । सारखी गोविंद वार्ता.'***

इथे गोविंदच सेव्य आणि त्याचाच यौक्तिक विचार. म्हणून आपणा सर्वांसाठी हा सेव्य विचार प्रपंच.

भगवान श्रीकृष्णाबद्दल गुलाबराव महाराज प्रेमनिकुंजाच्या दुसऱ्या बल्लीत (अध्यायात) एक सिद्धांत मांडतात.

***'सौंदर्याची सीमा । तो हा अनभ्यस्त हरिपाद विवर्त महिमा । म्हणोनि तेथेचि प्रेमा । आमुचा असो'***

श्रीकृष्ण ही सौंदर्याची सीमा. याहून दुसरे अधिक सुंदर काहीही नाही. असा पहिल्या चरणाचा भाव. उरलेल्या चरणातील भाय इतरत्र प्रतिपादू. आपला मुद्दा सौंदर्याबाबतची मीमांसा करून श्रीमहाराज सिद्ध करतात.

मूळ आहे तो ब्रह्मानंद. आपणास दृग्गोचर होणाऱ्या सृष्टीत त्याची अभिव्यक्ती मर्यादित सौंदर्याला प्राप्त होते. कारण इथे द्वैत आहे. मात्र

सर्वव्यापक असणारा ब्रह्मानंद आनंदांश प्राधान्य न्यायेकरून स्फुरून आहार्य एकदेशियता पांघरून (ज्यामुळे अद्वैत मोडत नाही कारण ही साकारता सत्तेत नसते. विषम सत्तेत असते.) भक्त-भगवंत न्यायाने साकारतो. तेव्हा त्या भगवंतस्वरूपात - श्रीकृष्ण स्वरूपात सौंदर्य अमर्यादित असते. कारण व्यापकता सुटलेली नसते. पूर्णता जशीच्या तशी असते. पाण्यावर स्फुरणाऱ्या लहरीच्या स्पर्शाने आधारभूततेने सर्वव्यापक पाण्याचा तेवढा भाग देशपरिच्छेद न होता साकारणाऱ्या पाण्यासारखा. म्हणूनच सौंदर्यप्रचिती पूर्णतेने. आनंद म्हणून प्रेमोल्हास त्यास कारण हे भगवंताचे पूर्ण सौंदर्य. असा हा सिद्धांत. इतर अवतारांच्या अनुभूतीत अवतारकार्याच्या सापेक्षतेमुळे थोडी मर्यादा पडते. श्रीकृष्ण स्वरूपात अशी मर्यादा पडत नाही म्हणूनही सौंदर्य असीम. हाही भाग गुलाबराव महाराज युक्तीने सिद्ध करतात. पण विस्ताराभयास्तव आम्ही तो इथे तरी मांडीत नाही.

ज्याच्या योगाने चित्ताचे आकर्षण होईल त्याला सौंदर्य म्हणावे अशी सुटसुटीत व्याख्या सौंदर्याची करता येईल.

स्थूल पदार्थांना आपण सत्य मानतो. केवळ तेवढेच सत्य मानणारे सत्यवादी म्हणतात की सौंदर्य हा सृष्टीतील पदार्थाचा स्वभाव आहे. सौंदर्य हे सृष्टीतील पदार्थात त्याचे आंगचेच असते. म्हणून त्यांना पाहिले असताना त्या पदार्थाचे ठायी सौंदर्य प्रतीत होऊन त्या पदार्थापासून आनंद होतो.

परंतु हे म्हणणे समीचीन नाही. कारण एकच पदार्थ कधी कोणाला प्रिय वाटतो, तर तोच पदार्थ इतरांना कधी द्वेष्य तर कधी उपेक्ष्य वाटतो. कोणतीही गोष्ट-पदार्थ स्वभावतः सौंदर्यवान असती तर त्या पदार्थापासून तशी प्रचिती सदैव यावयास हवी. आनंद सदैव यावयास हवा. आनंदात परिणती होत नसेल तर सौंदर्याचे अस्तित्व मानता येणार नाही. कारण चित्ताकर्षणाचा अभाव. एकच सामान्यतः सौंदर्यवती स्त्री-व्यावहारिक सौंदर्यसंपन्न स्त्री तिच्या पतीस सुखकारक, (भानगड बहाद्दर असल्यास त्याला सुद्धा दुःखकारक) सवत असल्यास तिला दुःखदायक, तर वैराग्य आलेल्यास उपेक्ष्य. अग्नि शीतकाळी प्रिय, उन्हाळ्यांत द्वेष्य. दूर पर्वतावर उपेक्ष्य. उपयोग असेल तर धन प्रिय. चोरभय प्राप्त झाले तर द्वेष्य, तर दीनांना उपेक्ष्य. स्वभावतः सौंदर्य वस्तूत असते तर त्याची प्रचिती सर्वकाळ आली असती. त्यात काळसापेक्षता, व्यक्तिसापेक्षता आली नसती. ज्यांना सौंदर्याचे ॲवार्ड मिळतात त्यांना सर्वजण सौंदर्यवान म्हणतीलच असे नाही. केवळ व्यक्तिसौंदर्य घेतले तरी आपण फोटोजेनिक, भावजन्य, गुणजन्य असे भेद मानतो. म्हणून त्यातही तरतमता रहाते. एवंच पदार्थ स्वभावतःच सौंदर्यवान असतात हे म्हणणे बरोबर नाही.

ज्या वस्तूचा आपणास उपयोग, ज्यापासून आपला स्वार्थ, अडचणीवाचून सहजभोग्य तिथे सौंदर्य असेही म्हणता येत नाही. भूतदया, विरक्ती यांच्या तर वर्णनापासूनही आनंद होतो. असे काव्य, असे लेखन सौंदर्यपूर्ण वाटतेच. मूळ पदार्थापेक्षा कधी चित्रापासून अधिक आनंद प्रत्ययतो. म्हणून मूळ पदार्थापेक्षा प्रतिमेचे ठायी सौंदर्य मानावे काय? वरसंशोधनास निघालेल्या वधु पित्याच्या खिशात वधूचा फोटो असतो तो पाहून मुलीच्या सौंदर्याची कल्पना करावी तर प्रत्यक्षात मुलगी पाहिल्यावर वेगळाच अनुभव. मात्र वाघाची जरी भीती वाटते तरी त्याचे चित्र सौंदर्यदायक वाटते. स्वतःचा स्वभाव स्पष्ट असलेल्या मूळ पदार्थात सौंदर्य नसून त्या पदार्थाच्या चित्रभासात सौंदर्य मानण्यात सौंदर्याचे ठायी केवळ आभासता येते. आभास खोटा तर सौंदर्य खोटे. मग त्यापासून आनंद कसा? आभास म्हणजे सौंदर्य नसून आभासाचे ठायी असणारा सत्वगुण त्याला सौंदर्य म्हणावे तर खोट्या आभासाचा सौंदर्य हा खरा गुण मानावा लागेल. खऱ्याचे खोटे अधिष्ठान कसे मानायचे? सत्य असा जो मूळ पदार्थ त्यात जो सौंदर्यगुण नाही, तो त्या पदार्थाच्या आभासात चित्रात काय म्हणून आणि कसा यावा? मूळ द्रव्याचा गुण आभासत न आला तर आभास मनोमय-काल्पनिक नाही का ठरणार? सौंदर्य मनोमय म्हटले तर सृष्टीच्या चित्रांत सृष्टीचे सौंदर्य आहे हे म्हणणे व्यर्थ ठरेल. मन चंचल असताना समाधान नसते. समाधान नसूनही सौंदर्य मनोमय कल्पिले तर त्याचे अस्तित्व गृहीत धरावेच लागेल. मग सौंदर्याची प्रचिती असूनही आनंद नाही असा विपर्यास होईल. तिरस्कार्य स्थिति असली म्हणजे समाधानाची वृत्ति नसते. तिथेही सौंदर्य आहे म्हणायचे काय?

जेथे चित्त एकाग्र होऊन सुख होते तिथे सुंदरता असा साधा न्याय.

शालीन सात्विकतेच्या सहजाविष्कार असणाऱ्या सुलोचना ताईंच्या सौंदर्याला कोण लुब्धावत नाही? लुब्धावले नाही? आता दूरदर्शनच्या सार्वभौम आक्रमणतेच्या काळात शारीरिक उत्तानपणाचे प्रदर्शन करणाऱ्यांचा (आम्ही नावे घेत नाही) सौंदर्यवती म्हणून गवगवा होतोय ना. पुनः ज्याच्या चित्ताला अशाही ठायी चित्ताकर्षण होणार नाही तिथे तो सौंदर्य मानणार नाही. सौंदर्याचा मग ते व्यक्तिसापेक्ष असो, पदार्थ सापेक्ष असो, की वर्णन सापेक्ष असो त्याबाबतीत चित्ताकर्षण निरपेक्ष नियम बांधणे म्हणूनच कठीण-अशक्यच.

थोडा काळ ज्याची प्रचिती येते ते सौंदर्य गौण. जे सौंदर्य नित्य रहाते ते प्रधान वा नित्य सौंदर्य. सौंदर्यात विविधता आढळते, वैचित्र्य आढळते, ते मूल चैतन्याचे अभिव्यक्तीत द्वैतमूलक - विविधता मानल्यामुळेच. पुनः पुनः देश कालपरिच्छिन्नतेतून व्यक्त होणारी ही अभिव्यक्तिच वैचित्र्याची जनक होय. खंडिततेची जनक होय.

ज्या परब्रह्माची सच्चिदानंदपणाने प्रचिती येते त्या परब्रह्माच्या तशा मूळ चैतन्य स्फुरणाची मायेने मर्यादित एकदेशियता मानल्याने तशीच अभिव्यक्ति होणे हीच सौंदर्याची - आपणास प्रचित होणाऱ्या सौंदर्याची मूलभूत उपपत्ति. मायाद्रव्य ही या परब्रह्माची सत्‌स्वरूप अभिव्यक्ति. शक्तित्वादिगुण (मायाजन्य) चित्‌ या अंशाची अभिव्यक्ति तर सौंदर्य (मायाजन्य) ही आनंदांशाची अभिव्यक्ति. अज्ञानाने या सर्वांचा खंडित अनुभव येतो. मूळ स्वरूपाचा जसाच्या तसा अनुभव येत नाही. सारांश सौंदर्य मर्यादिततेने प्रचित होते. अभिव्यक्तीचे ठायी असणाऱ्या सत्वगुणाच्या योगाने पण वेदांतार्गत फलव्याप्ती न्यायानुसार ही अभिव्यक्ति होते. सात्विक सत्वगुणाचा आश्रय घेऊन मन जेव्हा एकाग्र होते तेव्हा परब्रह्माचा प्रियत्वगुण अभिव्यक्त होतो. तेच सौंदर्य. ही अभिव्यक्ती पूज्य पदार्थाचे ठायी होते तेव्हा सौंदर्य अधिक वाढते. पुनः तिथे माता, पिता, पति, पत्नी असा महत्त्वाचा संबंध जडला की तेच सौंदर्य अधिकाधिक वाटू लागते. (व्यभिचारी व्यक्तीस त्या नातेसंबंधाने) हा न्याय सृष्टीतील सर्व पदार्थांना लागू पडतो.

व्यतिरेक समाधीत सुख स्वतःपुरते चित्ताच्या एकाग्रतेमुळे भावतेच. तेच अन्वयाने सर्व व्यापकरूपाने प्रतीत होते. अज्ञानात वृत्तिविहारास आत बाहेर असा देहअवधि असतो. आत्मज्ञानोत्तर अन्वय भक्तीत देह अवधि प्रत्ययच नाही. ती गुलाबराव महाराजांच्या प्रीतिनिर्तन ग्रंथात सांगितल्याप्रमाणे 'वृथा बुझावणी'. आत्मप्रेम आणि आत्मीयप्रेम असा भेद रहात नाही. वृत्तिस्फुरणामुळे प्रेम उल्हसतच असते. कारण अन्वयभक्तीतल्या

स्फुरणात आनंदांश स्फुरण प्राधान्यता असते.

— भागवतोत्तम नाथ महाराजांची श्रुति आहे

***'म्हणे मज मिया आलिंगावे । मज मिया संभोगावे । मज मिया नियोगावे । स्वामी सेवकत्वे ॥ ए.भा. ३-७६.***

आत्मवस्तु जशी आपण आपणास पहावे म्हणून स्फुरून दोनपण पांघरून आपणच आपणास जाणते (ज्ञानप्रक्रिया) तशी आत्मवस्तु आत्मप्रेमस्फुरणाने आपणच आपला भोग घेण्याकरता दोनपण पांघुरते. यातील पहिल्या पांघुरण्यात एक प्रकारचा देशपरिच्छेद भासतो. प्रेमात जाणीव वा भोक्तृत्व उठतच नसल्याने देशपरिच्छेद दुसऱ्या पांघुरण्यात प्रत्ययत नाही. हाच भाव ज्ञानेश्वर माऊलीसुद्धा 'ते भोगिजे अनन्य । तेणेसी सदा ॥ अभं. ५.५२ या श्रुतीत सांगतात.

गुलाबराव महाराज म्हणतात,

***भ्रमे लोपता जरी प्रेमू । तरी हारपता विषयकामू । म्हणौनि चिवेशी प्रमू । आनंदी नव्हे ॥ प्री.न. १-१४.***

संसारात मी आणि माझे असे प्रेम. परमार्थात आत्मप्रेम. दोन्ही ठिकाणी प्रेम एकच. आत्मज्ञानाने संसाराची निवृत्ति, पण प्रेमाचा संकोच होत नाही. (म्हणून तर अज्ञानात देहावर ऐक्य करून प्रेम करतो ना) अंतःप्रेम तो आत्मा. नामरूपे अन्वयभक्ती तादात्म्याने ब्रह्मरूप प्रत्ययतात. तेव्हा सर्वव्यापक असणारे ब्रह्मच आनंदांशप्राधान्याने स्फुरून एकदेशिय इव एकदेशिय साकारता स्वीकारून भगवान श्रीकृष्णरूप लेते. इथे व्यापकतेचे भान न सुटताच एकदेशियता असते. प्रेमवृत्ति जणू स्वतःलाच दोभागी वाटते. आणि सागरतरंगाप्रमाणे क्रीडते. स्फुरणावेगाने आनंदाकडून आनंदाकडे वाहणे घडते. त्याचा आविष्कार अंतःकरणईव स्फुरणाकार धरणाऱ्या करणात घडतो तेव्हा आनंदांश रसरूपतेला पावतो. घनीभूत होतो. आणि आतील (मानीव) स्फुरणाकाराला-उल्हासाला सामोरा होतो तो बाह्य (मानीव) रसरूप साकारभाव. एक भक्तभाव दुसरा भगवंतभाव. भगवान श्रीकृष्ण भाव. खूप विस्ताराने हा तत्त्वज्ञानात्मक विचार आम्ही 'बापरखुमादेविवरु' मासिकातून मांडत आहोत. इथे विस्तारभयास्तव अधिक लिहिणे उचित ठरणार नाही.

सेव्यविचारातले साकारणारे असे हे श्रीकृष्णस्वरूप म्हणूनच साकार तरी निराकारही. सगुण तरी निर्गुणही. पाण्यात बर्फ नसेल. निर्गुण स्वरूपात सगुणता नाही प्रत्ययणार. (व्यतिरेक अनुभव) पण बर्फात पाण्यावाचून काय आहे? सगुणात निर्गुणताच असते. इथे उपाधि नाही. उभयस्वरूपे निरुपाधिक. पूर्णतः सच्चिदानंदमात्र.

असे हे सर्वव्यापक श्रीकृष्णस्वरूप म्हणूनच परिपूर्ण सौंदर्यस्वरूप सौंदर्याची सीमा. दृष्टी उघडी असो की मिटलेली. अखंड अनुभवास येणारे स्वरूप.

त्या ठिकाणी प्रेम का नाही रहाणार? शिवाय प्रेमास युक्ति लागत नाही कारण ते मूलभूत स्फुरण. ज्ञानपूर्व वा ज्ञानोत्तर अवस्थेत प्रेम रहातेच.

म्हणूनच गुलाबराव महाराज म्हणतात.

***बद्धमुक्त मुक्ता । सारखी गोविंदवार्ता***

इथे अशी एक शंका मनात येऊ शकते की वैराग्यावाचून आत्मज्ञान प्राप्त होत नाही. वैराग्य विषयप्रेमाच्या विरोधी. मग ज्ञानोत्तर प्रेम कसे संभवेल ! ही शंका समुचित नाही. कारण यद्यपि वैराग्य प्रेमाविषयी अनादर निर्माण करते तरी ते मिथ्या असणाऱ्या विषयावरील प्रेमाविषयी. भगवत्प्रेमाविषयी अनादर उत्पन्न होत नाही. आईस परमेश्वर समजून ज्ञानसाधना करणाऱ्यास आत्मज्ञान झाल्यावर तो पुढे आईला लाथा मारताना आपण पहातो काय? मग मिथ्या नसणाऱ्या सच्चिदानंदमात्र असणाऱ्या व्यापकता न सोडता अव्यापक इव सगुणसाकार रूपाने प्रतीत होणाऱ्या श्रीकृष्णस्वरूपाविषयी अनादर कसे निर्माण करील? वैराग्य दोषदर्शनाने होत असते. ज्ञानोत्तर भगवत्प्रेम तर प्रारब्धाचा अभिभव करते. तो तर ज्ञानाहंता जिरविण्यासाठी - अविद्यालेश राहू न देण्यासाठी आवश्यक. मग या भगवंतप्रेमाविषयी अनादर कसा निर्माण होईल? उलट प्रेमाचाच उल्हास असल्याने ते आवेगाने अधिकोत्तर वाढीने धावणार नाही का? म्हणूनच ज्ञानेश्वर माऊलीसुद्धा म्हणतात, 'ऐसीयाहि', म्हणजे ज्ञानाची अवस्था प्राप्त झाल्यानंतरसुद्धा 'स्वामीभृत्य संबधा' म्हणजे आत्मज्ञानोत्तर सेव्यसवेकभावाने 'लागी उठती श्रद्धा', प्रेमभक्ति होते. आणि 'देवोचि नुसधा कामविजे' म्हणजे कामुक कामभावनेने सैरावैरा व्हावा तसा उभयपक्षी देवच मग क्रीडतो. याशिवाय सूतसंहितेचे प्रमाण देऊन महाराज भावार्थ सांगतात, की बाधिताकाररूपाने देखिले ज्याची शिवपूजादिकांचे ठिकाणी स्वभावतःच प्रियबुद्धी रहात नाही तो खरोखर ज्ञाती नव्हे तर भ्रमिष्ट आहे. एवंच अशी शंका घेऊन आपण आपणास भ्रमिष्ठांच्या यादीत सामावू नये. अध्यस्ताचे ठिकाणी वस्तुतः आदर उत्पन्न होणे कठीण. भगवद्विग्रह रज्जु सर्पाप्रमाणे अध्यस्त सुवर्ण अलंकाराप्रमाणे अनध्यस्त आहे. सुवर्ण अलंकार जसा सुवर्णाभिन्न नाही असे कळूनही स्वविशेषत्वाने अवशिष्ट रहातो आणि अलंकारच अधिक प्रिय वाटतो तसा भगवद्विग्रह ज्ञानाने सच्चिदानंदघनच कळूनही स्वविशेषत्वाने - आनंदांशप्रधान स्फुरण न्यायाने अवशिष्ट रहातो आणि अधिकच प्रेमप्रत्ययी रहातो.

ही ज्ञानोत्तर भक्ति लोकसंग्रहार्थ संभवनीय नाही कारण लोकसंग्रहात लोकांना नियमपूर्वक साधनाचा मार्ग दाखवायचा असतो. भक्तीतले वर्तन संगनिषेधपूर्वक उन्मत्तवत् असते. भक्ताचे चित्त द्रवीभूत होते ते श्रीकृष्णलीला कथाश्रवणाने, लोकसंग्रह म्हणून नाही. दयेनेसुद्धा नाही. ज्ञानोत्तर भक्ताचे ठायी शेष प्रारब्ध भोगवशात दयावृत्ति स्फुरतेही. पण अवघ्या वृत्तींचे समर्पण श्रीकृष्णचरणी होत असल्याने तेच अवगुंठन रहाते. दया नियामक होत नाही. ज्ञानोत्तरभक्ति स्वतःसिद्ध, सहजावस्थारूप, परब्रह्मच रसरूपता ल्यालेले त्याला कुणाची नियामकता? हे प्रेम श्रीकृष्णच देतात. त्यात लीला करतात. रममाण होतात. भोक्तृत्वसुद्धा उठू देत नाहीत. कारण प्रेमरसधारा तैलवत अखंड बरसते.

श्रीकृष्णस्वरूपाची महाराज नित्यता सिद्ध करतात.

अविद्या उपाधीत पडलेले जे ब्रह्माचे प्रतिबिंब तो जीव. त्या प्रतिबिंबाचे जे मूळ ब्रह्मरूप बिंब तोच श्रीकृष्ण वासुदेव होय. हा शुद्ध आत्मरूपच. सर्वव्यापक असणारे परब्रह्म नित्य स्फुरद्रूप (अमृतानुरूप) ते तसे स्फुरून (अज्ञान असताना जसे देहामुळे द्रष्टादृश्य भावात्मक प्रत्ययते, तसे ज्ञानोत्तर सर्वच ब्रह्म असे ज्ञान असल्याने स्फुरते तेव्हा) सर्वव्यापकपण तसेच ठेवून प्रिया प्रियभावाला प्रेमामुळे प्राप्त होते. स्फुरण नित्य म्हणून प्रिया प्रियभाव नित्य. बिंबरूप प्रियभावात्मक, श्रीकृष्णस्वरूप नित्य. एका ज्ञान्यासाठीच नव्हे तर स्फुरणमात्रतेमुळे चिद्विलासात्मक लीला असल्याने अनेकाकार स्फुरणामुळे त्यातलाही प्रियभाव नित्य. एकाची एका ज्ञानीभक्ताची जीवनन्मुक्तता संपली तरी रहाणारी नित्यता. शरीरासहाची नित्यता. कारण

शरीरही सच्चिदानंदघनच असते. तेथे माया सत्व, रजतमगुणात्मक प्रकृत्तीचा प्रादुर्भाव नसतो. जीवशरीराची विविधाकारता प्रत्ययली तरी श्रीकृष्णसाकारतेत शारीरिक वैविध्य रहात नाही. एकजीववाद-अनेक जीववाद, बिंब-प्रतिबिंबवाद याचा यासाठी तात्त्विक उहापोह आवश्यक. या विषयाचा आवाका मोठा. एकाच लेखात आणण्यासारखा नाही. मात्र *एवढे सिद्ध की भगवान श्रीकृष्णस्वरूप इथून तिथून सारखे आणि नित्य.* म्हणून तर त्यासाठी आत्मप्रेम जसेच्या तसे जडते ना, त्या गोपीमनमोहन श्रीकृष्ण चरणी.

भगवान श्रीकृष्णतनु हे मायाकार्य नव्हे. मायिक नव्हे. हा मुद्दा गुलाबराव महाराजांनी फारच विस्ताराने प्रेमनिकुंजाच्या सेव्यवल्ली नामक दुसऱ्या प्रकरणात तत्त्वज्ञानाच्या घटित भाषेत पूर्वपक्ष उत्तरपक्ष रूपाने खंडनमंडन स्वरूपाने चर्चिला आहे. त्याचा आता विचार करू.

श्रीकृष्णस्वरूपाने शरीरासह असणे हे जरी विवर्त म्हणून ब्रह्माहून दुसरे रूपाने भासते तरी हे दुसरे रूप ज्ञानाने निवृत्त होत नाही. म्हणून ते अध्यस्त नसून अनध्यस्त म्हटले जाते. ते शरीर जरी भिन्नाप्रमाणे (भिन्नईव) तरी शुद्ध ब्रह्माहून अभिन्न सत्य द्वैत (अस्तित्व आणि वस्तुस्वरूपाने भिन्नपण) उत्पन्न करण्यास कारण होत नाही. ते पृथकईव आहे. साक्षात् पृथक् नाही. तुच्छ म्हणून निराकरणीय तर मुळीच नाही. ते असत् नव्हे सदसत् असे उभयरूप नव्हे. सत् असत् विरोधरूप ते एके ठिकाणी कसे प्रत्ययतील? मायाकार्य नव्हे. मायाकार्य ज्ञानाने नाश पावते. भगवतशरीर ज्ञानाने नाश पावत नाही. सुवर्णाचे ज्ञान झाले तरी अलंकार काही नाश पावत नाही तसे रज्जुचे ज्ञान झाल्यावर सर्प सर्वथा नाश पावतो तसे भगवद्शरीर नाही. ईश्वरास नित्य ब्रह्मज्ञान - भगवान श्रीकृष्ण तर मुसावले परब्रह्म. त्यांचे ठायी अज्ञान कुठले? अज्ञान नाही तर मायाजन्य असा पाचभौतिक देह त्याला कसा प्राप्त होणार? भगवान श्रीकृष्ण म्हणतात.

'जन्मकर्म च मे दिव्यम्'. भगवद पूज्यपाद शंकराचार्य दिव्यम् चा अर्थ करतात अप्राकृतम् - प्रकृतिजन्य नाही असा. सत्वरजतम हे गुण प्रकृतिचे. सत्वरजतमगुणजन्य भगवंताचा देह नाही.

प्रकाशरूप सूर्याचे ठायी जसा अंधःकार नसतो तसे सच्चिदानंदघन श्रीकृष्णाचे ठायी त्रिगुणात्मक माया नाही. त्याची शक्ती वा तिचा आविर्भाव (लीलाविग्रह) सच्चिदानंदस्वरूपच. मी अज्ञानी अशी जी जीवाची स्वतःबद्दलची अनुभूति हीच भ्रांतीरूप त्रिगुणात्मक माया. ही जीवाने मानलेली. जीव या त्रिगुणात्मक मायेलाच परमेश्वराची शक्ति समजतो. आपल्या जन्मकर्माचे कोडे उलगडताना भगवंत या जीवाच्या समजुतीचा अनुवाद करून मी त्रिगुणात्मक मायेला स्वाधीन ठेवून जन्म घेतो (प्रकृतीम् स्वाम् अधिष्ठाय) असे म्हणतात. त्रिगुणात्मक मायेपासून मायाजन्य असा माझा जन्म आहे असे म्हणत नाहीत. वस्तुतः अशी माया श्रीकृष्णस्वरूपाचे ठायी मूलतः म्हणजे परब्रह्मस्वरूपी तर नाहीच पण श्रीकृष्णअवतार काळासाठीसुद्धा मी आणि माया असे द्वैत भगवंत मांडत नाहीत. भगवंत, त्याची साकारता नित्यच. माया तो जन्मला असे भासविते. माया त्याला जन्मवित नाही. जन्मला असे भासविते. तेवढेच तिचे कार्य. द्रव्यरूपाने ती भगवदाविर्भावात नांदतच नाही. द्रव्य सच्चिदानंदच. सत्वरजात्मक पांचभौतिक नव्हे.

संसाराचे मूळ अज्ञान. माऊली म्हणतात, 'नाही अज्ञानावाचोनि मूळ.' आणि अज्ञान म्हणजे 'स्वरूप नेणणे जे धनंजया' अज्ञान्याची सुखाकरता कर्मप्रवृत्ति. तो आत्मविस्मृतीमुळे आपले मीपण देहावर ठेवतो. फलाशेने अहंकारपूर्वक कर्म करतो. अशा कर्मातून प्रारब्ध आणि प्रारब्धामुळे जन्ममरण परंपरा अशी साखळी. त्यातून देहाची प्राप्ती ती पाचभौतिक देहाची. आत्मज्ञान झाले म्हणजे फलाशापूर्वक कर्माचरण घडत नाही. निष्काम कर्माचरण घडते. साहजिकच क्रियमाण प्रारब्ध घटत नाही. ज्ञानाने संचित जळते. मात्र प्रारब्धभोग (देह धारण असेतोवर भोगावे लागणारे प्रारब्ध) *भोगोन्मुख प्रारब्ध असेतो जन्म असतो. एरवी जन्ममरणपरंपरा टळते.* अज्ञानावाचून पाचभौतिक देहाची प्राप्ती होत नाही असा वेदांत सिद्धांत आहे. श्रीकृष्णभगवान शुद्ध बुद्ध नित्यज्ञानी अवाप्तकाम. त्याचे ठायी आत्मविस्मृती रूप अज्ञान मुळीच नाही. मग फलाशापूर्वक कर्म कसे घडणार? अज्ञान नाही. साभिलाष कर्म नाही. म्हणून कसलेच संचित क्रियमाण, उपभोगोन्मुख प्रारब्ध नाही. मग पाचभौतिक देहाची प्राप्ती कोठली? मग श्रीकृष्णतनुला मायाकार्य कसे म्हणणार? तो लीलाविग्रह. ओतप्रोत सच्चिदानंदस्वरूप. लहरीसंस्पृष्ट सागराच्या भागासारखा ज्याची सर्वव्यापक अस्फूटता कायम राहून लहरीच्या अपेक्षेने साकारता भासते. सर्वत्र अस्तित्व वस्तुत्वरूपाने पाणी. हे दोनपण समसत्तेतल नाही. विषमसत्तेतल. समसत्तेतील दोनपण पूर्ण असते. यामुळे दुःखप्राप्ती होते. विभ्रमसत्तेतील दोनपण आहार्य-मानीव असते. यातील विरोधाभास (एकपण दोनपण) आनंद निर्माण करणारा असतो. साहित्यातही विरोधाभासाला आपण अलंकारात स्थान देतो. इथे दोनपण पूर्ण नसते. एकपणाचीही भक्तीने जाणीव उठत नाही. म्हणून व्यापकता फुटत नाही. मायेने अविच्छिनता खरोखरी इथे नाहीच. म्हणून भगवद्देह मायाकार्य नाही.

घरदार आदि अचेतन वस्तूची प्राप्ती आपणास आपल्या प्रारब्धातून होते. आपल्या प्रारब्धातून भगवदेह मानल्यास तो घरदार यासारखा जड होईल. भगवंताला जड कसे म्हणणार? जड सर्व अचेतन म्हणून ज्ञान नसताना तसे मानल्यास त्याला सुख-दुःख मानावे लागेल. त्याला सुखदुःख तर भगवंतालाही सुखदुःख, नित्यज्ञानी भगवंत त्याला प्रकृतीजन्य सुखदुःख मानायचे याहून अपसिद्धांत कोणता? अतएव भगवद्देह मायाकार्य मानता येत नाही. सचेतन वस्तूशी आपला व्यवहार होतो तो परस्परांच्या प्रारब्धांतून. परस्परांचे प्रारब्ध म्हणजे ईश्वरास प्रारब्ध. तो तर नित्यज्ञानी. त्याला प्रारब्ध कोठले? ईश्वराचा देह प्रारब्धजन्य मानल्यास त्याला जीवावस्था मानावी लागेल. जीवाची उपासना श्रुती सांगत नाहीत म्हणून ईश्वराचा देह पांचभौतिक मायाकार्य ठरविता येत नाही.

भगवंताच्या तनुचे उपादान कारण चैतन्य-आनंद आहे. त्यात चैतन्य-आनंदच ओतप्रोत भरलेला आहे. त्याचे निमित्तकारण मात्र जीवाने मानलेली माया अगर मुक्तांना-ज्ञानीभक्तांना प्रत्ययणारी भगवंताची आनंदांशसाकारता आहे. निमित्त कारण दोन प्रकारचे असते - एक अनुगत निमित्त दुसरे निवृत्त निमित्त. सारथी असल्यावर रथ चालणे या अनुभवात सारथी अनुगत निमित्त कारण. कुंभार घटाचे निवृत्त निमित्त कारण. घटाची निर्मिती झाल्यावर कुंभार नसला तरी घट असतोच. निमित्ताने ईश्वर अवतारधारण करतो. निमित्त संपले की अंतर्धान पावतो. ऐतिहासिक श्रीकृष्णस्वरूप हे याचे उदाहरण. इथेसुद्धा ज्ञान असणाऱ्या पांडवांनाच श्रीकृष्ण भगवंत वाटत होते. इतरांना नव्हते. एरवी शिशुपाल वध करण्यास कसा सरसावला असता. तो भगवंताला मनुष्य मानीत होता म्हणूनच ना. ज्ञानोत्तर भक्तीने श्रीकृष्णभगवान आधी हृदयात साकारतात मग बाहेरही सर्वव्यापकपणे सर्व नामरूपात. कारण सर्वच नामरूपांना श्रीकृष्णभगवान

यावाचून दुसरा अर्थ - प्रचीतिभाव नसतो. हा श्रीकृष्णभगवान निवृत्त होत नाही - वृत्तिस्फुरण असतो. वृत्तिसाकार जीवन्मुक्ताला अखंड प्रत्ययतो.

असे हे भगवान श्रीकृष्ण स्वरूप मायिक-मायाकार्य नव्हे. त्याची सगुणत्वाने प्रचिती येते कारण त्याचे षड्गुणैश्वर्य अमर्याद, असीमित असते. तरी गुणरूपाने प्रत्ययते. मात्र असीम सौंदर्यात्मक असल्यामुळे परमानंददायी.

गुलाबराव महाराजांनी आम्ही वर केलेले विवेचन अनेक उपपत्ती, पूर्वपक्ष, उत्तरपक्षद्वारा सेव्यवल्लीत सिद्ध केले आहे. आम्ही सौलभ्यास्तव ओव्यांची उदाहरणे उद्धृत न करता सरलविचारात्मक असे मांडले आहे. एरवी विस्तार खूपच झाला असता.

या सेव्यवल्ली प्रकरणात गुलाबराव महाराज जीवईश्वर विषयींचे निरनिराळे वेदांतार्गत एकूण अकरा पक्ष उद्धृत करून त्यांची तात्त्विक समीक्षा करून ईश्वर शरीर हे मायाकार्य असे घटित होऊ शकत नाहीत असे तर्कतः प्रामाण्यपूर्वक सिद्ध करतात. गुलाबराव महाराजांनी तत्त्वज्ञानघटित भाषेत सिद्ध केलेली ही समीक्षा आणि त्यातून अनध्यस्त विवर्तात्मक भगवंत शरीराची केलेली सिद्धी हा भाग म्हणजे महाराजांची अतिशय मोठी अशी वैचारिक देन आहे. मूळ प्रेमनिकुंज ग्रंथातील हा भाग समजावयास, वेदांताचा चांगला अभ्यास नसेल तर, खूपच कठीण आहे. गुलाबराव महाराजांचे उत्तराधिकारी श्री. बाबाजी महाराज पंडित यांचे ज्येष्ठ चिरंजीव आणि तत्त्वज्ञान क्षेत्रातील ज्येष्ठ विचारवंत डॉ. वा. ना. पंडित यांनी आपल्या 'शांकर तत्त्वज्ञानात भक्तीचे स्थान' या ग्रंथात याचा उत्तम उहापोह केलला आहे. वाचकांनी तो तेथूनच अभ्यासावा. या अकरा पक्षांपैकी एका पक्षाचा इथे विचार करू. प्रत्येक पक्षाचा विचार करावयाचा झाल्यास केवळ त्यासाठीच एक स्वतंत्र लेखमाला लिहावी लागेल.

अंतःकरणांत प्रतिबिंबित जीव होय. तर अविद्येत प्रतिबिंबित ईश्वर होय. असे सर्वज्ञात्माचार्य संक्षेपशारिरकात म्हणतात. हा महाराजांनी उद्धृत केलेला सातवा पक्ष.

यावरील महाराजांची समीक्षा अशी.

हे म्हणणे योग्य नाही. कारण या पक्षामुळे अविद्येचे आवरण परमेश्वराचे ठिकाणी स्थापित होते. त्यामुळे परमेश्वर असर्वज्ञ होईल आणि आवृत्त झाल्यामुळे अधिष्ठानाच्या ज्ञानावाचून परमेश्वर बद्ध होईल. त्यामुळे जीव म्हणून संसारी. त्याला मुक्त होण्याकरता उपदेशाची अपेक्षा लागते आणि त्याला उपदेश करणारा दुसरा एक नित्यसिद्ध ईश्वर मानावा लागतो. तोहि ईश्वर. त्याला पहिल्या ईश्वराचा न्याय लागू व्हावयास हवा. अनवस्था प्रसंग त्यामुळे ओढवतो. पुनः ईश्वर बद्ध ठरल्यास, बद्धाने उच्चारलेले वाक्य प्रमाण होत नसल्यामुळे वेद अप्रमाण होतात. सर्वज्ञात्माचार्य ही साखळी कशी मानतील?

पुनः ज्ञानाने अविद्या निवृत्त होत असल्यामुळे अविद्येमध्ये पडलेले प्रतिबिंब जो ईश्वर तोही अर्थात निवृत्त होईल. मग जीवन्मुक्तांच्या भोगोन्मुख प्रारब्धाचे नियमन करणारा ईश्वरच कोणी राहणार नाही. प्रारब्धाने मर्यादित झालेल्या अविद्येच्या विक्षेप अंशाच्या ठायी जर प्रतिबिंब मानले तर अंतःकरण सुद्धा विक्षेपरूप असल्याने त्यातही प्रतिबिंबरूप परमेश्वर मानावा लागेल. असा मानल्यास एकाच ठिकाणी जीवरूप प्रतिबिंब आणि ईश्वररूप प्रतिबिंब या दोहोंची स्थिती झाल्यामुळे दोघांचे साकर्य होईल आणि मग जीवाला होणारे स्वर्गनरकादि भोग परमेश्वरालासुद्धा होतील. भिन्न भिन्न प्रदेश मानले किंवा अंतःकरण भिन्न विक्षेपाचे ठायी चेतन प्रतिबिंब ईश्वर मानल्यास अंतर्यामित्व ईश्वराचे ठिकाणी मानणाऱ्या श्रुतींची काय व्यवस्था लावणार? त्यांना बाध येईल.

अंतःकरणाचे शुद्ध सत्व आणि मलीन सत्व मानल्यास, माया अविद्येहून पृथक न ठरल्यास अनेक दोषांची परंपराच गळी पडेल.

'कार्योपाधिरयं जीवः कारणोपाधिरीश्वरः अशी श्रुती-त्याची व्यवस्था काय अशी शंका.

त्याला उत्तर असे.

प्रतिबिंबापेक्षिक बिंबत्वारोपावाच्छिन्न बिंबभूत तो परमेश्वर अशी आमची व्याख्या. अशा परमेश्वराचे ठायी जीवानेच जगत्कारणादिकांचा आरोप केलेला आहे. म्हणूनच तदुपहित तटस्थ लक्षण परमात्मा. अशी चैतन्याला संज्ञा. हे तटस्थ लक्षण, स्वरूप लक्षण नव्हे.

जीवाचा कार्योपाधि अंतःकरण हे स्पष्ट - यासंबंधी दुमत नाही.

तात्पर्य अविद्येमध्ये प्रतिबिंबित परमेश्वर हा पक्ष घटत नाही. पुनः सर्वच उपाधी नियमपूर्वक प्रतिबिंब संपादन करीत नाहीत. शाखा चंद्राचा उपाधि तो प्रतिबिंब संपादक होत नाही. किंतु व्यावर्तक होतो. त्याप्रमाणे जगत्कारणत्व ही उपाधि जीव, परमाणू याहून परमेश्वराचे व्यावर्तन करतो. चैतन्याचे प्रतिबिंब संपादन करीत नाही. म्हणूनसुद्धा अविद्येत प्रतिबिंब तो परमेश्वर हा पक्ष तर्कतः घटत नाही. असो.

या पक्षामुळे परमेश्वराचे शरीर हे मायाकार्य आहे. कोणत्याही इतर उपपत्तीतून सिद्ध होत नाही.

अतएव भगवद्देह मायाकार्य किंवा मायाजन्य नव्हे.

त्यातल्या त्यात सोपा पक्ष आम्ही इथे प्रतिपादिला (उद्धृत करून) आहे. इतर पक्ष उत्तरोत्तर न्यायघटीत भाषेत कठीण आहेत. स्वतंत्रपणे यांचा विचार जरूर करू.

या उदाहरणांवरून महाराजांची वैचारिक भर तात्त्विक बैठकीची भक्तीची (ज्ञानोत्तर) सिद्धता करण्यासाठी केवढी सूक्ष्म आहे हे लक्षात यावे.

भगवान श्रीकृष्ण स्वरूपाचे ठिकाणी माधुर्यालंबनत्व व पूर्णत्व. श्रीकृष्णाच्या रासलीलेवर येणारे आक्षेप. मूलभूत स्वरूप आणि अवतार म्हणूनही पूर्णत्व. याही विषयांचा उहापोह महाराजांनी या सेव्यवल्ली प्रकरणात केलेला आहे.

गुलाबराव महाराजांच्या सेव्यविचाराचा सारांश त्यांच्याच श्रुतीत सांगायचा झाला तर तो असा संक्षेपिता येईल.

*'शुद्धसत्वात आवरकत्व नाही । आणि स्थिरत्वे विक्षेप नसे काही ।*
*म्हणोनि आनंद अधिष्ठान लवलाही । जैसेचि तैसे शुद्ध भाते ॥१-११६॥*
*ऐसी सत्ववृत्तिस्तव पृथगिवपण । जे आनंदाधिष्ठानी चिन्ह ।*
*तेचि अनध्यस्तविवर्त सगुण ब्रह्म । श्रीकृष्ण अस्मन्नती ॥१-११७॥*
*म्हणोनि प्रतिबिंबापेक्षिक । बिंबत्वारोपावच्छिन्न देख । बिंबभूत ब्रह्म*
*निष्कलंक । अनध्यस्त विवर्त साकार ॥२-११५॥*
*कनकशुद्ध निराकार । भूषण अनध्यस्त विवर्त साकार ।*
*आणि लालित्य घटना भूषणाकृति वर । तैसे सर्व हरिगुण समग्र*
*अनध्यस्तविवर्त ।११६॥*
*कोणी अत्यंत साकार ब्रह्म म्हणती । ते निर्युक्तिक म्हणोनि उपेक्ष्य निश्चिति*
*।११७॥*

***सत्ता एक पारमार्थिक । परी पृथगिव प्रकार । प्रतिभासारोपावच्छिन्न देख । हा ज्ञानेश्वरभक्तिगोपनायक ॥ सेव्य निष्कलंक सकळिका ॥१९८॥***

कसा सेव्य?

गुलाबराव महाराज म्हणतात.

***म्हणोनि सगुणा श्यामसुंदरा । यशोदानंदना दीनोद्धारा । गोगोपवत्सला परमउदारा । आहार्याद्वैते सेविजे ॥***

याने पंचमपुरुषार्थ साधतो. त्याचा याचक साक्षात भगवान आणि दातारू भक्त.

मात्र यासाठी

***यालागी आळंदीश सेवा । हा अग्रहार वाटे देवाधिदेवा । याचकत्व रमाधवा । दातृत्व दासा ।***

याहून अधिक काय ते?

इत्यलम्

सद्‌गुरु, ज्ञानेश्वर माऊली स्वरूप स्कंददासनाथचरणी हा लेखनरूपी अग्रहार समर्पण असो.

**श्री. भालचंद्र भास्कर बुर्से**

ओंकार सोसायटी, स्टेशन समोर, दीनदयाळ रोड, डोंबिली (प.)

# श्रीगुलाबराव महाराजांचे विभूतिमत्व

***आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः । आश्चर्यवच्चैनमन्यः श्रृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् । (श्रीगीता २ × ११)***

## (ओव्या)

वरील भगवद्‌उक्तीचें प्रत्यंतर । मजलागीं लाधलें साचार । वऱ्हाड प्रांतीय सत्पुरुष थोर । श्रीगुलाबरावांसी देखतां ॥१॥ प्रथम भेटी सरसें । प्रेम उपजलें अपैसें । "ज्ञानेश्वर माउली" ऐसें पिसें । जडलें देखतां वाचेसी ॥२॥ ज्ञानोबावरी माझे प्रेम अति । आणि तैंचि कानीं ऐकतां उक्ति । प्रेम वाढलें सहज स्थिति । उपासनेच्या ऐक्यानें ॥३॥ पाहो तरी जन्मांध स्थिति । शूद्र वर्ण जन्म जाति । वर वर दिसे असंस्कृत मति । खेडवळासी व्यवहार ॥४॥ ऐसी प्रतिकूल परिस्थिति । ज्ञानाचें साधन ना संपत्ति । घडली नाहीं संत संगति । श्रीनारदा प्रमाणें बाळपणीं ॥५॥ परि घडाघडां मुखांतूनि । सकळ शास्त्रें ओसंडोनि । येंता नवल वाटे मनीं । किती तरी आश्चर्य ॥६॥ तैसेंचि ज्ञानेश्वरी प्रवचन । ओवीबद्ध निरूपण । असखलित प्रवाह चालला पाहून । थक्क झालें मन माझें ॥७॥ मग मी पुसिलें तयांसी । ज्ञानसंपत्ति लाधली कैसी । ज्ञानेश्वरीचे अध्ययनासरसी । कार्यसिद्धि झाली म्हणताती ॥८॥ इयें जन्मीं अंधपण । म्हणतां ज्ञानेश्वरीचें अध्ययन । केलें कैसें सत्यवचन । आम्ही मानावें निर्धारें ॥९॥ तंव बोलति हांसून । पूर्व जन्मीचें तपाचरण । ये जन्मीं फळलें आम्हां लागून । श्रीज्ञानेश्वर कृपा प्रसादें ॥१०॥ त्यांची कन्या मी असून । कृष्ण परमात्म्यासी वरून । अखंड ऐक्यासी पावून । नित्य कांता भजनानें ॥११॥ ऐसा वृत्तांत ऐकिला । मनीं नवलावो वाटला । सहवासावरी हेतु जडला । कैशापरि साधेला ॥१२॥ (पुण्यांत आमच्या घरीं :—) महाराज राहती उमरावतीस । माझी वस्ति नित्य पुण्यास । दोघांचा नित्य सहवास । अशक्य वाटों लागला ॥१३॥ परि आळंदी यात्रे निमित्त । सालेसालं पुण्यासि येत । ती संधि साधोनि नित्य । भेटीं घेवूं लागलों ॥१४॥ जोग महाराज वर्णन करिती । खात्री झाली ऐसे म्हणती । प्रत्यक्ष ज्ञानेश्वर विभूति । प्रगटली म्हणती जगांत ॥१५॥ एकदां महाराज भेटिसी आले । राजकारण बोलूं लागले । म्हणति शक्तिवीण वांया गेले । प्रयत्न आजवरीचें ॥१६॥ पूर्वकाळीं धनुर्विद्या । अस्त्र मंत्र शस्त्र साध्या । भारतमाता विश्ववंद्या । घातलें विश्व पायातळीं ॥१७॥ सांप्रत गेले सर्व लया । कांही करितां नये उपाया । म्हणाल तरी आणीन ठाया । प्राचिन विद्या सकल ॥१८॥ अगाध ज्ञानाची खूण । सर्वांसी पटवून देवून । पुढें निघालें जातों म्हणून । आळंदीस दर्शन ॥१९॥ परतोनि पुन्हां भेट झाली । भाषण चर्चा बहुत केली । प्रमुख मंडळी भेटून गेली । सर्व आश्चर्य चकित झाले ॥२०॥ ग्रंथांतरीचे दाखले । कोणे ग्रंथीं काय लिहिलें । ते अचूक सांगति वहिलें । खरे खोटे निवडती ॥२१॥ ग्रंथावरी बहुत हव्यास । ग्रंथ मिळविण्याचा सायास । ग्रंथ घेवूनि बसती सावकाश । संग्रहामाजीं ठेविति ॥२२॥ सहज पुशिलें एकवेळ । ग्रंथ संपादनीं कासया तळमळ । स्वतः दृष्टी नसतां केवळ । जवळ घेवून कां बसतां ॥२३॥ लोकांस प्रमाण दावावया । ग्रंथ जवळी लागति असावया । ग्रंथी लिहिलें समजावया । वेळ नलगे अणुमात्र ॥२४॥ (आमचे चुलते डॉ. नानासाहेब देशमुख एम.ए.एम.डी., मुंबई यांच्या घरी सतत दहा दिवसांचा मुक्काम) सर्वांशी संभाषण विनोद । अनेक शास्त्रांवरी चर्चा अमर्याद । चालूं होतां वादविवाद । प्रसन्न मनें आघवियांची ॥२५॥ संगीतशास्त्र, न्यायशास्त्र । वैधक आणि वेदांतशास्त्र । राजकारण, नीतिशास्त्र । मंथन झालें सर्वांचे ॥२६॥ त्या त्या विषयांतील पूर्ण तज्ज्ञ । प्रश्न करूं लागति मर्मज्ञ । उत्तरें बिनचूक समयज्ञ । पणें मिळतां डुल्लति ॥२७॥ ग्रंथांतरीचें पुरावे । पान पुस्तकांसहित द्यावे । पडताळुनि पाहतां व्हावें । सर्वकाळ चकित सर्वांनीं ॥२८॥ ऐसा नित्य महोत्सव । चालिला थोर अभिनव । नित्यनवा श्रोतृ समुदाव । जमु लागला प्रत्यहीं ॥२९॥ अलोट गर्दी होऊं लागली । विभूतिमत्वाची खात्री पटली । महाराजांची वृत्ति उठली । म्हणती गांवीं जावूं आतां ॥३०॥ दहा दिवस मुक्काम पडला । सर्वांचा भ्रम फिटला । अद्‌भुत दर्शनाचा सोहळा । मनमुराद भोगिला ॥३१॥ प्रत्यक्ष नव्हे जरी ईश्वर । तरी ईश्वरांशाचा भाग थोर । जवळी बाळगोनि असे हा नर । केलें कबूल सर्वांनी ॥३२॥ सारांश, आश्चर्यवत् दर्शन । सर्व आश्चर्यवत् संभाषण । आश्चर्यवत् घडलें श्रवण । सकल आश्चर्य होऊनि गेले ॥३३॥ आश्चर्य त्यांचें तयासी । तें कळों नये कवणासी । आश्चर्यांचि आश्चर्यासी । पावोनि थकित जाहले ॥३४॥ सद्‌गुरु ज्ञानेश्वर माउली । प्रेमपान्हा पाजूनि ओळली । भक्तिरसाची पुष्टी आली । ओसंडोनि सर्वांगीं ॥३५॥ श्रीज्ञानेश्वर कृपा थोर । मी तंव रंक पामर । तिहीं धरूनि माझा कर । जें लिहविलें तें लिहिलें ॥३६॥ आतां असो बहु बोलणें । न बोलणें तैंचि बोलणें । बोलीं बोलतां अबोलणें । ऐसें बोलणें बोलवा ॥३७॥

**"श्रीज्ञानेश्वरसुत."**

**श्री. केशवराव महाराज देशमुख**

# पीतांबराच्या पल्लवें । झाकियेलें दयार्णवें

एम. ए. पीएच. डी. प्रबंध विषय मधुरा भक्ती, नू. म. वि. मुख्याध्यापक. १७५ लहान-मोठे ग्रंथ प्रसिद्ध. शिवाय शालेय क्रमिक पुस्तके लेखन विषयांत विविधता. शिक्षण शास्त्रज्ञ, संत साहित्य अभ्यासक व विचारवन्त. शैक्षणिक व सामाजिक परिस्थितीच्या अभ्यासासाठी अमेरिका भेट. चित्रकार व चित्रकला संबंधित ग्रंथ प्रसिद्ध. संत विषयक वाङ्मयाचे १४ ग्रंथ प्रसिद्ध.

**शं**भर वर्षे उलटून गेली. अमरावतीजवळील माधान नावाच्या गावातील ही कथा. तेथे वसती बहुतेक मोहोडांची आहे. पूर्वीचे राजपूत वंशातील संस्कार लोप पावलेले. शिक्षणाचा गंध नाही. कशीबशी शेती करून उपजीविका करणे हेच एक काम मोहोडांचे. अशाच एका मोहोडांच्या घरात सन १८८१ मध्ये एक बालक जन्मास आले. नऊ महिन्यानंतर त्याची दृष्टी गेली. ते कायमचे आंधळे बनले. भोवती सर्वत्र अशिक्षित लोकांचा वावर. पण विदर्भाची माती अत्यंत मृदू व सकस. या लहान पोराच्या मनावर भगवद्कृपेचे बीज अनायासे रुजले व वाढले. कुणबी कुळात जन्म, स्वतः जन्मान्ध, शिक्षणाचा अभाव, कोणी मार्गदर्शन करणारा नाही सत्संग तर नाहीच; पण अशाही स्थितीत या पोरास ईश्वराचा ध्यास लागला. कृपादृष्टीची बीजे अंकुरताना दिसू लागली. या जन्मान्ध बालकाच्या प्रज्ञाचक्षूंमधून प्रत्यक्ष परमेश्वराची कृपा पाझरू लागली. या अंध बालकास ध्वनींचे ज्ञान उपजतच होते. बायकांच्या जोडव्याच्या व कंकणाच्या आवाजावरून कोणी आले तर ती ओळखीत असे. हा अंध पोरगा लहानपणी आजीजवळ वाढला. एकदा आजीने त्याच्यापुढे जेवायचे पान वाढले. पोरगा जेवेना. एके ठिकाणी दाराकडे टक लावून तो पाहू लागला. जन्मान्ध पोरगा काय पाहाणार? थोडे नवल वाटल्याने आजीने विचारले,

'गुल्या, हे काय रे? जेवत का नाहीस?'

'आजी, एक सुंदर लेकरू दाराशी उभे आहे. त्याला चार हात आहेत. त्याच्या डोक्यावर मुकूट आहे. कपाळास केशरी गंध आहे. कानात कुंडले आहेत. मुकुटावर मयुराचे पीस आहे. आजी त्याने माझे लक्ष वेधून घेतले आहे.'

अशा प्रकारचे विविध अनुभव लहानपणी मुलास आले. लहानपणीच त्याचे लग्न झाले. त्याच्या पत्नीचे नाव मनकर्णिका. व्यंकटेशस्तोत्र, शिवलीलामृत, ज्ञानेश्वरी यांची ओळख गुलाबरावांनी तिला करून दिली. त्यांना एक मुलगाही झाला. पण पत्नी लौकरच निवर्तली. गुलाबरावांचा संसार संपला. जगताच्याकडे एका नव्या दृष्टीने ते पाहू लागले. आधी काही दिवस त्यांना ज्ञानेश्वर महाराजांनी दृष्टान्त देऊन स्वतःच्या मांडीवर घेतले होते. ज्ञानेश्वरांचा आज जो फेट्यासहीत फोटो पहायला मिळतो, त्याचे मूळ या स्वप्नातील दर्शनात आहे. गुलाबरावांनी ज्ञानेश्वरांना स्वतःचे पिता मानले. ते ज्ञानेश्वरांची कुलीन कन्या व कृष्णाची पत्नी म्हणून वावरू लागले. सतत ध्यान ज्ञानेश्वरांचे व श्रीकृष्णाचे त्यांना होते. पोरगा घरची शेतीवाडी करीत नाही म्हणून घरचे लोक नाराज झाले. गुलाबराव घरातून बाहेर पडले. डोक्यावर ग्रंथांची पेटी घेऊन वणवण प्रवास केला. अनेकांकडून वाचून घेतले. त्यांची स्मरणशक्ती जबर होती. श्रीकृष्ण व ज्ञानेश्वरतातांच्या संगतीत त्यांना कधीही न संपणारी सुखद सावली लाभली. एखाद्या साध्वीप्रमाणे ते सौभाग्यचिन्हे धारण करू लागले. त्यांनी केस वाढवून वेणी घातली. कपाळावर कुंकू लावले. गळ्यात मंगळसूत्र घातले. सांख्य, योग, वेदान्त, वैद्यक, संगीत इत्यादी विषयांचे त्यांनी अध्ययन केले. डोळस जगास मार्ग दाखविणारे लहान-मोठे अनेक ग्रंथ त्यांनी लिहिले. एखाद्या विद्यापीठास शोभेल असा ग्रंथसंग्रह जमा केला. अमरावतीस आज तो सुरक्षित आहे. संप्रदाय सुरतरू, पत्रव्यवहार, व्यवहार धर्मबोध, अलौकिक व्याख्यानमाला, भागवतरहस्य, प्रेमनिकुंज, अभंगगाथा अशा किती म्हणून ग्रंथांची नावे सांगावीत?

उपास्य दैवताबद्दल गुलाबरावांच्या अंतःकरणात उदंड प्रेम होते. काही भक्तजनांबरोबर गुलाबराव एकदा आळंदीस ज्ञानेश्वरांच्या समाधीची पूजा करीत होते. दुधादह्याने समाधीस माखले जात होते. भक्तजनात पांगारकर होते. मध्येच गुलाबराव म्हणाले, 'लक्ष्मणराव, हातातील अंगठी जरा बाजूस काढून ठेवा. सोन्याची असली तरी तातांच्या अंगाला ती बोचते आहे.'

पांगारकर चपापले. या अंध माणसाची निष्ठा पाहून बोटातील अंगठी त्यांनी काढून ठेवली. पांगारकर, चौंडेबाबा, केशवराव देशमुख इत्यादींचा व गुलाबरावांचा मोठा लोभ होता. ज्ञानेश्वराची एखादी ओवी पांगारकरांनी म्हणावी व गुलाबरावांनी हजार एक ओव्या मुखातून स्वतःच्या अशा ज्ञानेश्वरांच्या कृपाबलावर उच्चाराव्यात, असे अनेक प्रसंग सांगता येतील. या ज्ञानेश्वर कन्येने एकदा अभंगात म्हटले, 'पूर्वी प्रल्हादाची आर्तता पुरविली म्हणून मी अयोध्येस गेले. तर रामरायांना कैकयीने वनात पाठविले होते. त्यामुळे त्यांची भेट झाली नाही. पुढे कृष्णावतारी गोकुळात गेले तर देवास अक्रूराने मथुरेस नेले होते. पंढरपुरात गेले तेव्हा मूर्ती अनागोंदीच्या राजाने नेली होती. पण या आळंदीत मात्र माझे दुर्दैव संपले. ज्ञानराज तातांच्या कृपेचा मेघ कारूण्याच्या धारांचा वर्षाव सतत करू लागला.' या अलौकिक अनुभूतीच्या अनेक भावरम्य छटा गुलाबरावांच्या अभंगातून व पदांतून प्रत्ययास येतात. दयार्णव प्रभूने त्यांच्यावर आपल्या पीतांबराच्या पदराने सतत छाया कशी केली हे थोडक्यात पाहू.

गुलाबराव श्रीहरीच्या रूपात नित्य रमलेले होते. ज्ञानेश्वर व कृष्ण यांच्या ध्यासात ते सदैव तृप्त होत राहिले. 'शरयूतीरी' राम कौसल्येचे बाळ । दिसे घननीळ मेघतनु' म्हणून त्यांनी रामप्रभूंचेही मनापासून वर्णन केले आहे. 'मोतियांचा हार गळा । आणि वैजयंती माला । हरि पाहावया डोळा । कळवळ अंतरी' असे त्यांनी म्हटले आहे. 'सुंदर ते ध्यान इंद्रायणीतीरी । सांवळी गोजिरी मूर्ति मध्ये' असा त्यांच्या मनास वेध होता. 'तुझी एक आशा लागलीया मना । नावडे कामना यात काही । सोळा वरुषाची मूर्ति गोजिरवाणी । पाहावी लोचनी वाटे माये' अशी लालसा त्यांच्या मनात सारखी होती. 'सुंदर ते ध्यान मायमांडीवरी । सावळी गोजिरी मूर्ति शोभे' या ध्यानात ते तृप्त होते. 'मूर्ति सावळी गोजिरी । चला पाहूं डोळेभरी । चिरोनिया पोट । आत बैसवू प्यारा वैकुंठ' अशी त्यांच्या मनाची धारणा होती.

सतत नामसंकीर्तन, भगवद्चिंतन, ग्रंथवाचन व श्रवण यांनी गुलाबरावांचे मन व्यापून गेले होते. त्यांच्या अनुभूतिपर अभंगातून नामसंकीर्तन, संतमहिमा, गुरुमहात्म्य, उपासना, करुणा, भक्ती, वेदान्त, श्रीकृष्णलीला, विरह, प्रेमकलह, योग अशा अनेक प्रकारांची उदाहरणे मिळतात. भक्तिशास्त्रातील एक सिद्धान्त असा आहे की, प्रभूच्या मीलनाचे सौख्य त्याचा विरह, वियोग किती झाला यावर अवलंबून आहे. जितके उन्हात तापून भटकाल, तितके सुख प्रभूच्या पीतांबराच्या छायेचे होते. रामकृष्ण परमहंसांना एकदा एकाने विचारले,

'स्वामी, ईश्वर मला केव्हा भेटेल?'

'गृहस्था', रामकृष्णांनी उत्तर देताना म्हटले, 'तू बायकापोरांसाठी रडतोस. पैशासाठी कष्टी होतोस. बढती मिळाली नाही की खिन्न होतोस. आवडते मनुष्य भेटले नाही की व्याकुळ होतोस. अशी आर्तता कधी प्रभूसाठी वाटली का? प्रभू आज भेटला नाही म्हणून तू कधी कष्टी झालास? उदास झालास? प्रभूसाठी कधी डोळ्यांवर आश्रू आले? आठवून पाहा. तू एक पाऊल प्रभूसाठी पुढे टाक. तो मायबाप स्वतः होऊन नऊ पावले तुझ्याकडे स्वाभाविक ओढीने चालत येईल.'

विरहाचे हे माहात्म्य गुलाबरावांच्या अभंगांवरून व पदांवरूनही ध्यानात येते. परमेश्वराच्या भेटीसाठी, मीलनासाठी जीवाची तडफड होते. तगमग होते. पाण्याशिवाय मासोळी जशी तडफडते तशी वेदना विरही भक्तास होत असते. तो प्रभूचे चिंतन करतो, त्याचे गुणगान करतो, त्याच्यावर रूसतो, रागावतो. कधी त्याचे वर्म तो काढतो. कधी प्रेमकलहात तो रंगतोही. 'रोषें प्रेम दुणवटे' हा ज्ञानेश्वरतातांचा भावार्थ गुलाबरावांनाही पटलेला असावा. 'जीव माझा कासावीस ! दृढ आस पायाची' असे त्यांनी म्हटले आहे. हा संसार पुरे आता. मी बेजार झालो आहे. 'तुजवीण मायबापा । कोण वारील त्रितापा?' असा आर्त पुकार गुलाबरावांनी केला आहे. 'येई येई माझे माय । पुरे अंत पाहणे' अशी विनंती प्रभूला करताना ते दिसतात. 'नलगे मुक्ति नलगे ते ज्ञान । नलगे साधन योगादिक... शपथ वाहोनी सांगतो निश्चय । वरों हे हृदय तुज एका' एवढ्या निर्वाणीवर ते येताना दिसतात. आम्ही अन्याय केला आहे. तरी देवराया तुम्ही आमचा स्वीकार केला आहे ना? मग 'आता अव्हेरणें दीना या पामरा । कैसे हें श्रीधरा तुम्हा शोभे' असा प्रश्न गुलाबरावांनी विचारला आहे. देवा मला मंत्र येत नाही. तंत्र माहीत नाही. विद्या नाही. वाक्‌चातुर्य नाही. 'नेहमी आंधळे न कळती ग्रंथ' कोणत्याही महंतास मी शरण गेलो नाही. पण मायबापा, ज्ञानेश्वरा, मजवर कृपा करा, असे ते वारंवार म्हणतात. 'मायलेकराची ताटातुटी करू नका' अशी ते विनवणी करतात. एकदा ते कळवळून म्हणतात,

*या आळंदीच्या तपा । आम्हां पिलियां चारापा ॥१॥*
*तुजऐसी माय गडे । तिहीं लोकीं न सांपडे ॥२॥*
*तिन्ही ताप निवसोनी । कावा नंदसुत् ज्ञानी ॥३॥*
*ऐसें यावें वरवान । केलें तनु मन अर्पण ॥४॥*
*स्वामी ज्ञानेश्वरताता । कृपाकर ठेवा माथा ॥५॥*

देवा, तुमच्याकडे मी कसा येऊ? मला मार्ग माहीत नाही. 'नाहीं अंगी विद्याबळ । नाहीं चातुर्य प्रबळ । नाहीं शुद्ध प्रेमभक्ति । नाहीं पुण्यकर्मशक्ति' आणि त्यात 'डोळे आंधळे साजणी । कैसे येतील चक्रपाणी?' ही मनात सतत चिंता. देवा, माझे आता सासर-माहेर तुम्हीच आहात. तुमचाच दृढ भरवसा मला आहे. 'देवा, कोठवरी माझा पाहतां जी अंत । स्वयें दयावंत म्हणवितां !' आणखी एकदा व्याकुळलेल्या अवस्थेत ते म्हणतात,

*कोठवरी अंत पाहसी केशवा? ।*
*पळ माझ्या जीवा धीर नाहीं ॥१॥*
*नयन आंधळे सांपडेना वाट ।*
*हातेरु चोखट नाहीं कोणी ॥२॥*
*आतां कवणाच्या पाहूं मुखाकडे ।*
*आणिक नावडे तुजवीण ॥३॥*
*ज्ञानेश्वरताता पायातली ठेवा ।*
*करवावी सेवा बलात्कारें ॥४॥*

देवा, मला भेट देण्यासाठी तुम्ही संकोच करता? मला तुमचे काही एक नको. तुमचे कैलास वैकुंठ मला काचेच्या तुकड्याप्रमाणे वाटते. मी त्याकडे क्षणभरही पाहात नाही. योगसिद्धी, कैवल्याचा ठेवा, हा सर्व अज्ञानाचा गोवा मला वाटतो. देवा, मी ज्ञानेश्वरांची शपथ घेऊन सांगतो की 'कोमल चरण हृदीं तुझे' राहावेत. प्रभु, मी तुझ्याशिवाय फार कासावीस आहे रे ! तुझे येणे कधी होईल? माझा जीव क्षणोक्षणी तळमळत आहे. गोपाळा, तू मला भेट केव्हा देशील? माझी काहीच करुणा देवा, तुला येत नाही? माझी जात नीच आहे. मला सत्संग नाही. माझी वृत्ती संशयी आहे. मला अधिकार नाही. मला पुराणे, वेदशास्त्र कळत नाही. पण श्रीहरी, मला छंद मात्र तुझ्याच नामाचा आहे. पण देवा, तुम्ही तुमचे ब्रीद सांभाळावे हे बरे. असे म्हणत असताना गुलाबरावांना एकदा एक चंदन पाखरू दिसले. त्याला उद्देशून निरोप देण्यासाठी ते म्हणाले,

*ऐक तूं एवढें चंदनपांखरा ।*
*निरोप माहेरा नेई माझा ॥१॥*
*पुण्याहुनि आहे गांव सहा कोस ।*
*पुसत वाटेस जाय तेथें ॥२॥*
*लक्षिजे दुरूनि सोन्याचा पिंपळ ।*
*बैसे अकुमाळ तयामूळीं ॥३॥*
*माझिये मायेस सांगावें एकांतीं ।*
*माझी ही विनंती प्रेमभरें ॥४॥*
*तुझिया कन्येतें सासुरवास मोठा ।*
*येऊं यावी पोटां कृपा काही ॥५॥*
*किती वेळ तुज माझा ये आठव ।*
*कांहीं गुप्त भाव पुसे सख्या ॥६॥*
*केव्हां धाडशील लवकरी मूळ ।*
*घेऊनी सकळ भाक येई ॥७॥*
*तुझे पतिराजा, वंदिते मी पाय ।*
*ज्ञानेश्वर माय भेटवावी ॥८॥*

अशी नाना प्रकारांनी विनंती श्रीहरींना करतात. प्रभु, तुम्हास हाक मारता मारता माझा कंठ सुकून गेला. माझ्या मुखास कोरड आली. नारायणा, तू माझ्याकडे लौकर धावून का येत नाहीस? देवा 'तुज बहु जण, मज तू एकला' हे तुझ्या ध्यानात येत नाही? श्रीहरी, तुझी विनवणी मी आता किती प्रकारांनी करू? 'आंधळे लोचन, पांगुळे चरण । बारा वाटा मन धांवतसे' हे तुझ्या ध्यानात येत नाही? मला सर्व दिशा शून्य झाल्या आहेत. माझे प्राण कंठाशी आले आहेत. रडून रडून डोळे गुंजांप्रमाणे लाल झाले आहेत. देवा हा जीव त्रासून गेला आहे. माझे पापताप देवा, आळंदीराया, तुझ्याशिवाय कोण रे दूर करणार? माझा जीव आता अगदी वेडापिसा झाला आहे. त्याला तुझ्याशिवाय काहीच आवडेनासे झाले आहे.

खरे कोणते, खोटे कोणते, हेही कळेनासे होत आहे. देवा, 'तुजविन कोण ये सांगाती?' 'डोळे भरूनिया पाहु तुज वाटे । आवडी ये मज नारायणा', 'कोण माझी लाज राखी तुजवीण । करुणानिधान माय-बापा'' 'जाहले आंधळे नयन फिरूनी । ने हातीं धरूनी वो विठ्ठले' 'करूं कोणता उपाय? । तुझे पाहावया पाय?' अशा अनेक वचनांतून गुलाबराव केवळ प्रेमाच्या अनुभूतीसाठी प्रभूस आळवितात. मग कधी त्यांना भलतीच शंका येते. ती परखडपणाने सांगताना ते म्हणतात,

*ठाऊक मी तुम्हां आंधळी गौळणी ।*
*येतां वृंदावनीं भय नये ॥१॥*
*परदेशा कामिनी बहु नारायणा ।*
*तुम्ही वृंदावना स्वयें नेतां ॥२॥*
*माझी काय तुम्हांवरी नाहीं सत्ता ।*
*ऐसें नंदसुता स्वयें सांगा ॥३॥*
*पितयाने माझ्या केलें कन्यादान ।*
*फळ त्याचे जाण ऐसें कैचें ॥४॥*
*धर्मी अर्थी कामीं न सोडीन वाणी ।*
*श्रीवीं चक्रपाणी, वेद साक्षी ॥५॥*
*तिये सांभाळणें तुमचे हें ब्रीद ।*
*साक्षचि गोविंद लेखितसा ॥६॥*
*नावडे मी तुम्हां तरी स्पष्ट सांगा ।*
*परतोनि श्रीरंगा जाते आता ॥७॥*
*आळंदी जाऊन सुखाने राहीन ।*
*चरण सेवीन श्रीगुरूचे ॥८॥*
*गुरुकृपें तुम्हां तेथेंही आणीन ।*
*ज्ञानेश्वर पूर्ण सत्तावंत ॥९॥*

इतकी मनाची तगमग झाल्यावर कधी तरी अकस्मात प्रभूची कृपा होते. सर्व विश्व प्रकाशाने उजळून निघाल्याची खात्री पटते. सर्व संशय फिटतात. किल्मिषे दूर होतात. मन तृप्त, शांत, प्रसन्न होते. सर्व यातना, वेदना थांबतात वा सुखरूप होऊन जातात. 'परमानंद मनीं । हरि देखिला नयनी । रूप सांवळें चिदबुंथी । पाहतां तुटे अहंग्रंथि ॥' असे होऊन जाते. एखाद्या दिवशी नवलच घडते. योग्याचे समाधिस्थान, शूळपाणीचे ध्यान असलेला श्रीहरी नाना गवळणींच्या सह वृंदावनात खेळताना दिसतो. तेव्हा 'रूप सुंदर सावळें । पाहुनियां गर्व पळे' अशी मनाची अवस्था होऊन जाते. 'देखियेला डोळा । निज ब्रह्मींची सोहळा ॥ रूप सांवळें सुंदर । या मानसमंदिरी' पाहिल्यावर मन तृप्त होते. हरिप्रेमाने भरून येते. 'सुंदर ते ध्यान हृदयकमळी । सगुण सांवळी मूर्ति शोभे' असा प्रत्यय आल्यावर मन संतुष्ट होते. अशा अनुभूतीची कित्येक उदाहरणे गुलाबरावांच्या अभंगांत आहेत. एक दोन पाहू.

*१) डोळां पाहिल्याचें सुख । तनू सावळी सुरेख ॥१॥*
*राधेसह गोजिरवाणी । काखे वेत्र वेणुपाणि ॥२॥*
*मन पाहाताचि निवे । ब्रह्म आकारलें नवें ॥३॥*
*ज्ञानेश्वर कन्येसाठीं । कांतमूर्ति ही गोमटी ॥४॥*

*२) आजि माझें पुण्य फळलें साजणी ।*
*देखिले आंगणि नारायण ॥१॥*
*अनंत जन्मांची सांपडली ठेव ।*
*चैतन्य सावेव पुढें उभें ॥२॥*
*नाकळे तें ध्यातां योगितांच्या ध्यानीं ।*
*तो हा चक्रपाणि डोळां दिसे ॥३॥*
*ज्ञानेश्वर कन्या पाहोनी विस्मय ।*
*जाहली निर्भय भवाविषीं ॥४॥*

*३) सोनियाचा दिन आज उगविला ।*
*हृदयीं देखिला यदुनाथ ॥१॥*
*ज्ञानध्यान सारें जाहलें चांगले ।*
*पाहतां सावळें डोळेंभरी ॥२॥*
*नारीनर झाले नारायणरूप ।*
*आळंदीचा भूप सर्वा ठायीं ॥३॥*

असे हे वेदांचे रहस्य डोळ्यांना, आणि ते अंध डोळ्यांना दिसल्यावर गुलाबरावांचे मन तृप्त, संतुष्ट होते. कधी असा सोन्याचा दिवस उजाडतो. अधरी मुरली, मंजुळ पावा ऐकून कान धन्य होतात. अशा मीलनानंतर गुलाबराव म्हणतात, 'देखियिला डोळा । जीव निवे एका हेळा ।' एका क्षणात तप्त जीव निवतो. केलियाचे फळ प्राप्त होऊन विश्वाचा धनी भेटतो. 'सांपडलें हातीं । पराधिया गोपीपति । तुज ऐसा कृपावंत । स्वामी असतांहि कान्त ॥२॥ या कुललाज सांभाळावी रिपुरदळें निर्दाळावीं ॥३॥ सख्या आळंदीच्या नाथा । ठेवितें त्वत्पदी माथा ॥४॥ अशा परमेश्वराच्या भेटीनंतर आपल्या सर्व पुण्यांचे फळ प्राप्त झाले. हा नंदनंदन सर्व सुखांचे अधिष्ठान आहे, असा प्रत्यय आला. 'भोगिता अवीट । त्यागिता जायेना' असे याचे मग स्वरूप बनते. संतुष्ट व तृप्त मनाने गुलाबरावांनी लिहिले आहे,

*सुकृताच्या कोटी । बहु दिसां झाल्या भेटी ॥१॥*
*विश्व गंगाजळ । जग ब्रह्मचि निर्मळ ॥२॥*
*प्रेमाचे पाझर । परमानंद निर्भर ॥३॥*
*ज्ञानेश्वरपायीं । पुण्यफळा मौन्य नाहीं ॥४॥*

नंदनंदनाच्या या भेटीचा सोहळा गुलाबरावांनी परोपरीने वर्णन केला आहे. 'सकळही सुख भेटे एकाएकीं । बैसविल्या अंकीं नंदसुतें । नलगे योग-ध्यान, नलगे अनुष्ठान । एक नारायण नाम पुरे ॥' अशी साक्ष त्यांच्या मनात पटते. हृदयाची तगमग वाढली, मनाची तडफड झाली व मग एकदम प्रकाशरूप प्रभू डोळ्यांना दिसला की सर्व संपले असेही नाही. पुन्हा काळोख येतो. पुनः जीवाची उलघाल सुरू होते. पुनः तगमग होते. पुनः भेटीचा, मीलनाचा आनंद होतो. विरहमिलनाच्या या चक्रातच भक्तांचा जीव रमतो. म्हणूनच त्यांनी 'मी भक्त तूं देव ऐसें करी गा' अशी प्रार्थना प्रभूस केली आहे. भर प्रखर उन्हात हा दयाघन प्रभू आपल्या पीतांबराने भक्तास सावली करतो, ही कल्पना नव्या पिढीस केवळ कल्पनाच वाटेल. यात वास्तव काय आहे? ... अशी शंका त्यांच्या मनात येईल; पण त्यांनी ध्यानात धरावे की आपले आईबाप, बंधू, भगिनी, पत्नी, इष्टमित्र हे सर्व प्रत्यक्ष दिसतात ना? पण ऐन प्रसंगी ते निवारा देतील याची खात्री आजकाल कोण देईल? पण भक्तिपंथाची वाटचाल ज्या गुलाबरावांनी केली ते मात्र अत्यंत आनंदाने व आत्मविश्वासाने म्हणतात की, या रखरखीत वाळवंटात प्रभूने माझ्यावर कृपा केली. कशी ते पाहा,

*पीताम्बराच्या पल्लवें झाकियेलें दयार्णवें ॥१॥*
*काळभय नाहीं आता । झाला मृत्युचि अन्यथा ॥२॥*
*निवळली तळमळ । वंदिता पदकमळ ॥३॥*
*स्वामी ज्ञानेश्वरराय । एकीएक दिला ठाय ॥४॥*

*('संतकृपा' मासिक यांच्या सौजन्याने)*

**डॉ. प्र. न. जोशी**
सामदा, डॉ. केतकर मार्ग, एरंडवणा, पुणे ४११००४.



# आरती

आरती समर्थ सद्‌गुरुची । संत श्री गुलाबरावांची ।
घेऊनी क्षात्र कुळी जन्म
विदर्भा केले तू धन्य
तुझ्या सम नाही जगि अन्य
प्रज्ञाचक्षु जगद्‌गुरुची । आरती समर्थ... ॥१॥

कृष्ण पति ज्ञानेश्वर तात
भक्तिमय हे मधुराद्वैत
शांकर ज्ञाने संयुक्त
पंचलतिका या गोपीची । आरती समर्थ.... ॥२॥

अकुंठित बुद्धि, कर्म शुद्ध
विपुल वाङ्मय तर्के सिद्ध
योग सामर्थ्य करी मुग्ध
योगिवर पांडुरंगनाथाची । आरती समर्थ... ॥३॥

वेदसिद्धांत सत्य वदण्या
समन्वय धर्माचा करण्या
जीव मात्रांना उद्धरण्या
व्यास-ऋषि अवतरले साचि । आरती समर्थ... ॥४॥

**आचार्य किशोर व्यास, पुणे.**

